मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक ७३ वें

# संसार असार!



ही कादंबरी

श्रीयुत विठ्ठल सीताराम गुर्जर

यांनीं लिहिली.

[ प्रथमावृत्ति ]

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी.

गिरगांव--मुंबई.

किंमत १-८-०. ] सर्व हक्क स्वाधीन. [ अक्टोबर १९१४.

मनोरंजन प्रेस, गिरगांव-मुंबई.

# दोन शब्द

विख्यात वंगकथालेखक श्रीयुत प्रभातकुमार मुकर्जी, बी.ए., बार-अॅट-लॉ यांच्या 'नवीन संन्यासी' नामक कादंबरींतील कथानकाला मराठी वेष देण्याचा प्रयत्न करून प्रस्तुत कादंबरी लिहिली आहे. केवळ बंगाल्यांतच नव्हे, तर सर्व हिंदुस्तानांत प्रभातबाबूंच्या तोडीचा कथालेखक एकादुसराच असेल ! 'वंगकथासाहित्याचे जादुगार' अशी संज्ञा प्रभातबाबूंना बंगाली टीकाकार देतात. प्रस्तुत लेखकाचा वंगवाङ्मयाशीं परिचय झाल्यापासून प्रभातबाबूंविषयीं त्याच्या मनांत अतोनात आदर उत्पन्न होऊन त्यांनीं लिहिलेली प्रत्येक ओळ तो परमादरानें आणि अत्यंत आतुरतेनें वाचीत आला आहे.

अशा ग्रंथकाराच्या जीवनचरित्राशीं परिचय करून घ्यावयाची प्रस्तुत लेखकाला आज कित्येक वर्षें उत्कंठा लागून राहिली होती. प्रचलित वंगवाङ्मयांत प्रभातबाबूंचें जीवनचरित्र कोठें तरी वाचावयाला मिळेल, अशी त्याला फार आशा होती; परंतु अद्यापि ती अतृप्तच राहिल्यामुळें, प्रस्तुत लेखकानें खुद्द प्रभातबाबूंनांच 'आत्मवृत्त' लिहिण्याचा आग्रह केला, आणि त्या प्रयत्नांत यश आलेलें पाहून त्याला अत्यंत समाधान वाटत आहे. प्रभातबाबूंचें हें 'आत्मवृत्त' पुढें दिलें असून प्रस्तुत लेखकाप्रमाणेंच वाचकांनाहि तें चित्ताकर्षक वाटेल, अशी त्याला उमेद आहे.

एका श्रेष्ठ वंगलेखकाचें आत्मवृत्त पहिल्यानें त्याच्या मातृभाषेंत–बंगालींत–प्रसिद्ध न होतां तें मराठींत प्रसिद्ध होत आहे, हा योग केवळ अपूर्व होय ! बंगालच्या उत्कृष्ट गुणांचा महाराष्ट्राला परिचय करून देऊन महाराष्ट्र आणि बंगाल या उभय

## दोन शब्द.

प्रांतांत स्नेहवृद्धि करावयाला झटणाऱ्या मनोरंजनाला हा योग साधतां आला, याबद्दल तर त्याला अत्यंत समाधान वाटणें साहजिक आहे. प्रभातबाबूंच्या या 'आत्मवृत्ता'चें बंगालींत भाषान्तर होऊन त्यावरून त्यांच्या चरित्राचा वंगवाचकांनां परिचय झाला, तर मनोरंजनाला त्यामुळें धन्यता वाटेल !

प्रस्तुत कादंबरीच्या चवदाव्या प्रकरणांत वर्णन केलेली 'पुताटकीची गोष्ट' खरी असल्याचें ऐकिल्याबद्दल आणि त्यांतील अनुभव आलेली व्यक्ति अद्यापि जीवंत असल्याबद्दल प्रभात-बाबूंनीं मुद्दाम उल्लेख केला आहे.

'नवीन संन्यासी' ही कादंबरी बंगालमध्यें अत्यंत लोकप्रिय झाली असून तिची तिसरी आवृत्ति निघण्याचा योग तिच्या जन्मापासून चार वर्षांच्या आंतच येत आहे. तिची ही महाराष्ट्र प्रतिकृतिहि महाराष्ट्र वाचकांच्या तशीच आदराला प्राप्त होवो !

आपल्या 'नवीन संन्यासी' कादंबरीचा उपयोग करण्याची प्रस्तुत लेखकाला प्रभातबाबूंनीं उदार हृदयानें परवानगी दिली; इतकेंच नाहीं, तर आपल्या इतर कृतींचाहि उपयोग करण्याची त्यांनीं त्याला परवानगी देऊन आणि आपला अमूल्य वेळ खर्चून आत्मवृत्त लिहून पाठविलें, व आपला अगदीं अलीकडचा फोटो देण्याचीहि कृपा केली, याबद्दल प्रस्तुत लेखक प्रभातबाबूंचा सदैव ऋणी राहील.

मनोरंजन कार्यालय,<br>गिरगांव मुंबई,<br>ता १० अक्टोबर १९१४.

विठ्ठल सीताराम गुर्जर.

# आत्मवृत्त.

माझे वडील प. वा. बाबू जयगोपाल मुकर्जी हे गुरोप खेड्यांतील रहिवासी. हुगळी जिल्ह्यांतील धात्रिग्रामचे रहिवासी प. वा. बाबू गोविंदचंद्र चतर्जी यांची कनिष्ठ कन्या कादंबिनीदेवी हिच्याशीं माझ्या वडिलांचा त्यांच्या सत्राव्या वर्षी विवाह झाला. या दोन्ही कुटुंबांची स्थिति मध्यमपैकींच असून थोड्याशा वडिलार्जित जमिनीच्या उत्पन्नावरच त्यांना उदरनिर्वाह करावा लागत असे.

माझे वडील बोलपुरला रेल्वे सिग्नलर असून त्यांना पगार अगदींच थोडा होता. माझी आई थोड्याच दिवसांत प्रसूत होणार, असें पाहून माणसांच्या मदतीच्या अभावामुळें माझ्या वडिलांनीं तिला धात्रिग्रामला माहेरीं पाठवून दिलें. तारीख ३ फेब्रुवारी १८७३ रोजीं माझ्या आईच्या पोटांत अतोनात दुखूं लागून क्षणोक्षणीं त्याची तीव्रता अतिशयच वाढत चालली. गांवच्या सुईणीला हें खटलें झेंपणार नाहीं, अशी भीति घरच्या मंडळीला वाटूं लागून कलन्या( पांच मैलांवर असलेल्या तालुक्याच्या गांवा)हून एखादी शिकलेली सुईण आणण्यासाठीं माझ्या आईचा भाचा जोगेश्वर हा तिकडे गेला, व सुईणीला घेऊन उषःकालच्या सुमाराला परत आला; पण तत्पूर्वींच एक तास माझा जन्म झाला होता.

त्या वेळीं माझ्या आजोळीं मुळींच घड्याळ नव्हतें; पण माघी सप्तमीला (दोन मैलांवर असलेल्या) 'गंगेवर प्रातःस्नानाला गांवची मंडळी निघाली होती,' अशा वेळेला माझा जन्म झाल्याचें वडील मंडळी सांगतात. यावरून ता. ४ फेब्रुवारी १८७३ रोजीं पहांटे सुमारें पांच वाजतां माझा जन्म झाला, असें ठरतें. माझी वडील मावशी वामासुंदरीदेवी त्या वेळीं म्हणाली "हा प्रभातकाळ झालाच. अशा वेळीं हा बाळ जन्मला आहे तेव्हां याला आपण '**प्रभातकुमार**' असें नांव ठेवूं या!"

माझें '**प्रभातकुमार**' हें नांव अशा तऱ्हेनें मला मिळालेलें आहे.

मी चार वर्षांचा असतांनाचा एक प्रसंग मला आठवतो. एके दिवशीं माझ्या धाकट्या मामांची छोटी मुलगी ईशानी हिला एका भिंतीशीं एका चिरगुटावर ठेविली होती. भिंतीच्या गिलाव्याची थोडीशी वाळू ओरखडून घेऊन अस्मादिकांच्या स्वारीनें बेलाशक बिचाऱ्या ईशानीच्या डोळ्यांत फेंकली! तिनें अर्थात्‌च मोठमोठ्यानें रडावयाला सुरुवात केली; त्याबरोबर तिची आई आणि इतर मंडळी धांवत आली. मला मजेनें हंसत असलेला पाहून त्यांनीं "कुणीं रे केलं हें!" ह्मणून मला विचारलें आणि मीहि प्रांजलपणें माझा पराक्रम कबूल केला. मला शासन करण्यासाठीं कोणी धांवत येत आहे असें पाहून मीं धूम ठोकली. धांवतांधांवतां बाहेरच्या पडवीच्या कोपऱ्यावर मी येतों, तों पाय निसरून जमिनीवर आपटलों, आणि माझ्या हनुवटीला खोंक पडली. या खोंकेची खूण अजूनहि माझ्या हनुवटीवर आहे—परंतु तेथेंच केसांचा लहानसा झुपका असल्यामुळें ती कोणालाहि दिसत नाहीं.

यानंतर कांहीं महिन्यांनीं माझ्या वडिलांनीं येऊन आईला व मला नवाढीला नेलें. माझ्या मातापितरांबरोबर बैलगाडींत बसून तिकडे निघाल्याचा देखावा अजूनहि मला स्पष्टपणें आठवत आहे. माझी मावशी वामासुंदरी आह्मांला निरोप देण्याकरितां दरवाज्याशीं उभी होती, ती मला उद्देशून ह्मणाली "बाबा, तुझी आई अन् बाबा जाऊं देत—तूं नको जाऊं—तूं रहा आमच्याजवळ!" तत्क्षणीं मी ह्मणालों "चूप रहा! तुझे दोन तुकडे करून टाकीन!" लहान असतां मी किती शांत व गोड स्वभावाचा होतों, याचें उदाहरण ह्मणून ही गोष्ट वडील मंडळी अजूनहि थट्टेनें मला सांगत असतात.

नवाढीला माझा 'हातखडी'चा विधि झाला. सरस्वतीपूजेच्या दिवशीं तेथल्या ब्राह्मण पोस्टमास्तरनें हा विधि केला. त्यानें माझ्या हातीं खडूचा एक तुकडा देऊन माझ्या हातून बंगाली लिपीचीं पहिलीं अक्षरें काढून घेतलीं. त्या दिवशीं हळदीनें माखलेलें धोतर नेसून इकडेतिकडे फिरत असल्याचें मला अद्यापि स्मरतें.

नवाढीला असतां माझें लग्न झालें—खरें नव्हे, खेळांतलें! माझी ही काल्पनिक वधू एक छोटी तीन वर्षांची वात्रट मुलगी असून तिचें नांव सरोजिनी असावें, असें मला अंधुकपणें स्मरतें. तिचे व माझे आई-बाप यांमध्यें खूब आत्मीयता होती. आपल्या मुलामुलींचा लहानपणीं असा खेळांत विवाह लावून आपली मैत्री दृढ करण्याची नवीच कल्पना त्यांच्या डोक्यांत आली! माझे व सरोजिनीचे वडील एकमेकांनां व्याही ह्मणत असत. अर्थात् आमच्या माता विहिणी झाल्या! एकमेकांकडून एकमेकांनां नजराणेहि जातयेत. आपल्या खेळांतल्या सुनेकरतां एका लाल साडीला काळी फीत शिवीत असलेल्या माझ्या मातेची मूर्ति अद्यापि मला दिसते आहे. सरोजिनी माझी खरीच बायको आहे, असा माझा मात्र समज होता.

नवाढीहून गाहमरला व तेथून दिनापुरला माझ्या वडिलांची बदली झाली. मी अकरा वर्षांचा होईपर्यंत आह्मी येथेंच होतों. मी सहा वर्षांचा झालों, त्या वेळीं माझीं दोनतीन बंगाली पुस्तकें झालीं असून मी प्यारीचरण सरकारच्या पहिल्या पुस्तकावरून इंग्रजी शिकावयाला लागलों होतों. आपल्याजवळ एक चाकू असावा, अशी या सुमाराला मला भारी इच्छा होती. माझ्या वडिलांपाशीं दोन पात्यांचा एक चाकू होता; पण ते त्याला मला हातहि लावूं देत नसत! या चाकूकडे मी अगदीं आशाळभूत नजरेनें पहात असें. रात्रीं चाकूंचा पाऊस पडला असून सकाळीं पहातों तों आमच्या अंगणांत चाकूच चाकू! ते घेऊन मी भराभर खिसे भरूं लागलों, असें एकदां मला स्वप्न पडलें होतें! एके दिवशीं बाबांच्या खिशांतून चाकू काढून घ्यावयाचा मोह मला कांहीं केल्या आवरेना! चाकू शाळेंत नेऊन मी तो ज्या त्या माझ्या सोबत्याला गर्वानें दाखवूं लागलों; पण आमच्यापैकीं एक मोठा मुलगा मला ह्मणाला "माझ्या खिशांत जी वस्तु आहे, तिच्यापुढें तुझ्या चाकूची किंमत ती काय?"

"काय आहे तुझ्या खिशांत?"

"वा! फारच गमतीची आहे ती वस्तु! तूं तर तशी जिन्नस साऱ्या जन्मांत देखील नसशील पाहिलीस!"

"मला दाखव-दाखव रे ती !"

तो लुच्चेगिरीनें ह्मणाला "छे छे! ती पाहून तूं अगदीं वेडा होऊन जाशील अन् माझ्यापासून हट्टानें घेशील."

त्याचीं पुष्कळ आर्जवें केल्यावर त्यानें आपली ती जम्मत मला दाखविली. ती जम्मत म्हणजे त्याला रस्त्यांत सांपडलेलें एक भिकार चित्र होतें. मी तर त्या चित्रावर अगदीं भाळून गेलों व चाकू बदलीं देऊन तें चित्र द्यावयाला त्याला आग्रह करूं लागलों. शेवटीं केवळ माझ्या आग्रहामुळें अगदीं नाखुषीनें एकदांचा तो या अदलाबदलीला कबूल झाला!

संध्याकाळीं बाबांनीं ऑफिसांतून येउन मला चाकूबद्दल विचारलें. पण मीं साफ नाहीं ह्मणून सांगितलें! बाबांनीं चाकू जिकडेतिकडे शोधून पाहिला, पण अर्थात्च त्यांनां त्याचा कांहीं शोध लागला नाहीं! त्यांनीं पुनःपुनः बाबापुता करून, धमकावून चाकूबद्दल मला विचारून पाहिलें, पण छः! माझा आपला एक नन्नाचा पाढा!

यानंतर दोनतीन दिवसांनीं मी बाबांजवळ पडवींत बसून अभ्यास करीत होतों, इतक्यांत बाबांच्या ऑफिसांतले वनमाळीबाबू तेथें येऊन ह्मणाले "जयगोपाळदादा! हा घ्या तुमचा चाकू !"

"अरे! तुम्हाला कुठें सांपडला हा ?"

"माझ्या मुलाच्या हातांत मीं काल रात्रीं हा पाहिला. आपला चाकू हरवला आहे, असें तुम्ही ह्मणत होतां. तुमचा चाकू आह्मी वारंवार घेत असल्यामुळें मीं तो पटकन् ओळखला. 'तुला हा चाकू कुठें सांपडला?' असें मीं मुलाला विचारलें, तेव्हां 'प्रभातनें मला हा शाळेंत दिला' असें तो ह्मणाला."

"काय रे? खरें हें?"

मी काय बोलणार? लज्जेनें खालीं मान घालून मी बसलों!

पुढे माझी ही चाकूची हौस पुरली. माझे मामा बांकीपुरला जेलर होते. त्यांच्याजवळ दोनतीन चाकू होते. त्यांनां त्यांपैकीं एक चाकू मला पाठवून देण्याविषयीं मीं पत्र पाठविलें. रविवारीं बांकीपुराहून येतांना

मामांनीं मला दिलेला चाकू बरोबर आणला. मला अत्यानंद झाला; पण बाबांनीं मला चाकू दिला नाहीं! 'मोठा झालास ह्मणजे देईन, आतां हातबोट कापून घेशील,' अशी त्या वेळीं खोटीच वाटणारी सबब मला सांगितली! आपण मोठे कधीं होऊं आणि तो चाकू-स्वतःचा चाकू आपणाला कधीं मिळेल, अशी उत्कंठा मला लागून राहिली होती!

१८८१ सालीं आमची खगोल येथील शाळा उठून मी घरींच अभ्यास करूं लागलों. नंतर मी बरहामपुरला मामाकडे गेलों; परंतु तेथें मी फार दिवस शाळेंत गेलों नाहीं. मामांची बांकीपुरला बदली होऊन आह्मी धात्रिग्रामला आलों. मी कलना येथील शाळेंत जावें असें ठरलें; परंतु तेथें मला ताप येऊं लागल्यामुळें बाबांनीं येऊन आह्मांला पुनः खगोल (दिनापुर)ला नेलें. येथें मी एक वर्ष होतों. येथें चापूनें खळणें आणि भटकणें हा माझा मुख्य धंदा होता. बाबांना यामुळें फार वाईट वाटून ते ह्मणत "मला चांगलें शिक्षण मिळालें नाहीं, ह्मणून मी ही तीस रुपये दरमहावर हमालगिरी करतों आहें. तूं चांगला शीक-ह्मणजे पुढें असें तुला रखडायला नको!"

यानंतर पांच मैलांवर असलेल्या दिनापुरच्या इंग्रजी हायस्कुलांत मी जाऊं लागलों. गंगेच्या तीरीं असलेलें एक घर साडेतीन रुपये भाड्यानें घेऊन बाबांनीं आईला व मला तेथें ठेवलें. एक मोलकरीणहि आमच्या शुश्रूषेकरतां ठेवून बाबा परत खगोलला गेले.

बाबांची नोकरी भारी गैरसोईची व त्रासाची असतांहि ते आमच्या समाचाराला कधीं पायांनीं, तर कधीं गाडींतून येत. माझ्या वाडेलांनीं माझ्या शिक्षणाकरतां जे कष्ट सोसले, ते अवर्णनीय आहेत! तीस रुपये पगारा-पैकीं सत्तावीस रुपये त्यांच्या हातीं येत. इतक्या पैशांत दोन संसार व माझ्या शिक्षणाचा खर्च निभावतांना बिचाऱ्यांना किती कष्ट पडत असतील, याची कल्पनाहि करवत नाहीं.

यासंबंधाचा एक प्रसंग मला चांगलाच स्मरतो. हिवाळ्यांत एके दिवशीं सडकून थंडी पडली होती. नेहमींप्रमाणें रात्रीं दोन वाजत

बाबांना नोकरीवर जावयाला उठवण्यासाठीं चपराशी आला, त्या वेळ बाबा खेदानें ह्मणाले " किती घाणेरडें माझें जिणें हें! माझ्या मुलाल मी असें शिक्षण देईन, कीं, त्याला कांहीं तरी स्वतंत्र धंदा करतां येई —त्याला कोणींहि ' इधर आव ' असें ह्मणूं नये! "

माझ्या परमपूज्य वडिलांची ही इच्छा पूर्ण झाली आहे. मला आत 'इधर आव' असें कोणालाहि ह्मणतां येणार नाहीं!

दिनापुरच्या या शाळेंतला पहिला दिवस मला चांगला आठवतो. मल दाखल करण्यांत आलेल्या पांचव्या वर्गांत मी सर्वांत लहान विद्यार्थी असू मी एकटाच बंगाली होतों. बाकीचे सर्व विद्यार्थी बहारी असून कित्येक तर माझ्यापेक्षां पांचसहा वर्षांनीं मोठे होते. तो इंग्लिशचा तास होता 'मॉरल क्लासबुक' आह्मांला नेमलें होतें. वर्गांत पंधरा मुलें असून मी शेवट होतों. सर्व विद्यार्थ्यांनीं वाचल्यावर मी वाचूं लागलों.

माझें वाचन संपतांच शिक्षकांनीं मला एकदम पहिला नंबर दिला. माझे उच्चार आणि वाचनपद्धति यांवर ते बहाल खूष होऊन गेले.थोड्याच दिवसांनीं परीक्षा होऊन मी चवथ्या वर्गांत चढलों.

दोनतीन महिन्यांनीं बाबांची जामुआला पस्तीस रुपयांवर बदली होऊन आह्मांला तिकडे जावें लागलें. तेथें शाळेची किंवा कसलीच सोय नव्हती. अर्थात् माझ्या शिक्षणांत पुनः व्यत्यय आला. जामुआला कांहीं महिने व्यर्थ घालविल्यावर जमालपुरला एका आप्ताकडे आम्हांला ठेवण्यांत आलें. बाबा एकदोन महिन्यांनीं तेथें येऊन एकाद दिवस रहात.

येथें चवथ्या वर्गांत असतां 'शाळेला झुकांडी देण्याची ललितकला' मीं शिकलों. शाळेच्या वेळेवर पुस्तकें वगैरे घेऊन घरांतून बाहेर मात्र पडावयाचें—परंतु शाळेंत न जातां दिवसभर शेतांत व टेंकड्यांवर खेळावयाचें, ओली चिंच खावयाची, तळ्यांत डुंबावयाचें, असा या वेळीं आमचा मोठा मौजेचा कार्यक्रम असे!

परंतु थोड्याच दिवसांनीं आम्ही ज्याच्याकडे राहिलों होतों, तो आमचा आप्त वारला, व आम्हांला परत जामुआला यावें लागलें.

नंतीन महिन्यांनीं माझ्या वडिलांनीं जमालपुरला एका आप्ताकडे मला ठेवून माझ्या शिक्षणाची सोय केली.

येथें गौरांग नांवाच्या एका वर्गबंधूशीं माझी जीवश्चकंठश्च मैत्री झाली. गौरांगाचे वडील तेथील लोकोमोटिव्ह ऑफिसमध्यें मोठे अधिकारी असून स्कूलकमिटीचे सेक्रेटरीहि होते. त्यांच्या घरीं माझ्या भावी बायकोचें मला प्रथमदर्शन झालें. त्या वेळीं ती आठ वर्षांची असून तिचा माझा जोडा चांगला शोभतो, असें तिचे वडील ह्मणत.

१८८८ सालीं मी भागलपुर येथें प्रवेशपरीक्षेला बसलों. परीक्षेनंतर मी दिनापुरला गेलों. येथें दोन वर्षांपूर्वी माझ्या वडिलांची बदली झाली होती. तीन महिन्यांनीं परीक्षेचा निकाल प्रसिद्ध झाला. तो कळतांच माझ्या प्रेमळ मातेच्या नेत्रांतून अश्रु वाहूं लागले. ते आनंदाश्रु होते!

मला चाकू बक्षीस देणाऱ्या माझ्या मामांच्या मदतीनें मी बांकिपुरला पाटणा कॉलेजांत पुढील अभ्यास सुरू केला. पहिल्या वर्षाच्या अखेरीला आमची वार्षिक परीक्षा चालली होती. गणिताचा कागद होता. आह्मी एका मोठ्या हॉलमध्यें बसलों असून त्याच्या एका शेवटाला एक मोठें टेबल होतें. तेथें विद्यार्थ्यांनीं आपलीं पुस्तकें ठेविलीं होतीं. आमच्यावर नजर ठेवावयाला एक 'गार्ड' असून तो इकडेतिकडे फिरत असे. मधुनमधून तो बाहेरहि जाई. यांपैकीं एका संधीचा फायदा घेऊन आह्मी दोघेतिघे विद्यार्थी टेबलाशीं जाऊन पुस्तकें चाळूं लागलों. इतक्यांत गार्ड परत येत होता. माझे सोबती त्याला येतांना पहातांच मला सूचना न देतां हळूच आपापल्या जागेवर जाऊन बसले. मी अर्थात् सांपडलों! याचा परिणाम असा झाला, कीं, मला दुसऱ्या वर्षाच्या वर्गांत त्या वर्षीं मज्जाव झाला!

या वर्षाच्या उन्हाळ्याच्या सुटींत मीं पहिल्यानेंच एक कविता केली व ती 'आनंद' नांवाच्या—नंतर लवकरच नामशेष झालेल्या—एका तिसऱ्या प्रतीच्या मासिकाकडे पाठवली. पण ती परत आली! याच सुटींत मीं आणखीहि कित्येक कविता लिहिल्या. १८८९ सालीं बंगालींत त्या वेळीं

व इल्लींहि प्रमुख असलेल्या 'भारती' नामक मासिक पुस्तकांत माझी पहिली कविता प्रसिद्ध झाली. याच वर्षीं ह्मणजे ता.७ डिसेंबर १८८ रोजीं गौरांगाच्या भगिनीशीं माझा विवाह झाला.

बांकिपुरला अतुलचंद्र घोस नामक लेखकाशीं माझा परिचय होऊन आमची दाट मैत्री जमली. १८९१ त मी एफ्. ए. झालों. हा वेळपर्यंत मीं किती तरी कविता केल्या होत्या. परंतु सर्व मासिकांनीं--भारतीनेंसुद्धा त्या परत केल्या! १८९३ त मी बी. ए. ला बसलों, परंतु नापास झालों. आजपर्यंत भारतींत प्रसिद्ध झालेल्या दोन कवितांखेरीज माझी एकहि रचना छापली गेली नव्हती, तरी पण 'कवि' ह्मणून बांकिपुरला माझी बरीच ख्याति झाली होती! १८९४ सालीं मला हिंवताप जडल्यामुळे मी परीक्षेला बसलों नाहीं.

अतुल व मी रवीन्द्रनाथांच्या कृतींचे मोठे चहाते होतों. त्यांच्या बहुतेक कविता आह्मांला मुखोद्गत असत. रवीन्द्रांनीं कांहीं नवीन लिहिलें, कीं, आह्मी तें अधाशीपणानें 'आत्मसात्' करून टाकीत असूं. १८९४ सालीं रवीन्द्रनाथांना एक पत्र लिहावें, असें माझ्या डोक्यानें घेतलें, व त्याप्रमाणें मीं केलेंहि. पत्र निनांवी होतें, इतकेंच नव्हे, तर तें कोठून रवाना झालें, याचाहि पत्ता मीं लागूं दिला नव्हता! माझ्या वडिलांची मध्यंतरीं दिलदारनगरला बदली झाली होती. तेथें मी आगगाडींतच पत्रें टाकीत असल्यामुळें अमुक गांवच्या पोस्टाच्या छापहि कव्हरांवर पडत नसे. ही पत्रें मी विनोदी पद्धतीनें रवीन्द्रांना लिहीत असून त्यांत त्यांच्या काव्यांवर मी गुणग्राही टीका करीत असें. रवीन्द्रनाथांना हीं पत्रें फार आवडत, व ते तीं आपल्या मित्रांना दाखवीत, असें माझ्या ऐकण्यांत आलें होतें. हा पत्रलेखक कोण असावा, याविषयीं त्या सर्वांना मोठें गूढ पडलें होतें. या वेळीं रवीन्द्रनाथ 'साधना' नामक मासिक पुस्तकाचे संपादक होते. 'मी कोण हें कळून घ्यावयाची जर आपणाला इच्छा असेल, तर सोबत पाठविलेली कविता आपल्या मासिकांत खूण ह्मणून छापावी.' असें मीं रवीन्द्रांना एकदां लिहिलें.

कविता 'साधने'त ताबडतोब प्रसिद्ध झाली, व मींहि माझें नांवगांव
न्द्रांनां कळीविलें. नंतर आह्मां उभयतांत पत्रव्यवहार सुरू होऊन
दोनतीन वर्षें सारखा सुरू होता.

१८९५ साली माझा पहिला मुलगा—अरुणकुमार जन्मला याच वर्षी
बी. ए. झालों. याच सालीं माझ्या कांहीं कविता 'साधने'त प्रसिद्ध
ल्या. एका पत्रांत रवीन्द्रांनीं मला गद्य लिहिण्याचा प्रयत्न करण्या-
षयीं सूचना केली. मीं त्यांनां लिहिलें "कवितेला ना आई ना बाप,
शी बंगालींत एक ह्मण आहे. अर्थात् माझ्यासारख्यांनां कवितेच्या
ज्यांत धुडगुस घालण्याला मोकळीक आहे; परंतु गद्यलेखनाला विद्वत्ता
शिक्षण याची फार आवश्यकता आहे. आणि या दोहोंचाहि मजपाशीं
त्यंत अभाव असल्यामुळें आपल्या सूचनेप्रमाणें मला करितां येत नाहीं.
मा असावी."

यावर रवीन्द्रांनीं मला लिहिलें "शिक्षण ह्मणजेच गद्य लेखनाचा
रवाना आहे असें नाहीं.नाहींतर मला गद्य कधींच लिहितां आलें नसतें.
हा अर्थात् कविवर्यांचा विनय होता.) त्याला अत्यंत आवश्यक गोष्ट
णजे 'रस' हा होय आणि तो आपणाजवळ विपुल आहे; आपण जरूर
हीं तरी गद्य लिहा."

रवीन्द्रांसारख्यीं विद्वदग्रणीच्या या शब्दांनीं उत्तेजन येऊन मी रवी-
द्रांच्या नवीनच प्रसिद्ध झालेल्या 'चित्रा' नामक काव्यावर टीका
लिहिली व ती रामानंद चतर्जी (हल्ली मॉडर्न रिव्ह्यू व 'प्रवासी' या
ासिकांचे संपादक) यांच्या 'दासी' नांवाच्या मासिकांत प्रसिद्धहि
ाली. लगेच या मासिकांत माझी एक गोष्टहि प्रसिद्ध झाली. हे दोन्ही
ेख रवीन्द्रनाथांनां फार पसंत पडून माझ्या श्रमांचें सार्थक झालें, असें
ला वाटलें.

१८९५ च्या जून महिन्यांत दिलदारनगरच्या शाळेवर ५० रुपये
रमहाबर असिस्टंट हेडमास्तर म्हणून माझी, हंगामी नेमणूक झाली
थें दोनतीन महिने काढून 'गव्हर्मेंट ऑफ इंडिया सेक्रेटरीयट क्लार्कशिप'

च्या परीक्षेची तयारी करण्याकरतां मी कलकत्त्याला गेलों. येथें रवीन्द्रनाथांचीव माझी पहिल्यानें भेट झाली. मी येथें असतां १८९६ सालीं माझा दुसरा मुलगा प्रसंतकुमार याचा जन्म झाला. परीक्षा देऊन मी दिलदारनगरला गेलों.

यानंतर थोड्याच दिवसांनीं माझी पत्नी तापानें आजारी पडली. तापाच्या दुसऱ्या कीं तिसऱ्या दिवशीं मी तारीघाटच्या स्टेशनमास्तरकडे जेवावयाला गेलों होतों. आम्ही व्हरांड्यांत गप्पा मारीत बसलों असतां एकाएकीं एक पाल माझ्या उजव्या मांडीवर पडली. तत्क्षणीं **'यदि निपतति पल्ली दक्षिणांगे नराणां, स्वजनधनवियोगो, लाभदा वामभागे'** असा श्लोकार्ध म्हणून मीं हंसून म्हटलें "मला धनवियोग होवो-पण स्वजनवियोग मात्र न होवो!"

यानंतर दुसऱ्या अगर तिसऱ्या दिवशीं ३१ जुलै १८९७ रोजीं पहांटे तीन वाजतां माझी पत्नी परलोकवासी झाली.

यानंतर थोड्याच दिवसांनीं श्रीयुत रामानंद चतर्जींनीं नवीनच सुरू केलेल्या 'प्रदीप' नांवाच्या मासिकांत, त्यांच्या विनंतीवरून मीं पाठविलेल्या एकदोन कविता आणि एक गोष्ट दुसऱ्याच नांवानें प्रसिद्ध झाली. कमिसरी जनरल इन चीफच्या ऑफिसांत एक हंगामी जागा मिळून मी या वेळीं सिमला येथें गेलों होतों. १८९८ च्या जुलैंत टेलिग्राफच्या डायरेक्टर जनरलच्या ऑफिसांत माझी कायमची नेमणूक झाली. कलकत्त्याला ही नोकरी संभाळून मी कायद्याचा अभ्यास करूं लागलों.

अलीकडे कित्येक दिवस रवीन्द्रनाथ **भारती**चे संपादक होते. या वर्षअखेर त्यांनीं **भारती**चें संपादकत्व सोडून दिलें व श्रीमती सरलादेवी घोसाळ,बी. ए. या **भारती**च्या संपादिका झाल्या. **भारती**संबंधानें आमचा दोघांची पत्रव्यवहार सुरू होऊन पुढें आमच्या भेटीहि होऊं लागल्या, व शेवटीं सरलादेवींशीं माझा विवाह होण्याबद्दल 'वाङ्निश्चय'हि झाला. या गोष्टीला रवीन्द्रांची (सरलादेवीचे मामा) अन्तःकरणपूर्वक संमति होती. परंतु आमच्या कुटुंबांतील मंडळीला हा संबंध पसंत पडेना. सरलादेवी

.ह्मो पंथाच्या अनुयायी असल्यानें त्यांच्याशीं विवाह केल्यामुळें, मी
ातिबहिष्कृत होईन, अशी त्यांनां भीति वाटत होती.

दोनतीन वर्षांपासून माझ्या वडिलांनां अंतर्गळाचा विकार सुरू झाला
ाता. १९०० सालीं हा विकार अतोनात बळावल्यामुळें गाझीपुरच्या
ास्पिटलमध्यें शस्त्रक्रिया करण्यासाठीं त्यांनां नेण्यांत आलें. ते अत्यवस्थ
ासल्याची तार आल्यावरून मी तिकडे निघालों. शस्त्रक्रिया अगोदरच
रकण्यांत आली होती; परंतु तिला यश न येतां दुर्दैवानें याच दुखण्यांत
.कादशीला त्यांचा अंत झाला.

दिलदारनगरला दोन महिने राहून, वडिलांचें और्ध्वदेहिक आटोपून
ा कलकत्त्याला परत आलों, व बी. एल्. च्या परीक्षेला बसलों. तींत यश
ाईल, अशी मला आशा नव्हतीच; व शेवटीं त्याप्रमाणेंच झालें. डिसें-
ारांत माझ्या भावी पत्नीच्या कुटुंबांतील मंडळींनीं मला बॅरिस्टर होण्या-
ारतां इंग्लंडला पाठविण्याचें ठरविलें, व १९०१ च्या जानेवारींत मी तिकडे
वाना झालों.

इंग्लंडला जाऊन मी 'मिडल टेंपल' मध्यें दाखल झालों. या वेळीं
प. वा. रमेशचंद्र दत्त यांचें मला फारच साहाय्य झालें. लंडनमध्यें
मि. यूजेन ऑसवल्ड या ग्रंथकाराच्या घरीं मी राहिलों होतों. तिसऱ्या
म्हणजे शेवटच्या वर्षी मिस् घोसाळ व मी यांनीं एकमेकांच्या अनुमतीनें
आमचा 'वाङ्निश्चय' मोडून टाकला. तरीहि त्यांच्या कुटुंबांतील मंडळीनें
मला पुढेंहि पैशांची मदत चालूच ठेविली.

१६ नोव्हेंबर १९०३ रोजीं मी विधिपूर्वक बॅरिस्टर झालों आणि २७
डिसेंबरला कलकत्त्याला परत आलों. प्रॅक्टिस सुरू करावयाला मजपाशीं
भांडवल कांहींच नव्हतें. माझ्या वडिलांनीं ठेवलेले सर्व पैसे १९००रुपये
आईनें माझ्या स्वाधीन केले, व त्यांतून हायकोर्टाची सनद काढून
मी दार्जिलिंगला प्रॅक्टिस करूं लागलों; परंतु तेथें माझा जम न बसल्यामुळें
मी रंगपुरला आलों.

रंगपुरला असतां रामानंदबाबूंच्या '**प्रवासी**' मासिकांत माझ्या
पुष्कळ गोष्टी प्रसिद्ध झाल्या, व रवीन्द्रनाथांच्या खालोखाल वंगवाङ्मयांत

मीच एक कथालेखक आहें, असें लोक व विख्यात टीकाकार ह्मणूं व लिहूं लागले. या पदवीला मी अयोग्य नाहीं, अशी मला आशा आहे. याच्या पूर्वी सात वर्षे १८९० सालीं '**नवकथा**' हा माझा प्रथम कथासंग्रह प्रसिद्ध झाला असून या सुमाराला १९०६ सालीं माझा दुसरा कथासंग्रह '**षोडशी**' व १९०७ सालीं '**रमासुंदरी**' ही भारतींत क्रमशः प्रसिद्ध झालेली माझी कादंबरी स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाली.

१८०८ सालीं गयेला येऊन मी प्रॅक्टिस करूं लागलों. १९०९ सालीं '**देशी-ओ-बिलाती**' हा माझा तिसरा कथासंग्रह प्रसिद्ध झाला. वरील तीनहि पुस्तकांच्या दुसऱ्या आवृत्ति गेल्या एकदोन वर्षांत प्रसिद्ध झाल्या असून तिसऱ्या आवृत्त्या लवकरच प्रसिद्ध कराव्या लागतील, असें दिसतें.

१९१० सालीं '**नवीन संन्यासी**' ही माझी कादंबरी '**प्रवासी**' मासिकांत सुरू होऊन त्याच्या पुढील वर्षी ती पूर्ण झाली. १९१३ सालीं '**गल्पांजलि**' नामक माझा चवथा कथासंग्रह प्रसिद्ध झाला आहे.

गेल्या वर्षी बंगालींतील दोन प्रख्यात मासिक पुस्तकांनीं मला आगाऊ पैसे देऊन माझ्याशीं गोष्टींचें कॉंट्रॅक्ट केलें आहे. त्या हळुहळू त्यांत प्रसिद्ध होत आहेत.

मी गया येथेंच रहात असून तूर्त तरी दुसरीकडे कोठें न जाण्याचा माझा विचार आहे. फौजदारी बाजूकडे मला साधारण बऱ्यापैकीं प्रॅक्टिस आहे. मीं पुनः लग्न केलें नाहीं. माझे दोन्ही मुलगे कॉलेजांत शिकत आहेत.

हिंदी, उर्दू, तामिळ, गुजराती, मराठी, असामीज वगैरे भाषांत माझ्या गोष्टींचीं भाषान्तरें झालीं असून त्यांपैकीं कांहीं पुस्तकरूपानेंहि प्रसिद्ध झालीं आहेत. बंकीमचंद्रांच्या कित्येक कादंबऱ्यांचीं ज्यांनीं इंग्रजींत भाषान्तरें केलीं आहेत, अशा मिसेस नाईट व मीं या उभयतांनीं मिळून माझ्या दहा गोष्टींचें भाषान्तर केलें असून तें ' Stories of Bengali life ' या नांवानें प्रसिद्ध झालें आहे.

गया, २५ सप्टेंबर १९१४ — **प्रभातकुमार मुकर्जी**

तात्यासाहेब कण्हत कण्हत ह्मणाले "गळ्याला भारी शोष पडतो आहे माझ्या. बाबू–माझ्या तोंडांत थोडी गंगा घालतोस बाळ?"

मनोहरानें तत्क्षणीं उठून गंगाजलाची झारी हातीं घेतली, व थोडथोडें गंगाजल तो तात्यासाहेबांच्या तोंडांत ओतूं लागला. तें गंगोदक पोटांत जातांच तात्यासाहेबांनां जणूं काय नवीनच हुषारी आली!

दोनतीन वेळ मोठाले उसासे सोडून तात्यासाहेबांनीं क्षीण स्वरानें हांक मारली "गोपाळ!"

रावसाहेब पुढें होऊन ह्मणाले "हा मी आहें बाबा इथें."

"माझा मधु कुठें आहे?"

मधुसूदन हा रावसाहेबांचा मुलगा. हा सारा तीन वर्षांचा असून आजोबांचा तो भारीच लाडका होता. तात्यासाहेबांनां त्याची आठवण काढतांच रमाबाई त्याला कडेवर घेऊन पलंगाजवळ येऊन उभ्या राहिल्या.

रावसाहेब ह्मणाले "हा मधु आला आहे बाबा–निजला आहे तो."

तात्यासाहेबांनीं क्षीण स्वरानें विचारलें "अन् सूनबाई?"

मनोहर ह्मणाला "वहिनी तुमच्याजवळ उभी आहे बाबा!"

"यमुताई कुठें आहे? तिचा विनू कुठें आहे?"

आत्याबाई ह्मणाल्या "ही मी इथं उभी आहें तुझ्याजवळ तात्या! मला अन् तुझ्या या अनाथ विनूला सोडून कुठं चाललास तूं?" असें ह्मणून त्या मोठ्मोठ्यानें रडूं लागल्या.

तात्यासाहेब शांतपणें ह्मणाले "रडूं नको यमुताई! कसलीहि काळजी करण्याचें तुला कारण नाहीं. माझा गोपाळ आहे–बाबू आहे; विनूचा प्रतिपाळ ते अगदीं माझ्याप्रमाणें काळजीनें करतील."

थोडा वेळ स्तब्ध राहून तात्यासाहेबांनीं पुनः गंगोदक तोंडांत घालावयाला सांगितलें. मनोहरानें तसें करतांच कांहीं वेळानें ते ह्मणाले "तुह्मी सारींजणें आहां ना इथें?"

रावसाहेब ह्मणाले "होय बाबा, आह्मी सारीं इथेंच आहों तुमच्या-जवळ."

तात्यासाहेबांनीं एकवार सर्वांकडे नजर टाकली. क्षीण स्वरानें हळुहळू एकएक शब्द उच्चारीत ते ह्मणाले " गोपाळ, बाबू! माझी या लोकांतली मुदत भरत आली. आतां फार वेळ राहिला नाहीं. तुह्मी सारीजणें मला पवित्र हरिनाम ऐकवाल का? माझ्या श्रीकृष्णाचें नांव–माझ्या हरीचें नांव?"

वृद्धाच्या या शब्दांनीं सर्वांचें हृदय भरून येऊन सर्वजणें स्फुंदूं लागलीं. मनोहर रडतरडत ह्मणाला " होय बाबा. आह्मी ऐकवतों तुह्मांला हरिनाम!"

अर्धस्फुट स्वरानें तात्यासाहेब हळुहळू ह्मणाले " ठीक आहे; परंतु शांतपणें पडून माझ्या श्रीकृष्णाचें नांव ऐकण्यापूर्वी संसारासंबंधाचें एक कर्तव्य मला अवश्य केलें पाहिजे, तें मला करूं द्या. नंतर तुह्मां साऱ्यांच्या तोंडून माझ्या हरीच्या मधुर नामाचा गजर ऐकतऐकत, हंसतहंसत देवदूतांनीं आणलेल्या विमानांत बसून मी वैकुंठाला जाईन. गोपाळ, बाबू–तुम्ही दोघेहि असे माझ्याजवळ या."

ते दोघेहि पुढें सरतांच रावसाहेबांचा हात आपल्या हातीं घेऊन तात्यासाहेब पुढें बोलूं लागले "बाबा गोपाळ, तुला लहानाचा वाढवून मोठा केला, विद्या शिकविली, योग्य प्रसंगीं योग्य वधूशीं तुझें लग्न करून दिलें. परमेश्वराच्या कृपेनें तुह्मी प्रेमानें एकमेकांशीं वागत असून तुम्हांला देवानें चांगली संततिहि दिली आहे–पण माझा हा बाबू अजून लहान आहे. याच्या आईनें तर याला टाकून केव्हांच स्वर्गलोकीं प्रयाण केलें. तेव्हांपासून याची आई अन् बाप मीच होऊन याला मीं वाढविला. पण त्याचा संसार थाटून द्यायला मी आतां रहात नाहीं. अर्धवट बाल्यावस्थेंतच मला याला सोडून जावें लागत आहे. बाबू, बाळ, मी आतां निघून गेल्यावर तुझा हा अप्पाच तुला माझ्या ठिकाणीं आहे, अन् तुझी ही वहिनीच आतां तुझी आई आहे. माझा ज्याप्रमाणें तूं मानसन्मान ठेवतोस, माझ्यावर जशी तुझी श्रद्धा आहे, त्याप्रमाणेंच यापुढें तुझ्या अप्पालाहि मान देऊन त्यावर तूं श्रद्धा ठेव. आणखी एका गोष्टीसंबंधानें तुह्मां

दोघांहि भावांनां मला सावध करून ठेवायचें आहे. या कलियुगांत सख्ख्या भावाभावांचेंहि कधीं पटत नाहीं; पण तुह्मां दोघां भावांमध्यें कधींहि फाटाफूट होऊं नये, तुह्मीं उभयतांनीं अखेरपर्यंत एकत्र नांदावें, अशी माझी शेवटची इच्छा आहे; ती तुह्मीं दोघांनींहि पूर्ण केली पाहिजे. मी जी कांहीं संपत्ति मागें ठेवून जात आहें, तिचा जर तुह्मीं अपव्यय केला नाहीं, तर तिला हातहि न लावतां हल्लींच्या इतमामानें तुमचें जन्मभर मजेनें चालण्यासारखें आहे; पण तुह्मीं दोघांहि भावांनीं एका संसारांत एक अन्न खाऊन मिळूनमिसळून एकमतानें राहिलें पाहिजे. सुखानें चाललेला संसार कुणाला पहावत नाहीं. त्याचे तुकडेतुकडे व्हावे, ह्मणून दुष्ट मनुष्यांचे प्रयत्न चाललेले असतात. अशा मनुष्यांच्या कानगोष्टी ऐकून तुह्मी भाऊ एकमेकांनां कधींहि परकी–शत्रु समजूं नका. बायकांच्या गोष्टी मुळींच मनावर घेऊं नका. त्यांच्या कानगोष्टींकडे कानाडोळाच करा–बायका या घरफोड्या असतात! पुष्कळ लोकांचे संसार मीं पाहिले आहेत. भावाभावांत पहिल्यानें खूब प्रेम असतें, परंतु पुढें त्यांच्या बायका येऊन संसार करूं लागल्या, कीं, त्या प्रेमाचा अगदीं सत्यनाश होऊन जातो. प्रसंगीं त्या बंधूंत एकमेकांचे खून करण्यापर्यंत मजल येते. कांहीं झालें, तरी तुह्मी पृथक् होऊं नका--विषयसंपत्तीचे भाग करूं नका. भाग पडूं लागले, तर प्रचंड पर्वतहि धुळीला मिळून जातो! सदासर्वदा नीतीनें–धर्मानें चाला–ह्मणजे परमेश्वराच्या कृपेचा तुह्मांला कधींहि तोटा पडणार नाहीं. झालें. मला जें कांहीं तुह्मांला सांगायचें होतें, तें संपलें. आतां मला इथून खालीं उतरून घोंगडीवर ठेवा–गोपाळ, तूं मला मांडी दे–बाबू अन् तुह्मी सारींजणें माझ्याजवळ बसून माझ्या हरीचें पवित्र मधुर नाम मला ऐकवा."

असें ह्मणून तात्यासाहेब उगे राहिले. रावसाहेब व मनोहर या उभयतांनीं मिळून तात्यासाहेबांनां पलंगावरून खालीं उतरून ठेविल्यानंतर सारी मंडळी त्यांच्याजवळ बसली. रावसाहेबांनीं त्यांनां मांडी दिली. नंतर मनोहरानें हरिनामाला आरंभ केला:–

“ हरेर्नाम हरेर्नाम हरेर्नामैव केवलम् ।
कलौ नास्त्येव नास्त्येव नास्त्येव गतिरन्यथा ॥ ”

तात्यासाहेब क्षीण स्वरानें ह्मणाले “ संस्कृत नको–प्राकृतांतच मला हरिनाम ऐकवा. बाबू !–तें पद ह्मणनारे सोहिरोबांचें–‘**हरिभजनावीण काळ घालवूं नकोरे—**’ ”

तात्यासाहेबांच्या आज्ञेप्रमाणें पहिल्यानें मनोहर व नंतर रावसाहेब एका स्वरांत गाऊं लागले:—

“ हरिभजनावीण काळ घालवूं नकोरे !
चिद्रूपासि जाण समज
ध्यानिं अणुनि पुरतें उमज !
अपुले मतिनें उगाच चिखल
कालवूं नकोरे !
हरिभजनावीण काळ घालवूं नकोरे !
जिंकि जिंकु देइं न भवा !
भेद नाहिं जिवा शिवा !
अंतरिंचा ज्ञानदिवा
मालवूं नको रे !
हरिभजनावीण काळ घालवूं नकोरे !
सोहिरा ह्मणे पूर्ण ज्योति !
तेथें कैंचि दिवस राती !
तयावीण नेत्रपाती
हालवूं नकोरे !
हरिभजनावीण काळ घालवूं नकोरे ! ”

याप्रमाणें मधुर हरिनाम ऐकतऐकत मध्यरात्र उलटून गेल्यानंतर थोड्याच वेळानें तात्यासाहेबांचा प्राणवायु गंभीर अनन्तसागरांत मिळून गेला !

---

## प्रकरण दुसरें.

### अश्रुजल.

मागील प्रकरणांत वर्णन केलेली गोष्ट घडून आल्यानंतर पांच वर्षे लोटलीं आहेत. या अवधींत मनोहरानें आपलें कॉलेजांतील शिक्षण संपविलें असून तो आतां एम्. ए., एल्एल्. बी. झाला आहे. मागील प्रकरणांत ज्या स्थितींत आपण त्याला पाहिला, त्यापेक्षां सर्व बाजूंनीं त्याच्यांत उन्नति झाली आहे; आतां त्याला नुसतें 'मनोहर' म्हणण्यापेक्षां 'मनोहरपंत' असेंच आपणांला म्हटलें पाहिजे. एल्एल्. बी. झाल्यानंतर रावसाहेबांच्या आग्रहामुळें हायकोर्टाची सनद काढून मनोहरपंतांनीं मुंबईला वकिली करावयाला सुरुवात केली होती. एकंदर वर्षसवावर्ष ते मुंबईत राहिले--परंतु तेवढ्या अवधींत दोनतीन अशीलांपेक्षां अधिक अशीलांची—अर्थात् पैशांचीहि प्राप्ति—त्यांनां न झाल्यामुळें, आणि वकिलीच्या धंद्याचाहि त्यांनां मनापासून तिटकारा असल्यामुळें मनोहरपंत पुनः बनगांवाला येऊन राहिले होते. धर्मशास्त्र आणि तत्त्वज्ञान यांची चर्चा, पूजाआन्हिक, स्नानसंध्या, गीतापाठ यांतच त्यांचा सर्व दिवस जाऊं लागला.

तात्यासाहेबांच्या मृत्यूनंतर घरचा व इनामतीचा सर्व कारभार अर्थात्‌च रावसाहेबांकडे आला. या पांच वर्षांच्या अवकाशांत त्यांनीं मनोहरपंतांचा विवाह करावयाचा प्रयत्न अनेक वेळां करून पाहिला; परंतु त्यांत त्यांनां अजूनपर्यंत यश आलें नव्हतें. कांहीं केल्या मनोहरपंतचें विवाह करावयाला कबूल होईनात. विवाह न करावयाला मनोहरपंतांनां दोन कारणें होतीं—एकतर संसारजालांत पडण्याची त्यांनां उत्कट इच्छा नव्हती. आणि दुसरें हें, कीं, विवाहामुळें वडील बंधूपासून वेगळें व्हावें लागण्याचा बराचसा संभव होता. 'स्त्रियांच्या कानगोष्टींनीं भावाभावांतील प्रेम नष्ट करूं नका,' असा जो तात्यासाहेबांनीं मृत्युशय्येवर त्यांनां उपदेश केला होता, तो ढळढळीत अक्षरांनीं मनोहरपंतांनां सदोदित डोळ्यांसमोर दिसत असे. आपल्या पित्याविषयीं त्यांनां अत्यंत आदर व

प्रेम होतें.त्यांची मृत्युशय्येवरील इच्छा पूर्ण करणें हें पुत्र या नात्यानें आपलें अत्यंत श्रेष्ठ कर्तव्य आहे, अशी त्यांची दृढभावना होती; म्हणून मनोहरपंतांनां नेहमीं वाटे, कांहीं होवो, वडिलांच्या उपदेशाप्रमाणें आपणाला चालावयाचें असेल तर आपणाला मुळीं विवाहच करतां कामा नये! त्यांनां मधुनमधून वाटे, कीं, जरी आपल्या पत्नीनें आपल्या बंधूविरुद्ध हजार गोष्टी सांगितल्या, तरी त्यांकडे आपण बिलकूल लक्ष्य दिलें नाहीं म्हणजे झालें; परंतु लगेच त्यांच्या मनांत असाहि विचार येई, कीं, स्त्रीप्रेमाच्या अनिवार मोहामुळें, तरुणपणाच्या ऐनभरांत आपली बुद्धि अशी नेहमींच विचारशील व स्थिर राहील, यौवन आणि पत्नीप्रेम यांच्या नशेंत आपण भलतीकडेच वहात जाणार नाहीं, कशावरून? त्यापेक्षां अशा भयंकर मार्गावर पाऊल न टाकणेंच उत्तम!

याप्रमाणें मनोहरपंत स्वतःच आपल्या विवाहाच्या विरुद्ध होते. परंतु गांवचे लोक—आणि विशेषतः मनोहरपंतांच्या वयोवृद्ध आप्तस्त्रिया—साफ म्हणत, कीं, "भावाचं लग्न करायची रावसाहेबांचीच तितकी मनापासून इच्छा नाहीं. अहो, बोलूनचालून बाबुराव पडला रावसाहेबांचा सावत्र भाऊ—त्याच्या लग्नाबद्दल त्यांनां इतकी कळकळ कां असेल? हाच जर त्यांचा सख्खा भाऊ असता, तर आजपर्यंत त्याचं लगिन करायचं रावसाहेबांनीं ठेवलं का असतं? लिहिण्यावाचण्यासंबंधानं जितक्या म्हणून परीक्षा आहेत, तितक्या बाबूनं साऱ्या देऊन टाकल्या आहेत. बरं, रूपानं म्हटलं तर तो अगदीं मदनासारखा आहे. अहो, कशाला हवी ती गोष्ट? आज जर तात्यासाहेब जीवंत असते!"—इत्यादि इत्यादि! तारुण्याच्या ऐन भरांत आलेल्या मुलाचें अद्यापि लग्न झालें नाहीं, हें पाहून कोणत्या मावशीला, कोणत्या आतेला, कोणत्या काकूला, कोणत्या आजीला, वाईट वाटून 'नको हा जीव' असें होऊन जाणार नाहीं?

बनगांवांत लघुलेखनकुशल असा एकहि मनुष्य नव्हता; परंतु तरीहि वरील प्रकारचें करुणरसात्मक वक्तृत्व अक्षरशः—छेः—चांगलें तिखटमिखट

लावून रावसाहेबांच्या अर्धांगीजवळ–रमाबाईपाशीं–'रिपोर्टेड' होत असे, अर्थात् त्यांनां हे तीव्र वाग्बाण अगदीं असह्य होत. 'भाऊजीं'चा विवाह करून टाकण्याविषयीं रमाबाईनीं अलीकडे तर पतिराजांनां नुसतें भंडावून सोडलें होतें. उठल्या बसल्या 'भाऊजींच्या लगिना'शिवाय त्या अलीकडे गोष्टच बोलत नव्हत्या!

इकडे रावसाहेबांची भावाच्या लग्नाबद्दल खटपट पुष्कळ दिवसांपासून सुरूच होती. मनोहरपंतांनां पुष्कळ स्थळें सांगून येत–परंतु रावसाहेबांनांच तीं पसंत पडत नसत. या वेळीं मुंबईच्या एका स्थळाच्या खटपटींत रावसाहेब होते. मुलीचे वडील मुंबईतील एक श्रीमंत व वजनदार व्यापारी होते. हुंडा आणि करणी त्यांनीं खूबच कबूल केली असून मुंबईतील मोठमोठे बॅरिस्टर, वकील, सॉलिसिटर यांच्याशीं त्यांचा रगड परिचय होता. लग्नानंतर जांवयांनां मुंबईला नेऊन, ऑफिस वगैरे खूब भपक्याचें थाटून देऊन, त्यांच्या श्वशुरांनीं त्यांनां हायकोर्टची 'प्रॅक्टिस' चांगलीच जमवून दिली असती. आपल्या भावानें एम्. ए., एल्एल्. बी.-पर्यंत शिक्षण संपादन करून शेवटीं निरुद्योगीपणानें माशा मारीत घरींच बसून रहावें, हें रावसाहेबांनां बिलकूल आवडत नव्हतें–आणि त्यांत त्यांची कांहीं बाबतींत अतोनात गैरसोयहि होत होती. मनोहरपंतांनीं मुंबईला जाऊन वकिली चालवावी, अशी त्यांची उत्कट इच्छा होती.

पण या संबंधांत कन्यापक्षाचा एक मोठा विलक्षण 'पण' होता! श्वशुरांनां जामात फार सुंदर, गोरा आणि कांतिमान् पाहिजे होता. असा जामात मिळविण्यासाठीं वाटेल तितकी रकम खर्च करावयाला ते तयार होते. आज श्वशुरांच्या मार्फत जामात पहावयाला कांहीं मंडळी यावयाची होती. त्यांनां जामात पसंत पडला, तर काय वाटेल ती खटपट करून रावसाहेब मनोहरपंतांनां विवाह करावयाला कबूल करविणार होते.

सकाळचा वेळ. त्या वेळीं आकाश आणि पृथ्वी स्निग्ध अशा सूर्यकिरणांच्या समुद्रांत बुडून गेलीं होतीं. वाड्याच्या मागील बागेंत पुष्करिणीच्या तीरीं एका झाडाच्या तळाशीं एक लहानसें दर्भासन

एसर्हन मनोहरपंत अगदीं एकाग्र मनानें **'योगवासिष्ठ'** वाचण्यांत निमग्न होऊन गेले होते. त्यांच्या अंगांत एक पांढरा स्वच्छ सदरा असून डोळ्यांला साध्या फ्रेमीचा चष्मा होता. दर्भासनावर एक लहानशी काळ्या लांकडाची तपकिरीची डबी असून तीवर रुपेरी अक्षरांनीं **'सत्यं शिवं सुंदरम्'** अशीं अक्षरें लिहिलेलीं होतीं. मनोहरपंत ज्या ठिकाणीं बसले होते, त्या ठिकाणापासून जवळच असलेल्या विशाल पुष्करिणींत किती तरी कमलपुष्पें फुललीं होतीं; मासे, कांसवें पृष्ठभागावर पोंहत होतीं; मध्येंच एकादा मत्स्यभक्षक पक्षी उडतउडत येऊन चटकन् एकाद्या लहानशा माशाला उचलून घेऊन जात होता. परंतु या सगळ्या गोष्टींकडे मनोहरपंत दृष्टिपातहि करीत नव्हते. **योगवासिष्ठा**च्या अध्ययनांत त्यांचें लक्ष्य अगदीं पूर्णपणें वेधून गेलें होतें.

पहिल्या प्रकरणांत आपण मनोहरपंतांनां पाहिलें, तें त्यांच्या यौवन-कालाच्या अगदीं प्रारंभीं--या पांच वर्षांत त्यांची यौवनावस्था पूर्ण होऊन ते फार सुंदर असे पूर्णयौवन पुरुष दिसत होते. त्यांच्या ओंठांवरचा भाग आतां मोठ्या अशा मिशांनीं झांकून गेला होता.एकदोन दिवसांच्या अंतरानें ज्यावरून क्षुरकर्म होत असे, अशा त्यांच्या हनुवटीच्या अंत्यभागावरून त्यांच्या मानसिक दृढतेचा परिचय होण्यासारखा होता. त्यांचे डोळे स्थिर, तेजःपुंज आणि शांत असून दृष्टि मात्र प्रखर अशा अग्निशलाकेप्रमाणें होती. त्यांच्या ललाटप्रदेशावर ज्या वक्र रेषा दिसत, त्या त्यांच्या चिंतन-शीलतेचा परिचय करून देत असत.

किती वेळ तरी मनोहरपंतांचें याप्रमाणें एकाग्र मनानें अध्ययन चाललें होतें. इतक्यांत एकाएकीं त्यांनां एक हांक ऐकूं आली "दादा—"

पुस्तकावरून दृष्टि वर करून मनोहरपंतांनीं मागें वळून पाहिलें. सुमारें बारातेरा वर्षांचा एक मुलगा त्यांनां उद्देशून हांक मारीत होता.

"दादा—"

"कायरे विनू ?"

"दादा, चला–जरा आंत चला."

किंचित् विरक्ततेच्या स्वरानें मनोहरपंतांनीं विचारलें "कशाला रे ?"

"अप्पा बोलावताहेत तुह्माला."

"जा, थोड्या वेळानें येतों मी, जा तूं!"

विनायक दृढ स्वरानें ह्मणाला "नाहीं, आतांच्या आतां चला मजबरोबर. वर दिवाणखान्यांत कोणी दोघे गृहस्थ आले आहेत. अप्पा मला ह्मणाले 'जा विनू, तुझ्या दादाला चटकन् बोलावून येऊन ये- उशीर लावूं नको.'"

विनायकाचें हें भाषण ऐकून मनोहरपंत कांहीं वेळ नुसत त्याच्या तोंडाकडे तीव्र दृष्टीनें पहातच राहिले. नंतर त्यांनीं विचारलें "कशाला रे? ते दोघेजण कशाला आले आहेत ?"

ते दोघे गृहस्थ कशाला आले होते, तें विनायकाला चांगलें ठाऊक होतें; परंतु तें कारण दादाला कळवूं नको, ह्मणून रावसाहेबांनीं त्याला बजावून सांगितलें होतें.ह्मणून तो ह्मणाला "कुणाला ठाऊक!"

परंतु विनायकाच्या कंठस्वरांत असत्य भाषणाशीं संलग्न असलेला संकोच स्पष्टपणें ध्वनित होत होता.

मनोहरपंतांनीं तीव्र दृष्टीनें विनायकाकडे पाहिलें, व एक मोठा उसासा सोडून ते ह्मणाले "छी छी छी–विनू! खोटें बोललास तूं अगदीं!"

बिचारा विनायक स्तब्धपणें उभा राहिला. तो कांहींच बोलत नाहीं असें पाहून मनोहरपंत निर्भर्त्सनेच्या स्वरानें पुढें ह्मणाले "विनू, तुझ्या मराठी पहिल्या किंवा दुसऱ्या पुस्तकांत 'खोटें बोलणें हें महापातक होय,' असें तूं किती वेळ तरी वाचलें आहेस ना? बापाचें सत्यवचन पाळण्या- करतां रामचंद्रानें राजपुत्र असतांहि अरण्यांत जाऊन चौदा वर्षे हाल भोगले, हें तूं वाचलें आहेस ना? प्राचीनकालच्या आर्यांनीं प्राण दिले, पण कधीं मिथ्याभाषण केलें नाहीं, हें कधीं तूं ऐकलें नाहींस का? तूंहि त्याच आर्यांचा वंशज आहेस, ही गोष्ट तूं विसरलास का? असत्य भाषण करणें हा भ्याडपणा आहे, नीचपणा आहे. विनू, असत्य भाषणाच्या कलंकानें तुझ्या तोंडाला आज काळोखी लागली! विनू–अगदीं शरमेची गोष्ट आहे–छी छी छी!"

मनोहरपंतांच्या या तीव्र, असह्य वाग्बाणांनीं जर्जरित होऊन बिचारा विनायक ढळढळां रडूं लागला. त्याच्या दोन्ही डोळ्यांतून सारखा अश्रु-प्रवाह वाहूं लागला. मनोहरपंतांची तीव्र, अग्निज्वालेसारखी दृष्टि त्याला सहन होईनाशी झाल्यामुळें विनायकानें दोन्ही हातांनीं तोंड झांकलें, आणि स्फुंदस्फुंदून तो रडूं लागला.

त्याच्याकडे पहात, तशाच कर्कश स्वरानें मनोहरपंत पुढें बोलूं लागले "रड-तसाच रड! जें पाप तूं आतां केलेंस, तें डोळ्यांतील पाण्यानें चांगलें धुऊन काढशील, तेव्हांच तूं पवित्र होशील. पापाचा कालिमा केवळ डोळ्यांतील पाण्यानेंच धुऊन निघतो, दुसऱ्या कशानेंहि तो स्वच्छ होणार नाहीं. त्याला दुसरा उपाय नाहीं!"

असें ह्मणून मनोहरपंत पुनः आपल्या वाचनांत निमग्न झाले. बिचारा विनायक खालीं मान घालून अश्रु ढाळीत तेथून निघून गेला.

आणखीहि कांहीं वेळ गेला. मनोहरपंतांचें **योगवासिष्ठाचें** मनन सारखें चालूच होतें. इतक्यांत जवळच घुंगुरांचा रुमझुम रुमझुम शब्द त्यांनां ऐकूं आला; त्याबरोबर एकवार त्यांनीं मागें वळून पाहिलें. आपली पुतणी गोदावरी आपल्याकडेच येत आहे, असें त्यांच्या दृष्टीला पडलें. पुनः मनोहरपंत हातांतलें पुस्तक लक्ष्यपूर्वक वाचूं लागले.

गोदावरी मनोहरपंतांजवळ येऊन उभी राहिली; परंतु त्यांच्याशीं बोलावयाला तिला धीर झाला नाहीं. खालीं जमिनीकडे दृष्टि लावून एकाद्या पुतळीप्रमाणें ती स्तब्ध उभी होती.

कांहीं वेळानें पुस्तकावरून वर डोळे करून मनोहरपंतांनीं गोदावरीकडे पाहिलें व गंभीर स्वरानें विचारलें " काय ग गोदे ?"

गोदावरीनें एकवार आपल्या चुलत्याकडे पहाण्याचा धीर केला व ह्मटलें "काका, एकदां घरांत येऊन जा. अप्पा बोलावताहेत तुह्माला."

" कशाला बोलावताहेत ?"

" कुणी दोघे गृहस्थ आले आहेत."

" [illegible]"

"तें मुला नाहीं ठाऊक काका! ते केव्हांचे येऊन वर दिवाणखान्यांत तुमची वाट पहात बसले आहेत."

गोदावरीचे हे शब्द ऐकून मनोहरपंतांनीं कांहींसा स्वतःशींच नुसता "हूं!" एवढाच उद्गार काढला. आपली पुतणी नैतिक कसोटीला कितपत टिकते, हें पहावयाच्या उद्देशानें त्यांनीं विचारलें "ते कुठून आले आहेत ग?"

"मुंबईहून."

"मुंबईहून? कशाला?"

गोदावरीनें एकवार काकांकडे पाहिलें, आणि दुसरातिसरा कांहीं विचार मनांत न आणतां ती चटदिशीं म्हणाली "तुम्हाला पहायला काका!"

विनायकाला काकांकडून नुकतेंच जें बक्षीस मिळालें होतें, त्याचा वृत्तांत गोदावरीला कळला होता.

भृकुटी वक्र करून मनोहरपंत रागानें म्हणाले "काय? ते काय पहाणार? मी का वाघ आहें, का सिंह आहें?"

काकांच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच गोदावरीला खुदकन् हंसूंच आलें. ती हंसतहंसत म्हणाली "ते दोघेजण मुंबईहून तुम्हाला लग्नासाठीं बघायला आले आहेत हो काका!"

गोदावरीचें हें हास्य पाहून मनोहरपंतांच्या पायांची आग मस्तकाला गेली! आपल्यासारख्या वडील मनुष्याच्या समोर गोदावरीनें अशा रीतीनें अमर्यादपणें हेटाळणीनें हंसण्याचें धाडस करावें, हें अगदीं निंद्य आहे, तिचा हा अगदीं अक्षम्य अपराध आहे, असें त्यांना वाटलें. डोळे लाल-बुंद करून त्यांनीं कर्कश स्वरानें हांक मारली "गोदे–पोरी!—"

काकांचा चेहरा व त्यांचें एकंदर जामदग्न्य स्वरूप पाहून बिचारी गोदावरी अगदीं हतबुद्धच होऊन गेली. भयचकित दृष्टीनें ती मनोहरपंतां-कडे पहातच उभी राहिली.

"गोदे, तूं हंसलीसशी?"

गोदावरी त्यांना काय उत्तर देणार? ती मुकाट्यानें उभी राहिली. तिचे डोळे पाण्यानें अगदीं डबडबण्याच्या बेताला आले. चेहरा पांढरा फटफटीत झाला.

तिच्याकडे तीव्र दृष्टिपात करून मनोहरपंत गंभीरपणानें बोलूं लागले "गोदे, तुझ्या काकाच्या लग्नाची गोष्ट म्हणजे तुला तुझ्या पोरखेळांपैकीं एक वाटला, कीं, हंसून खिदळण्यासारखा एकादा गारुड्याचा तमाशा वाटला? आपणापेक्षा वयानें वडील अशा मनुष्यांशीं कसें वागायला पाहिजे, हें, तूं इतकी मोठी झालीस, तरी तुला अजूनहि ठाऊक नाहीं काय? तुझ्या आईनें तुला यासंबंधानें कांहींच शिकवलेंसवरलें नाहीं वाटतें? तूं कधीं कधीं रामायण अन् महाभारत वाचीत असतेस, असें माझ्या पहाण्यांत आलें आहे. काय उपदेश तूं त्या रामायणमहाभारतांपासून घेतलास? तुझ्यासारख्या अमर्याद पोरीला धिक्कार असो गोदे!"

मनोहरपंतांचें हें दीर्घ व्याख्यान ऐकत गोदावरी खालीं मान घालून उभी होती. तिच्या अंतःकरणांत अगदीं भडभडून येऊन डोळे अश्रूंनीं भरून आले. क्षीण, कंपित स्वरानें ती म्हणाली " मी कांहीं तुमच्या लग्नाच्या गोष्टींना हंसलें नाहीं—"

" कशाला हंसलीस तर मग तूं?"

"तुम्ही मघांशीं नाहीं का म्हणालांत, 'मी वाघ आहें का सिंह आहें?'"

"बरें मग?"

" त्याचं मला एकदम हंसूं आलं काका!"

" कां? त्यांत तरी हंसण्यासारखें काय आहे?"

" वाघ अन् सिंह डोळ्यांला चष्मा लावून पुस्तक का वाचतात कधीं? मी तरी काय करूं काका! माझ्यानं अगदीं रहावेनाच पहा—"

बोलतांबोलतां गोदावरीच्या डोळ्यांतून अश्रुबिंदु गालांवरून टपाटप खालीं गळूं लागले.

आपलें बोलणें पोरीला इतकें लागलें, हें पाहून मनोहरपंतांनां वाईट



"तुह्मां दोघां भावांमध्यें कधींहि फाटाफूट होऊं नये, अशी माझी शेवटची इच्छा आहे, ती तुह्मीं दोघांनींहि पूर्ण केली पाहिजे." (पृष्ठ २१.)

गळून गेलें! दोन शब्द बोलून तिचें सांत्वन करावें, असें त्यांनां वाटलें; परंतु या प्रसंगीं तसें करणें योग्य नाहीं, तिला दोन सांत्वनाचे शब्द आपण बोललों, तर आपलें हें सारें बोलणें अरण्यरुदितवत् होऊन तिच्यावर इष्ट परिणाम कांहींसुद्धां होणार नाहीं, असा विचार करून मनोहरपंत त्या भानगडींत पडले नाहींत. जणूं काय महत्त्वाची अशी कांहीं गोष्ट घडलीच नाहीं, अशा रीतीनें ते पुनः आपलें पुस्तक वाचूं लागले.

परंतु गोदावरी कांहीं तेथून गेली नाहीं. ती जागच्या जागीं उभीच राहिली. तिनें साडीच्या पदरानें आपले डोळे व तोंड पुसलें आणि कांहीं न बोलतां काकांची वाट पहात ती तशीच खालीं मान घालून उभी राहिली.

आपल्या रागावण्यामुळें पोरगी तडक घरांत आईकडे निघून जाईल, आणि तूर्त तरी आपण या बोलावण्याच्या तडाक्यांतून सुटूं, अशी मनोहरपंतांची कल्पना होती; परंतु गोदावरी जागच्याजागींच उभी आहे, असें पाहून त्यांनां पुनः राग आला. कांहीं केलें तरी आपणाला ही सोडीत नाहीं, असें पाहून कपाळाला आंठ्या चढवून मनोहरपंत ह्मणाले "जा ना गोदे ! आतां कशाला इथें उभी राहिली आहेस तूं ? तूं आणलेला निरोप मला कळला--जा आतां तूं !"

या वेळीं मनोहरपंतांच्या स्वरांत पूर्वीप्रमाणें कर्कशता नव्हती--दृष्टींतहि तितका भेदकपणा नव्हता.

गोदावरीच्या लक्ष्यांत हा फरक आल्यावांचून राहिला नाहीं. मनोहर-पंतांकडे पहात ती ह्मणाली " चला ना पण आतां काका ! "

" गोदे, मला कां उगीच तूं अशी त्रास देते आहेस ? " मनोहरपंत त्रासिक स्वरानें ह्मणाले.

" चला काका--चला आंत. पाहिजे तर मी तुमच्या पायां पडतें--पण माझ्याबरोबर तुह्मी आतांच्या आतां चला. "

" नको उगीच मला असा त्रास देऊंस गोदे ! मी वारंवार घरातल्या सगळ्या माणसांनां सांगून टाकलें आहे, कीं, कांहीं झालें तरी मी कांहीं

म्हणून मनोहरपंत पुस्तकाकडे लक्ष्य लावण्याचा वृथा प्रयत्न करूं लागले.

गोदावरी म्हणाली "तें मला नाहीं कांहीं ठाऊक काका! तुम्हाला जें कांहीं सांगायचं असेल, तें अप्पांनांच सांगा ना तुम्ही! चला, या–"

"पण येऊन करायचें काय? त्यापासून होणार काय?"

"चला, या ना काका!"

क्षणमात्र विचार करून मनोहरपंतांनीं डोळ्यांवरून चष्मा काढून, तो त्याच्या 'केस'मध्यें (घरांत) ठेवून खिशांत घातला; परंतु क्षणभरानें तो पुनः काढून डोळ्यांला लावला. तपकिरीच्या डबींतून थोडी तपकीर घेऊन ती त्यांनीं सडकून ओढली, व पुस्तक बगलेंत मारून आणि दर्भासन हातावर झुलतें टाकून विषण्ण मुखानें ते गोदावरीबरोबर वाड्याकडे जाऊं लागले.

---

## प्रकरण तिसरें.

## कलहाचें बीज.

आज रावसाहेबांच्या दिवाणखान्याला जणूं काय एका प्रकारचें नूतन चैतन्यच आलें होतें. मनोहरपंतांनां 'पहावयाला' मुंबईहून, त्यांच्या भावी श्वशुरांच्या वतीनें दोघे गृहस्थ आले होते, त्यांची बैठक दिवाणखान्यांतच बसली होती. या दोघांपैकीं एकजण खुद्द मुलीचा सख्खा चुलता असून त्याचें नांव सदाशिवराव मुतालीक. सदाशिवरावांबरोबर दुसरे जे गृहस्थ रावसाहेबांकडे आले होते, त्यांचा मुलीच्या घराण्याशीं कोणत्याहि प्रकारचा आप्तसंबंध नव्हता–मनोहरपंतांच्या भावी श्वशुरांचे ते एक निकटचे मित्र होते, इतकेंच. या गृहस्थांचें नांव नारायणराव देसाई. हे एम्.ए., बी. एस्सी. असून मुंबईच्या एका कॉलेजांत 'केमिस्ट्री'–(रसायनशास्त्र)–चे असिस्टंट प्रोफेसर होते. पूर्वी जेव्हां लहानलहान मुलांमुलींचे विवाह आमच्या समाजांत विशेष जारीनें सुरू होते, तेव्हां नवऱ्यामुलाची वधूपक्ष निरनिराळ्या तऱ्हेनें कसून

रेंगाळतच आहे. प्रस्तुतच्याच उदाहरणांत पहाना ! नवरामुलगा चांगला प्राप्तवयस्क असून मुंबई विश्वविद्यालयाचा एम्.ए., एलएल्. बी. झालेला 'तिप्पट' ग्रॅज्युएट आहे, आणि ही बातमी सरकारनें आपल्या 'गव्हर्मेंट गॅझेट'मध्यें वेळोवेळीं छापून सर्व जगाला कळविली असून अशा 'मुला'ची 'परीक्षा' घ्यावयाची कांहीं आवश्यकता नाहीं; इतकेंच नव्हे, तर अशा मुलाची परीक्षा घ्यावयाला योग्य परीक्षक सांपडणेंहि कठिण आहे; या साऱ्या गोष्टी कन्यापक्षाला जरी अगदीं पूर्णपणें ठाऊक होत्या, तरीहि मनोहरपंतांच्या भावी श्वशुरांनां आपल्या बंधूबरोबर एक नामांकित विद्वान् मनुष्य पाठविणें या प्रसंगीं उचित आहे असें वाटून त्यांनीं नारायणरावांनां त्यांच्याबरोबर बनगांवला मुद्दाम पाठविण्याची व्यवस्था केली होती. प्रोफेसरसाहेब भावी जामातांचें कोणत्या तऱ्हेनें 'रासायनिक परीक्षण' करणार होते, कोण जाणे !

सदाशिवराव आणि प्रोफेसरसाहेब दिवाणखान्यांत एका थोरल्या, पांढरा शुभ्र अभ्रा चढविलेल्या लोडाशीं टेंकून बसले असून त्यांच्याजवळ रावसाहेब बसले होते. त्या तिघांत अमुक एका विषयावर गप्पा चालल्या होत्या, असें जरी नाहीं, तरी पण चाललेल्या गप्पांत मनोहरपंतांच्या भावी विवाहासंबंधाचा भाग विशेष असावा, हें साहजिक होतें. शेजारचे दोघेचौघे वयोवृद्ध व शिष्ट असे लोकहि याच प्रसंगानिमित्त तेथें जमले होते. विड्या, सिगारेट, चिरूट इत्यादि धूम्रपानसाधनांच्या सुगंध व दुर्गंध अशा धुराचे लोटच्या लोट चालले असून त्यामुळें तो दिवाणखाना अंधारानें भरून गेल्यासारखा दिसत होता. मधुनमधून पानसुपारीवरहि हल्ला चालू होता. गप्पांसप्पांची मजलस खूब मजेदार जमली होती. सर्वांच्या हास्यविनोदाला नुसता ऊत आला होता. फक्त एका प्रोफेसरसाहेबांनीं मात्र या गप्पाष्टकांत विशेषसा भाग घेतला नव्हता. ते पहिल्यापासून बहुतेक गप्पच होते. मधुनमधून ते जवळच पडलेल्या आपल्या रुप्याच्या डबींतून चिमटी चिमटी तपकीर घेऊन नाकपुड्यांत कोंबीत; व दुसऱ्यांच्या विनोदात्मक कोट्या ऐकून मधुनमधून आपल्या तिमजली हंशानें सारा दिवाणखाना हादरून सोडीत.

बराच वेळ झाला. मनोहरपंतांनां दोनतीन बोलावणीं गेलीं, तरी देखील ते येत नाहींत, असें पाहून स्वतः रावसाहेब उठले, आणि खालीं उतरून मागीलदारच्या बागेकडे ते निघाले. परंतु खालच्या अंगणांत ते येतात, तों पुढें आपली कन्या गोदावरी व तिच्या मागें काखेंत पुस्तक व हातावर दर्भासन घेऊन मनोहरपंत येत आहेत, असें त्यांच्या दृष्टीला पडलें.

मनोहरपंत जवळ येतांच रावसाहेब स्मितपूर्वक त्यांनां ह्मणाले "अरे, इतका वेळ कुठें होतासरे बाबू? चल एकदम असाच वर दिवाणखान्यांत. केवढा वेळ तरी तुह्मी आह्मी सारेजण तिथें वाट पहातों आहों ना! तुला बोलवायला सारखीं माणसांवर माणसें पाठवीत होतों–मारे गडबड उडवून दिली! पण तुझा आपला कुठें पत्ताच नाहीं!"

आपणाला 'पहावयाला' मुंबईहून मंडळी आली आहे, असें आज सकाळीं मनोहरपंतांनीं ऐकिल्यापसून त्यांच्या मनाची स्थिति कांहीं विलक्षणच होऊन गेली होती. विकत घ्यावयाच्या एकाद्या बैलघोड्या-प्रमाणें माणसालाहि 'पहावयाला' येण्याच्या कल्पनेनें त्यांच्या मनाचा अगदीं भडका उडवून दिला होता. परंतु मनाची ही स्थिति झांकण्याचा यथासाध्य प्रयत्न करून मनोहरपंत नम्रपणें आपल्या बंधूला ह्मणाले "इतकीं बोलावण्यांवर बोलावणीं कशाला मला पाठवलींत अप्पा? दिवाण-खान्यांत मीं जरूर आलेंच पाहिजे, असें आज काय विशेष कारण आहे?"

रावसाहेब हंसून ह्मणाले "हो, तसेंच कांहीं कारण आहे. आज मुंबईहून दोघे गृहस्थ आले आहेत आपणांकडे. चल, त्यांच्याशीं चारदोन शब्द बोल."

मनोहरपंत क्षणभर थांबले व ह्मणाले "ते काय माझ्या लग्नाकरतां का आले आहेत अप्पा?"

रावसाहेब किंचित् गोंधळांत पडल्यासारखे होऊन क्षणभर गप्प राहिले व ह्मणाले "हो–तसें–"

मनोहरपंत एकदम तीव्र स्वरानें ह्मणाले "मीं तर तुह्माला किती तरी वेळ स्पष्टपणें सांगितलें आहे अप्पा, कीं, कांहीं झालें तरी मी कांहीं लग्न

रावसाहेब मध्येंच किंचित् रागाच्या स्वरानें ह्मणाले " हाच तो तुझा कांहीं तरी दुराग्रह ! त्यांनीं तुला पाहिलें, ह्मणजे तुझ्या गळ्यांत ताबडतोब त्या मुलीची माळ पडलीच वाटतें ? अरे, ते तुला नुसते आज पहायला आले आहेत. त्यांनां जांवई नक्षत्रासारखा अगदीं सुरेख, रूपवान् अन् गोरागोमटा पाहिजे आहे. असा वर मिळाला, तरच ते लग्न करणार. पैशांची त्यांनां बिलकूल तमा नाहीं!"

रावसाहेबांचे हे शब्द ऐकून मनोहरपंतांचें अगोदरच विषण्ण असलेलें मन अधिकच विषण्ण झालें. धनसंपत्तीच्या मदानें उन्मत्त झालेला तो मुलीचा गर्विष्ठ बाप आपणाला विकत घेण्यासाठीं आला आहे! पडलों आपण त्याला पसंत, तर तो आपणाला विकत घेईल-मग कितीहि किंमत पडो, त्याची त्याला दरकार नाहीं! पसंत नाहीं पडलों, तर अवज्ञतेनें उपरणें झाडून तो चालता होणार ! शिवशिव ! काय आपली दुःस्थिति ही !

मनोहरपंतांकडून आपणाला कांहींच जबाब येत नाहीं, असें पाहून रावसाहेब ह्मणाले "ते मोठे धनकुबेर लोक आहेत हो! आमच्यासारख्या दहा इनामदारांनां एका चुटकीसरशीं ते विकत घेऊं शकतील. त्यांनां जर तूं पसंत पडलास कीं नाहीं बाबुराव ! तर तुझें भाग्य पुरें फळफळलें ह्मणून समज! अरे, मुंबईचे मोठमोठे बॅरिस्टर, सॉलिसिटर, वकील ह्मणजे त्यांच्या हातांतलीं नुसतीं खेळणीं आहेत ना! ते ह्मणतात काय, आहे का माहीत बाबुराव ? 'लग्न होतांच जांवईबुवांनां मुंबईला घेऊन जाऊन कोटांतल्या एकाद्या जंगी इमारतीच्या फ्लॅटमध्यें देऊं त्यांनां भपकेबाज ऑफिस थाटून ! एक मोटार देऊं त्यांच्या तैनातीला-सहा महिन्यांच्या आंत त्यांची जंगी प्रॅक्टिस चालू होईल, अशी सर्व व्यवस्था आमच्याकडे लागली !' पण त्यांची मुख्य अट ही आहे, कीं, तूं त्यांनां पसंत पडला पाहिजेस! चल, वर दिवाणखान्यांत चल. केव्हांपासून तुझी ते सारखे वाट पहाताहेत!"

'रावसाहेब आपणाकडून आपल्या भावी व्याह्यांची प्रौढि सांगावयाला गेले खरे परंतु त्याचा परिणाम मात्र झाला उलटा ! जो अग्निस्फुलिंग

आतांपर्यंत टुकटुक करीत होता, त्यांत रावसाहेबांनीं आपणाला स्वतःला नकळत अशा रीतीनें घृताहुति टाकली! त्यांचा प्रत्येक शब्द मनोहर-पंतांच्या हृदयाला तीव्र शल्याप्रमाणें दारुण वेदना देऊं लागला. तरीहि शक्य तितकें आत्मसंयमन करून ते ह्मणाले "अप्पा, मला क्षमा करा—मी नाहीं वर दिवाणखान्यांत येत."

"कां रे बुवा? कां नाहीं येत?"

"माझें मन या वेळीं चांगल्या स्थितींत नाहीं अप्पा!"

रावसाहेब आतां थोडे रागावले. ते तीव्र स्वरानें मनोहरपंतांनां ह्मणाले "हें काय अलीकडे तूं भलतेंच चालवलें आहेस बाबू? ह्मणे 'मन बरें नाहीं!' मन बरें नसायला तुला असें झालें आहे तरी काय? कोणती गोष्ट तुला कमी आहे रे? मुंबईहून-इतक्या लांबून ते गृहस्थ आपणांकडे मुद्दाम आले, त्यांच्याजवळ बसून दोन शब्द बोलायचे—हें देखील नाहीं का तुझ्या-कडून होण्यासारखें? मग तुझ्या हातून होणार तरी काय? बरें, आलेले लोक तरी का असेतसे आहेत? त्यांच्या त्या शेंकडों पेढ्यांपैकीं एकादीवर आह्मांला नुसती कारकुनी मिळाली तरी मिळवली आह्मीं! चल ये—"

आहुतीवर आहुति! अपमानावर अपमान! आपला अधरोष्ठ चावून कंपित स्वरानें मनोहरपंत ह्मणाले "ठीक आहे—चला तर मग. तुमच्या इच्छेप्रमाणें होऊं द्या. पण पुढच्या परिणामाबद्दल मात्र माझ्यावर दोष ठेवूं नका, ह्मणजे झालें!"

"ठीक आहे—चल तूं अगोदर."

बंधूला बरोबर घेऊन रावसाहेब वर दिवाणखान्यांत आले. सदाशिव-रावांकडे बोट दाखवून ते मनोहरपंतांनां ह्मणाले "हे सदाशिवरावजी—दादासाहेब मुतालिकांचे सख्खे बंधु. यांनां नमस्कार कर."

सदाशिवरावांच्या स्थूल, गोल अशा चेहऱ्याकडे मनोहरपंत क्षणभर पहातच राहिले. त्यांच्या कोटाच्या बटनहोलपासून खिशापर्यंत लोंबणाऱ्या, मधुनमधून हिरकण्या जडलेल्या बहुमूल्य छेड्याकडे आणि त्यांच्या दोन्ही हातांतील अंगुलींमधील हिरे, माणकें, पाच इत्यादि

रत्नांच्या आंगठ्यांकडे त्यांनीं तुच्छतेनें आपली दृष्टि लावली. अशा या भबक लक्ष्मीपुत्राला नमस्कार करावा कीं नाहीं, याविषयीं त्यांना क्षणभर विचार पडला असावा, असें दिसलें; परंतु शेवटीं त्यांनीं हात वर करून सदाशिवरावांनां नमस्कार केला, व ते थोड्या अंतरावर खालीं बसले.

मनोहरपंतांकडे पाहून सदाशिवरावांनीं गंभीरपणें प्रश्न केला " नांव काय आपलें ? "

या प्रश्नानें मनोहरपंतांच्या अंगाची आगीआग झाली ! आपल्या नेत्रद्वयांतून चष्म्याच्या भिंगावरून सदाशिवरावांकडे दोन आग्निबाण फेंकून कंपित स्वरानें ते ह्मणाले " माझें नांव मनोहर कृष्ण देशमुख. माझ्या वडिलांचें नांव कृष्णराव केशव ऊर्फ तात्यासाहेब देशमुख. पांच वर्षांपूर्वीं ते कैलासवासी झाले. मी अलीकडच्या पिढींतला असल्यामुळें माझें मोडीअक्षर चांगलें नाहीं—तरी साधारणपणें चांगलें वाचतां येतें. पत्रावळी लावतां येत नाहींत. बोरूच्या लेखण्या करतां येत नाहींत. शाई करतां येते—पण मला लग्नच करायचें नाहीं !"

सदाशिवरावांच्या प्रश्नाला मनोहरपंतांच्या तोंडून हें भलतेंसलतेंच—अगदीं विलक्षण, अनपेक्षित उत्तर आलेलें पाहून दिवाणखान्यांत बसलेली सर्व मंडळी अगदीं हतबुद्धच होऊन गेली ! जे चिरूट, विड्या वगैरे ओढीत होते, त्यांचे हात जेथल्या तेथेंच थबकून राहिले ! रावसाहेबांनां तर लज्जेनें मेल्यापेक्षां मेलें होऊन ते खालीं पाहूं लागले. ते संतापानें अगदीं लाल होऊन गेले !

चहूंकडे पसरलेल्या निस्तब्धतेचा भंग करून कांहीं वेळानें प्रथम सदाशिवराव ह्मणाले "ओः ! मला नव्हती अशी कांहीं कल्पना ! नाहीं तर—"

इतक्यांत मनोहरपंत त्यांनां नमस्कार करून चटकन् उठले, व आपल्या खडावा चढवून खाडखाड शब्द करीत तेथून झटकन् निघून गेले.

ज्यांनीं धूम्रपान बंद केलें होतें, त्यांनीं पुनः तें हळुहळू सुरू केलें; परंतु कोणाला कांहींच बोलण्याचा धीर होईना. शेवटीं रावसाहेबांकडे

पाहून सदाशिवराव ह्मणाले “ अशा रीतीनें आह्मांला बोलावून आणून आमचा अपमान केला नसता, तरी चालण्यासारखें होतें !”

रावसाहेबांनीं एक दीर्घ निःश्वास टाकला व ह्मटलें “ आतां मी बोलूं तरी काय अन् कसें ? मला आपणांसमोर तोंड दाखवायला देखील जागा उरली नाहीं. या आपल्या संबंधापासून कांहीं तरी चांगलेंच निष्पन्न होईल, अशा आशेनेंच मीं या कामाला हात घातला होता. आपण बडे लोक—आपणांशेजारीं बसायची देखील आमची योग्यता नाहीं. आपल्या-सारख्यां लोकांशीं शरीरसंबंध झाल्यानें या गाढवाचें शेवटीं कल्याण होईल, असें मला वाटलें होतें; पण वेळ तर अशी अत्यंत खराब आली आहे, कीं, या काळांत प्रत्यक्ष पाठच्या भावावरहि उपकार करायला जाणें ह्मणजे महाहरामखोरपणाचें होतें! मला तर कांहीं सुचत नाहीं. आपणांला मी तोंड तरी कसें दाखवूं ?” असें ह्मणून रावसाहेबांनीं दोन्ही हातांनीं आपलें तोंड झांकलें.

शेजारचे एक वयोवृद्ध शिष्ट गृहस्थ म्हणाले “ ‘ **विद्या ददाति विनयम्** ’ असें आम्ही चिरकाल ऐकत आलों आहों; पण तें अगदीं असत्य आहे, असें आज आमच्या अगदीं पूर्ण अनुभवाला आलें. बाबुरावांनीं इतकी विद्या संपादन केली, एकहि परीक्षा द्यायची ह्मणून शिल्लक ठेवली नाहीं, पण शेवटीं त्यांच्या अंगीं अजूनहि इतका उद्धटपणा आहे, ही अत्यंत दुःखाची गोष्ट आहे. आह्मी यांच्याइतके शिकलों नाहीं, अन् भाराभर परीक्षा दिल्या नाहींत, हें एकपरी बरेंच झालें, असें मला आतां वाटूं लागलें आहे!”

प्रोफेसरसाहेब अजूनपर्यंत अगदीं गप्प होते, ते आतां ह्मणाले “ या गोष्टींत एक पठाडी गोम काय आहे, ती आली आपणां सर्वांच्या लक्ष्यांत? साऱ्या शाळा अन् कॉलेजें यांत अलीकडे भाराभर विषयांचें शिक्षण मिळतें, परंतु त्यांबरोबरच नीतिशिक्षण देण्याची कोठेंहि बिलकूल व्यवस्था नाहीं. अर्थात् अलीकडे शिकलेले लोक असे आपोआपच उद्धट बनतात! माझी तर बुवा या अविनीतभावाची मीमांसा अशी आहे. ” असें ह्मणून त्यांनीं तपकिरीची एक भली थोरली चिमूट नाकांत कोंबली.

सदाशिवराव रावसाहेबांकडे वळून, हात जोडून ह्मणाले "तर मग येतों आतां आह्मी. असाच कृपालोभ असावा आपला!"

रावसाहेब खिन्न स्वरानें ह्मणाले "फार उशीर झाला आहे. स्नान अन् भोजन आतां इथेंच व्हावें, अशी हात जोडून विनंति आहे."

" आपल्या आज्ञेचें उल्लंघन करणें अगदीं जिवावर येतें, पण काय करणार ? आपण आह्मांला क्षमा केली पाहिजे. इथें आतां रहावें, असें वाटण्यासारखी आमच्या मनाची स्थिति नाहीं. आमचा इथें भारी अपमान झाला, अशी मनाची भावना झाली आहे. पण याबद्दल आपणाला आह्मी तिळमात्र दोष देत नाहीं. सारा दोष आमच्या अदृष्टाचा ह्मटला पाहिजे, दुसरें काय? इथून एक मैल दीड मैलावर आमच्या एका स्नेह्याचें घर आहे, तिथें जाऊनच आमच्या स्नानाहाराची व्यवस्था आह्मी करतों. बरें तर, येतों आह्मी. अरे कोण आहे रे? गणू? चला—"

आलेल्या पाहुण्यांनां आग्रहानें राहून घेण्यासारखी या वेळीं राव-साहेबांच्या तरी मनाची स्थिति कोठें होती ? त्यांनां या वेळीं डोळ्यां-समोर केवळ एका मनोहरपंतांची मूर्ति दिसत होती. एकदां त्यांनां गांठून चांगलें झाडून आजपर्यंत मनांत डंवचत असलेल्या साऱ्या विषाचा वर्षाव त्यांच्यावर कधीं करतों, असें रावसाहेबांनां होऊन गेलें होतें. काय होईल तें होवो, ही दिशा किंवा ती दिशा काय ती कायमची ठरवून आपल्या बंधूच्या संबंधानें काय तो कायमचा निकाल करून टाकावयाचा, असें त्यांनीं मनाशीं ठरवून टाकलें. क्रोधभरामुळें त्यांचा गळा अगदीं दाटून येऊन त्यांच्या तोंडून शब्द फुटत नव्हता. श्वासोच्छ्वास जोरजोरानें व फारच जलद होत होता.

पाहुण्यांची बॅग उचलून गणू पुढें चालूं लागला. एक शब्दहि न बोलतां सदाशिवराव व प्रोफेसरसाहेब त्याच्या मागोमाग निघाले. शेजारचो जमलेलो शिष्टमंडळीहि झालेल्या गोष्टीविषयीं तेथल्यातेथें सडकून चर्चा करण्याचा दारुण मोह कसाबसा आवरून जड आवेगपूर्ण हृदयानें

इलुहळू तेथून आपापल्या घरांकडे निघून गेली. मुकाट्यानें जातांना बिचाऱ्यांच्या मनाची काय स्थिति झाली होती, ती त्यांची त्यांनांच ठाऊक!

मंडळीची रवानगी करून रावसाहेब भुकेनें कावलेल्या एकाद्या वाघाप्रमाणें बंधूचा 'शोध' करण्याकरतां तेथून धांवतच गेले!

---

## प्रकरण चवथें.

### वाग्बाण.

मुंबईहून आलेल्या पाहुणेमंडळीला मागें सांगितल्याप्रमाणें सणसणीत उत्तर देऊन खडावा खाडखाड वाजवीत मनोहरपंत जे बाहेरच्या दिवाणखान्यांतून निघाले, ते वाड्यांतील मागील भागाकडे वळून जिना चढून दुसऱ्या मजल्यावरील आपल्या निजावयाच्या खोलींत शिरले. जातांजातां खालीं बायकांच्या दालनांत त्यांची आते, वहिनी, गोदावरी वगैरे बायकामंडळी त्यांचीच वाट पहात बसून राहिल्या होत्या. वहिनींनीं तर भाऊजींची सडकून थट्टा करण्याचा बेतहि मनांत करून ठेवला होता. परंतु मनोहरपंतांचा चेहरा व त्यांची एकंदर या वेळची 'चालचलणूक' पाहून, त्यांची थट्टा करावयाचें तर बाजूलाच राहिलें, परंतु त्यांनां एकादा प्रश्न विचारण्याचेंहि धाडस कोणाला झालें नाहीं!

मनोहरपंत आपल्या खोलींत जाऊन कांहीं वेळ झाल्यानंतर रागानें बेफाम होऊन गेलेले रावसाहेबहि खालीं आले. आत्याबाईंनां तेथें पाहून त्यांनीं विचारलें "बाबू कुठें गेला आत्याबाई?"

"वर गेला वाटतं—पण काय झालं रे अप्पा? पडला का पसंत बाबू त्यांनां?"

"तें सारें सांगेन मागाहून—लांबलचक हकीगत आहे ती!" असें ह्मणून धाडधाड जिना चढून रावसाहेबांची स्वारी वरच्या मजल्यावर आली. इकडेतिकडे पहातपहात शेवटीं ते मनोहरपंतांच्या शयनगृहांत येऊन पहातात, तों ते एका उघड्या खिडकीजवळ डोकीवर हात देऊन उभे असून विमनस्कतेनें आकाशाकडे पहात आहेत, असें त्यांच्या दृष्टीला पडलें.

खिडकीच्या खालींच बगीचा असून त्याच्या मध्यभागीं वृक्षशाखांच्या आड एक सुंदर पुष्करिणी होती.

बंधूच्या खोलींत येतांच रावसाहेबांनीं दार लावून त्याला कडी घातली. नंतर हलुहळू मनोहरपंतांजवळ येऊन उघड्या खिडकींतून त्यांनीं पुष्करिणीकडे नजर फेंकली. घरची स्वयंपाकीणबाई पुष्करिणीच्या पायऱ्या उतरून तींतील पाण्यानें आपलें हातपायतोंड स्वच्छ धूत आहे, असें त्यांच्या दृष्टीला पडलें. ही स्वयंपाकीणबाई एक अनाथ ब्राह्मण बालविधवा असून तिचें वय अठराएकोणीस वर्षांचें होतें. रावसाहेबांनीं एकवार पुष्करिणीकडे आणि एकवार आपल्या बंधूकडे संदेहाच्या नजरेनें पाहिलें.

क्षणभरानें त्यांनीं रुक्ष स्वरानें विचारलें "बाबू, तुझा एकंदर हेतु तरी काय आहे, तें मला एकदां कळूं दे!"

मनोहरपंतांनीं फक्त एकवार आपल्या ज्येष्ठ बंधूंकडे पाहिलें व त्यांना कांहीं उत्तर न देतां ते स्तब्ध उभे राहिले. रावसाहेब आपल्या खोलींत आल्याबद्दल त्यांना कांहीं आश्चर्य वाटल्याचें दिसलें नाहीं.

पुनः रावसाहेबांनीं आणखीहि तीव्र स्वरानें प्रश्न केला "बाबू, तुझा एकंदर मतलब तरी काय आहे, तें मला स्पष्ट सांग."

स्थिर आणि दृढ स्वरानें मनोहरपंतांनीं उत्तर दिलें "मी कांहीं झालें तरी लग्न करणार नाहीं, हें कितीतरी दिवस मी सर्वांना सांगत आलों आहें."

"अन् तें आम्ही ऐकतहि आलों आहों—त्याचें असूं दे एक—पण आपल्या घरीं आलेल्या त्या थोर सभ्यगृहस्थांचा अशा तऱ्हेनें उपमर्द अन् अपमान करण्याचें साहस तूं कसें केलेंस? त्यांच्या अपमानामुळें माझाहि अपमान झाला, ही गोष्ट तुझ्या लक्ष्यांत आली नाहीं काय?"

मनोहरपंतांनीं बंधूच्या या प्रश्नाला कांहीं उत्तर दिलें नाहीं. दर क्षणाला रावसाहेबांच्या रागाचा पारा चढतच चालला होता. ते आवाज किंचित् चढवून म्हणाले " आतां कां नाहीं तूं उत्तर देत बाबू?"

मनोहरपंतांनीं शांतपणें उत्तर दिलें "तुमचा अपमान करावा, असा माझा बिलकूल हेतु नव्हता."

" हेतु नव्हता? तर मग काय उद्देश होता तुझा तसें करण्यांत? त्या थोर गृहस्थांचा अपमान करावा, असा तर मग तुझा हेतु होता काय? ज्या थोरामोठ्या माणसांना मोठ्या आग्रहानें मीं घरीं बोलावून आणिलें, त्यांचा अशा उद्धटपणानें उपमर्द करावा असाच तुझा हेतु होता काय? हेंच सारें तुझें शिक्षण काय? तुझा एम्. ए., एल्एल्. बी.पणा हाच काय? तुझ्या ज्ञानाची मजल येथपर्यंतच काय? सभ्यपणाचा तुझा हाच काय आदर्श? बाबू–धिक्कार असो तुझ्या ज्ञानाला, सभ्यतेला अन् शिक्षणाला!"

वडील बंधूच्या भाषणांतील प्रत्येक शब्दानें मनोहरपंतांच्या अंगाचा तिळपापड उडत होता. परंतु शिकस्तीच्या प्रयत्नानें त्या क्रोधाचें संयमन करून ते शांतपणें ह्मणाले " अप्पा, मजवर असे उगीच रागाऊं नका. जरा विचार करा. त्यांनीं माझा अपमान केला नाहीं काय?"

झटकन् तोंड फिरवून रावसाहेब ओरडले "काय ह्मणतोस? त्यांनीं तुझा अपमान केला नाहीं काय? होय, केला बरें त्यांनीं तुझा मोठा अपमान! आमच्यासारख्या गरीबांकडे त्यांच्यासारखा नवकोट नारायण आपली मुलगी देऊं इच्छितो, हा खराच त्यांनीं तुझा अन् तुझ्याबरोबर आह्मां सर्वांचाहि अगदीं अक्षम्य असा अपमान केला!"

एक मोठा उसासा टाकून मनोहरपंत उद्विग्नतेनें ह्मणाले " तुह्माला हें सारें मी समजावून तरी कसें सांगूं अप्पा?

"मला कसें समजावूं ह्मणतोस? जरा स्पष्टपणें तूं बोललास, तर मला वाटतें, मला समजेल सारें! मराठी ही माझी मातृभाषा आहे. मराठींत जर तूं मला सांगितलेंस, तर कदाचित् मला तुझें ह्मणणें समजेलहि! बाबू! खरोखर तुला असें वाटतें काय, कीं, एकादी अगदीं साधी अशी गोष्टहि मला समजणार नाहीं, इतका मूर्ख, इतका गांवढळ, इतका गाढव मी आहें? अगदीं कबूल करतों मीं, कीं, मी कांहीं तुझ्यासारखा कॉलेजांत शिकलों नाहीं, कीं, एम्. ए., एल्एल्. बी.पर्यंत झाडून साऱ्या परीक्षाहि मीं पालथ्या घातल्या नाहींत! माझीतर शिक्षणाची सारी मजल सेकंड क्लासपर्यंत गेलेली आहे–पण तूं सांगणार आहेस, हें कांहीं



श्रीयुत प्रभातकुमार मुकर्जी,

बी. ए., बार-ॲट-लॉ.

# संसार असार!

## प्रकरण पहिलें.

### पित्राज्ञा.

" बाबा, बाबा, एवढें हें औषध पिऊन टाकाना एकदां झटकन्!"

हे शब्द बोलणारी व्यक्ति पस्तीसएक वर्षें वयाचा तरुण पुरुष होती. एका छोट्या ग्लासांत औषध घेऊन नाकाशीं सूत लागलेल्या आपल्या वडिलांच्या पलंगाशेजारीं बसून अत्यंत करुण स्वरानें त्यानें हे शब्द उच्चारले.

" बाबा, ऐकलेंत ? बाबा, अहो बाबा—"

परंतु त्या वृद्ध रोग्यानें डोळे उघडून पाहिलें नाहीं. त्याला तितकी शुद्धिच नव्हती. त्या वेळीं चैत्र महिना चालू होता. दुपारची वेळ-एक वाजण्याचा सुमार होता. उघड्या असलेल्या खिडक्यांतून मधुनमधून थोडथोडा वारा येत असे, तेवढाच. बाकी प्रखर उष्णतेमुळें अंगाची लागीआग होत होती.

पलंगापासून जवळच एका खुर्चीवर बूटपाटलून, पगडी, सोनेरी फ्रेमचा चष्मा वगैरे सरंजाम' परिधान केलेले, मुद्दाम जिल्ह्याच्या गांवाहून जबरदस्त फी देऊन आणलेले डॉक्टरसाहेब गंभीर मुद्रेनें बसले होते. तो तरुण गृहस्थ त्यांच्याकडे वळून खिन्नतेनें ह्मणाला "काय बुवा करावें आतां? हे मुळीं डोळेसुद्धां उघडून नाहीं पहात. आतां यांच्या पोटांत औषध जातें कसें, ही मला मोठी काळजी पडली आहे. डॉक्टरसाहेब, औषध जायला दुसरा कांहीं नाहीं का उपाय ? "

डॉक्टरसाहेब ह्मणाले "हळुहळू त्यांचें तोंड उघडून औषध नाहीं का त्यांना घालतां येणार?"

"बरें तर. मी हळूच तोंड उघडून धरतों, आपण मग घाला औषः थोडथोड."

डॉक्टरसाहेबांनीं आपल्या जागेवरून उठून त्या तरुण गृहस्थाच्य हातचें ग्लास घेतलें. त्या तरुणानें आपल्या वडिलांच्या ओंठांना स्पर्श करून त्यांचें तोंड हळूच उघडण्याचा प्रयत्न केला. तोंच म्हाताऱ्या किंचित् डोळे उघडून एक दीर्घ निःश्वास टाकून क्षीण स्वरानें म्हटलें "आ का—य ?"

तरुण करुण स्वरानें म्हणाला "बाबा, हें औषध घ्या थोडें."

आतांपर्यंत तो रोगी अगदीं विकल होऊन पडला होता. तो आत किंचित् कुशीवर वळला, व पुनः एकवार एक मोठा उसासा सोडून आपल्य मुलाच्या चेहऱ्याकडे पाहून हळूच म्हणाला"औषध ? आतां मला औषध कशाला बाळ? आतां गंगोदक हेंच माझें औषध. तें माझ्या थोडें तोंडांत घाल—अयाई ! भारी तहान लागते आहे—घसा कोरडा—"

त्या तरुणानें कांहीं न बोलतां डॉक्टरांच्या तोंडाकडे पाहिलें. त्याच्य मनांतील भावार्थ समजून ते म्हणाले " कांहीं नाहीं हरकत."

तत्क्षणीं तो तरुण गृहस्थ उठून बाहेर दिवाणखान्यांत गेला. तेथें त्याच पत्नी व घरांतील इतर स्त्रिया मुकाट्यानें अश्रु ढाळीत बसल्या होत्या तरुण तेथें येतांच त्याची पत्नी चटकन् उठून उभी राहिली.

" मला थोडी गंगा द्या कुणीतरी आणून."

गंगोदक मिळतांच तें आंत नेऊन त्या तरुणानें आपल्या पित्याच्य तोंडांत थोडेंसें घातलें. तें तोंडांत जातांच वृद्धाच्या अंगीं जणूं काय न चैतन्यच आलें. डोळे नीट उघडून त्यानें मुलाला विचारलें " बाबू—बा कुठें आहे माझा ?"

" त्याला तार केली आहे बाबा ! अजून तो कांहीं आला नाहीं. प मला वाटतें, आतां कांहीं उशीर नाहीं लागणार."

किंचित् विमनस्क होऊन जड अशा स्वरानें वृद्ध जणूं काय आपणाशींच बोलूं लागला " उशीर नाहीं ? आतां उशीर नाहीं लागणार ?"

तरुणानें प्रेमार्द्र स्वरानें उत्तर दिलें "मला वाटतें, आतां फार वेळ नाहीं लागणार बाबा!"

वृद्ध रोगी यावर कांहींच बोलला नाहीं. हळुहळू तो पुनः अचेतन होऊन पडला.

या वृद्ध रोग्याचें नांव कृष्णराव देशमुख. यांनां तात्यासाहेब असें ह्मणत असत. तात्यासाहेब हे एक लहानसे इनामदार असून त्यांचें वार्षिक उत्पन्न वीसबावीस हजार रुपयांपर्यंत होतें. आमची ही गोष्ट ज्या गांवीं घडून येत आहे, त्या गांवाचें नांव बनगांव. बनगांव हा सातारा जिल्ह्यांतील एक मध्यमसा गांव आहे.

वर जो तरुण गृहस्थ सांगितला, त्याचें नांव गोपाळराव. यांनां रावसाहेब असें ह्मणत असत. रावसाहेब हे तात्यासाहेबांचें ज्येष्ठ चिरंजीव—तात्यासाहेबांनां पहिल्या कुटुंबापासून झालेले एकटेच पुत्र. तात्यासाहेबांचें पहिलें कुटुंब वारलें, त्या वेळीं तात्यासाहेबांनीं तारुण्यावस्थेचा अतिक्रम करून चांगला प्रौढावस्थेंत प्रवेश केला होता. तात्यासाहेबांसारख्या श्रीमंत विधुराला आमचा समाज फार दिवस विधुरावस्थेचें दुःख अनुभवावयाला लावील, हें शक्यच नाहीं. तात्यासाहेबांनीं प्रथम पत्नीच्या मृत्यूनंतर लवकरच दुसरा विवाह केला; परंतु थोड्याच वर्षांत दोन वर्षांचा एक मुलगा मागें ठेवून तात्यासाहेबांच्या याहि पत्नीनें त्यांनां दगा देऊन अकालींच वैकुंठपदप्राप्ति करून घेतली. तिच्या या तान्ह्या मुलाचें नांव मनोहर ऊर्फ बाबू. तात्यासाहेबांचें श्रीकृष्ण हें परंपरागत आराध्य दैवत. या दैवतावर त्यांची विशेष भक्ति असल्यामुळें आपल्या या दुसऱ्या मुलाला गोविंद, केशव, माधव—किंवा असेंच कांहीं तरी कृष्णाचें नांव ठेवावें, अशी त्यांची फार इच्छा होती; परंतु अलीकडच्या काळांतील त्यांच्या द्वितीय पत्नीला त्यांचा हा विचार रुचला नाहीं. तिनें पतीच्या बेताला जोरानें हरकत करून, आपल्या मुलाचें 'मनोहर' असेंच नवीन पद्धतीचें नांव ठेवून आपला हट्ट तडीला नेला. तात्यासाहेबांच्या घराण्यांतील मुलांमुलींनां आजपर्यंत देवदेवींच्या नांवांखेरीज दुसरीं नांवें ठेवण्याची रीत नव्हती;

परंतु त्यांची ही **'वृद्धस्य तरुणी भार्या'** मुळींच ऐकेना. तिनें ही रीत साफ फेटाळून लाविली. वृद्धावस्थेंतील संतान–त्यांतून मातृसुखाला लहानपणींच पारखा झालेला मुलगा, ह्मणून तात्यासाहेबांचें मनोहरावर विशेष प्रेम होतें. मनोहराचें वय या वेळीं एकोणीस वर्षांचें असून तो मुंबईला एल्फिन्स्टन् कॉलेजांत बी. ए. च्या वर्गांत होता.

मनोहराच्या आईच्या हट्टामुळें जरी त्याला एकाद्या देवाचें नांव ठेवण्यांत आलें नव्हतें, तरी तो अत्यंत निष्ठावंत आणि स्वधर्मपरायण असा मुलगा निपजला. दररोज स्नानसंध्या, जपजाप्य, भगवद्गीतेचें पठन वगैरे कृत्यें सांग केल्याशिवाय तो पाणीहि तोंडांत घालीत नसे. इतक्या तरुण वयांतहि त्यानें कांदे, लसूण वगैरे 'धर्मनिषिद्ध' पदार्थांचा अजिबात त्याग केला होता; पण इकडे श्रीकृष्णांचें 'गोपाळ' हें नांव धारण करणाऱ्या रावसाहेबांची धाकट्या भावाच्या अगदीं उलट स्थिति होती. आपल्या स्वतःच्या घरीं ते कांदे, लसूण (तात्यासाहेब व घरची प्रौढ मंडळी यांनां कांदेलसूणहि चालत नसे.) अगदीं उघडपणें खात असत, व मित्राबित्रांच्या घरीं तर याच्याहिपुढें त्यांची मजल जात असे. पायांत जोडा असतांना ते पाणी वगैरे पीत असत, आणि जिल्ह्यातालुक्याच्या ठिकाणीं ते कधीं गेले, ह्मणजे तेथल्या कोर्टांतील मुसलमान नोकरांनीं आणलेला चहा पितांना त्यांनां लोकांनीं पुष्कळ वेळां पाहिलें होतें. मधुनमधून आपल्या "पान' प्रिय दोस्तमंडळीच्या मजलसींत ते मदिरादेवीचेंहि यथासाध्य सेवन करीत असत, अशीहि रावसाहेबांची गांवांत थोडीबहुत ख्याति होती. रावसाहेबांसंबंधानें दुसरीहि एक कुजबूज मधुनमधून ऐकूं येत असे, ती तूर्त आह्मी प्रिय वाचकांच्या कानांवर घालीत नाहीं; परंतु असले सर्व कारभार फार दिवस जगांत गुप्त रहाणें शक्य नसतें. एकाद्या दिवशीं तरी भ्रमाचा भोंपळा फुटतोच फुटतो!

तीन प्रहरांच्या सुमाराला एक बैलांची गाडी येऊन वाड्याच्या थोरल्या दरवाज्यासमोर उभी राहिली, व मनोहर खालीं उतरला. त्याचें तोंड अगदीं उतरलें असून वेषहि अस्ताव्यस्त आणि मलिन होता.

मनोहर आंत शिरतांच रावसाहेब पुढें येऊन त्याला ह्मणाले " आलास बाबू? "

रावसाहेबांच्या पायांला हात लावून भयभीत हृदयानें, कंपित स्वरानें मनोहरानें विचारलें " बा–बा आ-हेत ना ? "

रावसाहेब गद्गदकंठानें ह्मणाले "आहेत अजून–पण रात्र पार पडेल कीं नाहीं, याबद्दल शंका आहे."

हें ऐकतांच मनोहराच्या छातींत धस्स झालें. तो उभा राहून मुकाट्यानें अश्रुविसर्जन करूं लागला.

स्नेहभरानें भावाचे डोळे पुसून रावसाहेब ह्मणाले " अजून तुझें खाणेंपिणें कांहीं नाहीं ना झालें ?"

"नाहीं."

"मुंबईहून केव्हां निघालास तूं ?"

"काल मेलला."

"काल तरी तुझें जेवण झालें होतें ना ? का एकादा उपास होता?"

"नाहीं. माझें स्नानसंध्या, गीता वगैरे होते आहे, तों तुमची तार आली."

इतक्यांत तेथें तात्यासाहेबांची विधवा भगिनी–रावसाहेब व मनोहर यांची आते–येऊन उभी राहिली. मनोहरानें झटकन् तिला प्रणाम करतांच तिनें त्याला उठवूनं पोटाशीं धरलें, व सद्गदित स्वरानें ती ह्मणाली "माझ्या बाळाचं तोंड सुकून कसं अगदीं अर्धं होऊन गेलं आहे ! चल बाबा–लवकर आंघोळ करून ये, तों सदोबाला सांगतें भातपिठलं टाकायला झटकन् ! तोंपर्यंत थोडं साखरपाणी—"

मनोहर मध्येंच ह्मणाला "पण अगोदर बाबांची भेट घेतों मी."

साश्रुनेत्रांनीं आत्याबाई ह्मणाल्या "अगदीं ऐन वेळेला येऊन पोंचलास बाबू ! आज न येतां जर उद्यां येतास, तर तुझी दृष्टभेट तरी होती कीं नाहीं, तें एक भगवान् जाणे ! जेव्हांजेव्हां ह्मणून तात्या शुद्धीवर येतो, तेव्हांतेव्हां 'बाबू आला ? माझा बाबू आला ?' असं सारखं विचारतो." असें ह्मणून डोळ्यांना पदर लावून त्या स्फुंदूं लागल्या.

जोडे बाहेर काढून ठेवून, पाय न वाजवितां ते दोघे बंधु पित्याच्या शय्येजवळ जाऊन उभे राहिले. तात्यासाहेबांची पूर्वीची कळा कांहींच राहिली नसून त्यांचा तो कांतिमान् पुष्ट देह बिछान्याशीं एकजीव होण्याच्या मार्गाला लागला आहे, असें मनोहराच्या दृष्टीला पडलें.

पलंगाजवळ जाऊन मनोहरानें अचेतन पडलेल्या आपल्या वडिलांच्या पायांवर मस्तक ठेविलें. दहा वर्षे वयाची एक मुलगी हातांत पंखा घेऊन तात्यासाहेबांच्या मस्तकाशीं बसून त्यांनां हलुहळू वारा घालीत होती. सात वर्षांचा एक मुलगा त्यांच्या पायांशीं बसून हलुहळू त्यांच्या पायांवरून हात फिरवीत होता. त्या मुलाला उद्देशून मनोहर हळूच ह्मणाला "तूं उठ बाळ! मी फिरवतों बाबांच्या पायांवरून हात."

थोड्या वेळानें रमाबाई तेथें येऊन मनोहराला ह्मणाल्या "चला भाऊजी, भात झाला. झटकन् अंघोळ करून घ्या कशी."

मनोहर खिन्न स्वरानें ह्मणाला "होऊं दे—मी नाहीं आतां जेवीत वहिनी!"

"असं करून कसं बरं चालेल भाऊजी?" असें ह्मणून प्रेमभरानें मनोहराचा हात धरून वहिनीनीं त्याला उठविलें व शिकस्तीच्या आग्रहानें त्या त्याला जेवावयाला घेऊन गेल्या.

झटपट स्नान व भोजन उरकून थोड्याच अवकाशांत मनोहर तेथें येऊन पुनः वडिलांची सेवा करूं लागला.

तासांमागून तास जाऊं लागले. रात्रीं नऊ वाजावयाच्या सुमाराला तात्यासाहेब पुनः शुद्धीवर आले. ते एकदां हळूच या कुशीवरून त्या कुशीवर वळले, व त्यांनीं हळूच डोळे उघडले. हें पाहून त्यांच्या कानाशीं तोंड नेऊन रावसाहेब ह्मणाले "बाबा, बाबू आला आहे."

तात्यासाहेब क्षीण स्वरानें ह्मणाले "बाबू?–बाबू आला? माझा बाबू आला?"

"हा मी आलों आहें बाबा! इथें बसलों आहें." असें ह्मणून मनोहर पुढें सरकला व तात्यासाहेबांचा क्षीण झालेला एक हात त्यानें आपल्या हातीं घेतला.

शेक्स्पियरहि नाहीं, कीं मिल्टनहि नाहीं; वेदान्त नाहीं, किंवा श्रुतिस्मृति-पैकींहि कांहीं भानगड नाहीं ! मग तें मला कां नाहीं समजणार ? पहा तर एकवार प्रयत्न करून शुद्ध मराठींतच मला ती गोष्ट सांगायचा! कदाचित् समजेलहि मला तुझें ह्मणणें. मला समजावून सांगितलेंस, तर त्यांत तुझी मानहानि व्हायचा किंवा तुझ्या विद्येचा क्षय व्हायचा कांहीं संभव नाहीं ना ? तसा कांहीं संभव असेल, तर मग नको बुवा सांगूं !"

इतक्या अवकाशांत हातपायतोंड वगैरे धुऊन स्वयंपाकीणबाईनें एक लहानशी पितळेची कळशी पुष्करिणीच्या पाण्यानें भरून कमरेवर घेतली, व पायऱ्या चढून वर येऊन बागेंतील वृक्षांच्या छायेछायेनें ती वाड्याकडे हलतडुलत येऊं लागली. वाड्याच्या अगदीं जवळ येतांच मनोहरपंतांच्या खोलीच्या या उघड्या खिडकीकडे तिनें एकवार चटकन् नजर टाकली व खालीं मान घालून पदर सावरून ती पुढें निघाली. यांपैकीं स्वयंपाकीणबाईची प्रत्येक कृति रावसाहेबांच्या नजरेंतून चुकली नाहीं.

रावसाहेबांचें वर दिलेलें हेटाळणीचें भाषण मनोहरपंत मुकाट्यानें ऐकून घेत होते. ते शांतपणानें ह्मणाले " अप्पा, 'आपल्यासारख्या गरिबांकडे ते आपली मुलगी देऊं इच्छितात,' असें तुह्मी आतां ह्मणालांत. खरेंच का ते आपली मुलगी आमच्याकडे देऊं इच्छीत होते ? ते वास्तविक आले होते मला पहायला—मला पसंत करायला ! जणूं काय मी दुकानांतली एकादी विक्रीची वस्तु आहें, किंवा आपल्या गांवच्या बाजारांत विकायला येतात, त्या बैलांपैकीं किंवा घोड्यांपैकीं मी एकादा प्राणी आहें ! त्यांनीं मला पाहिल्यावर मी जर त्यांनां पसंत पडलों, तर पैशाची कांहीं एक छबब न मोजतां ते मला विकत घेणार ! अप्पा, हा माझा अपमान नव्हे काय ? माझा हा उघडउघड उपमर्द नव्हे काय ?"

मनोहरपंतांच्या या भाषणाचा रावसाहेबांवर बराच परिणाम झाला असावा, असें दिसलें. ते थोडेसे नरम होऊन ह्मणाले " हें तुझें आपलें कांहीं तरी भलतेंच ! यांत रे कसला आला आहे अपमान अन् उपमर्द बाबू ? लग्न कायम व्हायच्या पूर्वी वराकडची मंडळी मुलीला पहातात

वधूपक्षाकडील मंडळी मुलाला पहातात. ही चाल तर आज हजारों वर्षांपासून आमच्या हिंदुस्तानांत तरी चालत आलेली आहे. मुलगी किंवा मुलगा पसंत होतो किंवा न होतो, हें ठरविण्यासाठींच तर त्यांनां पहायची जरूरी! दोन्ही पक्षांनां जर वधूवरें पसंत पडलीं, तर साऱ्या गोष्टींची वाटाघाट होऊन, अटी वगैरे ठरून विवाह निश्चित होतो. यांत अपमान कसला? आजपर्यंत ही अपमानाची कल्पना नाहीं कुणाच्या मनांतहि आली ती?"

मनोहरपंतांनीं रावसाहेबांच्या या वक्तृत्वाला कांहींच उत्तर दिलें नाहीं. कपाळाला आंठ्या घालून ते तें मुकाट्यानें ऐकून घेत होते. खिडकीच्या जवळच एक मोठें थोरलें आंब्याचें झाड होतें. त्याच्या शाखांवर चिमण्या वगैरे निरनिराळ्या जातींचे अनेक पक्षी बसले असून त्यांचा किलबिलाट सारखा चालू होता. इतक्यांत एका वानरानें त्या झाडाच्या या खांदीवरून त्या खांदीवर याप्रमाणें उड्या घ्यावयाला आरंभ केला. त्याबरोबर झाडावरचे चटसारे सर्व पक्षी भुर्कन् उडून गेले!

परंतु या साऱ्या देखाव्याकडे त्या दोघांहि बंधूंचें फारसें लक्ष्य नव्हतें. कांहीं वेळ दोघेहि गप्प होते. नंतर रावसाहेबांनीं मनोहरपंतांच्या चेहऱ्याकडे तीव्र नजर लावून म्हटलें "कांहीं झालें तरी लग्न म्हणून करणार नाहीं, अशीच तुझी प्रतिज्ञा आहे काय बाबू?"

स्थिर, शांत स्वरानें मनोहरपंत म्हणाले "होय."

"लग्न कां करायचें नाहीं, तें मला सांगशील का?"

रावसाहेबांच्या या प्रश्नाला उत्तर काय द्यावें, याविषयीं मनोहरपंतांच्या मनांत क्षणभर चलबिचल चालली असावी, असें दिसलें. नंतर ते म्हणाले "त्याचीं कारणें सांगायची माझी इच्छा नाहीं!"

"वहावा! ही तर तुझी नुसती बादशाही थाटाची इच्छा दिसते!" असें म्हणून रावसाहेब शेजारींच असलेल्या पलंगाच्या एका टोंकावर बसले.

कांहीं वेळ दोघेहि बंधु एकमेकांशीं कांहीं बोलले नाहींत. नंतर कांहीं वेळानें रावसाहेब म्हणाले "लग्न करायचें नाहीं, ही तुझी इच्छा सृष्टि-

धर्माच्या अगदीं विरुद्ध आहे. संसारी लोकांनां-ज्यांनां संसार सोडून अरण्यांत तपश्चर्येला जायचें नाहीं, अशा संसारी लोकांनां-विवाह करणें हेंच श्रेयस्कर आहे-हाच त्यांचा धर्म आहे. विवाह हा हिंदुधर्मांतला एक अत्यंत आवश्यक असा संस्कार आहे, हें कोणाहि हिंदूला सांगण्याची जरूरी नाहीं. तुलाहि हें चांगलें माहीत असलें पाहिजे. आपण बडे धार्मिक आहों, असें तूं तर चहूंकडे पिकवलें आहेस-तुझी धार्मिकता ती हीच काय?" असें ह्मणून रावसाहेबांनीं मनोहरपंतांच्या अवनत मुखाकडे तीव्र नजर लावली.

बिचाऱ्या मनोहरपंतांनीं आज सकाळीं उठतांक्षणींच कोणाचें तोंड पाहिलें होतें, कोण जाणे! सकाळीं उठल्यापासून प्रत्येक गोष्ट घडून येत होती, ती त्यांच्या मनाविरुद्ध! कांहींकांहीं गोष्टी तर त्यांच्या मनाला अगदीं दारुण यातना देण्याजोग्याच घडून आल्या. मनुष्य कितीहि शांत असला, तरी त्याच्या सहनशक्तीच्या ताणालाहि कांहींतरी मर्यादा असतेच! आतां शांत भाव धारण करून रहाणें हळुहळू मनोहरपंतांनां अगदीं अशक्य होऊं लागलें. तरीहि शक्य तितकें आत्मसंयमन करून ते ह्मणाले " संसारांत रहाणाऱ्या लोकांनां विवाह करणें हें अगदीं अत्यावश्यकच आहे, असें मला तरी वाटत नाहीं."

कांहींशा तिरस्काराच्या आणि हेटाळणीच्या स्वरानें रावसाहेब ह्मणाले " अच्छा-समज तूं लग्न नाहीं केलेंस, पण जन्मभर शुद्ध रहाण्याचें सामर्थ्य तुझ्यांत आहे काय? आपल्या मनोविकारांच्या शक्तीचा तूं नीट विचार केला आहेस ना?"

मनोहरपंतांनीं रावसाहेबांच्या या प्रश्नाला कांहींच उत्तर दिलें नाहीं. त्यांचे हे प्रश्नसुद्धां अत्यंत अपमानकारक असेच त्यांनां वाटले. अपमानाच्या या प्रचंड भाराखालीं आपल्या हृदयाचें चूर्ण होऊन जात आहे, असें त्यांनां वाटूं लागलें.

आपल्या प्रश्नाला कांहींच उत्तर न देतां मनोहरपंत स्तब्ध राहिले आहेत, असें पाहून रावसाहेबच पुढें बोलूं लागले " मला हें अगदीं कबूल

आहे बाबू! तूं अगदीं प्रचंड, बडा विद्वान् आहेस; आह्मी काय अक्षरशत्रु मूर्ख माणसें! पण तुझ्यापेक्षां पंधरावीस पावसाळे मीं अधिक पाहिले आहेत, त्यामुळें जगाचा अनुभव मला जास्त आहे. तुझ्यापेक्षां या जगाला नीट ओळखण्याचें सामर्थ्य माझ्यामध्यें अधिक आलेलें आहे. तुझ्यासारखा मी एम्. ए., एल्एल्. बी. नाहीं, मला शेक्स्पियर येत नाहीं, मिल्टन मीं वाचला नाहीं, अलंकारशास्त्र मला अवगत नाहीं, वेदान्ताचा मला गंधहि नाहीं; परंतु या कठिण संसारासंबंधाचें ज्ञान तुझ्यापेक्षां मला अधिक आहे, जगाचा अनुभव मला जास्त आहे, ही गोष्ट छातीवर हात ठेवून वाटेल तेव्हां सांगायला मी तयार आहें! मी तुला स्पष्ट-स्पष्ट सांगतों बाबू, संसारांत-या जगांत रहाणाऱ्या तुझ्यासारख्या ऐन तारुण्याच्या भरांत असलेल्या मनुष्यानें विवाह करणें ही अत्यंत आवश्यक अशी गोष्ट आहे. संसाराश्रमांत रहाणाऱ्या प्रत्येक मनुष्यानें निदान आत्मशुद्धीसाठीं तरी विवाह करणें अगदीं जरूर आहे, असा आजपर्यंतचा जगाचा अनुभव सांगतो. संसाराचा त्याग करून बैरागी किंवा संन्यासी बनून तूं जर अरण्यांत निघून गेलास, गृहस्थाश्रमाशीं तुझा बिलकूल कांहीं संबंध राहिला नाहीं, तर मग ती एक गोष्ट अलाहिदा होती. परंतु गृहस्थाश्रमांत राहून त्याच्या नियमांचें मात्र प्रतिपालन करायचें नाहीं, तर मात्र त्यापासून दुष्परिणाम झाल्याशिवाय कधींहि रहाणार नाहींत. तूं जर लग्न केलेंस, तर त्यामुळें तुझ्या धार्मिक आचरणाला किंवा तत्त्व-वेदांत-चर्चेला कांहीं हरकत येईल, असें मला बिलकूल वाटत नाहीं. परंतु तूं अविवाहित राहिलास, तर मात्र त्यापासून हानि होण्याचा संभव विशेष आहे. विवाह करून देखील पुष्कळांनां नैतिक बाबतींत निर्मळ रहातां येत नाहीं; मग लग्न न करूनसुद्धां आपण धुतल्या तांदळासारखे अगदीं निर्मळ राहूं शकूं असें जर तूं ह्मणत असलास, तर तो तुझा शुद्ध भोंदूपणा आहे, असें मी स्पष्ट-स्पष्ट ह्मणतों! पुष्करिणीवर स्नान करायला किंवा पाणी भरायला आलेल्या तरुण स्त्रियांकडे पापदृष्टि ठेवण्यापेक्षां लग्न करणें शतपटीनें श्रेयस्कर आहे!"

रावसाहेबांच्या तोंडून हें शेवटचें वाक्य निघतांच मनोहरपंतांच्या अंतःकरणाचा नुसता भडकाभडका झाला! आत्मसंयमन करणें त्यांनां आतां अगदीं अशक्य होऊन गेलें! क्रोधातिशयामुळें त्यांचा गळा दाटून येऊन ते ह्मणाले "सर्वजण आपणासारखेच आहेत, असें तुह्मी बिलकूल समजूं नका अप्पा!"

झालें! या वाक्यानें रावसाहेबांच्या संतापाचीहि परमावधि झाली! पलंगावरून ताडकन् खालीं उडी टाकून ते डोळे फाडून गर्जना करून ह्मणाले "काय ह्मणतोस निर्लज्जा! लहान तोंडीं मोठा घांस घ्यायला तुला शरम नाहीं वाटत? पाजी कुठला!"

मनोहरपंतहि तीव्रस्वरानें ह्मणाले "उगीच आतां माझें मस्तक भडकवूं नका अप्पा! सर्व कांहीं हकीगत मला पूर्णपणें ठाऊक आहे—"

मनोहरपंतांच्या या संदिग्ध भाषणानें रावसाहेब थोडे दचकले; तथापि तसें मुळींच न दाखवितां पूर्वीप्रमाणेंच ओरडून ह्मणाले "काय आहेरे ठाऊक तुला, हरामखोरा?"

"जें कांहीं मला ठाऊक आहे, त्याचा उच्चार करून माझें तोंड मी विटाळूं इच्छीत नाहीं; पण तुह्मी मात्र सावध व्हा, एवढीच मी तुह्माला सूचना देऊन ठेवतों. आपण स्वतः होऊन जर तुह्मी सध्याच्या कुमार्गापासून परावृत्त झालांत नाहीं, किंवा कुसंगतीचा त्याग केला नाहींत, तर तें काम स्वतः मला आपल्या हातीं घ्यावें लागेल, हें पक्कें ध्यानांत ठेवा!"

मनोहरपंतांचें हें अगदीं अनपेक्षित असें जरबीचें भाषण ऐकून रावसाहेब आश्चर्यानें थक्कच होऊन गेले! ते मोठ्या संकटांत पडून काय करावें हें त्यांनां सुचेना. आपल्या भावाला काय ठाऊक आहे आणि कोठपर्यंत माहिती आहे, याचा कांहींच पत्ता त्यांनां लागेना. सर्पाला भ्यालेला मनुष्य ज्याप्रमाणें अंधकारांत अतिशय सावधपणें अगदीं जपून एकएक पाऊल टाकीत असतो, त्या प्रकारच्या सावधानतेचें अवलंबन करून रावसाहेब जरा नरम अशा स्वरानें ह्मणाले "अस्सें! एकूण तूं माझा प्रतिपालक झालास ह्मणायचास! वडीलच पडलास तूं. तेव्हां मला तुला भ्यालेंच पाहिजे!"

" नाहीं–मी तुमचा प्रतिपालक नाहीं किंवा कांहीं वडिलपणाचेंहि नातें मजकडे नाहीं. तुमचा मी धाकटा भाऊ. अधर्मापासून किंवा कुमार्गापासून लहान बंधूला निवृत्त करण्याचा वडील भावाला जितका अधिकार आहे, तितकाच वडील भावासंबंधीं धाकट्या भावालाहि अधिकार आहे!"

मनोहरपंतांनीं दाखविलेल्या या धमकावणीनें आपण कांहींच भ्यालों नाहीं, किंवा त्यानें आपणावर घातलेल्या आरोपाबद्दल आपणाला तिळमात्र चिंताहि वाटत नाहीं, अशा तऱ्हेचा आविर्भाव चेहऱ्यावर दाखवून रावसाहेब ह्मणाले " अस्सें! हें नवीनच एक शास्त्र ऐकलें मीं! मग, पुढें काय करायचा बेत आहे तुझा?"

मनोहरपंत गंभीरपणानें ह्मणाले " पुढें काय करायचें, त्याचा बेत मीं अजून नक्की केला नाहीं! पण तुह्मी जर सहज रीतीनें सुमार्गावर येणार नाहीं, तर मग मला अप्रिय अन् कडू असा कांहीं तरी जालीम उपाय योजणें भाग पडेल!"

हे शब्द बोलतांना मनोहरपंतांच्या चेहऱ्यावर दृढ निश्चयाचें उज्ज्वल तेज स्पष्टपणें दिसत होतें. त्यांचा या वेळेचा चेहरा पहातांच रावसाहेबांची कांहीं अवर्णनीय स्थिति होऊन गेली. चेहरा भयामुळें ह्मणा अगर दुसऱ्या कशामुळें ह्मणा, अगदीं पांढरा फटफटीत झाला. हळुहळू शेजारच्या पलंगावर ते पुनः बसले आणि आपल्या डाव्या हातानें दोन्ही डोळे झांकून एकाद्या पीडित धार्मिकाप्रमाणें बोलूं लागले " हो, पडेलच भाग तुला! कां नाहीं बाबा भाग पडणार? बोलूनचालून हें पडलें कलियुग! या काळांत सगळाच कांहीं उफराटा प्रकार झाला आहे! पूर्वी लहान भाऊ मोठ्या भावाला वडिलांप्रमाणें किंवा गुरूप्रमाणें मानून त्यावर श्रद्धा ठेवीत असे, अलीकडे धाकटा भाऊ वडील भावाला धर्मोपदेश ऐकवतो, त्याच्या चारित्र्यांत दोष काढून ते सुधारण्याविषयीं प्रयत्न करतो, नाना प्रकारांनीं तो त्याच्यावर शह ठेवूं पहातो; अन् असें होणें अगदीं रास्तच आहे–नाहीं तर हें कलियुग कसलें? पूर्वी वडील माणसांची निंदा हें मोठें पातक समजलें जात असे; गुरुजनांच्या निंदेनें निंदकाची



रावसाहेब डोळे फाडून गर्जना करून ह्मणाले " काय ह्मणतोस निर्लज्जा पाजी कुठला ! "

( पृष्ठ ४७. )

जीभ झडून पडत असे; आतां लहानमोठा हा भेदाभेद मुळीं शिल्लकच नाहीं उरला ! जो उठतो तो ह्मणतो मी शहाणा अन् मी मोठा ! बरें, जातों तर आतां, उगीच तुमा महत्त्वाचा, धर्मचर्चेचा वेळ नाहीं मी नष्ट करीत ! माझ्यासारख्या पाप्याच्या क्षणमात्र संसर्गानें एकादवेळीं तुझ्या साऱ्या पुण्याचा क्षय व्हायचा !"

असें ह्मणून हलुहळू पलंगावरून उतरून, दार उघडून रावसाहेब मनोहरपंतांच्या खोलीबाहेर आले. दरवाज्याच्या डाव्या अंगालाच एक लहानसा जिना होता. तिकडे नजर जातांच रमाबाई घाईघाईनें त्या जिन्यावरून खालीं उतरून जात आहेत, असें त्यांच्या दृष्टीला पडलें.

कोणाशीं कांहींहि न बोलतां रावसाहेब तडक पुनः बाहेरच्या दिवाणखान्यांत आले. तेथें येतांच एक अपरिचित व्यक्ति आपली वाट पहात तेथें बसली आहे, असें त्यांनां आढळून आलें. ही व्यक्ति एक मध्यम वयाचा पुरुष होता. त्याच्या डोकीला एक गबाळी तऱ्हेचा पांढरा, पण नवा रुमाल असून अंगांतहि तशाच रंगाचा नवा शॉर्ट कोट होता. अंगावर एक पांढरें स्वच्छ नवीन उपरणें असून त्याच्यापुढें एक नवीनच पांढरा अभ्रा वर घातलेली छत्री पडलेली होती. त्याच्या खांद्यावर एक मध्यमसा खादीचा बटवा लोंबकळत होता. त्यानें कपाळाला पांढरें आडवें गंध लाविलें होतें. त्याचे डोळे काळेभोर व पाणीदार असून त्यांत कावेबाजपणाचें तेज दिसत होतें. त्याचा रंग मात्र अगदीं काळाकुळकुळीत, शाईशीं स्पर्धा करणारा होता. मिशा साधारणपणें लहानच होत्या, परंतु त्यांत पांढरे केंस मधुनमधून डोकावूं लागले होते. रावसाहेब दृष्टीला पडतांच त्यानें चटकन् उठून अगदीं जमिनीपर्यंत लवून नम्रपणें प्रणाम केला.

रावसाहेबांनीं आश्चर्यानें विचारलें "कोण तुह्मी ?"

त्या गृहस्थानें नम्रतेनें उत्तर दिलें "माझें नांव केशव भास्कर कुळकर्णी."

"रहाणारे कोणीकडले ?"

"कोल्हापुर संस्थानांतला मी रहाणारा."

"काय हेतु मनांत धरून तुह्मी इकडे आलांत ?"

दोन्ही हात जोडून, अत्यंत नम्र प्रार्थनेच्या स्वरानें तो ह्मणाला. "दुसरी कांहीं सेवकाची इच्छा नाहीं. हुजूर माझे मायबाप! मायबापां-कडून या अनाथ मुलाचा योगक्षेम चालावा–"

"काय कामकाज येतें तुह्माला?"

"कुळकर्णपणा चांगला येतो. वसुलाबिसुलाची, जमाखर्चाची वगैरे चांगली माहिती आहे."

रावसाहेबांच्या इनामदारीच्या कारभारांत अशा एका नोकराची जागा नुकतीच रिकामी झाली होती. क्षणभर विचार करून रावसाहेब ह्मणाले "ठीक आहे. आतां तुह्मी आमच्या कचेरीच्या इमारतीकडे चला. तिथेंच तुमच्या स्नानाची अन् भोजनाची व्यवस्था होईल. पुनः भेट झाल्यावर यासंबधानें बोलूं काय तें."

असें ह्मणून एका नोकराला हांक मारून रावसाहेबांनीं त्याच्याबरोबर त्या गृहस्थाची कचेरीकडे रवानगी करून दिली.

---

## प्रकरण पांचवें.

## 'कुळकर्णीलीलामृत.

मागील प्रकरणांत वर्णन केलेल्या गोष्टीपूर्वी थोडे दिवस घडून आलेली एक हकीगत वाचकांनां येथें सांगणें इष्ट वाटतें.

प्रातःकाल. सूर्योदय नुकताच झाला होता. कोल्हापुर येथील तुरुंगाच्या इमारतींत एका दालनाच्या दरवाज्याजवळ सातआठ कैदी कोणाची तरी वाट पहात उभे होते. त्यांच्या चेहऱ्यांवर विषण्णतेचें किंवा दुःखाचें कसलेंच चिन्ह दिसत नसून उलट अत्युत्कट आनंदाची छटा त्यांवर विराजमान झाली होती. ते एकमेकांशीं विनोद करून मोठमोठ्यानें हंसत होते. कैदखान्यासारख्या भयंकर ठिकाणीं असतांहि त्या कैद्यांचीं मनें आज इतकीं प्रफुल्लित असण्याचें कारण हें, कीं, त्या सर्वांची आज कैदखान्यांतून मुक्तता व्हावयाची होती. जेलरसाहेब यावयाचाच काय तो अवकाश असून ते त्यांचीच वाट पहात होते.

सात वाजले. थोड्याच वेळांत जेलरसाहेबांची स्वारी तेथें आली. त्याबरोबर दरवाज्याशीं इकडूनतिकडे फेऱ्या घालणारा पहारेकरी चकटन् उभा राहिला, व खांद्यावरील बंदूक खालीं उतरून, ती नम्रपणें हातीं तशीच धरून त्यानें जेलरसाहेबांनां लष्करी थाटाचा सलाम केला. दरवाज्यावरच्या जमादारानें कुलूप काढून धाडकन् दरवाजा उघडला आणि तुरुंगांत जाण्याचा रस्ता मोकळा करून दिला.

जेलरसाहेब हळुहळू आंत शिरले. त्यांच्या हाताखालचे दोघेतिघे कामगार कागदाच्या फाइली वगैरे हातीं घेऊन त्यांच्याजवळ येऊन उभे राहिले. जे कैदी कारागृहांतून आज मुक्त व्हावयाचे होते, त्यांच्या नांवनिशीची यादी हातीं घेऊन जेलरसाहेबांनीं जवळ असलेल्या प्रत्येक कैद्याच्या गळ्याला अडकविलेल्या फळीच्या तुकड्यावरील नंबर, तारीख वगैरे यादींतील माहितीशीं अतिशय सावधपणें काळजीपूर्वक तपासून पाहिलीं. नंतर शेजारच्या एका खोलींत त्या सर्वांनां नेऊन त्यांनीं एका चोपडीवर त्यांच्या उजव्या हाताच्या आंगठ्याचे छाप घेऊन प्रत्येक कैद्याला त्याचा पोषाक वगैरे देण्याची व्यवस्था केली. तुरुंगांत येण्याच्या वेळीं हा पोषाक त्या त्या कैद्याच्या अंगावर असून तो काढून घेऊन त्यांनां तुरुंगाचा पोषाक देण्यांत आला होता. नंतर प्रत्येकाला त्याच्या गांवीं जावयाला लागणारें तिसऱ्या वर्गाचें आगगाडीचें भाडें व तेथपर्यंत खाण्यापिण्याला लागणारे पैसे देण्यांत आले, आणि तुरुंगाचें दार उघडण्यांत येऊन कारागृहांतून त्या सर्वांची मुक्तता झाली.

आज कैदेंतून सुटलेल्या या कैद्यांच्या टोळींत केशव भास्कर कुळकर्णी या नांवाचा एक कैदी होता. त्याचें वय जवळजवळ चवेचाळीसपंचेचाळीस वर्षांचें असावें. आज त्याच्या अंगावर सांप्रतच्या ऋतुमानाला अगदीं गैरसोईचा असा जो हा पोषाक दिसतो आहे, त्याचें कारण इतकेंच, कीं, ही स्वारी तुरुंगांत येण्याच्या वेळीं या पोषाकाला अनुकूल असा ऋतु होता.

माईसाहेब किंचित् हंसून ह्मणाल्या " इकडे पहा केशव—"

" काय माईसाहेब ?"

" दुसरं कांहीं नाहीं सांगायचं तुला. सहा वर्षांची शिक्षा भोगून तूं सुटतो आहेस हा आज, आतां पुनः कधीं चोरीबिरी करूं नकोस हो!"

" छे छे माईसाहेब! मी कांहीं चोरीचहाडी केल्यामुळें तुरुंगांत नाहीं पडलों! जंगी दंगा केला होता, त्यामुळें ही शिक्षा झाली मला. " असें ह्मणून डौलानें छाती पुढें करून केशवराव गालांत हंसूं लागले.

आणखी पंधरावीस मिनिटें माईसाहेब व त्यांचीं मुलें यांच्याशीं गप्पा-टप्पा मारल्यानंतर केशवरावांनीं जावयाला त्यांचा निरोप मागितला.

माईसाहेब ह्मणाल्या "छे, आतांच नाहीं जायचं केशव! जरा थांब ना! दुपारचं जेवणबिवण करून जा. आतां पुनः तूं कधीं आह्मांला भेटणार तरी आहेस का?"

"आजच आणखी निराळें काय जेवायचें आहे माईसाहेब? आपलेंच अन्न तर आज कित्येक दिवस खातों आहें मी. इथून जाऊन अंबाबाईचें दर्शन घेईन, अन् शहरांत थोडें चहापाणी करून तशीच घरची वाट धरीन. येतोंच माईसाहेब आतां."

" येतोस?–बरं तर–तुझ्या सुखाच्या आड मी कशाला येऊं?"

नंतर केशवराव माईसाहेबांना प्रणाम करून मुलांचा निरोप घेऊन तेथून निघाले.

केशवराव ज्या अर्थीं कोल्हापुर येथील तुरुंगांतील कैदी होते, त्या अर्थी ते या संस्थानांतीलच रहिवासी होते, हें निराळें सांगावयाची गरज नाहीं. कोल्हापुर इलाख्यांतील शिरपुर हें त्यांचें गांव. शिरपुरचे इनामदार भाऊसाहेब पंडित, यांचे केशवराव हे अत्यंत आवडते आश्रित असून त्यांचे ते केवळ उजवा हात होते, असें ह्मटलें असतांहि चालेल. इनामदारीच्या कारभारांत केशवराव ह्मणजे खुद्द भाऊसाहेबच होते, असेंहि ह्मटलें असतां चालण्यासारखें आहे. जगांत असें एकहि दुष्कार्य नाहीं, कीं, जें इनामदारसाहेबांच्या आज्ञेनें केशवराव पार पाडूं शकत नव्हते!

दांडगाई किंवा दंगाधोपा करण्यांत, अजिबात खोटी साक्ष देण्यांत, खोटे मुकद्दमे उपस्थित करण्यांत, बाकी थकलेल्या किंवा बाकी न देणाऱ्या कुळांचें सर्वस्व लुटण्यांत, त्यांच्या घरांदारांनां आगी लावण्यांत केशवरावांचा हात धरणारा मनुष्य मिळणें दूरापास्त होतें. भाऊसाहेबांच्या व्यवहारांत एकादा खटलामुकद्दमा उपस्थित झाला, म्हणजे त्यासंबंधीं सर्व कारभार केशवरावांवर संपविण्यांत येत असे. त्यांनां कायद्याचीहि थोडीशी माहिती होती. फौजदारी कायदा, दिवाणी कायदा, स्टँप वगैरे संबंधीं कायदा, इत्यादि कायद्यांचीं जीं पुस्तकें मराठींत झालीं आहेत, तीं सर्व केशवरावांच्या वाचनांत होतीं. आज ज्या कैदेच्या शिक्षेंतून ते सुटले होते, ती कांहीं त्यांनां झालेली पहिली शिक्षा नव्हे. एकदां बेकायदेशीर लोकांच्या जमावांत मिळून एका शेतकऱ्याचें सर्वस्व लुटल्याबद्दल त्यांनां दीड वर्षाची सक्तमजुरीची शिक्षा झाली होती. ही झाली दहाबारा वर्षांपूर्वीची गोष्ट! या वेळीं त्यांनां कैदेची शिक्षा होण्याचें कारण असें होतें, कीं, भाऊसाहेबांच्या शेजारींच असणाऱ्या दुसऱ्या एका इनामदाराच्या जमिनीच्या सीमेबद्दल त्या दोघांत मोठा तंटा उपस्थित होऊन त्यासंबंधानें एकदां जंगी दंगाधोपा झाला, व त्यांत त्या इनामदाराच्या पक्षाचे दोन लोक ठार मारले गेले. या दंग्यांत भाऊसाहेबांच्या वतीनें केशवरावजींची स्वारी घोड्यावर स्वार होऊन आपल्या सेनेचे सेनापति बनून हातांत तरवार परजीत आपल्या सैन्याला दंग्याचे हुकूम सोडीत होती! पहिल्या सपाट्याला अधिकाऱ्यांनीं केशवरावांनां दहा वर्षांची काळेपाण्याची शिक्षा ठोठावली होती; परंतु पुढें त्यावर अपील होऊन हुद्द महाराजांनीं दयाळु होऊन ती शिक्षा रद्द करून तीबद्दल सहा वर्षे सक्तमजुरीची कैद त्यांनां दिली!

योग्य वेळीं केशवराव आपल्या गांवीं—शिरपुरला पोहोंचले. गांवांत प्रवेश करतांच, आपले दयाळु यजमान भाऊसाहेब सहा महिन्यांपूर्वी परलोकवासी झाले, अशी अशुभ बातमी त्यांच्या कानांवर येऊन आदळली. भाऊसाहेबांच्या पश्चात् इनामतीचा सर्व कारभार त्याचे चिरंजीव चिंतामणराव ऊर्फ नानासाहेब यांच्याकडे आला होता.

केशवरावजी तसेच आपल्या घराकडे निघाले. परंतु घर सर्व पडलें असून त्याचा नुसता चौथरा आणि फुटक्या विटा–दगडांच्या राशी मात्र शिल्लक असलेल्या त्यांच्या दृष्टीला पडल्या. या दगडा–विटांच्या राशीं-मधून लहानमोठीं शेवरीचीं झाडें व इतर तऱ्हेतऱ्हेच्या जंगली लता व वनस्पति वाढल्या होत्या. घराचीं दारें, खिडक्या, चौकटी, खांब, तुळया, वरगे वगैरे लांकडी सामान शेजारपाजारच्या लोकांनीं ओढओढून लांब-वून त्याचा अगदीं नापत्ता करून टाकला होता. या सर्व सामानानें त्यांच्या सर्पणाची बरीचशी सोय झाली असावी !

'आपणाला शिक्षा झाल्यानंतर वर्षभरानें खाण्यापिण्याचे अगदीं हाल होऊं लागल्यामुळें आपल्या दोन्ही मुली घेऊन आपली पत्नी आपल्या माहेरीं निघून गेली; कांहीं दिवसांनीं ती क्षयाचें निमित्त होऊन तेथेंच मरण पावली. आपल्या मेहुण्यांनीं कशीबशी खटपट करून आपल्या दोन्ही मुलींचीं लग्नें करून दिलीं, व भगिनीच्या ऋणांतून ते मुक्त झाले. भाऊसाहेबांकडूनहि या व इतर बाबतींत आपल्या कुटुंबाला थोडेंबहुत साहाय्य झालें,' अशी बातमी शेजारपाजारच्या लोकांकडून केशवरावांनां कळली.

या साऱ्या वृत्तान्तानें बिचाऱ्या केशवरावजींची अगदीं कंबरच खचून गेली. डोकीवर हात देऊन ते किती तरी वेळ जागच्याजागींच बसून राहिले होते. आतां जावें कोठें, करावें काय, कोठें डोकें टेकावें, खावें काय, असे शेंकडों प्रश्न त्यांच्यासमोर उभे राहून ते अगदीं भांबावून गेल्यासारखे झाले. शेवटीं, गांवांत त्यांचा एक दूरचा–तीनचार चुली मध्यें असलेला धोंडोपंत नांवाचा एक भाऊ होता, त्याच्या घरीं जाऊन केशवरावांची स्वारी उतरली. या प्रसंगीं अशा कोणातरी आप्ताचा कांहीं दिवस तरी आश्रय घेतल्याशिवाय त्यांनां गत्यंतरच नव्हतें.

यानंतर एकदोन दिवसांनीं, केशवरावांनीं जाऊन आपल्या पूर्वीच्या यजमानांच्या मुलाची भेट घ्यावी, व त्यांनां आपली सविस्तर हकीगत सांगावी, म्हणजे ते कांहींतरी त्यांच्या योगक्षेमाची व्यवस्था केल्य

शिवाय खास रहाणार नाहींत, अशी धोंडोपंत व इतर चारचौघी मंडळी यांनीं त्यांनां सल्ला दिली, व विचार करतां केशवरावजींनां ती पटलीहि.

केशवरावांनां शिक्षा होण्यापूर्वी त्यांनीं भाऊसाहेबांच्या या चिरंजीवांनां—नानासाहेबांनां—फारसें पाहिलें नव्हतें. त्या वेळीं ते अगदीं लहान असून मुंबईला कॉलेजमध्यें शिकत होते. सुटीबिटींत नानासाहेब कधींमधीं घरीं येत हें खरें; परंतु त्यांच्यासारख्या कच्च्या पोराशीं संघटन करावयाची केशवरावजींनां त्या वेळीं तादृश आवश्यकताहि वाटत नव्हती, आणि नानासाहेबांनांहि केशवरावांशीं आपली मैत्री असावी, अशी इच्छा कधीं उत्पन्न झाली नाहीं. यामुळें नानासाहेबांचा स्वभाव वगैरे कसा काय आहे, याचें निरीक्षण करावयाची केशवरावजींनां यापूर्वी फारशी कधीं संधि आलीच नव्हती; परंतु त्यांनां साधारणपणें माहीत होतें, कीं, अलीकडील इंग्रजी शिक्षण प्राप्त झालेल्या तरुण मंडळीला जरी देवदेवता, भटभिक्षुक, प्रचलित रूढि इत्यादिकांविषयीं फारसा आदर वाटत नसला, तरी समाजांतील लोकांशीं त्यांचा व्यवहार अगदीं चोख असून त्यांत धर्मभीरुत्वाचा व नीतिपरायणतेचा अंश बराच असतो. अशा या अलीकडील सुशिक्षित मंडळींतच नानासाहेबांची गणना असल्यामुळें त्यांच्याकडे जाऊन आपलें गाऱ्हाणें त्यांच्या कानांवर घातलें, तर त्याचा कितपत उपयोग होईल, याबद्दल केशवरावजींच्या मनांत कमी धाकधूक होती, असें नाहीं.

परंतु पोटाच्या आगीसारखी प्रचंड आग दुसरी कोणतीहि नाहीं; तेव्हां आपल्या यजमानांच्या मुलाची भेट घ्यावी, असाच केशवरावांनां शेवटीं निश्चय करावा लागला. लवकरच एके दिवशीं रस्त्यांत नानासाहेब दृष्टीला पडतांच केशवरावांनीं त्यांनां आत्मपरिचय करून दिला.

नानासाहेब ह्मणाले "मुद्दाम आपला परिचय करून द्यायचें कांहीं कारण नाहीं. मी तुह्माला ओळखतों. तुह्मी आलांत कधीं शिरपुरला?"

केशवराव नम्रपणें ह्मणाले "तीनचार दिवस झाले मला इथें येऊन. यजमानसाहेबांनां एकवार भेटून यावें, असा केव्हांपासून मी विचार करतों आहें, पण कांहीं भेटायला यायला मला धीर नाहीं होत—"

" भेटायचें कांहीं विशेष कारण का आहे ? "

" होय, श्रीमंतांपाशीं कांहीं विनंति करायची आहे. "

" ठीक आहे, या एके दिवशीं कधीं तरी. "

" जशी आज्ञा. पण यजमानसाहेबांनां जरा फुरसत असेल ऐकून घ्यायला माझें बोलणें, अशी वेळ मला पाहिजे आहे. "

नानासाहेब क्षणभर विचार करून ह्मणाले " ठीक आहे. तिसऱ्या प्रहरीं साडेतीनचारांच्या सुमाराला या कोणत्याहि दिवशीं. मा मोकळाच असतों त्या वेळीं. "

दुसऱ्या दिवशीं तीन वाजण्याच्या सुमाराला विघ्नहर्त्या गणेशाचें आणि कुलदेवतेचें नांव भक्तिभावानें स्मरणपूर्वक घेऊन केशवरावजी श्रीमंतांनां भेटण्याकरतां घराबाहेर पडले. घराबाहेर पडतांना कोणता तरी एकादा शुभशकुन व्हावा, ह्मणून ते दरवाज्याशीं बराच वेळ उभे होते. परंतु किती वेळ तरी त्यांनां शुभ किंवा अशुभ असा कोणताच शकुन झाला नाहीं. शेवटीं, श्रीमंतांची वेळ टळेल, या भीतीनें ते एकदांचे बाहेर पडले.

नानासाहेब या वेळीं एका निवांत खोलींत एका सुंदर टुमदार टेबला-समोर खुर्चीवर बसले होते. त्यांच्यापुढें एकदोन मोठे इंग्रजी, संस्कृत ग्रंथ व 'एशिॲटिक सोसायटीच्या जर्नल'च्या एक दोन फायली असून त्यांवरून ते 'प्राचीन भरतखंडांत बंदुकी होत्या कीं नाहीं ?' हा विषय घेऊन एक खूब गंभीर स्वरूपाचा पुराणतत्त्वविषयक निबंध लिहिण्यांत अगदीं मनः-पूर्वक गढून गेले होते.

केशवराव तेथें आलेले पहातांच नानासाहेबांनीं पुस्तकें बंद करून टांकहि दूर ठेवला. केशवरावांनीं येतांच यजमानसाहेबांनां नम्रतापूर्वक नमस्कार केला, व त्यांनीं बसावयाला सांगतांच खालीं जवळच पसरलेल्या सतरंजीवर ते बसले. क्षणभरानें दंतप्रदर्शन करून केशवराव ह्मणाले " वः ! मोठ्या आनंदाची गोष्ट ! सर्व इनामतीचा व्यवहार, हिशेबठिशेब श्रीमंत स्वतः जातीनिशीं पहातात ना ! फार छान—फार छान ! आमचे कैलासवासी श्रीमंत देखील सर्व व्यवहार असा स्वतः पहात असत.

नाहींतर या इनामतीची जी इतकी भरभराट दिसते आहे, ती तशी झाली असती का? आः! काय आपल्या वडिलांची व्यवहारदक्षता! यजमानसाहेब आतां कोणत्या गांवच्या जमाखर्चाचे कागद पहात होते?"

नानासाहेब किंचित् हंसून ह्मणाले "छे, मी कांहीं आतां इनामतीसंबंधानें कागदपत्र पहात नव्हतों-कांहीं रचना करण्यांत गुंतून गेलों होतों."

विस्मय व हर्ष या मनोविकारांचा मिश्र भाव चेहऱ्यावर आणण्याचा बराच प्रयत्न करून केशवराव म्हणाले "असें! एकूण श्रीमंतांची काव्यरचना चालली होती वाटतें? वा-वा-फार समाधानाची गोष्ट आहे. सगळ्या महाराष्ट्रांत एकादाच संस्थानिक विद्याव्यासंगी असेल. कुरुंदवाडाजवळ एक छोटे इनामदार होते, ते अशीं कांहीं पदें, लावण्या, कटाव करीत, कीं, ते ऐकून श्रोते नुसते आनंदानें मान हलवीतच रहात! राधा अन् कृष्ण यांच्या शृंगाराच्या त्यांच्या लावण्या तर त्या प्रांतांत सर्वतोमुखीं आहेत. श्रीमंतांची कोणत्या विषयावर काव्यरचना चालली होती?"

आपल्या निबंधाच्या चोपडीचीं पानें उलटतांउलटतां नानासाहेब स्मितपूर्वक ह्मणाले "छे छे-ही कांहीं काव्यरचना नाहीं. निबंधरचना चालली आहे माझी. प्राचीनतत्त्वसंशोधनविषयक एक निबंध मी लिहीत आहें."

"काय तत्त्व म्हटलें श्रीमंतांनीं?"

"प्राचीनतत्त्व-"

"माझ्या कांहीं लक्ष्यांत नाहीं आलें. कांहीं नवीनच निघाला आहे वाटतें हा प्रकार?"

नानासाहेब किंचित् हंसून ह्मणाले 'पूर्वीच्या कालच्या गोष्टींचा जो शोध त्यालाच प्राचीनतत्त्व ह्मणतात. आतां मी लिहीत होतों, हा निबंध घ्याना उदाहरणार्थ! 'प्राचीन भरतखंडांत बंदुकी होत्या कीं नाहीं?' या विषयावर मी लिहीत आहें. या निबंधांत 'प्राचीन कालीं हिंदुस्तानांत बंदुकी होत्या,' असेंच प्रमाणें दाखवून सिद्ध करण्याचा मी प्रयत्न करतों आहें. फार काय,

दशरथराजाच्या वेळींहि बंदुका अन् तोफा होत्या हें खास आहे. अशा गोष्टीच्या विषयांना प्राचीनतत्त्व किंवा पुराणतत्त्व ह्मणतात."

केशवरावजींनीं नानासाहेबांचें शेवटचें वाक्य न ऐकतां मध्येंच ह्मटलें " काय ह्मणतात हें श्रीमंत? छे छे–मला नाहीं वाटत बुवा! दशरथ-राजाच्या ह्मणजे रामाच्याहि अगोदर बंदुका अन् तोफा कुठल्या? छद्, बंदुका अन् तोफा हीं साहेबलोकांनीं शोधून काढलीं आहेत. दशरथाच्या वेळच्या लोकांचें आयुध ह्मणजे धनुष्यबाण! आह्मी कथापुराणांत असेंच ऐकत आलों आहों, अन् ललितांतून अन् जत्रानाटकांतून तर आह्मीं हें प्रत्यक्ष पाहिलें आहे ना?"

मनांतल्या मनांत केशवरावांच्या या भाषणाचें नानासाहेबांना कौतुक वाटून हंसूंहि येत होतें. ते ह्मणाले "छे, प्राचीनकालीं भरतखंडांत बंदुका होत्या, हें खास आहे. प्रत्यक्ष रामायणांत त्याचें प्रमाण आहे. अयोध्या नगरीचें वर्णन करीत असतां वाल्मीकींनीं ह्मटलें ,आहे—'**सर्वयन्त्रा-युधवती शतघ्नीशतसंकुला**' अर्थात् दुसऱ्या शस्त्रास्त्रांबरोबर शंभर शतघ्नीहि होत्या. शतघ्नी ह्मणजे तोफा, याशिवाय दुसरें कांहींहि नाहीं, हें खास! एक शतघ्नी सोडली, कीं, सपाट्याबरोबर शंभर मनुष्यें ठार व्हायचीं!"

दांताचें प्रदर्शन होईल येथपर्यंत स्मित करून, मान हालवीत केशव-राव ह्मणाले " वा वा! मौज आहे मोठी! श्रीमंतांनीं तर मला अगदीं आश्चर्यानें थक्क करून सोडलें! आँ? ही मोठी मौज नव्हे तर काय? इतके दिवस आह्मांला कुणाला याची दाद तरी लागायची होती! तरीच ह्मटलें, रावणकुंभकर्णासारखे मोठमोठे वीर अन् त्यांचें तें भलें धिप्पाड राक्षसांचें सैन्य, हीं नुसत्या तीर अन् धनुकल्या एवढ्याच शस्त्रांनीं मरत असत, हें कसें? होय, तोफा अन् बंदुका त्या वेळीं खास होत्या. पण इतके दिवस ही गोष्ट कांहीं कुणाच्या नाहीं लक्ष्यांत आली. अरे, येणार कशी लक्ष्यांत! ललितें; जत्रानाटकें, फार तर मोठा अगदीं विद्वान झाला मनुष्य, तर मोरोपंताचें एकादें रामायण, इथपर्यंतच कीं नाहीं

आमच्यासारख्या साधारण माणसाची धांव ? श्रीमंतांसारखें मुळांतलें वाल्मीकीचें अस्सल संस्कृत रामायण वाचतो आहे कोण? बाबा! लिहिणें, वाचणें अन् त्याची चर्चा करणें यासारखी दुसरी मजा नाहीं बुवा! आजकाल तर बडेबडे लोक याशिवाय दुसरें काय करतात? अहो, ज्यांनां कालिजांतलें मोठें साहेबांचें शिक्षण मिळालें आहे, त्यांनां का त्या घाणेरड्या चोपड्या घेऊन जमाखर्च, खातेबाक्या, तोंडमिळवणी इत्यादि प्रकारांत डोकें खुपसून बसणें आवडतें? एक अतिशय हुषार, दक्ष, काळजीचा अन् पूर्ण माहीतगार असा एकादा मनुष्य या कामाकरतां ठेवून दिला, ह्मणजे त्यांचें काम भागतें. अहो, अलीकडचे जितके मोठे जहागीरदार, इनामदार, सरदार आहेत कीं नाहींत, ते आपले पहावे तेव्हां मुंबईत! तिकडे ते तऱ्हेतऱ्हेच्या सभा काय भरवतात, संमेलनें का काय तीं किती करतात, मोठमोठीं व्याख्यानें अन् लेक्चरें काय देतात, अन् पुराणें, वेद अन् श्रुति यांसंबंधानें चर्चा काय करतात! अहो, यांपैकीं कोणी कोणीतर गव्हर्नरसाहेबांच्या मेंबरांचें कौंसुलीपर्यंत झाले आहेत ना! ही मंडळी गव्हर्नरसाहेबांपुढें कौंसुलीप्रमाणें भडाभड जंगी भाषणें करून त्यांनां अगदीं थक्क करून टाकतात ना! त्यांच्या या वक्तृत्वानें देशावर मोठे उपकार झाले आहेत. श्रीमंतांनीं इतकी विद्या साध्य करून घेतली आहे, तेव्हां मी ह्मणतों, कीं, श्रीमंत जर मुंबईला जाऊन राहिले, अन् त्यांनीं थोडाफार त्या दिशेनें प्रयत्न करून पाहिला, तर मला वाटतें, श्रीमंत गव्हर्नरसाहेबांच्या मेंबराचे कौंसुलीहि होतील!"

आपल्या सोनेरी फ्रेमीच्या चष्म्यामधून नानासाहेब केशवरावजी कुळकर्ण्यांकडे मोठ्या कौतुकाच्या दृष्टीनें पाहूं लागले. कांहीं वेळ ते अगदीं स्तब्ध होते. नंतर ह्मणाले "बरें, तूर्त तें राहूं द्या सारें. माझ्याशीं तुह्माला कांहीं बोलायचें आहे, असें तुह्मी ह्मणालां होतांत. काय सांगायचं आहे तुह्माला?"

खालीं नजर लावून, बोटांच्या नखांनीं सतरंजीवर आडव्याउभ्या रेघा आंखीत, केशवराव बराच वेळ गप्प बसले होते. नानासाहेबहि त्यांच्याकडे पहात स्तब्ध होते.

कांहीं वेळानें एकवार यजमानसाहेबांकडे पाहून केशवरावजींनीं बोलावयाली आरंभ केला " मी अधिक तें काय सांगणार आहें ? श्रीमंतांना सर्व कांहीं ठाऊकच आहे. मी चिरकाल श्रीमंतांचा आश्रित–श्रीमंतांच्या अन्नावरच हा पिंड वाढला आहे. आजपर्यंत यजमानांच्या सेवेलाच हा देह वाहिलेला आहे, अन् पुढेंहि आमरणान्त आपल्या सेवेवांचून दुसरें कांहीं करायचें नाहीं, असा मनाचा निर्धार आहे. आपल्या वडिलांची माझ्यावर पूर्ण कृपादृष्टि असून ते मला आपला जीवश्चकंठश्च मित्र मानीत असत. आतां आपल्याच तोंडानें आपली स्तुति करणें कांहीं ठीक नाहीं. पण सांगतोंच–श्रीमंतांच्याहि ऐकण्यांत आलेंच असेल. मी आपल्या वडिलांचा अगदीं उजवा हात होतों. माझी सल्लामसलत घेतल्याशिवाय ते कधीं कोणतेंहि काम करीत नसत, अन् मीं तरी त्यांच्यासाठीं काय नाहीं केलें ? गेलीं सहा वर्षं तुरुंगांत खडी फोडीत मीं काढलीं, तीं कुणासाठीं ? अलबत् श्रीमंतांच्या वडिलांसाठीं ! श्रीमंतांना निंबवली गांव आहे ना ठाऊक ? "

"निंबवली ? निंबवली गांव कुठेंसा आहे बुवा हा ?"

"निंबवली गांव तर श्रीमंतांच्या इनामतीमध्येंच आहे. पिंडेश्वरगांवाहून सारा अर्धा मैल अंतरावर असेलनसेल–"

"नाहीं बुवा कांहीं लक्ष्यांत येत." नानासाहेब किंचित् हंसून ह्मणाले

"कांहीं घोटाळा होऊन सहासात वर्षांपूर्वीं हा निंबवली गांव लिलावांत काढला जाऊन शेजारच्या महिपतरावांनीं तो खरेदी केला. कितीतरी वर्षांची, वाडवडिलांपासून आलेली जमीन कुणीतरी उपटसुंभ्य मध्येंच उपस्थित होऊन लिलावांत चटकन् खरेदी करून हां हां ह्मणता उपटून घेऊन जातो, हें का कुणाला सहन होणार ? वर्षाला पांचसहाशें पेक्षां जास्ती उत्पन्न या जमिनीपासून आपणाला मिळत होतें. आह्मी बस्तादगिरी करून केलें काय, आहे का ठाऊक ? या निंबवलीच्या उत्तरेला कांहीं अंतरावर पांचसात मोडकींपडकीं घरें अन् झोंपड्या असून त्यांत कांहीं कुणब्यांची वसती होती. आह्मी ह्मणायला लागलों, कीं,

अस्सल निंबवली गांव तो हाच, अन् लिलांव झाला तो याच जागेचा! अन् अस्सल निंबवलीला करून टाकला पिंडेश्वरगांवाचाच एक भाग! आहे काय अन् नाहीं काय? कुणाकुणाला कसकसे वळवून घ्यावे लागले आहेत, अन् त्या वेळीं आह्मीं कायकाय केलें आहे, तें सांगतां नाहीं येत! तेराचौदा वर्षांचीं खतेंपत्रें अन् कागद सारे बदलून अजिबात खोटे कागद तयार करावे लागले. नंतर तेथल्या नाईकसाहेबांनां थोडें आंजारूनगोंजारून अन् थोडेंबहुत भयहि दाखवून दिलें एकशेंपंचेचाळीस कलमान्वयें त्याच्या हातचें एक प्रोसिडिंग पाठवून!"

"कसलें प्रोसिडिंग बुवा?" नानासाहेबांनीं विचारलें.

आपल्या पूर्वींच्या यजमानाच्या मुलाचें–सध्या इनामतीचा व्यवहार पहाणाऱ्या इनामदाराचें हें अज्ञान पाहून केशवरावांनां मनांतून मोठें आश्चर्य वाटलें. परंतु तें न दाखवितां ते ह्मणाले "तें नाहीं ठाऊक श्रीमंतांनां? फौजदारी कायद्याच्या एकशेंपंचेचाळीसाव्या कलमांत सांगितलें आहे, कीं, जर एकाद्या जमिनीच्या ताब्यासंबंधानें दोन पक्षांत वाद उपस्थित होऊन शांततेचा भंग होण्याची वेळ आली, तर पोलिसाच्या रिपोर्टावरून मॅजेस्टरसाहेबांनीं हक्काचीं प्रमाणें वगैरे पाहून एका पक्षाला त्या जमिनीचा ताबा देऊन दुसऱ्या पक्षाला सांगावें, कीं, 'तुमचा जर कांहीं हक्क असेल, तर तुह्मी कोर्टांत आपला हक्क शाबीत करून घ्या.' आमच्या नाईकांनीं दिला रिपोर्ट करून, कीं, हक्क आमचाच आहे. प्रोसिडिंग झालें–इतक्यांत महिपतरावांचे लोक आले तेथली आपली बाकी वसूल करायला. आह्मी सोटे, गोफणी, फार काय तरवारी घेऊन गेलों त्यांनां अटकाव करण्याकरतां. मग काय विचारतां? जंगीच दंगा झाला, अन् त्या मारामारींत शत्रूच्या पक्षाचे दोन मनुष्य ठार झाले! आह्मीं मोठ्या युक्तीनें त्या दोघांचीं प्रेतें पळवलीं, अन् दोन स्वार दिले पोलिसठाण्याकडे दौडत पाठवून. 'महिपतरावांच्या लोकां-नींच आमचे हे दोन असामी ठार केले,' असें तिथें जाऊन फिर्यादींत

लिहा म्हणून आम्हीं त्यांनां बजावून सांगितलें. आम्हीं दोन घोडेस्वार त्यां प्रसंगीं कां पाठविले, तें आलेंच असेल लक्ष्यांत श्रीमंतांच्या ?"

नानासाहेब मान हलवून म्हणाले "नाहीं बुवा !"

"श्रीमंतांचें वय जरा लहानच पडलें, त्यामुळें हें नाहीं आपल्या यायचें लक्ष्यांत. अहो, हा इनामतीचा व्यवहार करायचा, म्हणजे नेहमीं पांचापेंचांचें अन् दूरदृष्टीचें धोरण ठेवलें पाहिजे. दोन पक्षांत जर कधीं दंगाधोपा झाला, तर ज्या पक्षाची फिर्याद ठाण्यावर पहिल्याप्रथम लिहून घेतली जाते, त्या पक्षाला कोर्टांत पुढें बरेंच सोपें जातें. म्हणून कसेंहि करून ठाण्यावर शत्रुपक्षाच्या अगोदर पोंचणेंच जरूर असतें. जर एकादा एकटाच माणूस पाठविला ठाण्यावर, तर रस्त्यांत त्याच्यावर कांहीं संकट येण्याचा संभव असतो, एकादवेळेला तो मध्येंच आजारीहि पडतो, अन असें कांहीं तरी गंडांतर मध्येंच उपस्थित होऊन दुसऱ्या पक्षानें ठाण्यावर जाऊन आपली फिर्याद अगोदर दाखल केली, म्हणजे आटोपला सारा कारभार! म्हणून नेहमीं अशा वेळेला एका माणसाबरोबर दुसराहि माणूस पाठविणें इष्ट असतें. तें असो म्हणा—त्या वेळीं ठाण्यावर आमचेच लोक अगोदर पोंचून आमचीच फिर्याद अगोदर दाखल झाली. तेथल्या नाईकाला थोडें मधाचें बोट दाखवून आमचीच तक्रार खरी, शत्रूंची फिर्याद अजिबात खोटी, असा रिपोर्ट त्याच्याकडून लिहविला अन् केस झाली कोर्टात सुरू. पण '**धर्मस्य सूक्ष्मा गतिः**' कीं नाहीं, त्यांच्या पक्षाचे सर्व आरोपी गेले सुटून. नाईकानें लांच दिल्याचा आरोप घातला माझ्यावर, अन् सर्वच गाडें उलटलें शेवटीं आमच्या पक्षावरच उलटें ! त्या खटल्यांत मला ही सक्तमजुरी झाली. आः! या सहा वर्षांच्या कैदेंत माझ्या किती हालअपेष्टा झाल्या, त्या एका परमेश्वरालाच ठाऊक असतील. पण मीं आपलें निमक खाल्लें आहे, आपणासाठीं मी तुरुंगांत गेलों, तर त्यांत मोठें नवल असें काय आहे! तसेंच कारण पडलें, तर आपणाकरतां मी पुनः तुरुंगांत जायला तयार आहें. त्यांत हा केशवशर्मा एक केंसभरहि नाहीं मागें हटणार !"

इतकें दीर्घ वक्तृत्व करून केशवराव उगे राहिले. आपल्या अंगचें प्रचंड वीरत्व, खोल बुद्धि, जंगी मुत्सद्दीगिरी, कुशलता आणि मोठा आत्मत्याग यांच्या आपण केलेल्या रसभरीत व जळजळीत वर्णनानें नानासाहेब एकदम जेरीलाच येऊन जातील, अशी त्यांनां भारीच आशा होती. परंतु तशा प्रकारचा भाव कांहीं नानासाहेबांच्या चेहऱ्यावर बिलकूल दिसला नाहीं. त्यामुळें केशवरावांची बरीच निराशा झाली.

केशवरावांच्या वर्णनाकडे नानासाहेबांचें मुळींच लक्ष्य नसावें, असें दिसत होतें. ते आपल्या निबंधाचीं पानें मधुनमधून उलटीत असून त्यांत ठिकठिकाणीं लहानमोठे शोध घालीत होते. मधुनमधून ज़वळच्या दुसऱ्या पुस्तकांचींहि पानें ते चाळीत होते.

नानासाहेबांनां स्तब्ध बसलेले पाहून केशवराव ह्मणाले "कैदेंतून जेव्हां माझी मुक्तता झाली, तेव्हां मी तडक इकडे आलों. पण इकडे आहे काय? घर वगैरे सारें पडून गेलें आहे, असें माझ्या दृष्टीला पडलें. अंथरुणाला जमीन अन् पांघरुणाला आकाश, अशी माझी स्थिति झाली आहे. आतां श्रीमंतांनीं जर मेहरनजर करून पूर्वीचें काम मजवर संपविलें, तर दोन वेळ गरीबाला अन्न तरी मिळेल!"

नानासाहेब गंभीरपणें ह्मणाले "केशवराव, हल्लींच्या अन् पूर्वींच्या काळांत जमीनअस्मानाची तफावत पडली आहे. आह्मां जहागीरदार-इनामदारांवर गव्हर्मेंटची आतां कडक नजर आहे. कायदा स्वतःच्या हातांत घेऊन दंगाधोपा, मारामारी वगैरे करायचें आतां इनामदार-जहागीरदारांनां शक्य नाहीं. ह्मणून बाबांच्या पदरीं अशा कामाकरतां ह्मणून जी कांहीं लाठीबाज गुंडमंडळी ठेवलेली होती, तिला मी बडतर्फ करून टाकलें आहे. कायद्याच्या सरळ मार्गानें कोर्टाच्या मदतीनें जें कांहीं करतां येईल, तेवढेंच करायचें, असा माझा निश्चय आहे."

यजमानांनीं आपल्या आशेला वाटाण्यांच्या अक्षता लावण्याचा प्रसंग आणला, हें पाहून केशवरावजींची बरीच निराशा झाली. परंतु ते तसे नानासाहेबांनां थोडेच सोडणार होते! ते हात जोडून ह्मणाले "त्या

यावर्तीतुहि आपल्या या सेवकाचा हात धरील, असा कोणी सांपडणें कठिण आहे. आपल्या वडिलांच्या वेळेला तर फिर्यादीआर्यादींचा सर्व कारभार ते माझ्यावरच संपवीत असत."

नानासाहेब किंचित् विचार करून ह्मणाले " फिर्यादीआर्यादींचा कारभार पहायला एका चांगल्या माणसाची आह्माला खरोखरच जरूर आहे. एक 'लॉ-एजंट' च कायमचा नेमून टाकावा, असें माझ्या मनाला वाटायला लागलें आहे. पण फिर्यादीबिर्यादींच्या व्यवहाराची तुह्माला चांगली माहिती आहे का ?"

नानासाहेबांच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच केशवरावांच्या आशेची मावळू पहाणारी ज्योति पुनरपि चांगली उज्ज्वलित झाली. त्यांनां आतां अपूर्व उत्साह वाटूं लागला. उल्लसित स्वरानें ते ह्मणाले "त्याबद्दल मीं श्रीमंतांनां स्वतःच्या तोंडानें सांगून काय अर्थ ? भाऊसाहेब मला नेहमीं ह्मणायचे 'केशव, खरेंच तुला जर इंग्रजी येतें कीं नाहीं, तर तूं एक बडा वकील झाला असतास–ब्रान्सनसाहेबाची देखील तुझ्यापुढें डाळ शिजली नसती !' तें असो ह्मणा–पण माझ्या डोक्यांत या अशा कांहीं तरी युक्त्या खेळत असतात, हें कांहीं खोटें नव्हे. एक वेळची एक गोष्टच सांगतों श्रीमंतांनां—आपल्या लग्नाच्या वेळेला भाऊसाहेबांनीं आपल्या सर्व कुळकर्ण्यांनां अन् कारभाऱ्यांनां आज्ञापत्रें पाठवलीं,' कीं, आपल्या इनामतींतील प्रत्येक कुळापासून वार्षिक खंडाच्या दररुपयाला एक आणा प्रमाणें लग्नाचा अहेर ह्मणून जादा पैसा वसूल करून पाठवावा. धनगांवला सखाराम कुडव ह्मणून एक चांगलें बऱ्यापैकीं असें कुळ होतें. पण लेकाचा भारी उद्दाम ! तो बेटा तेथल्या कुळकर्ण्याला ह्मणाला काय 'जा, देत नाहीं लग्नाचा अहेर ! इनामदारसाहेबांचीं शेतें मजकडे आहेत, त्याबद्दल मीं त्यांनां ठरलेले पैसे वेळेवर देतों. अहेर अन् बिहेर कसला आला आहे ? जा-देत नाहीं साफ !' ही बातमी ऐकतांच भाऊसाहेब तर रागानें नुसते लालबुंद होऊन गेले. मला बोलावून आणून ते ह्मणाले 'अरे केशव, या बेट्याची हड्डीनहड्डी नरम करतोस काय ? लहान तोंडीं

मोठा घांस घेतो काय हा! या गुलामाचें सर्वस्व लुटून त्याच्या घरादाराची राखरांगोळी करून टाक!' मीं हात जोडून आपल्या वडिलांनां म्हटलें 'श्रीमंत, आपला हुकूम असल्यावर आपला हा बंदा काय करूं शकणार नाहीं? पण श्रीमंतांनीं सुचवलेल्या उपायापेक्षां मी अशी कांहीं युक्ति करतों, कीं, त्या पाजी बेट्यानें आपल्या इनामतींतून तोंड घेऊन जन्माचें काळें करावें! मोठमोठ्या उत्पन्नाच्या जमिनी या बेट्यांनां लहान-लहान खंडावर मिळाल्या आहेत नव्हे? त्याची हे पाजी लोक अशी कृतघ्न-पणें फेड करतात. अशा साऱ्या जमिनी अशा लोकांकडून काढून दुसऱ्या चांगल्या माणसांकडे दिल्या, तर खंड अधिक येऊन उत्पन्न कित्ती तरी वाढेल इनामतीचें.' श्रीमंतांनां माझें बोलणें पटून त्यांनीं मला रुकार दिला. थोडा वेळ डोकें खाजवून सोळाशें बासष्ट रुपयांचें खत तयार केलें बेट्याच्या नांवानें!"

"म्हणजे? खोटें खत केलेंत तयार?"

किंचित् हंसून केशवराव म्हणले "हो, श्रीमंत म्हणतात, तसेंच! इनामदारीचा व्यवहार पहायचा म्हणजे अशीं कांहींतरी कुलंगडीं केल्याशिवाय चालत नाहीं–"

"बरें, पुढें?"

"पुढें काय? त्या खतावरून केली त्या गुलामावर फिर्याद. फिर्यादीच्या तारखेच्या अगोदर तीनचार दिवसांपासून सर्व साक्षीदारांनां साक्षीची तालीम द्यायला लागलों. प्रतिपक्षाकडून ज्या ज्या प्रश्नांनीं आमचे साक्षी जेरीला येण्याचा संभव होता, त्यांची दिली त्या सर्वांनां ठीकठाक तैयारी करून. कुठें बसून तें खत लिहिलें, त्या वेळीं दिवस किती वर आला होता, दौत कसली होती, ती आणली कुणीं, लेखणी कसली होती, कोणत्या दिशेला तोंड करून खत लिहिलें, पहिल्यानें निराळा मसुदा करून मग त्यावरून खत लिहिलें, कीं एकदमच लिहिलें, सखारामाच्या डोकीवर त्या वेळीं कसलें पागोटें होतें, इत्यादि प्रश्नांचीं उत्तरें सर्वांनां अगदीं बरोबर ठेवलीं पढवून. खटला राहिला उभा. सखारामानें

बोरूच्या लेखणीनें सही केली असें सांगा, म्हणून सर्व साक्षीदारांना शिकवून ठेविलें होतें. पहिल्या साक्षीदारानें तसेंच सांगितलें. दुसरा साक्षीदार वकिलाच्या प्रश्नांच्या सरबत्तीला जरा घाबरला कीं काय कोण जाणे, त्यानें सांगितलें सखारामानें टांकानें सही केली. त्याबरोबर चरकून मीं मनांत म्हटलें 'अरेच्या! झाला घात, **'धर्मस्य सूक्ष्मा गति'**–खटला बुडतो वाटतें सपशेल!' परंतु तितक्यांतल्यातितक्यांत आली एक डोक्यांत युक्ति. चटकन् मी कोर्टाच्या बाहेर आलों, तिथें एका वडाच्या झाडाखालीं बाकीचे साक्षी बसले होते, त्यांना शिकवून ठेविलें, कीं, 'जर तुम्हांला विचारलें, तर सांगा, कीं, बोरूच्या लेखणींत टांक–निब–घातलें होतें, त्यानें सखारामानें सही केली.' त्या पक्षाचा वकील होता गाढव. दोन साक्षीदारांच्या साक्षींत एवढा फरक पडला–द्यायचें होतें तेवढ्यावर सोडून. पण छेः–तसें कुठलें तो करायला? त्यानें तिसऱ्या साक्षीदारालाहि तोच प्रश्न केला. ज्याला म्हणून त्यानें विचारलें, त्यानें मीं सांगितल्याप्रमाणे उत्तर दिलें. झालें–वकीलसाहेबांच्या तोंडांत पडली माती! खटला आमच्या तर्फेचा होऊन सख्यावर डिक्री झाली. त्याचें घरदार, दाणागोटा, गुरूं वासरूं सर्व कांहीं मालाचा लिलांव होऊन त्या बेफाम बेवकुफ गद्ध्याला आपल्या इनामतींतून काळें तोंड करून जावें लागलें!"

"सखारामाची सहीहि तुम्हीं बनावटच केलीत वाटतें?"

जरा घुटमळल्यासारखें करून केशवराव म्हणाले "हो, सहीहि बनावट केली. सखारामानें आपल्या वकिलाच्या वकिलातनाम्यावर जी सही केली होती, तिच्याशीं मुन्सफानें खतावरील त्याची सही बारीक नजरेनं ताडून पाहिली. एका केसाची तरी दोहोंत तफावत पडायची होती!' असें म्हणून केशवरावांनीं गर्वभरानें नानासाहेबांकडे पाहिलें.

केशवरावांची ही चर्पटपंजरी ऐकून नानासाहेब तर आश्चर्यानें थक्क होऊन त्यांच्याकडे पहातच राहिले! शेवटीं, कांहीं वेळानें त्यांनीं कुतूहलानें विचारलें "दुसऱ्यांच्या देखील सह्या तुम्ही हुबेहुब बठवून द्याल का?"

मोठ्या उत्साहानें केशवराव म्हणाले "हो, अगदीं हुबेहुब वाटेल त्याची सही देईन वठवून. फार कशाला? श्रीमंतांनीं आपली एक सही करून द्यावी, म्हणजे हुबेहुब देतों तशी दुसरी करून!"

नानासाहेबांनीं एक कागद घेऊन त्यावर आपली सही करून तो कागद केशवरावांच्या हातीं दिला. त्यांनीं त्या सहीकडे तीनचार मिनिटें बारीक नजरेनें निरखून पाहिलें, व तिच्याखालीं हुबेहूब–अस्सलबरहुकूम सहीची नक्कल करून तो कागद नानासाहेबांच्या हवालीं केला. नक्कल इतकी तंतोतंत होती, कीं, ती पाहून नानासाहेब आश्चर्यानें स्तंभितच होऊन गेले. आपल्या अंगचें हें विलक्षण कौशल्य पाहून यजमानसाहेब आपणावर बेहद्द खूष झाले असले पाहिजेत, असें केशवरावजींनां वाटलें.

कांहीं वेळानें आश्चर्याचा भर कमी झाल्यावर नानासाहेब म्हणाले "खरोखरच मोठें आश्चर्य आहे हें. ही कला तुम्ही शिकलेत तरी कोठें?"

यजमानसाहेबांनीं केलेल्या या प्रशंसेनें मनांतून अत्यंत खूष होऊन, पण वरून संकोच दाखवून, लज्जेनें हंसतहंसत केशवराव म्हणाले "माझ्या अंगीं हें ईश्वरदत्त कौशल्य आहे. हें माझ्या अंगीं जन्मतःच आहे–कुणाकडून मला शिकावें लागलें नाहीं."

नंतर थोडा वेळ नानासाहेब व केशवराव दोघेहि स्तब्ध होते. कांहीं वेळानें केशवरावांनीं विचारलें "मग काय हुकूम आहे हुजुरांचा?"

क्षणभर विचार करून नानासाहेबांनीं उत्तर दिलें "ठीक आहे. सात-आठ दिवसांनीं या पुनः माझ्याकडे, म्हणजे सांगेन माझा काय निश्चय झाला तो."

"जशी श्रीमंतांची मर्जी!" असें म्हणून केशवरावजी उठले, व नानासाहेबांनां नम्रपणें नमस्कार करून हंसतमुखानें घरीं निघून गेले.

केशवराव निघून गेल्यावर नानासाहेबांनीं आपले कारभारी हरिपंत यांनां बोलावून आणावयाला एका नोकराला पाठविलें. हरिपंत आल्यावर त्यांनीं त्यांनां विचारलें "धनगांवच्या सखाराम कुडवे नांवाच्या आपल्या कुळाची तुम्हाला कांहीं माहिती आहे का?"

"होय हुजूर !"

"हल्लीं कुठें आहे तो ?"

"त्याच्यावर कांहीं वर्षांपूर्वी आपली डिक्री होऊन त्याचें घरदार, गुरूं-वासरूं यांचा लिलांव झाल्यामुळें त्याला आपल्या गांवांतून शेवटीं निघून जावें लागलें. हल्लीं तो सातारा जिल्ह्यांतील आपल्या मामाच्या गांवीं जाऊन राहिला आहे."

"त्याचा बरोबर पत्ता आहे का तुम्हाला ठाऊक ?"

"हो, आहे."

"अच्छा–तर मग सखारामाच्या त्या खटल्यासंबंधाचे सर्व कागद-पत्र माझ्याकडे आतांच्या आतां पाठवून द्या."

हरिपंतांनीं पाठवून दिलेले कागदपत्र रात्रीं लक्ष्यपूर्वक पाहून नाना-साहेबांनीं दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्यांनां बोलावून आणून सांगितलें "हरिपंत, कुणातरी विश्वासू माणसाला पाठवून सखाराम कुडवाला सहा दिवसांच्या आंत इथें आणायची जरूर व्यवस्था करा. अन् इकडे पहा, ही गोष्ट मात्र षट्कर्णी होऊं देऊं नका !"

---

## प्रकरण सहावें.

## रज्जु नव्हे, सर्प !

केशवरावजींची स्वारी मोठ्या आनंदांत हलुहळू घरांकडे फिरली. त्यांची तब्यत आज मोठ्या खुषींत आहे, असें पाहून त्यांचे 'यजमान' धोंडोपंत त्यांनां ह्मणाले "काय हो, झालें का तुमचें काम नानासाहेबां-पाशीं फत्ते, केशवराव ?"

नाक मुरडून, मान हलवून केशवराव ह्मणाले "अहो नाहीं हो ! मोठे शिकलेसवरले, तरी हे अलीकडचे विद्वान् असेच का खुळसट असतात?"

"कां ? काय झालें बुवा ?"

"झालें नाहीं तसें कांहीं एक—पण हे तुमचे नानासाहेब मुंबईला शिकायला राहून ओंजळींच्याओंजळीं पैसे खर्च करून चारपांच परीक्षा पास होऊन आले, पण व्यवहारासंबंधानें पाहिलें, तर अगदीं इरसाल गद्धे !

काय ह्मणे, आपल्या पदरीं जितकी लाठीबाज वगैरे मंडळी होती, तितक्यांनां कडतर्फ करून टाकलें! ह्मणाले काय मला तुमचे इनामदारसाहेब, ‘कायद्याच्या मार्गानें अन् कोर्टाच्या मदतीनें जितकें होईल तितकेंच आपणाला बस्स आहे–मारपीट, दंगाधोपा करून कुळावर अधिकार गाजवणें बरें नाहीं!’”

धोंडोपंत किंचित् हंसून ह्मणाले “मग त्यांत तुह्माला एवढा गाढवपणा तो काय वाटला नानासाहेबांचा? आपल्या कुळाच्या बऱ्यासाठींच तर ते असें करताहेत ना?”

धोंडोपंतांचें हें विधान ऐकतांच केशवराव मोठमोठ्यानें खोखो करून हंसूं लागले. हंशाचा आवेग थांबल्यावर ते ह्मणाले “अहो, कसलें घेऊन बसलांत कुळांचें बरें अन् खरें! यांत कुळांचें हित तर कांहीं नाहींच, पण वकील–मुखत्यारांचें मात्र उखळ पांढरें व्हायचें हें खासें साधन आहे. समजा घटकाभर, एका कुळाकडे बाकी थकली, अन् हट्टाला पेटून तो ती देत नाहीं. मागच्या इनामदारांच्या कारकीर्दींत त्याच्याकडे दोन लाठीबाज गुंड पाठवून मुसक्या बांधून त्याला गिरफदार करून आणलें, अन् चिंचेच्या फोकाचे त्याच्या पाठीवर चारदोन तडाके बसले, कीं, स्वारी चटकन् शुद्धीवर येऊन वसूलबाकी तत्क्षणीं श्रीमंतांच्या पायांशीं येऊन पडे. एका पैशाभराच्या चुनाहळदीच्या शिडकावानें त्या कुळाच्या पाठीवरचे वळ कांहीं दिवसांनीं नाहींसे होत, अन् त्यांत खुद्द इनामदारांनां तर एका फुटक्या कवडीचाहि खर्च पडत नसे. ही झाली गोष्ट मागच्या अमलांतली; अन् आतां या नव्या दमाच्या सुशिक्षित तरुण इनामदारांच्या कारकीर्दींत काय होतें, आहे ठाऊक? समजा, एका कुळाकडे तीन वर्षांची बाकी तीस रुपये थकली आहे. इनामदारसाहेब महिना दोनमहिने आपल्या नोकरांनां त्याच्याकडे जोडेफाड करायला लावणार, अन् मग कांहीं केल्या कुळ पैसे देत नाहीं, असें ठरल्यावर शिरोळाला जाऊन मुन्सफकोर्टांत फिर्याद करणार. प्रथमच वकीलाची रवानगी, दोन रुपये, आठ आणे त्याच्या कारकुनाला पानसुपारीला ह्मणून, वकिलनाम्याचे आठ आणे,

कोर्ट-फीचे दोन रुपये नऊ आणे, कोर्टाच्या कारकुनाला बक्षिसी ह्मणून एक रुपया, एवढी तरी रकम लागायचीच. नंतर साक्षीदारांना समन्स लावायची भानगड. बेलिफाच्या हातांपायां पडून साक्षीदारांना समन्स लावायला नेलें, त्याला दिला पाहिजे एक रुपया-कमींतकमी आठ आण्यांचे पैसे तरी त्याच्या हातावर टिचलेच पाहिजेत. इकडे आपला नांगर अन् बैल तसेच टाकून कुळालाहि तारखेच्या दिवशीं कोर्टात हजर व्हायला पाहिजे. कदाचित् त्याच्या वकीलानें त्याला शिकवून ठेवलेंहि असेल, कीं, मी इनामदारसाहेबांचा खंड पैन् पै दरवर्षाला देत आलों आहे-त्यांचा वसूल करणाऱ्या कुळकर्ण्यानें ही बाकी माझ्यावर कशी काढली असेल तें ईश्वर जाणे, असें कोर्टात तूं सांग बेलाशक-कीं झालें सारें ऑफस् ! बरें, दुसऱ्या पक्षीं समजा कीं कुळ हरलें; तर डॅमेज, दुसऱ्या पक्षाचा खर्च वगैरे धरून डिक्री झाली त्याच्यावर तीस रुपयांऐवजीं बावन रुपये साडेनऊ आणे एक पै ! यांत त्याचा स्वतःचा खर्च मिळवला ह्मणजे गेली साठपांसष्टांच्या घरांत धांव ! बैल नांगर विक्री करून डिक्रीचे पैसे कुळाला भरून देणें भागच-नाहीं तर घरदार लिलांव व्हायची पाळी यायची ! मग धोंडोपंत, कोणतें बरें ? चिंचेच्या फोकाचे दोन सपाटे खाणें बरें, कीं, सर्वस्वाचा नाश करून घेणें बरें ? तुह्मीच सांगा—"

धोंडोपंत ह्मणाले "वाः ! ही सारी गोष्ट तुह्मीं आपल्या मनाला रुचेल अशा तऱ्हेचें रूप देऊन सांगितलीत. मी तुम्हाला विचारतों, इनामदार, जहागीरदार वगैरे मंडळी कुळांवर जे अत्याचार करतात, ते फक्त खंडाची बाकी वसूल करण्याकरतांच का ? कित्येक कुळांच्या जमिनीच ते हिसकावून घेतात, तर कित्येक कुळांची घरेंदारें जाळूनपोळून त्यांना अन्नालाहि महाग करून सोडतात. न्यायानें कुळांकडून वार्षिक खंडाबद्दल जी रकम यायची असेल, तीशिवाय त्यांच्यावर जुलूमजबरदस्ती करून निरनिराळ्या निमित्तांनीं कितीतरी जादा पैसा काढून घेतात, हें सारें आपल्या कुळांच्या हितासाठींच ना ? तें असो म्हणा-त्याच्याविषयीं आपणांला वाटाघाट करून करायचें आहे काय ? पण आज नानासाहेबांकडून तुम्हाला कांहीं भरंवसाबिरंसा तरी मिळाला का ?"

क्षणभर थांबून केशवराव ह्मणाले "झाला तसा लभ्यांश थोडा, पण त्यासाठीं मला थापा किती माराव्या लागल्या–बडबड किती करावी लागली–वस्तादगिरी किती लढवावी लागली–कांहीं विचारूं नका–"

"काय झालें, ऐकूं द्या तरी!"

नानासाहेबांशीं झालेल्या भेटीच्या हकीगतीला बरेंचसें तिखटमीठ लावून, व तिला बरेंच विकृत रूप देऊन केशवरावांनीं ती आपल्या 'यजमानां'नां निवेदन केली, व ते म्हणाले " फिर्यादीबिर्यादींत अन् कायदे कानूंच्या बाबतींत माझें डोकें बरेंच खेळतें, असें पाहून यजमानांचें मन झालें थंडगार! मारझोडीपेक्षां आपली मदार आतां सरकारदरबारावरच विशेष असल्यामुळें आपणाला एकाद्या कायदेबाज मनुष्याची मदत घेतल्याशिवाय चालणें शक्य नाहीं, ही गोष्ट राजश्रींनां चांगलीच पटली म्हणायची."

सहानुभूतीच्या स्वरानें धोंडोपंत म्हणाले " वाः! फार छान झालें बुवा तर मग. आज वर्षेंच्यावर्षें तुम्हीं या घराण्याच्या सेवेंत काढलींत, आतां या वयांत दुसरीकडे जाणार कुठें? पण मागच्या इनामदारांच्या कारकीर्दींत दोन्ही हातांनीं लूट करायला जशी तुम्हांली मिळत असे, तशी कांहीं यांच्या अंमलांत नाहीं करायला मिळणार. नानासाहेब म्हणजे पाणीदार, तिखट छोकरा आहे. शंभरसवाशें रुपये दरमहा खर्च करून हा कॉलेजांत शिकलेला आहे. कायदेकानूंची याला पुरी माहिती आहे."

केशवराव हंसून ह्मणाले "कायदेकानू ना? त्यासंबंधानें आहे पक्काच–" असें ह्मणून मूठ मिटून केशवरावजी प्रसिद्ध फाल्गुनवाद्यवादनाचें कांहीं वेळ अनुकरण करून दाखवून खोखो हंसूं लागले. कांहीं वेळानें ते पुढें बोलूं लागले "तुमच्या या कालिजांतील छोकऱ्याच्या हुषारीबद्दल कांहीं विचारूं नका! निंबवली गांवासंबंधाच्या दंग्याविषयीं मी जेव्हां गोष्ट सांगूं लागलों, तेव्हां या राजश्रींनीं मला प्रथम प्रश्न केला ' हा निंबवली गांव आहे कुठें?' इकडे तुमचे इनामदारसाहेब कोठल्याशा तत्त्वासंबंधानें–काय ह्मणाले ते पहा हो--प्राच्यतत्त्व–हो प्राच्यतत्त्वच–एक निबंध

लिहीत होते–दशरथराजाच्या तोफा किती होत्या, त्याचा ते हिशेब लिहीत होते, अन् इकडे आपल्या इनामतींत निंबवली गांव कुठें काय आहे, याचा मात्र या स्वारीला कांहीं हिशेब नाहीं ठाऊक ! ” असें म्हणून केशवराव मोठमोठ्यानें हंसूं लागले.

धोंडोपंत मान हलवून म्हणाले “ होईल–होईल–सर्व कांहीं त्यांनां माहिती होईल. अहो, नानासाहेबांनां इनामतीचा व्यवहार पहायला लागून अजून सहासात महिने देखील नाहीं पुरे झाले. त्यांनां कांहीं सहज फसवतां यायचें नाहीं तुम्हाला !”

केशवराव उत्तेजित स्वरानें म्हणाले “ नाहीं येणार–ठीक आहे–यासंबंधानें तुमचीआमची पैज ! चला, होऊन जाऊं द्या. मी म्हणतों, कीं, भाऊसाहेबांच्या कारकीर्दींत मीं जेवढा रोजगार केला, त्यापेक्षां कांहींतरी अधिकच रोजगार तुमच्या या कालिजांतल्या छोकऱ्याच्या अमलांत करीन—कांकणभर अधिकच करीन, पण कमी नाहीं ! अहो, रोग ओळखून मग त्याप्रमाणें औषधाची व्यवस्था केली पाहिजे. इनामदारसाहेबांच्या नोकरीवर मी एकदां रुजू झालों, म्हणजे असे कोंपरापासून हात जोडून नम्रपणानें मी त्यांनां म्हणेन ‘हुजूरांच्या पायांपाशीं या बंद्याची एक विनंति आहे.’ हुजूरांनीं मला ‘काय ?’ असा साहजिकपणेंच प्रश्न केल्यावर मी त्यांनां म्हणेन ‘ आपल्या पुण्यप्रतापी वडिलांच्या वेळेला मला महिना होता पगार सारा पांच रुपये. माझ्यामागें पडला बायको अन् चार कच्याबच्यांचा संसार. अवघ्या पांच रुपयांत इतक्या माणसांनां खायला नुसती मीठभाकर अन् अंगावर जाडेंभरडें वस्त्र यांची तरी तजवीज कशी होणार ? म्हणून मला अन्यायानें, लांचलुचपत खाऊन कांहीं तरी जादा कमाई करणें भागच पडे. इनामतींतल्या कुळांनां धाकदपटशा देऊन थोडेंबहुत कांहींतरी मिळवावें लागे. फिर्यादीअर्यादींसंबंधानें सिरोळाला किंवा कोल्हापुरला जावें लागलें, म्हणजे वकिलांनां जी फी किंवा खटला जिंकल्यावर बक्षिसी द्यावी लागे, त्यांतूनहि थोडीबहुत बचत मला काढावीच लागे. अन हें कमिशन ही मंडळी तरी आपल्या गांठच्या

पैशांतून थोडेंच देत असे मला! इनामदारसाहेबांच्याकडून मिळालेल्या मोठ्याशा भाकरीपैकीं एकादा तुकडा ते माझ्या अंगावर फेंकीत. काय करावें हुजूर? या पोटाचा जाळ मोठा कठिण आहे! पण आतां तो काळ अजिबात बदलला आहे. हुजूरांच्या कारकीर्दींतल्या कडक बंदोबस्तामुळें अन्यायानें, लांडीलबाडी करून कुणापासून अधर्माची पैहि खायची कांहीं सोय राहिली नाहीं. ह्मणून श्रीमंतांनां हात जोडून प्रार्थना एवढीच, कीं, सरळ रस्त्यानें चालून गरीबाचा संसार चालेल, इतक्या वेतनाची व्यवस्था हुजूरांकडून व्हावी.' बस्स! हा मंत्र हुजूरांवर बरोब्बर लागू पडणार —माझ्यावर बेहद्द खूष होऊन स्वारी अगदीं गळून जाणार! अहो, स्तुतीनें परमेश्वर देखील वश होतो. महिना पन्नास रुपये जरी नाहीं, तरी चाळीस रुपये निदान लागू होणारच आपणाला श्रीमंतांकडून!"

धोंडोपंत हसून ह्मणाले "मागच्या इनामदारसाहेबांच्या अमदानींत तर याच्यापेक्षांहि तुह्माला अधिक कमाई होती, नाहीं केशवराव?"

क्षणभर मान हलवून केशवराव उद्गारले "अहाहाहा! गेलें तें रामराज्य! अहो, त्या वेळीं महिन्याच्या पगारावर का मी होतों अवलंबून? पगार ह्मणजे माझी वरची पानसुपारी होती. अहो, अंजून तरी काय झालें आहे? वकिलाबिकिलांच्या फीमधून मी जें कमिशन मारीत असें, ती माझ्या हक्काची कमाई अजून झाली तरी दुसरीकडे कुठें जाणार? पूर्वीं शेंकडा पंचवीस टक्के या हिशेबानें वकिलाकडून मला कमिशन मिळत असे. अलीकडे वकिलांची संख्या तर इतकी झाली आहे, कीं, दोन धरें टाकलीं, कीं, वकिलाची एक पाटी आहेच! यांच्यांत कुळें मिळविण्यासाठीं जंगी चढाओढ सुरू असल्यामुळें यांच्या फीमधून जरी शेंकडा पन्नास टक्के मीं कमिशन मागितलें, तरी तें द्यायला ही मंडळी माझ्या पायांवर लोटांगणें घालीत येतील!"

सातआठ दिवसांनीं आपली भेट घ्यावयाला नानासाहेबांनीं केशवरावांनां सांगितलें होतें—परंतु हे दिवस कांहीं केल्या त्यांनां जातां जाईनात. "इनामदारसाहेबांनां मला आपल्या कुळांसंबंधाच्या फिर्यादी-

अर्धोदीची व्यवस्था बघण्याकरतां पन्नास रुपये दरमहावर नेमलें आहे, परंतु नोकरीवर रूजू होऊन कामाला आरंभ करायला पंचांगांत योग्य मुहूर्त सांपडत नसल्यामुळें श्रीमंतांच्या हातांपायां पडून कशीतरी एका आठ-वड्याची सुटी मीं मोठ्या मिनतवारीनें मिळविली आहे. आठ दिवसांनीं मला कामावर रूजू झालेंच पाहिजे, मग कांहीं श्रीमंत नाहीं ऐकायचे!" असें केशवरावजींची स्वारी ज्याच्याल्याच्याजवळ बेधडक सांगत सुटली होती. या बातमीच्या जोरावर गांवांतल्या कांहीं भोळसट प्राण्यांजवळून केशवरावांनीं दोनदोन चारचार रुपये उसनवट म्हणून मिळविण्याला कमी केलें नाहीं. अशा रीतीनें त्यांनीं चांगली पन्नाससाठ रुपयांची एक रक्कम पचनीं पाडली. इकडे, केशवरावांच्या हातीं लवकरच येणारा मोठा अधि-कार व त्यांची भावी उन्नति यांची भव्य कल्पना धोंडोपंतांनां चांगलीच आल्यामुळें त्यांच्या घरीं केशवरावजींच्या खाण्यापिण्याची चंगळ झाली—त्यांनां शेरभर दुधाचा रतीबहि दररोज सुरू झाला. या आठवड्याच्या अवकाशांत एक दिवस केशवरावजींची स्वारी शिरोळासहि एक फेरी करून आली. तेथल्या बऱ्याच लहानमोठ्या वकीलमुखत्यारांची त्यांनीं गांठ घेतली. आपल्या मोठ्या अधिकाराचें आपल्या मधुर रसवंतीनें तिखटमीठ लावून त्यांच्यापाशीं वर्णन करून आपले मोठ्या रकमेचे मुकद्दमे लवकरच लावावयाचे आहेत, अशी प्रस्तावना करीत केशवरावजींनीं त्यांपैकीं प्रत्येक वकिलमुखत्याराला 'अर्जाचा मसुदा करण्यासाठीं येत्या रविवारीं आपणाकडे आलों, तर आपणाला अवकाश होईल का?' असा साळसूदपणें प्रश्न केला. उठतांना त्यांनीं 'मला जरा एक धोतराची जोडी विकत घ्यायची होती,' असें एकाला सांगितलें, तर दुसऱ्याला 'हा डोकीचा रुमाल भारी जीर्ण झाला आहे. दुसरा आज घेतलाच पाहिजे,' असें ध्वनित केलें; 'नवीन छत्री घेणें या वेळीं अगदीं जरूरच आहे,' अशी तिसऱ्यापाशीं हळूच गोष्ट काढली. परंतु हें सांगितल्यानंतर 'येण्याच्या गडबडींत घरून पैशाचा कसा आणायला मी विसरलों बुवा अगदींच! येत्या रविवारीं अर्जासाठीं यायचेंच आहे पेठ्याला, तेव्हां येतांना आपले पैसे आणीनच,' असें वचन

खावयालाहि केशवराव विसरले नाहींत. कोणी भावी लाभाच्या आशेनें, तर कोणी भिडस्तपणानें, केशवरावांच्या मागणीप्रमाणें त्यांना रुपये दिले. त्या रकमेंतून नवा रुमाल, धोतरें, छत्री, जोडा वगैरे सरंजाम विकत घेऊन केशवरावजींची स्वारी घरीं परत आली.

जातांजातां मोठ्या कष्टानें मधले सारे दिवस जाऊन तो आठवडा तर पुरा झाला. नोकरी मिळाली, तर आपल्या कुलदेवतेला—त्याच गांवच्या सिद्धेश्वरीला—साडीचोळी देण्याचा नवस करून केशवराव इनामदार, साहेबांच्या वाड्याकडे निघाले.

त्या वेळीं नानासाहेबांची स्वारी पूर्वी वर्णन केलेल्या खोलींतच खुर्चीवर बसली होती. आंत येतांच त्यांनां अत्यंत नम्रपणें नमस्कार करून केशवराव खालीं घातलेल्या बिछायतीवर बसले.

दोनचार इकडच्यातिकडच्या गोष्टी झाल्यानंतर नानासाहेबांनीं टेबलाच्या एका खणांतून तें कर्जखत बाहेर काढून ह्मटलें "वहावा केशवराव! खरोखरच तुमची मोठी बहादुरी आहे. कचेरींतून कागदपत्र आणवून त्याच्यांतील सखाराम कुडवाच्या बऱ्याचशा सह्यांशीं ती कर्जखतावरील सही मीं मिळवून पाहिली, ती अगदीं हुबेहुब मिळाली! काय तुमचें हें कौशल्य तरी!"

आपली ही स्तुति ऐकून केशवरावांचा आनंद गगनांत मावेनासा झाला. ते आल्हादाच्या स्वरानें ह्मणाले "त्या कागदपत्रांतील त्या बेट्याच्या सह्या पाहूनच तर मीं ती कर्जखतावरील सही वठवून दिली हुबेहुब!"

क्षणभर थांबून नानासाहेबांनीं विचारलें " ज्यां वेळीं हें खत तुम्हीं बनावट तयार केलेंत, त्याच्याअगोदर पांच वर्षें हा स्टँपकागद विकत घेतलेला आहे. व्हेंडराची ही पहा तारीख इथें आहे. इतका जुना स्टँप-कागद तुह्माला मिळाला कुठें?"

केशवराव गर्वभरानें हंसून ह्मणाले " दरवर्षी निरनिराळ्या किंमतीचे स्टँपकागद विकत घेऊन ते मी घरीं नीट जपून ठेवीत असें. कुठल्या वेळीं केती वर्षांच्या जुन्या कागदाची जरूरी लागेल, याचा काय नेम आहे?"

" असें ? अन् शाईची हो काय व्यवस्था केली होती तुह्मीं ? नवीन शाईनें का हें कर्जखत तुह्मीं लिहिलेंत ? नवीन शाई पाहून कोर्टाला नाहीं का कांहीं खताच्या खोटेपणाबद्दल संशय आला ? "

किंचित् हंसून मान हलवीत केशवराव ह्मणाले "त्यालाहि एक बेमालुम युक्ति आहे हुजूर ! कागद लिहून तो कांहीं दिवस कांडलेल्या तांदुळांच्या राशींत ठेवावा, ह्मणजे त्यांतील कोंड्याच्या योगानें शाईचा रंग, त्याप्रमाणें कागदाचा रंगहि अजिबात बदलून जातो !"

नानासाहेबांनीं केशवरावजींकडे पाहून मृदु हास्य केलें. केशवरावांच्या आनंदाला पारावार नाहींसा झाला. इतक्यांत नानासाहेबांनीं शेजारच्या खोलीकडे पाहून हळूच हांक मारली "अरे सखाराम —"

तत्क्षणीं त्या खोलीचा दरवाजा खाडकन् उघडून सखाराम कुडवानें येऊन नानासाहेबांनां प्रणाम केला.

केशवरावांकडे पाहून नानासाहेबांनीं विचारलें "काय हो केशवरावजी! तो सखाराम कुडव हाच ना ?"

या वेळीं केशवरावांची स्थिति अगदीं अवर्णनीय होऊन गेली. त्यांचा चेहरा पांढरा फटफटीत झाला! भय, आश्चर्य इत्यादि विकारांच्या अतिरेकामुळें त्यांचे डोळे फुलून निघाले! श्वासोच्छ्वास जोरजोरानें व वारंवार होऊं लागला. सर्व शरीराला दरदरून घाम सुटला. कांहीं थांग ना पत्ता, अशा तऱ्हेचें एकादें भयंकर संकट आपणाला ग्रासण्याकरतां धांवून येत आहे, अशी भीति वाटून त्यांनां 'दे माय धरणी ठाय' होऊन गेलें !

नानासाहेबांनीं पुनः दृढस्वरानें केशवरावांनां विचारलें " ज्याच्या नांवचें बनावट खत करून, डिक्री मिळवून ज्याच्या सर्वस्वाचें लिलांव करून तुह्मीं ज्याला आमच्या इनामतींत घरदार नाहींसें करून टाकलेंत, तोच ना हा सखाराम ?"

भयानें कांपतकांपत केशवरावांनीं कसें तरी उत्तर दिलें "होय, हाच तो हुजूर ! "

नंतर सखारामाकडे वळून नानासाहेब ह्मणाले "सखाराम, अमच्याकडून तुझ्यावर जी विलक्षण जुलूमजबरदस्ती झाली, ती मला नुकतीच कळली. मला त्याबद्दल भारी दुःख वाटतें. तुझी जर इच्छा असेल, तर पुनः येऊन तूं माझ्या इनामतींत रहा. तुला पूर्वीच्याहून अधिक सोईची अन् कमी खंडाची जमीन देण्याची मीं व्यवस्था करतों. तुला घरदार स्वतःच्या खर्चानें बांधून देण्याचीहि मी तजवीज करीन. बोल, सखाराम, ही व्यवस्था तुला पसंत आहे का?"

कांहीं क्षण सखाराम स्तब्ध होता. नंतर तो कृतज्ञतेनें ह्मणाला "सरकारची ही गरीबावर मोठी दया आहे. माझ्यासारख्या गरीबांचे हुजूरच आईबाप आहेत. माझें वय इलीं आहे, यापेक्षां जर दहा वर्षांनीं कमी असतें, तर हल्लींचें माझें घर मोडून मी हुजूरांच्या रामराज्यांत येऊन राहिलों असतों. पण मी आतां ह्मातारा झालों सरकार! इतकी यातायात करण्याची कुवत आतां माझ्या अंगांत राहिली नाहीं. हल्लींच्या गांवीं माझ्या मामाचा थोडासा जमीनजुमला मला मिळाला आहे, थोडे पैसेहि मामा मला मागें ठेवून गेला. या जमिनीच्या उत्पन्नावर पोरेंबाळें, नातनातीं, गुरुंवासरूं यांच्यासह हुजूरांच्या कृपेनें दोन सुखाचे घांस खायला मिळतात. तिकडचा संसार मोडून इकडे येऊन रहाणें या वयांत मोठें कष्टाचें होणार आहे सरकार!" असें ह्मणून सखाराम हात जोडून नानासाहेबांकडे पहात उभा राहिला.

"हल्लीं कुठल्या गांवीं आहेस तूं?" नानासाहेबांनीं विचारलें.

"सातारा जिल्ह्यांत तांबखेडें ह्मणून गांव आहे, तिथें असतों सरकार! इनामतीपैकींच गांव आहे—"

"इनामतीपैकीं? असें! इनामदार कोण आहेत?"

"बनगांवचे देशमुख. हे दोघे भाऊ आहेत. त्यांपैकीं थोरले—रावसाहेब—इनामदारीचा कारभार करतात."

"तुझ्या संसाराची चांगली व्यवस्था आहे, हें ऐकून मला भारी आनंद झाला. तुला जर तिथें राहणें बरें वाटत असेल, तर तिथें सुखानें रहा.

आमच्यामुळें तुझें जें नुकसान झालें, त्याची थोडीशी भरपाई म्हणून मी तुला एक हजार रुपये देतों. कारभाऱ्यांना हीं त्याबद्दल मी चिठी देतों–कचेरींत नेऊन त्यांना ही दाखीव, म्हणजे तुला पैसे देण्याची ते व्यवस्था करतील."

नानासाहेबांची ही विलक्षण न्यायपरायणता व सरलता पाहून सखारामाचें हृदय कृतज्ञतेनें भरून आलें. त्याच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले.

नंतर केशवरावांकडे वळून नानासाहेब तीव्र स्वरानें म्हणाले "आजपर्यंत तुमचें आयुष्य अनेक प्रकारचीं घाणेरडीं कामें करण्यांत गेलें आहे. आतां तरी दुष्ट मार्ग सोडून आपल्या आयुष्याचा क्रम बदला. मीं तुम्हाला आतांच्या आतां पोलिसांत दिलें असतें, परंतु सहा वर्षे खडी फोडून तुम्ही नुकतेच तुरुंगांतून सुटून आलां आहां, म्हणून मला इतका कठोरपणा करतां येत नाहीं. जा–तुमच्या गुन्ह्याची मी तुम्हाला माफी करतों, पण तुम्ही चोवीस तासांच्या आंत माझ्या इनामतीच्या हद्दींतून निघून गेलें पाहिजे, असा माझा तुम्हाला सक्त हुकूम आहे. माझ्या इनामतीच्या जमिनींत तुम्हीं फिरून कधीं पाय ठेवलात, असें मला जर यापुढें कधीं आढळून आलें, तर बनावट कर्जखत केल्याबद्दल या सखारामाकडून तुमच्यावर मी फौजदारी करविल्याशिवाय कधींहि रहाणार नाहीं, हें तुम्ही पक्कें ध्यानांत ठेवा. अन् माझ्याजवळ तुम्हीं साहजिक रीतीनें जो कबूलीजबाब दिला आहे, तो मी साक्षीदार होऊन स्वतः कोर्टाला इत्थंभूत रीतीनें सांगेन! एक क्षणभरहि तुम्हाला गय करणार नाहीं."

नंतर सखारामाकडे वळून नानासाहेबांनीं विचारलें "कायरे सखाराम, माझें पत्र येतांच या केशवरावांवर तूं बनावट खत केल्याबद्दल फिर्याद गुदरशील कीं नाहीं?"

सखाराम केशवरावांकडे तीव्र दृष्टीनें पाहून म्हणाला "जी सरकार, जर मी जगलोंवांचलों, तर हुजूरांचा हुकूम होतांच मी वाटेल तेव्हां याच्यावर फिर्याद गुदरायला तयार आहें!"

" अच्छा—ठीक आहे तर. आतां तुम्ही दोघेजणंहि जा. तुमचें काम संपलें."

जड, हताश, जळजळणाऱ्या हृदयानें केशवरावजींची स्वारी खालीं मान घालून हळुहळू तेथून निघून गेली.

केशवराव घरीं येतांच खिन्न मुद्रेनें धोंडोपंतांना ह्मणाले "काय तुमचे नवे इनामदार पण! सातआठ दिवस मला वाट पहात ठेवलें, अन् आज मी गेलों अन् तब्बल दोन घंटे तिष्ठत बसलों, तरी त्यांची गांठच नाहीं पडली. हे अलीकडचे शिकलेले श्रीमंत लोक ह्मणजे मोठे लहरी बुवा! दुसऱ्यांच्या सोईकडे हे कधींहि लक्ष्य द्यायचे नाहींत!"

भोजन वगैरे आटोपून केशवराव अंथरुणावर पडले, परंतु आज त्यांना झोंप येणें अशक्य होतें. मध्यरात्र उलटून गेल्यावर, घरांतील सर्व मंडळी गाढ झोंपेंत आहे, असें पाहून ते हळूच अंथरुणावरून उठले आणि आपले जे कांहीं थोडे जिन्नसपान्नस होते, ते एकत्र गोळा करून त्यांचें एक गांठोडें बांधून हळूच घराबाहेर पडले.

केशवरावजी हळुहळू पायांनींच गांवाच्या बाहेर आले. या साऱ्या जगांत आपला जर कोणी भयंकर शत्रु असेल, तर तो सखाराम कुडव हाच होय, अशी त्यांच्या दिलाची आज पुरेपूर खात्री झाली होती. नानासाहेबांनीं जरी त्याला सांगितलें नाहीं, तरी इच्छा होतांच सखारामाला स्वतःला आपणावर फौजदारी करतां येईल, आणि खुद्द नानासाहेबांनीं जरी आपणावर फौजदारी केली, तरी त्यांचा मुख्य साक्षीदार सखाराम कुडवच! जोंपर्यंत सखाराम कोर्टांत हजर होऊन 'या खतावरची सही माझी नाहीं,' असें सांगणार नाहीं, तोंपर्यंत आपणावर बनावट सहीचा अन् खताचा पुरावा होणें शक्य नाहीं. अर्थात् काय वाटेल तें करून या आपल्या भयंकर शत्रूचा नाश करून टाकलाच पाहिजे. आणि आपला हा हेतु सिद्धीला न्यावयाला, सखाराम कुडव ज्यांच्या इनामतींत राहिला आहे, त्या रावसाहेब देशमुखांच्या हाताखालीं कसेंहि करून नोकरी मिळवणें हाच एक उत्कृष्ट उपाय आहे.

अशा तऱ्हेचा विचार करीतकरीत केशवराव शिरपुरांतून बाहेर पडले. त्यानंतर बनगांवला जाऊन त्यांनीं रावसाहेबांची भेट घेतली व त्यांच्या नोकरीला रहाण्याचा आपला मानस त्यांच्या कानांवर घातला, हें वाचकांनां माहीत झालेंच आहे.

---

## प्रकरण सातवें.

## हें असावें तरी काय ?

बनगांवचे प्रस्तुतचे इनामदार गोपाळराव ऊर्फ रावसाहेब देशमुख यांच्या अर्धांगीचें नांव रमाबाई. रमाबाईचा थोडासा परिचय वाचकांनां पहिल्या प्रकरणांत झालाच आहे. रमाबाईचें वय आमच्या कथानकाच्या वेळीं तीस वर्षांचें असून त्यांनां दोन मुलें--एक मुलगा व एक मुलगी-- आहेत. मुलाचें नांव मधुसूदन. हा आतां आठ वर्षांचा झाला आहे. मुलीचें नांव गोदावरी. मनोहरपंतांच्या वाग्बाणांच्या तडाक्यांत सांपडलेल्या गोदावरीला वाचकांनीं पाहिलीच आहे.

रमाबाई स्वभावानें फार गोड व मायाळू होत्या. त्यांनां कधीं राग आलेला सहसा कोणींहि पाहिलें नव्हतें. त्यांनां कधीं कसलें दुःख झालें, तर त्या तें मनांतल्या मनांत लपवून ठेवीत असत--त्यांच्या त्या गोड चेहऱ्यावर त्याचें प्रतिबिंबहि फारसें कधीं दिसत नसे. दुःखावेग अगदीं अनावरच झाला, तर रमाबाई एकान्तांत जाऊन मुकाट्यानें अश्रुविसर्जन करीत. अगदीं तशाच जिव्हाळ्याच्या माणसाखेरीज त्यांच्या हृदयांतील गुप्त वेदनांचा कधीं कोणाला पत्ताहि लागत नसे. रमाबाईच्या दुःखा-प्रमाणेंच त्यांच्या हर्षाचीहि स्थिति होती. हर्षातिरेक होण्यासारखा कांहीं प्रसंग उपस्थित झाला असतांहि त्या हर्षाचें चिन्ह त्यांच्या मुखमंडला-वर दृग्गोचर होत नसे.

तात्यासाहेबांच्या मृत्यूनंतर रावसाहेबांच्या घरांत वडील असें माणूस म्हणजे केवळ त्यांच्या आत्याबाईच राहिल्या होत्या. घरसंसारांत कर्त्या अशा त्याच होत्या. त्यांनां प्रत्यक्ष सासूच्या ठिकाणीं समजून रमाबाई

त्यांनां मानसन्मान देत, त्यांच्यावर मायाममता करीत व त्यांची भक्तिभावानें सेवाचाकरी करीत. आपण कर्त्या इनामदाराची बायको, आणि आत्याबाई केवळ आपल्या आश्रयाला राहिलेल्या, असा भाव रमाबाईनीं कधीं चुकूनहि एक दिवससुद्धां प्रकट केला नाहीं.

ज्या दिवशीं रावसाहेब आणि मनोहरपंत या बंधुद्वयामध्यें पहिल्यानेंच जंगी खटका उडाला, त्या दिवशीं रावसाहेबांनीं खोलीचें दार उघडतांच रमाबाई त्वरेनें जवळच्या जिन्यानें खालीं उतरत असतांना रावसाहेबांबरोबर वाचकांनींहि पाहिलेंच आहे. त्या तशाच खालच्या एका खोलींत शिरल्या व जमिनीवर तेथलीच एक चिरगुटाची चौघडी टाकून त्यांनीं तीवर अंग टाकलें. रमाबाईच्या मनांत त्या वेळीं नानाविध परस्परविरोधी विचार–विकारांचें तुमुल युद्ध चाललें होतें. दारुण चिंतेमुळें त्यांच्या हृदयाचे तुकडेतुकडे उडत होते! आतां भाऊजी जें कांहीं बोलले त्याचा अर्थ तरी काय? आपल्या पतिराजांनींहि भाऊजींवर जो आरोप घातला, त्याचा तरी अर्थ काय? भाऊजी तर स्पष्ट असें कांहींच बोलले नाहींत. 'तुम्ही जर कुमार्गापासून परावृत्त होणार नाहीं—'असें ते म्हणाले, नव्हे? कोणता कुमार्ग? 'वाईट संगति तुम्ही सोडणार नाहीं—' असेंहि ते म्हणाले. कोणाची संगति? वाईट कोण? कोणा वाईट मनुष्याची तर आपल्या पतीला संगत नाहीं ना लागली? असा हा मित्र तरी कोण? रमाबाईनीं यासंबंधानें करकर खूप विचार करून पाहिला, परंतु त्यांनां निश्चयात्मक असें कांहींच ठरवितां येईना. गांवांत आपल्या पतीचे मित्र असे दोघेच–एक विनायकराव दीक्षित आणि दुसरे श्रीधरपंत परचुरे. ही जोडी येऊन आपल्या पतीबरोबर तासच्यातास पत्ते, गंजिफा, सोंगट्या वगैरे खेळत बसते, हें खरें; परंतु त्यांच्यासंबंधानें विशेष असें आपल्या ऐकण्यांत कांहींच आलें नाहीं. आपल्या पतीचे यांशिवाय आणखी एक जीवश्चकंठश्च मित्र आहेत, ते ठाणवाडीचे इनामदार माधवराव. गेल्या वर्षी दिवाळींत ते आपल्याकडे पाहुणे म्हणून आले, असून आपल्या मोतीबागेंत ते तीनचार दिवस राहिले होते खरे.

त्या तीनचार दिवसांत आपले पतीराजहि घरीं फिरकले देखील नव्हते. एके दिवशीं दारू पिऊन तर्र झाल्यामुळें माधवराव जिन्यावरून उतरत असतां दहाबारा पायऱ्यांवरून गडगडले व त्यांच्या मस्तकाला खोल जखम झाल्यामुळें मुद्दाम डॉक्टरहि आणावा लागला होता, अशी एक उडती बातमी त्या वेळीं बनगांवांत पसरली होती. परंतु आपल्या या स्नेह्याच्या संगतीनें आपल्या पतीनें कांहीं दुष्कृत्य केल्याचें कोणीहि कधीं ऐकलें नाहीं. दिवाळीनंतर आणखीहि दोनतीन वेळ माधवराव मोतीबागेंत येऊन राहिले होते. परंतु त्यांच्या या भेटीमुळें आपल्या पतीला बरें तर वाटलें नाहींच, पण उलट वाईट मात्र वाटल्याचें दिसून आलें. मुंबईतील मोठमोठे श्रीमंत सावकार, आणि बडे लोक आसपासच्या गांवीं आपल्या बागांत जाऊन नानाप्रकारचे स्वेच्छाचार करीत असतात, असें रमाबाईच्या ऐकण्यांत आलें होतें. त्यांच्या एका बाळमैत्रिणीचा विवाह मुंबईच्या अशाच एका लक्ष्मीपुत्राशीं झाला होता. त्यांच्या या मैत्रिणीनें आपल्या पतीच्या दुर्वर्तनासंबंधानें अनेक हृदयद्रावक गोष्टी रमाबाईजवळ सांगून ती किती वेळ तरी धाय मोकलून रडली होती. तिचा पति नेहमीं आपल्या बागेंत किंवा अशाच कोठल्या तरी ठिकाणीं रहात असे. महिन्यांतील--वर्षांतील रात्रीच्या रात्री त्या अभागिनीला पतीच्या दर्शनाशिवाय अश्रु ढाळीत कंठाव्या लागत. रावसाहेब आपल्या मोतीबागेंत मधुनमधून जात खरे—परंतु बहुधा ते तेथें रात्रीं कांहीं रहात नसत. वैशाख किंवा ज्येष्ठ महिन्यांत जेव्हां उकाडा अतिशयच होऊं लागे, तेव्हां सकाळींच उठून रावसाहेब मोतीबागेंत जात, तेथें नदीच्या गार पाण्याचें स्नान करून सर्व दिवसभर तेथें स्वस्थपणें विश्रांति घेऊन अधिक रात्र व्हावयाच्या पूर्वींच ते घरीं परत येत असत. —तर मग भाऊजींच्या त्या म्हणण्याचा अर्थ तरी काय ? आपल्या पतीनें दृष्टान्ताच्या मिषानें जेव्हां त्यांच्यावर एक तीव्र वाग्बाण सोडला, त्या वेळीं भाऊजींनींहि आपल्या पतीनें 'सर्वांनांच आपल्याप्रमाणें समजूं नका,' असा रागानें खडखडून स्पष्ट जबाब दिला, आणि याच त्यांच्या



शवरावांकडे पाहून नानासाहेबांनीं विचारलें "काय हो केशवरावजी!
खाराम कुडव हाच ना?"
(पृष्ठ ७८.)

ोळण्यापासून पुढें कुमार्ग व कुसंगति यांची उत्पत्ति झाली. तर मग ाय !-या सर्व प्रकरणाचा अर्थ तरी काय ?

बिचाऱ्या रमाबाईची आतां विचार करण्याची शक्तिच नाहींशी झाली यांचें मस्तक अगदीं सणसणूं लागलें. डोळे झांकून, बाहूची उशी करून ीवर डोकें टेंकून त्या किती वेळ तरी त्या स्थितींत पडून होत्या. त्यांचे मेटलेले डोळे किंचित्किंचित् फुगूं लागले. थोड्याच वेळांत पापण्यांच्या ंगुर बांधांचें उल्लंघन करून दोनचार अश्रुबिंदु सळकन् बाहेर आल्या- ांचून राहिले नाहींत.

परंतु आपण हें भलतेंच काय करीत आहों, भर दोनप्रहरीं आपण ोळ्यांतून हें अभद्र पाणी काय म्हणून काढीत आहों, यापासून आपल्या तीचें अमंगल नाहीं का व्हावयाचें ? असा विचार तत्क्षणीं रमाबाईंच्या नांत आला. त्याबरोबर त्या झटकन् उठून बसल्या. लुगड्याच्या दरानें डोळे पुसून जवळच्या उघड्या खिडकींतून त्या बाहेर पहात ाहिल्या. मध्यान्हींच्या सूर्याचे किरण बाहेर रखरख करीत होते. मधुन- धून करुणस्वरानें एकाददुसरा पक्षी ओरडत होता. जवळचें निंबाचें ाड वायूच्या लहरींबरोबर इकडूनतिकडे डुलत होतें. निंबाच्या ुलाच्या मृदु कोमल सुवासानें रमाबाईंच्या मनाला किंचित् शांति ाढून त्याला थोडासा जोर आला. बसल्याबसल्या रमाबाईंचे विचार नरपि सुरू झाले—छे, आपणाला पतीविषयीं जो संदेह आला आहे, ा खोटा-अगदीं खोटा ! तसें होणें अगदीं अशक्य आहे. भाऊ- ींनीं दुसऱ्या कोणत्या तरी भलत्याच एकाद्या गोष्टीविषयीं तो उल्लेख ला असेल, हें खास. आणि याच गोष्टीविषयीं जर भाऊजी बोलले सतील, तर त्यांची ती समजूत अगदीं निखालस चुकीची आहे. कसल्या ी खोट्या दुष्ट बातमीवर विश्वास ठेवून भाऊजी तसें बोलले असतील—

रमाबाईंनां आपल्या पतीच्या चारित्र्याची-स्वभावाची चांगलीच ोळख होती. आज वीस वर्षें त्या त्यांनां सूक्ष्म दृष्टीनें पहात आल्या

होत्या. पण कधीं एक दिवसहि त्यांनां आपल्या पतीविषयीं कसल्याहि गोष्टीचा तिळभरहि संदेह आला नाहीं, आणि आजच काय ही नवीनच गोष्ट? छे:! अगदीं असंभवनीय, अगदीं अशक्य!

रमाबाई जरी याप्रमाणें आपल्या हृदयाला समजावूं पहात होत्या, तरी त्याला ही कृत्रिम समजावणी बिलकूल रुचली नाहीं! क्षणार्धांत पुनः पारडें उलटें फिरलें. रमाबाईनां फिरून वाटूं लागलें, जर या बातमीच्या मुळाशीं कांहीं आधार नाहीं, तर जेव्हां भाऊजींनीं आपल्या पतीच्या तोंडावर तो आरोप केला, तेव्हां त्यांनां कांहीं त्या आरोपाचें निराकरण करण्याचें तिळमात्र धैर्य झालें नाहीं! इतर एकाद्या प्रसंगीं ज्याप्रमाणें ते क्रुद्ध सर्पाप्रमाणें फुस करून फणा उभारून उठले असते, त्याप्रमाणें त्या प्रसंगीं त्यांनीं कां केलें नाहीं? त्यांनीं त्या प्रसंगीं जें उत्तर दिलें, ज्या रीतीनें त्यांनीं तें उत्तर दिलें, त्यावरून आपलें दुष्कृत्य प्रगट झाल्यामुळें लज्जेनें व भयानें त्यांच्या मनाला अतोनात संकोच वाटत असावा, असें स्पष्ट दिसत होतें. तर मग काय ती गोष्ट सत्य?

याप्रमाणें रमाबाईंच्या मनांत विचारलहरींनीं कल्लोल चालविला असतां त्यांच्या डोळ्यांच्या पापण्या पुनरपि अश्रुधारांनीं भिजून गेल्या. त्या मनांतल्या मनांत परमेश्वराची प्रार्थना करूं लागल्या "देवा, माझ्या पतीवर आलेला हा दोष जर खराखुरा असेल, तर त्यांच्यावर तूं कृपादृष्टि ठेव. त्यांनां तूं सुबुद्धि दे—त्यांनां सन्मार्गावर आण. त्यांचा हा निर्लज्जपणाचा दोष जनलोकांत प्रकट होऊं देऊं नकोस. हा घाणेरडा कलंक त्यांच्या जीवनावरून धुऊन जाईल, असें कर. माझ्या पतीचें रक्षण कर—दयाघना!—त्यांचें रक्षण कर."

इतक्यांत पायांतील वाळे व घुंगुर यांचा सुमधुर रुणझुण रुणझुण शब्द करीत रमाबाईंची कन्या गोदावरी आईचा शोध घेत तेथें आली. मातेची जरा चमत्कारिक अशी ती स्थिति पाहून ती एकदम म्हणाली "आई, हें ग काय हें असें? तुला कांहीं होतें का आहे?"

बळेंच हंसून रमाबाई म्हणाल्या "छे ग बाळ! व्हायचें आहे काय मला!"

"तर मग तुझं तोंड हें असं ग काय चमत्कारिकच दिसतं आहे ? अन् तुझ्या डोळ्यांतून हें असं पाणी कां येतं आहे–अन् तुझं नाक असं गलबुंद कां होऊन गेलं आहे ? अन् इथं कां अशी बसली आहेस तूं ?"

बोलतांबोलतां गोदावरी आपल्या आईच्या पायांशीं बसली व शंकित दशा करुणेच्या दृष्टीनें तिच्या चेहऱ्याकडे टकमक पहातच राहिली.

प्रेमभरानें मुलीच्या खांद्यावर हात ठेवून रमाबाई किंचित् स्मित-पूर्वक ह्मणाल्या "आज कीं नाहीं बाळ, माझ्या मनाला तितकं बरं नाहीं वाटत आहे, ह्मणून इथं बसलें आहें उगीच. पण हें ग काय पोरी ? अजून अंग नाहीं का धुतलंस ? दिवस बघ बरं किती आला तो !"

आईची ती स्थिति पाहून गोदावरीला वाटलें, कीं, आज सकाळीं काकांनीं जो कांहीं विलक्षण प्रकार केला, त्यामुळें घरांतल्या सर्व माणसां-बरोबर आपल्या आईचेंहि मन बरेंच दुखविलें असावें. ती खिन्न स्वरानें ह्मणाली "मी नाहीं आई आज अंग धूत ! नुसतें आतां हातपायतोंड धुवीन ह्मणजे झालं–पण तूं आतां नको उशीर करूं आई ! उठ–झटकन् अंग धुऊन." असें ह्मणून गोदावरीनें मातेचा हात आपल्या चिमुकल्या हातांत घेतला, व ती तिला वर उठवूं लागली.

इतक्यांत आत्याबाईहि तेथें येऊन पोहोंचल्या. रमाबाईनां अद्यापि तेथेंच बसलेल्या पाहून त्या प्रेमार्द्रस्वरानें म्हणाल्या "हें ग काय सुनबाई? अजून इथंच का बसून राहिली आहेस ? दोन प्रहर व्हायला आलेना ! अजून तुझं अंग धुणंहि व्हायचं आहे वाटतं ? आज घरांत सैंपाक होऊन हातोंडाची गांठ कधीं पडणार, याचा कांहीं थांगपत्ता नाहीं लागत बाई ! झटकन् आंघोळ करून घेऊन थोडं दूध नाहीं तर चहा घे आधीं, का !"

इतक्यांत रमाबाईचा मुलगा मधुसूदनहि धांवतधांवत तेथें आला त्यानें आईच्या मांडीवर लोळणच घेतली. प्रेमभरानें मातेच्या गळ्यांत हात घालून तो लडिवाळपणें म्हणाला " आई, माझ्या वाघ्याला एक भाकरीचा वडी दे ना ग ! त्या त्याला भारीच आवडतात आई ! "

अप्रत्यस्नेहामुळें रमाबाई क्षणभर आपल्या क्षतविक्षत हृदयाच्या यातना विसरल्या. त्यांचें मन किंचित् शांत झालें. सर्वांच्या अत्याग्रहामुळें त्या उठल्या, आणि दोन तांबे पाणी अंगावर घेऊन त्यांनीं कांहीं वेळानें कसेबसे अन्नाचे दोन घांसहि खाल्ले.

काय असेल तें असो, आज रावसाहेब भोजनालासुद्धां आंत आले नाहींत. त्यांच्या हुकुमावरून आचाऱ्यानें त्यांनां थोडें फराळाचें आणि चहा बाहेरच दिवाणखान्यांत नेऊन दिला. त्या साऱ्या दिवसांत त्यांनीं आंत ह्मणून पाऊल घातलें नाहीं.

संध्याकाळ झाल्यानंतर रावसाहेब आपल्या खोलींत आले व बाहेर जाण्यासाठीं पोषाख चढवूं लागले. इतक्यांत रमाबाईहि तेथें येऊन पोहों-चल्या. क्षणभर थांबून त्यांनीं विचारलें "कुठं बाहेर निघायचं वाटतं ?"

खिन्नस्वरानें रावसाहेबांनीं उत्तर दिलें "होय, मोतीबागेकडे जातों आहें."

"मोतीबागेंत? अन् या भलत्याच वेळीं?" रमाबाईनीं आश्चर्यानें विचारलें.

"मनाला बरें वाटत नाहीं, त्याप्रमाणें शरीरालाहि बरें वाटत नाहीं, ह्मणून मोतीबागेंत जाऊन दोन दिवस रहावें, असा बेत केला आहे."

कांहीं वेळ रमाबाई कसला तरी विचार करीत स्तब्ध होत्या. नंतर राव-साहेबांकडे पाहून त्या ह्मणाल्या "तर मग मलाहि न्यावं तिकडे बरोबर!"

पत्नीच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच रावसाहेब किंचित् चमकल्यासारखे झाले. नंतर आश्चर्याच्या स्वरानें ह्मणाले "काय–तूं मोतीबागेंत येणार? ही काय तुला आज विलक्षणच हौस आली आहे! तिकडे येऊन तूं काय करणार आहेस?"

पतीकडे पाहून रमाबाई ह्मणाल्या "दुसरं काय करणार? आपलं मन बरं नाहीं, शरीरहि बरं नाहीं, असं ह्मणायचं–ह्मणून मी येतें बरोबर. इकडची सेवाचाकरी तरी करीन बरोबर राहून."

रमाबाईंचा हा आग्रह पाहून रावसाहेब संकटांत पडल्यासारखे दिसले. ांहीं वेळ ते अगदीं स्तब्ध होते. नंतर ह्मणाले " छट्-तुझा आपला लताच कांहीं तरी आग्रह! सभ्य गृहस्थांच्या बायका अशा ख्याली-शालीच्या ठिकाणीं जातात तरी का कधीं? तूं हिंदुस्त्री ना? तूं का मेम-ाहेब बनून माझ्या हातांत हात घालून येणार तिकडे?"

किंचित् स्मितपूर्वक रमाबाई ह्मणाल्या " कां बरं? हिंदु स्त्रियांनीं किंवा भ्य गृहस्थांच्या बायकांनीं तिकडे न जाण्यासारखं काय आहे? पतीबरोबर नीनं कुठंहि गेलं ह्मणून काय हरकत आहे?"

तीव्र, शोधक दृष्टीनें रावसाहेब किती वेळ तरी आपल्या पत्नीच्या मुखा-डे पहात होते. तिनें आजच असा बिलक्षण आग्रह कां धरावा, याच्या ळाशीं असावें तरी काय, याबद्दल त्यांनां कल्पना होईना. नंतर कांहींशा स्वरानें ते ह्मणाले " नाहीं—तुला नाहीं मी नेत तिकडे!"

परंतु आज रमाबाईंच्या अंगांत कसला संचार झाला होता, कोण जाणे! हीं केल्या त्या आपला आग्रह सोडीनात. आपण मोतीबागेंत येणार, ा त्या निश्चयाचा हट्ट धरून बसल्या. शेवटीं अगदीं नाइलाज होऊन साहेबांनीं '**शेषं कोपेन पूरयेत्**' या पुरुषोचित मार्गाचा अवलंब न क्रोधानें आरडाओरड करावयाला सुरुवात केली. " बस्स—माझा म आहे—तुला इथेंच राहिलें पाहिजे!" अशी निर्वाणीची आज्ञा करून ाहेबांची स्वारी मार्गेहि न पहातां झटकन् तेथून बाहेर पडली.

ावसाहेब निघून गेल्यावर रमाबाई त्या खोलींत किती वेळ तरी एक-ं मुकाट्यानें अश्रु ढाळीत बसल्या होत्या. नंतर त्या उठल्या व डोळे ा, तोंड वगैरे धुऊन तेथून हळुहळू मनोहरपंतांच्या खोलीकडे निघाल्या. ली संध्या, जपजाप्य वगैरे आटोपून, दिवा वगैरे नीटनेटका करून जी वेदान्ताध्ययनाच्या आपल्या नित्यक्रमाला लागण्याच्या विचारांत ते, असें रमाबाईंच्या दृष्टीला पडलें.

ानोहरपंतांसमोर जाऊन जरा संकुचित भावानें रमाबाईंनीं त्यांनां रलें " भाऊजी, जरा बसूं का मी इथं?"

किंचित् आश्चर्याच्या स्वरानें मनोहरपंत ह्मणाले "कोण वहिनी ? बसते आहेस ? ये ये–बस इथें." असें ह्मणून आपल्या आसनापासून जवळच एक आसन पसरून ते ह्मणाले "बस या आसनावर."

भाऊजींनीं दिलेल्या आसनावर वहिनी बसल्या. कांहीं वेळ त्या आपल्याशींच विचार करीत होत्या. नंतर त्यांनीं खिन्नपणें विचारलें "भाऊजी! आज तिकडचं अन् तुमचं कशाबद्दल बोलणं चाललं होतं?"

"केव्हां वहिनी?"

"आज सकाळीं मुंबईची ती मंडळी इथून निघून गेल्यावर तुमच्या वरच्या खोलींत दार बंद करून तुमचं दोघांचं कशाबद्दल बोलणं चाललं होतं?"

भ्रुकुटी आकुंचित करून मनोहरपंत कांहीं वेळ विमनस्कतेनें दुसरीकडेच पहात होते. त्यांचा चेहरा या वेळीं अतिशय गंभीर झाला होता.

"भाऊजी, गप्प कां–सांगा ना?"

"मी लग्न करीत नाहीं, ह्मणून अप्पा माझ्यावर रागावले होते."

"अस्सं! आणखी कसल्या निघाल्या होत्या गोष्टी?"

"लग्नावरून दुसऱ्याहि कांहीं गोष्टी निघाल्या होत्या; पण वहिनी, तूं हें मला कां विचारते आहेस?"

"उगीच आपलं." असें म्हणून रमाबाई कांहीं वेळ स्तब्ध बसल्या. त्यांच्या मनांत कसली तरी भवति न भवति चालली होती, असें दिसलें. कांहीं वेळानें त्यांनीं विचारलें "भाऊजी, एक गोष्ट विचारूं तुह्माला? नीट उत्तर द्याल मला?" बोलतांबोलतां रमाबाईचा गळा अगदीं दाटून आला–डोळ्यांत अश्रुबिंदु उभे राहिले.

मनोहरपंतांनां हा प्रकार कांहींच कळेना! अगदीं गोंधळून जाऊन त्यांनीं विचारलें "काय विचारणार आहेस वहिनी?"

"आज तुम्हीं जें तिकडे उद्देशून म्हटलं, कीं 'मला सगळं ठाऊक आहे! आपण होऊन जर तुम्हीं कुमार्गाचा त्याग करणार नाहीं, कुसंगति सोडणार नाहीं—' याचा—"

वहिनींच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच मनोहरपंत आश्चर्यानें थक्कच होऊन गेले. आश्चर्याच्या भरांत ते किंचित् पुढें सरकले व मध्येंच म्हणाले "वहिनी, या साऱ्या गोष्टी तुला सांगितल्या तरी कुणीं ?"

"कुणीं नाहीं सांगितल्या; मीं स्वतःच त्या ऐकल्या साऱ्या."

"कशा ऐकल्यास ?"

"जेव्हां तुमचं दोघांचं मोठमोठ्यानं बोलणं सुरू झालं, त्या वेळीं बाहेर दाराच्या आड मी उभी होतें—"

भृकुटिभंग करून मनोहरपंत मध्येंच म्हणाले "वहिनी—"

रमाबाई किंचित् काकुळतीच्या स्वरानें म्हणाल्या "नका, नका भाऊजी, असे डोळे लाल करूं नका, मजवर रागावूं नका अन् मोठं लांबलचक व्याख्यानहि सुरू करूं नका ! तुम्ही व्याख्यान काय सुरू करणार, हें मला ठाऊक आहे. तुम्ही सांगणार 'असं आड लपून राहून दुसऱ्यांच्या गोष्टी ऐकणं हें मोठं पाप आहे—देवाच्या दृष्टीनं अन् नीतीच्या दृष्टीनं हा मोठा अन्याय केल्यासारखं होतं,' अशासारखं तुम्ही भलं खासं पुराण सुरू कराल, हें मला ठाऊक आहे; पण भाऊजी ! किती झालं तरी मी एक सामान्य बायको आहें. तुमच्याइतकं लिहिणंवाचणं माझं झालेलं नाहीं. अज्ञानाच्या चिखलांत लोळणाऱ्या माझ्यासारख्या बायकोची तुम्ही कीव केली पाहिजे. तुमच्यासारखं धर्माचं अन् पोथ्यापुस्तकांचं मनन मी केलेलं नाहीं—मग तुमच्यासारख्या ज्ञानी पुरुषांच्या मनासारखं माझं मन गंभीर कसं असेल, याचा भाऊजी ! तुम्हीच विचार करा. तुम्ही दिवाणखान्यांतून येऊन घाईघाईनं वर गेलांत, अन् कांहीं वेळानं तिकडची स्वारी रागानं अगदीं बेफाम होऊन तुमचा शोध करीत वरती गेली, तोंपर्यंत बाहेर कायकाय झालं, त्याची कथावार्ताहि आम्हांला नव्हती—मुंबईहून आलेल्या मंडळींशीं तुम्ही काय बोललांत, त्यांनां तुम्ही पसंत केलांत कीं नाहीं, एकंदरींत झालं काय, हें आम्हांला कांहींच कळेना. तें कळण्याविषयीं माझ्या मनाला भारीच रुखरुख लागून राहिली, अन् त्या भरांत मी वर येऊन तुमच्या खोलीबाहेर राहून आंत चाललेल्या

गोष्टी लपून ऐकूं लागलें. भाऊजी ! तुम्ही जें म्हणतां, कीं, कधीं कुणाच्या गोष्टी चोरून ऐकूं नयेत, तसं ऐकणं हें मोठं पाप आहे, तें अगदीं खरं आहे ! मीं केलेल्या या पापाचं प्रायश्चित्त मला तत्क्षणीं भोगावं लागलं ! भाऊजी, मीं ती गोष्ट अर्धवट ऐकल्यापासून माझ्या मनाला एक क्षणभरहि शांति नाहीं–माझ्या छातींत जळजळीत निखाऱ्यांची रास पेटत असल्याप्रमाणं वाटून माझ्या मनाची अन् शरीराची अगदीं आगीआग होऊन गेली आहे ! भाऊजी, तुम्हाला आईप्रमाणं असणाऱ्या, तुम्हाला नेहमीं प्रिय वाटणाऱ्या तुमच्या या गरीब वहिनीची जर तुम्हाला कांहीं दया येत असेल, तर ती गोष्ट मला तुम्ही सांगाच–भाऊजी ! दया करा–दया करा—" बोलतांबोलतां रमाबाईचा गळा अगदीं भरून येऊन त्यांचा शब्द रुद्ध झाला. डोळ्यांतून अश्रुधारा सुरू झाल्या.

मनोहरपंत पहिल्यानें वहिनीच्या चेहऱ्याकडे लक्ष्यपूर्वक पहात होते. परंतु पुढें तेथून आपली दृष्टि काढून ती त्यांनीं खालीं जमिनीकडे लाविली. रमाबाईच्या भाषणाचा त्यांच्या मनावर काय परिणाम झाला, हें सांगणें अशक्य आहे. ते कसल्या तरी गूढ विचारांत निमग्न होऊन गेले होते, एवढें मात्र खरें.

रमाबाईनीं एक मिनिटभर वाट पाहिली; परंतु भाऊजींकडून कांहींच उत्तर येत नाहीं, असें पाहून त्या म्हणाल्या "भाऊजी, गप्प कां बरं बसलांत असे ? सांगा ना काय तें !"

तरीहि मनोहरपंतांनीं वर मान केली नाहीं. ते अगदीं स्तब्ध होते.

रमाबाई करुणावाणीनें पुढें म्हणाल्या "भाऊजी, नाहीं ना तुम्हाला माझी दया येत ? इतके कसे हो तुम्ही निष्ठुर झालांत भाऊजी ?" असें म्हणून रमाबाईनीं डोळ्यांना पदर लावला.

वहिनींच्या या कातर शब्दांनीं मनोहरपंतांचें हृदय कळवळून त्याचें करुण प्रतिबिंब त्यांच्या चेहऱ्यावरहि उमटल्याशिवाय राहिलें नाहीं परंतु या प्रसंगीं हृदयाला निर्बलता येऊं देतां उपयोगीं नाहीं, असा

विचार करून त जरा कठिण स्वरानें ह्मणाले "वहिनी! त्यासंबंधानें तुला कांहींहि सांगणें मला इष्ट वाटत नाहीं."

मनोहरपंतांकडून असें दृढतेचें कांहीं तरी उत्तर येईल, अशी रमाबाईंना साधारणपणें कल्पना होतीच; परंतु या प्रसंगीं आपणहि इतक्यांत माघार घेऊन उपयोग नाहीं, भाऊजींकडून ती गोष्ट काढण्याचा प्रयत्न केलाच पाहिजे, असा विचार करून त्या ह्मणाल्या "भाऊजी, तुह्मी मला ती गोष्ट न सांगण्यांत चुकतां आहांत, असं नाहीं का तुह्माला वाटत?"

"ह्मणजे?" मनोहरपंतांनीं आश्चर्यव्यंजक स्वरानें विचारलें.

"तुह्मीं सकाळीं तिकडे सांगितलं, कीं, मोठा भाऊ जर कुमार्गानं जाऊं लागला, तर त्यापासून त्याला निवृत्त करून सन्मार्गावर आणायचा अधिकार त्याच्या धाकट्या भावाला आहे. धाकट्या भावाला जर असा अधिकार आहे, तर पतीला असन्मार्गापासून निवृत्त करून ज्या योगानं त्याचं मंगल होईल, असं करायचा अधिकार त्याच्या पत्नीला मात्र नसावा, हें सुसंगत आहे का भाऊजी? ती गोष्ट मला न सांगून तुह्मी तिकडचा, माझा अन् खुद्द आपलाहि घात करून घेत आहां. भाऊजी, सांगा काय झालं आहे तें. ती गोष्ट मला कळतांच तिचा प्रतिकार करून तिकडची स्वारी सुमार्गावर येईल, असा मी प्रयत्न करीन—मग त्या प्रयत्नांत माझे प्राण गेले, तरी मी मागं घेणार नाहीं. भाऊजी, माझ्यापासून ती गोष्ट लपवून ठेवूं नका—त्यापासून मोठा घात होईल. इतर बायकांप्रमाणं केवळ कुतूहलानं, जिज्ञासेनं किंवा मौजेनं ही गोष्ट मी तुह्माला विचारीत नाहीं." बोलतांबोलतां रमाबाईंच्या डोळ्यांतून झरझरां अश्रुप्रवाह सुरू झाला.

बिचाऱ्या मनोहरपंतांची स्थिति मात्र अगदीं चमत्कारिक झाली. घडलेली गोष्ट कळून घ्यावयाच्या अधिकाराविषयीं वहिनीनें जीं प्रमाणें दाखविलीं, तीं तर बहुतेक बिनतोड आहेत, असें त्यांना वाटूं लागलें. या प्रसंगीं काय करावें, हें त्यांना सुचेना.

परंतु पतीच्या अधःपतनाची गोष्ट त्याच्या धर्मपत्नीजवळ कशी प्रगट करावी, हा एक अत्यंत महत्त्वाचा प्रश्न मनोहरपंतांच्या समोर अगदी पहिल्यापासून उभा होता. त्या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर त्यांना देतां येईना. कांहीं वेळ विचार करून शेवटीं ते हळुहळू ह्मणाले "वहिनी, या साऱ्या हिडिस प्रकरणांत उगीचच्याउगीच मला तूं कशाला गोंवतेस? तुला जें कांहीं विचारायचेंसवरायचें असेल, तें तूं प्रत्यक्ष अप्पांनांच कां नाहीं विचारीत? कुठें आहेत अप्पा या वेळीं?"

क्षणभर विचार करून रमाबाई ह्मणाल्या "आतांच मोतीबागेकडे निघून जायचं—"

वहिनींच्या या शब्दांनीं मनोहरपंत एकदम चमकून उसळले! "काय? मोतीबागेकडे?"

एवढेच उद्गार त्यांच्या तोंडांतून निघाले. रागानें त्यांच्या मनाचा अगदीं भडका भडका होऊन गेला. काय? आज सकाळींच जी गोष्ट घडून आली, तिच्यानंतर चार प्रहरहि पुरे गेले नाहींत, तोंच अप्पांची स्वारी निर्लज्जपणें मोतीबागेकडे निघून गेली अं!—पुरा एक दिवसहि कांहीं त्यांच्यानें वाट पहावली नाहीं! आतांच्या आतां वहिनींनां बरोबर घेऊन वज्राप्रमाणें मोतीबागेवर जाऊन पडावें, ह्मणजेच अप्पांच्या अपराधाला योग्य शासन होईल, असा विचार एक क्षणभरच् कां होईना, त्यांच्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं.

"काय भाऊजी! एकदम असे चमकल्यासारखे कां झालांत? मोतीबागेंत कांहीं अनर्थ तर घडून येण्यासारखा नाहीं ना?"

"मला तें कांहीं विचारूं नकोस वहिनी!" असें ह्मणून मनोहरपंत झटकन् खोलीतून निघून बाहेर गेले.

क्षणभरानें रमाबाईनीं तेथेंच जमिनीवर अंग टाकून बाणांनीं क्षतविक्षत झालेल्या दीन हरिणीप्रमाणें त्या धाय मोकलून रडूं लागल्या.

## प्रकरण आठवें

# केशवरावांची धर्मबुद्धि.

रावसाहेबांनीं केशवरावांनां आपल्या आश्रयाला ठेवून तूर्त त्यांनां जमाखर्चाचीं, थोड्याबहुत वसूलबाकीचीं, अशीं किरकोळ कामेंच नेमून दिलीं; परंतु केशवरावजींचा स्वभाव केवळ आपलींच कामें करून स्वस्थ बसण्यासारखा नव्हता! दुसऱ्यांचीं कामें आपलींच समजून त्यांत ढवळाढवळ केल्याशिवाय ज्यांनां स्वस्थता वाटत नाहीं, अशा **'वसुधैव कुटुंबक'** वृत्तीचे ते महात्मे होते. अशा तऱ्हेच्या आपल्या वृत्त्यनुरूप टेहळणी करीत असतां त्यांनां थोडक्याच दिवसांत आढळून आलें, कीं, रावसाहेब आणि मनोहरपंत या उभयतां बंधूंमध्यें असावा तितका प्रेमाचा साफ व्यवहार नाहीं. रावसाहेबांची मनोवृत्ति कनिष्ठ बंधूसंबंधानें बिलकूल प्रसन्न नसते. त्यांच्यासमक्ष कोणीं कशासंबंधानेंहि मनोहरपंतांची स्तुति केली असतां त्यांच्या भुवया तत्क्षणीं वांकड्या होतात; पण कोणीं त्यांची यत्किंचित्‌हि निंदा केली, तर मात्र रावसाहेब खुष होतात. भावाभावांत अलीकडे बोलाचाली बहुतेक साफ बंद झाली आहे, ही काकदृष्टि केशवरावजींच्या लक्ष्यांत यावयाला फारसा वेळ लागला नाहीं. उद्योगी केशवरावांनीं लगेच यासंबंधानें शोध चालविला. तेव्हां त्यांनां कळून आलें, कीं, उभयतां बंधूंत पूर्वीं मनोमालिन्य बिलकूल नव्हतें उलट एकमेकांविषयीं त्यांनां प्रेमच वाटत होतें. मनोहरपंत विवाह करावयाला कबूल होत नाहींत; इतकेंच नाहीं, तर त्यांनां पहावयाला आलेल्या एका कन्यापक्षीय मंडळीचा एक प्रकारचा अपमान करून त्यांनीं त्यांनां हांकलूनच दिलें, ही गोष्ट ज्या दिवशीं केशवराव रावसाहेबांकडे आले, त्याच दिवशीं त्यांनीं ऐकली होती; परंतु केवळ एवढ्याच कारणानें इतके दिवसपर्यंत बंधुबंधूंत वैषम्य टिकून राहील, या गोष्टीवर त्यांचा कांहीं केल्या विश्वास बसेना. याच्यांत कांहींतरी गूढ रहस्य आहे, यांत बहुप्राय संशय नाहीं, असा त्यांनीं आपल्या मनाशीं ताबडतोब कयास

बांधली. त्याप्रमाणेंच दुसऱ्याहि एका गोष्टीचा केशवरावजींनां उलगडा होईना. मनोहरपंतांसारखा तारुण्याच्या ऐन उमेदींत आलेला, अनेक परीक्षा उत्तीर्ण झालेला, ज्याला खाण्यापिण्यासंबंधानें कसलीहि काळजी शिवणें शक्य नाहीं, असा वैभवशाली तरुण लग्न करावयाला कां तयार होत नाहीं? केशवरावांच्या अपवित्र, संकीर्ण अंतःकरणांत यासंबंधानें नानाविध शंकाकुशंका उपस्थित होऊं लागल्या.

हीं जीं इनामदारांचीं एकदोन कौटुंबिक रहस्यें आहेत, त्यांच्या अंतरंगांत पूर्णपणें शिरल्याशिवाय आपला हेतु कधींहि सिद्धीला जाणार नाहीं, ही गोष्ट धूर्त केशवरावजींच्या लक्ष्यांत कधींच येऊन चुकली होती. या अंतर्गूढांची पूर्णपणें माहिती करून घेतल्याखेरीज रावसाहेबांवर आपलें वजन पडणें शक्य नाहीं, त्याशिवाय त्यांच्यावर आत्मप्रभावाचा अंमल गाजवितां येणार नाहीं, हेंहि त्यांनां पूर्णपणें ठाऊक होतें. हळुहळू कालक्रमानें रावसाहेबांनां आपल्या अगदीं मुठींत आणून ठेवून त्यांचा सर्व विश्वास आपणावर ओढून घ्यावयाचा, व आपल्याशिवाय इनामतीचें एक पानहि हलूं नये—अशी व्यवस्था करून आपलें काम साधावयाचें--आपणाला सलत असलेला कांटा उपटून काढून जाळूनपोळून टाकावयाचा, असा केशवरावजींचा प्रथमपासूनच अगदीं अंतःकरणांतल्या अन्तःकरणाचा हेतु होता. तसा जर त्यांचा हेतु नसता, तर केवळ पंधरा रुपये महिना व दोन वेळचा मिळून दोन शेर शिधा एवढ्या वेतनावर त्यांच्यासारखा महत्त्वाकांक्षी मनुष्य बनगांवच्या इनामदारांकडे पडून रहाणें शक्य होतें काय?

तर मग आपला हेतु साध्य करून घेण्यासाठीं या रहस्यांतील अंतर्गत गोष्टींची आपणाला काय वाटेल तें करून पूर्णपणें माहिती करून घेतलीच पाहिजे, असा केशवरावजींनीं आपल्या मनाशीं निश्चय केला. पण आतां हा हेतु साधावयाला करावें काय? या रहस्यांतील गोष्टींचें पूर्ण ज्ञान व्हावयाला, व इनामदारांच्या कुटुंबांत नेहमीं काय चाललें आहे, याची खडानूखडा माहिती करून घ्यावयाला घरांतल्या एखाद्या कुणबिणीला

किंवा बाइमाणसाला आपल्या हस्तगत करून घेणें हाच सर्वोत्कृष्ट उपाय होय, असें केशवरावजींनीं पुष्कळ विचार करकरून ठरविलें, व त्याच दिशेनें ते प्रयत्न करूं लागले.

बनगांवच्या अगदीं मध्यभागींच इनामदारसाहेबांचा वाडा होता. बाहेरच्या मुख्य दिवाणखान्यासमोर रस्त्याच्या बाजूला एक मोठी पुष्करिणी होती. तिच्या चारहि बाजूंनां काळया दगडांनीं बांधलेले धुण्याचे घाट होते. या पुष्करिणीच्या पलीकडच्या बाजूला एक बरेंच मोठें असें देऊळ असून त्यांत लक्ष्मीनारायणांच्या सुंदर संगमरवरी मूर्ति होत्या. देवळाच्या डाव्या बाजूला दूरवर मोठें खुलें मैदान होतें, तेथें दररोज सकाळसंध्याकाळ गांवचा बाजार बसे. पुष्करिणीच्या तीरावर एक मातीच्या भिंतींचें लहानसें झोंपडें असून त्याच्या चारहि बाजूंनां बांबूंच्या कांटेयांनीं वगैरे तयार केलेलें कुंपण होतें. कुंपणावरून नाना जातींच्या वन्यलता दाटपणें पसरल्या होत्या. कुंपणांत मध्येंच एक कण्हेरीचें मोठें झाड असून त्याच्या असंख्य पिंवळया रंगाच्या फुलांनीं तो भाग मोठा मजेदार दिसत असे. या झोंपड्यांत पूर्वीं इनामदारांचें एक कूळ रहात असे—परंतु सध्यां तें बनगांवांतून पळून गेल्यामुळें नापत्ता झालें होतें. केशवराव कुळकर्णी रावसाहेबांच्या नोकरीला राहिल्यावर त्यांनां कोठें तरी कें टेंकावयाला जागा पाहिजेच होती. परंतु गांवांत दुसरीकडे कोठेंच त्यांची सोय न जमल्यामुळें रावसाहेबांनां सांगून त्यांनीं या झोंपडींत रहावयाची त्यांच्याकडून परवानगी मिळविली होती. इनामदारांच्या वाड्यांतील दासीकुणबिणी पुष्करिणीच्या तीरातीरानें केशवरावांच्या झोंपडीसमोरून कधींकधीं बाजाराला जात; त्यापैकीं उच्च दर्जाची बायकामंडळी बहुधा दररोज सायंकाळीं लक्ष्मीनारायणांच्या दर्शनाला जाऊन त्यांच्यापुढें मूठपसा तांदूळ ठेवून, काडवाती वगैरे लावून, भक्तिभावानें त्यांनां प्रदक्षिणा घालून परत जात. केशवरावजी आपल्या झोंपडीच्या दाराज्याशीं उभे राहून चिलिमींतील तमाखूची राखरांगोळी करीत स्त्रीमंडळाच्या हालचालींकडे बारीक नजरेनें पहात असत. बिचाऱ्या बायकांच्या मात्र हें ध्यानींमनींहि नसे.

गुप्तपणें शोध करतांकरतां आमच्या केशवरावजींनां कळून आलें, कीं, वाड्यांत नर्मदा नांवाची एक बाई खुद्द रमाबाईच्या व त्यांच्या मुलांच्या तैनातीला असून वाड्यांत तिच्याइतकीं वर्षे नोकरी कोणाचीहि झाली नाहीं. खुद्द इनामदारीणबाईच्या तैनातींत ती असल्यामुळें व बरींच वर्षे प्रामाणिकपणें तिनें नोकरीचे दिवस काढल्यामुळें वाड्यांत तिचें वजन चांगलेंच होतें. नर्मदा ही जातीनें यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण–आमचे केशवरावजीहि त्याच जातीचे. बालपणींच तिच्यावर वैधव्याचा घाला पडला होता. आंवळीपाडा नांवाच्या गांवीं तिचें सासर होतें; इतकीहि माहिती केशवरावांनीं मिळविली होती. आंवळीपाडा हा गांव बनगांवापासून फक्त तीन साडेतीन कोस अंतरावर होता. लहानपणीं वैधव्याचा घाला पडल्यानंतर थोड्याच अवकाशानें नर्मदा इनामदारांच्या वाड्यांत नोकरीला लागली. तिच्या माहेरचें माणूस कोणी नसून तिच्या सासरच्या मंडळीनेंहि कधीं आजवर तिची चुकूनहि विचारपूस केली नव्हती. केशवरावजींनीं खिडकीच्या दाराआड राहून या नर्मदेला पाहिलें. कोणाच्याहि तोंडावरून त्याची बहुधा बरोबर परीक्षा करण्यांत केशवरावजी अतिशय निष्णात होते. नर्मदेच्या चेहऱ्याचें निरीक्षण करतांच ही बाई अगदींच सरळ, भोळी–नव्हे, थोडीशी अर्धवटहि असावी, असें त्यांनीं तेव्हांच ताडलें. नर्मदा बालविधवा असतांहि अद्यापि तिच्या मस्तकावरून 'धर्मा'च्या संस्काराची तरवार फिरली नव्हती. (येथें एवढें सांगणें अवश्य आहे, कीं, तात्यासाहेबांचीं मतें बहुतेक जुन्या तऱ्हेचीं असतांहि केशवपनाविषयीं मात्र त्यांचें मत अत्यंत प्रतिकूल असे. म्हणूनच नर्मदेला त्यांच्या घरीं आश्रय मिळाला होता. )नर्मदा ही साधारणपणें चेहऱ्यानें बरी होती–त्यामुळें वाड्यांतील नोकरचाकर मंडळी तिला थट्टेनें 'रंभा' म्हणून हांक मारीत, आणि नर्मदाहि जरा नटण्यामुरडण्याची हौशी असल्यामुळें तिलाहि हें नांव म्हणजे अगदींच रुचत नसे, असें नाहीं. तिच्या सौंदर्यांत भर पडावी म्हणूनच कीं काय कोण जाणे, तिच्या कपाळावर एक लहानसें, पण कायमचें टेंगूळ होतें. तिचें वय सदतीसअडतीस

वर्षांचें होतें, पण दिसण्यांत ती यापेक्षां चारपांच वर्षांनीं कमीच दिसे. तिचा वर्ण कांहींसा काळसर, परंतु उज्ज्वल होता. डोळे पाणीदार होते, परंतु त्यांत भोळेपणाचें प्रतिबिंब स्पष्ट दिसत असे.

नर्मदेची ही हकीगत ऐकून आणि तिला प्रत्यक्ष पाहून आपणाला ही उत्तम शिकार लाधली आहे, असें केशवरावांनां वाटूं लागलें. एकवार जर ही शिकार आपल्या हातीं येईल, तर ती नेहमीं आपल्या मुठींत राहील, अशी तजवीज आपणाला हरयुक्तीनें करतां येईल, अशी त्यांची खात्री झाली. ही नर्मदा आपल्या हस्तगत कशी होते, याविषयीं केशवरावजी आतां उपायचिंतन करूं लागले.

हीच एक गोष्ट जेव्हां केशवरावांच्या मस्तकांत धरणें धरून बसली, तेव्हां एके दिवशीं रावसाहेबांजवळून कांहीं निमित्तानें सुटी घेऊन त्यांची स्वारी कोणालाहि नकळत आंवळीपाड्याला निघून गेली. तेथेंहि आपण कोण, हें गुप्त ठेवून नर्मदेच्या सासरची सर्व हकीगत—त्या कुटुंबांतील सर्व व्यक्तींचीं नांवें, त्यांच्या जन्ममृत्यूंचीं वर्षें व दुसरी जरूरीची सर्व हकीगत मिळवून केशवराव परत बनगांवला आले.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं दहा वाजावयाच्या सुमाराला केशवराव पुष्करिणींत स्नान करून वर येतात, तों वाड्यांतील एक कुणबीण बाजारांतून विकत घेतलेल्या कांहीं जिन्नसांची झोळी बगलेला मारून वाड्याकडे येत चालली आहे, असें त्यांच्या दृष्टीला पडलें. ती जवळ येतांच केशवरावांनीं तिला 'सहज' ह्मणून विचारलें "कोण ग. बाई तूं ? वाड्यांतली कुणबीण आहेस ?"

कचेरींतल्या या 'कारकून बामणबुवां'कडून आपणाला असा कांहीं प्रश्न येईल, अशी त्या कुणबिणीला कल्पना नसल्यामुळें जरा आश्चर्यचकित होऊन ती जागच्याजागीं थबकली व केशवरावांच्या चेहऱ्याकडे पाहात लावून ह्मणाली "व्हय—कां हो इचारतांसा ?"

"नाहीं, आपलें उगीच. तुझी जात कोणती बरें बाई ? तुझें नांव काय ?"

बामणबुवांची नम्र वृत्ति पाहून ती भोळी कुणबीण त्यांच्यावर बहाल खूष होऊन गेली व म्हणाली "मी जातीनं अस्सल मराठीन हांय! माजं नांव मैना."

"असें! तरीच इतकें पाणी चमकतें आहे! बरं, पण काय ग मैना, तुमच्या वाड्यांत देशस्थ ब्राह्मण जातीची एकादी बाई आहे का?"

मैना थोडा वेळ विचारांत पडली, व कांहीं वेळानें म्हणाली "कोन ब्रामन तें न्हाई मला दक्कल, पन वाड्यामंदी बामनाच्या तीन बया हैती नोकरीला. मला वाड्यांतली समदी म्हाईती हाय. तुमी मला इचारा, म्हंजी तुमची बया मी दावूनशानि देतें!"

ब्राह्मणवर्गाच्या पोटजातीविषयीं आपण या कुणबिणीला माहिती विचारली, ही आपली एका अर्थी चूकच झाली, असें आतां केशवरावांना वाटूं लागलें. आतां दुसऱ्या बाजूनेंच युक्तीनें हल्ला केला पाहिजे, असा विचार करून ते मृदु स्वरानें तिला म्हणाले "हा शेजारचा आंवळीपाडा गांव आहे का ठाऊक तुला? या आंवळीपाड्यांत माझी कांहीं आप्त मंडळी आहे. त्यांच्याच घराण्यांतली एक बाई इथल्या वाड्यांत नोकरीला आहे, असें माझ्या नुकतेंच ऐकण्यांत आलें. बिचारीचा अगदींच लहानपणीं नवरा वारला—संसाराचें अन् नवऱ्याचें वारें देखील नाहीं बिचारीला कधीं लागलें! अशी एकादी ब्राह्मणाची बाई आहे का वाड्यांत नोकरीला?"

क्षणभर विचार करून मैना आनंदानें चटकन् म्हणाली "हाय हो हाय—तुमी म्हंतासा तशी एक बामनीन हाय वाड्यामंदीं. नर्मदाबाईचं सासर हाय खरं आंवळीपाड्याला आन् तिचा दादलाबी लई न्हानपनीं म्येला हो खरं—नर्मदाबाईसंमंदीं का तुमी म्हनतासा?"

आनंदानें मान डोलवून केशवराव म्हणाले "हो ग हो! तिचें नांव नर्मदा खरेंच! आमच्या गांवाहून जेव्हां मी इकडे आलों कीं नाहीं, तेव्हां रस्त्यांत मी आंवळीपाड्याला दोन दिवस राहिलों होतों. त्या नर्मदाबाईच्या सासऱ्याचें नांव होतें दामोदरपंत गचांडे. आमच्या बाबांनीं या दामोदरपंतांकडून कांहीं रुपये घेतले होते कर्जाऊ, अन् आतां आमचे बाबाहि नाहींत,

अन् दामोदरपंत तर केव्हांच मरून गेले. बापाचें कर्ज न फेडतां त्याला नरकांत कुचंबत ठेवणें हें त्याच्या पोटीं आलेल्या मुलाला लाजिरवाणें आहे, असें वाटून तें कर्ज फेडून टाकावें, अशी मला रात्रंदिवस हुरहूर लागून राहिली होती. अन् या वेळीं माझ्या हातीं थोडी रोख रकमहि आली आहे, त्यामुळें तर ही रुखरुख भारीच वाढली आहे. पण नर्मदाबाईच्या चुलतदीराकडे मी यासाठीं गेलों, तेव्हां तो मला ह्मणाला 'हे तुमचे पैसे घेऊन आह्मी काय करूं? तुह्मी तर आतां बनगांवला जातांच आहां. तिथल्या इनामदारांच्या वाड्यांत आमच्या काकांची सून नर्मदाबाई नोकरीला आहे, तीच काकांची खरी वारस. तिलाच हे पैसे मिळणें रास्त आहे. तिकडे तिचा शोध करून तुह्मी हे तिला द्या, ह्मणजे झालें.' तुझ्या त्या नर्मदाबाईला सांग, एकाद दिवशीं इकडे येऊन आपले रुपये घेऊन जा ह्मणावें. करशील ना एवढें माझें काम मैना?"

"सांगन सांगन. आतांच्याआतां जाऊनशानी नर्मदाबाईस्नी तुमचा ह्यो निरोप मी सांगतें पघा."

यानंतर दोन दिवस गेले—तीन दिवस गेले—चार दिवस गेले! परंतु नर्मदाबाईचा कोठें पत्ता नाहीं! केशवरावजींना जरा चिंता वाटूं लागली. मैनेनें आपला निरोप तिला कळविला नाहीं, कीं, 'असेल कांहीं तरी हा चटोरपणा!' असें समजून ती आली नाहीं, हें त्यांना कळेना. होतां-होतां सबंध एक आठवडा लोटला, परंतु केशवरावजींकडून रुपये न्यावयाला नर्मदाबाईची स्वारी कांहीं आली नाहीं.

आणखीहि दोन दिवस गेले. आज कांहीं सणानिमित्त इनामदारसाहेबांची कचेरी बंद होती. आज केशवरावजींना सुटी असल्यामुळें कांहींच काम नव्हतें. इतके दिवस मध्यें लोटले, तरी नर्मदा आली नाहीं कशी, आपली ही गोळी अजिबात फुकट गेली कीं काय, आतां काय उपाय योजावा, याबद्दल विचार करीत केशवरावजींची स्वारी आपल्या झोंपडींतील सतरंजीवर पडून धूम्रपान करीत होती. पांचसाडेपांच वाजून गेले होते.

इतक्यांत बाहेरच्या दरवाज्यावर एक हलकीशी थाप पडली. केशवराव चमकून, उत्कंठेनें मान वर करून ऐकूं लागले. क्षणभरानें पुनः थाप पडली. उत्कंठित स्वरानें केशवरावांनीं विचारलें " कोण आहे ?"

"आहेत का घरांत केशवराव?"

" आहें–या आंत." असें यथासाध्य कोमल स्वरानें ह्मणून केशवरावांनीं झटकन् जाऊन दरवाजा उघडला, आणि वस्त्रानें झांकलेलें एक भांडें हातीं घेऊन एक स्त्री आंत येऊन त्यांच्यासमोर उभी राहिली.

आलेली स्त्री नर्मदा आहे, हें केशवरावांनीं तत्क्षणीं ओळखलें. माशानें आमिष गिळलें, अशी खात्री होऊन केशवरावजींचा आनंद गगनांत मावेना. परंतु चेहऱ्यावर त्यापैकीं कांहींहि भाव दिसूं न देतां अगदीं साधेपणाचा आव आणून त्यांनीं तिला विचारिलें "कोण तुह्मी ?"

" इनामदारांच्या वाड्यांतली मी एक बाई आहें. "

" इनामदारांच्या वाड्यांतल्या तुह्मी ? या-यॉ–बसा. माझ्याकडून तुमचें कांहीं काम आहे का होण्यासारखें ? "

परंतु नर्मदा बसली नाहीं. उभ्याउभ्याच ती ह्मणाली "आज मुंबई-हून कुणाकडूनशी बर्फीपेढे अन् फळफळावळीची एक भेट आली आहे अप्पासाहेबांनां. तेव्हां बाईसाहेबांनीं मला सांगितलं, ' तूं देवाला जाणार असलीस, तर कचेरींतल्या कारकुनांनां थोडथोडं देऊन ये यापैकीं.' ह्मटलं, आज आहे आयता सोमवार. जाऊन यावं देवाचं दर्शन घेऊन, अन् येतांना तुह्माला तुमची वांटणीहि पोंचती करावी. "

"एकूण मुंबईची भेट आणली आहे तुह्मीं ? ठेवा–ठेवा–भांडें नाहीं आहे माझ्याकडे, ठेवा तुह्मी तें; मीं करीन पोहोंचतें तें उद्यां. "

भांडें खालीं ठेवून नर्मदा जावयाच्या तयारीनें उभी राहिली. इतक्यांत कांहीं आठवण झाल्यासारखें करून केशवराव ह्मणाले "हो, बरी आठवण झाली. हो, तुमच्या वाड्यांत नर्मदा नांवाची कुणी बाई आहे का ? यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण जातीची ? "

"हो-आहे—!" असें ह्मणून नर्मदा केशवरावांना आत्मपरिचय करून देणार होती; परंतु कांहीं वेळ आपण कोण तें नाहीं कळविलें, तर काय मौज होते, तें तरी पाहूं या-हा प्रश्न करण्यांत या कारकूनसाहेबांचा उद्देश तरी काय, हें समजून घेऊं या, असा विचार करून ती ह्मणाली "आहे--कां हो!"

केशवराव अगदीं साळसूदपणें बोलूं लागले "वाड्यांत ही नर्मदा आहे कीं नाहीं, ती आमच्याच पोटजातीची--आमच्या आप्तमंडळींपैकींच. आंवळीपाड्याला ज्या घरीं या नर्मदेला दिली होती, ती मंडळी आमच्या आप्तवर्गांपैकींच. आमचे बाबा अन् या नर्मदेचे सासरे या दोघांमध्यें अगदीं गळ्यांत गळा घालण्यासारखी मैत्री ना! अगदीं हरिहरांच्या जोडीप्रमाणें या दोघां मित्रांची ही जोडी असे."

मुद्दाम खडा टाकून पहाण्याच्या उद्देशानें नर्मदेनें खोडसाळपणानें विचारलें "तुह्मी स्वतः कधीं नर्मदेला पाहिलं आहे का?"

नर्मदेचा हा खोंचीचा प्रश्न ऐकून केशवरावजी मनांतल्यामनांत हंसले व 'तुझ्यासारख्या भोळसट पोरीला का मी फसणार आहें?' असें आपणाशींच ह्मणून ते तिला ह्मणाले "वः-नर्मदेला मीं नाहीं पाहिलें ह्मणजे! पण पुष्कळ वर्षांपूर्वी मीं तिला पाहिलें होतें. त्या वेळीं त्या बिचारीचें लग्नहि झालें नव्हतें—नऊ कीं दहा वर्षांची असेल ती तेव्हां. अहाहा! काय सांगूं हो तुह्माला! नर्मदेचा चेहरा त्या वेळीं असा कांहीं गोड दिसत होता, कीं,—जणूं काय तळ्यांत फुललेलें एकादें सुंदर कमळच! पण पोरीचें कपाळ फुटकें!—तिच्या अदृष्टांत ब्रह्मदेवानें सुख ह्मणून कसें तें लिहिलें नाहीं. नर्मदेचें लग्न होऊन पुरीं दोन वर्षें कांहीं गेलीं नाहींत, तों तिचें कपाळ फुटलें—बिचारी विधवा झाली. अन् खरोखर सांगतों तुह्माला—मी देखील फुटक्या कपाळाचा--अगदीं हतभागी! पण करणार काय! ज्याच्या कपाळीं सटवीनें जें लिहून ठेवलें असतें, तें कांहीं झालें तरी घडून आल्याखेरीज थोडेंच रहाणार आहे! नाहीं तर बिचारी नर्मदा काय आज विधवा झाली असती--अन् मला तरी हे असले कष्ट अन् यातना कां भोगाव्या लागल्या असत्या!" असें ह्मणून केशवरावजींनीं

दुःखातिशयानें एक दीर्घ निःश्वास सोडला व चटकन् आपलें उपरणें डोळ्यांनां लावलें !

केशवरावजींच्या या भाषणापैकीं पहिलापहिला भाग नर्मदेला बराचसा समजला--परंतु स्वतःसंबंधीं उल्लेख असलेल्या उत्तरार्धाचें मर्म मात्र कांहीं केल्या तिच्या लक्ष्यांत येईना. तेव्हां तिनें ह्मटलें "मला कांहीं नीटसं नाहीं बाई कळलं तुमचं बोलणं ! नर्मदा अभागी हें एक ठीक आहे; पण तिच्याबरोबर आपणालाहि अभागी ठरवून तुह्मी दैवाला दोष देतां, याचा अर्थ काय बाई ?"

केशवरावांनीं उत्तरादाखल पुनः एक मोठा थोरला उसासा सोडला, व बराच वेळ ते अगदीं गप्प बसले. नंतर कांहीं वेळानें ते ह्मणाले "तें तुह्माला सांगून काय फायदा ? त्यापासून निष्पन्न काय व्हायचें आहे ? दुःख मात्र अधिक होणार मला ! जें कांहीं झालें, तें थोडेंच आतां परत येणार आहे !"

नर्मदेची जिज्ञासा आतां अधिकच प्रखर होऊन तिनें विचारलें "असं झालं तरी काय ?"

"पण मी ह्मणतों, तुह्माला तें ऐकून तरी करायचें आहे काय ? तुह्मी इथून जाऊन त्या नर्मदेपाशीं तें सांगणार–अन् त्यापासून त्या बिचारीलाहि दुःख होणार ! छे--नकोच पण तें !"

केशवरावांच्या या शब्दांचा नर्मदेवर बराच परिणाम झाला. तिची जिज्ञासा व कुतूहल यांची तार चांगलीच चढली. ती कांहींशीं गयावया करून ह्मणाली "नाहीं हो, मी नाहीं नर्मदेला यांतलं एक अक्षर दिखील सांगणार. खरंच—नाहीं सांगणार–माझ्यावर तुह्मी विश्वास ठेवा. तुमचीच शपथ एक अक्षरदिखील नाहीं सांगणार तिला. सांगा ना काय झालें तें ?" असें ह्मणून नर्मदा तेथेंच जमिनीवर बसली.

केशवरावजींनीं मानभावीपणानें पुनः एक दीर्घ निःश्वास टाकला, व ते बोलूं लागले "तुमची हीं नर्मदा आहे कीं नाहीं, हिच्याबरोबर माझेंच लग्न व्हायचें पहिल्यानें ठरलें होतें. सर्व बोलाचाली झाली, हुंडाकरणी

ठरली, फार काय, मुहूर्तनिश्चय देखील होऊन चुकला होता ह्मणाना! पण मध्येंच एक दुर्दैव झालें उपस्थित–"

"काय बाई तें?" नर्मदेनें कुतूहलानें मध्येंच विचारलें.

"मुलगी भारी सुंदर आहे, असें पाहून तो शिंचा दामोदरपंत आमच्या बाबांशीं रात्रंदिवस अगदीं धरणेंच धरून बसला! तो ह्मणाला 'भास्करपंत, या मुलीबरोबर माझ्या हणमंताचें लग्न होऊं द्या. मुलीच्या आईच्याहि मनांत मुलगी द्यायची आहे आमच्याकडे—पण तिच्या बापाचें वचन गेलें आहे तुह्माला. तुह्मी त्यांतून त्याला मुक्त केलेंत, तर मला मोठा लाभ होतो आहे. पहा, ही लक्ष्मीसारखी मुलगी आपली सून करून घेतली, तर या संबंधानें आमचें कोटकल्याण होईल, असें आपलें माझ्या मनानें घेतलें आहे. तुह्मी जर पांडुतात्यांनां वचनमुक्त करणार नाहीं, तर अशी नक्षत्रासारखी मुलगी फिरून कांहीं आमच्या नाहीं दृष्टीला पडायची! शिवाय, मुलीचें घरहि आमच्या गांवाशेजारींच. तुह्मी तर रहाणार तिकडे कोल्हापुराकडे. इतक्या दूरचा संबंध करून तुह्माला देखील कांहीं सुख व्हायचें नाहीं. तुमच्या तिकडे सुंदरसुंदर मुलींनां कांहीं तोटा नाहीं. त्यांपैकीं एकादी चांगलीशी मुलगी मिळून तुमचें कार्य सहज होऊन जाईल पहा–पण एकदां का ही सोन्यासारखी मुलगी आमच्या हातांतून गेली, कीं, आमच्या घराण्याची लक्ष्मीच गेल्यासारखें होणार आहे. मुलीच्या आईचाहि अतोनात आग्रह आहे मुलगी आमच्या हणमंताला द्यावी असा–ह्मणून तुह्माला आमचा इतका आग्रह!' आमचे बाबा होते माझ्यासारखेच थोडे भोळे अन् भिडस्त. त्यांच्यानें कांहीं त्या दामोदरपंताची भीड तोडवेना. शेवटीं झालें ते त्याच्या ह्मणण्याला कबूल! झालें, त्या हणमंतरावाशीं नर्मदेचें झालें लग्न अन् आह्मी राहिलों आ पसरून टकमकां वेड्यासारखे पहात! पुढें माझें दुसऱ्या एका ठिकाणीं जमून लग्न झालें. दीडदोन वर्षांनीं तो हणमंतराव विषमाचें निमित्त होऊन वारला, अन् बिचाऱ्या नर्मदेवर आकाशच कोसळलें; अन् माझीहि बायको कांहीं दिवसांनीं वारली. अहाहा!

ठरल्याप्रमाणें जर नर्मदेशीं माझें लग्न झालें असतें, तर काय बहार झाली असती ! ती बिचारी विधवा झाली नसती, अन् मलाहि विधुरावस्थेच्या अशा यातना भोगाव्या लागल्या नसत्या. तुह्मीच सांगा, मी ह्मणतों हें खरें आहे कीं नाहीं तें ? परंतु सटवीच्या लिपीपुढें कुणाचा इलाज ! हाय ! अदृष्ट–अदृष्ट !'' असें ह्मणून एक मोठा उसासा सोडून केशवरावांनीं आपल्या कपाळावर हात मारून घेतला.

केशवरावांचें हें दीर्घ वक्तृत्व ऐकत नर्मदा मुकाट्यानें बसली होती. केशवरावांनां पाहून, ते ह्मणजे कोणी मदनाचे पुतळे असावेत, असें कांहीं तिला वाटलें नाहीं–नव्हे, या मूर्तीची कुरूप माणसांतच जमा होण्यासारखी आहे, अशी तिची ठाम समजूत झाली. 'असें होतें, तर तसें झालें असतें,' या सदराखालीं येणाऱ्या या पतिराजांनां आपण मुकलों, याबद्दल नर्मदेला बिलकूल दुःख वाटलें नाहीं ! परंतु तें कांहीं असलें, तरी केशवरावांनीं ज्या कांहीं गोष्टी सांगितल्या, त्या ऐकावयाला तिला फार गोड लागल्या, यांत मात्र कांहीं संशय नाहीं. बोलतांबोलतां केशवरावांनीं तिच्या लहानपणच्या चेहऱ्याला तळ्यांत फुललेल्या सुंदर कमलाची उपमा दिली–होय–खरेंच आपला चेहरा तसा होता, असें नर्मदेलाहि वाटूं लागलें ! अशी चाटुस्तुति कोणच्या स्त्रीच्या कानांनां अमृताप्रमाणें वाटणार नाहीं ? आपला लाभ झाला नाहीं, ह्मणून दुःखानें निश्वास सोडणारा असा एक तरी प्राणी या जगांत आहे, मग त्याच्या मस्तकावर केंसांचा पूर्ण दुष्काळ पडला असला, किंवा त्याच्या मिशीचे व शेंडीच्या बटीचे केंस करडे झाले असले, तरी हरकत नाहीं ! या कल्पनेनें नर्मदेच्या मनाला समाधान वाटूं लागलें.

आतां आपला खरा परिचय केशवरावांनां करून द्यावा कीं नाहीं, याबद्दल नर्मदेला विचार पडला. आपण कोण, हें या वेळीं त्यांनां सांगावें तरी पंचाईत, न सांगावें तरी पंचाईत. न सांगावें, तर त्या पैशांची गोष्ट निघावी कशी ? सांगावें, तर या स्वारीनें नुकतीच ज्या प्रसंगाची स्मृति जागृत केली होती, त्यामुळें तसें करावयाला तिला लज्जा वाटूं लागली.

कांहींतरी बोललेंच पाहिजे, असा विचार करून नर्मदेनें विचारलें " तुमची बायको मरून किती दिवस झाले ? "

केशवरावांनीं तत्काळ उत्तर दिलें "किती तरी वर्षे झालीं असतील !"

" मुलंबाळं आहेत का कांहीं ?"

" छट्--औषधालासुद्धां नाहीं !"

" पुनः नाहीं वाटतं लग्न केलं ?"

" नाहीं. "

" कां ? "

केशवराव अवज्ञतेनें हंसून ह्मणाले "वा: ! या वयांत पुनः लग्न ! मोठी मजाच आहे ह्मणायची ! माझें वय काय असावें, असें वाटतें तुह्मांला ?"

" पन्नास जवळजवळ ? "

केशवराव हंसले, व ह्मणाले "छे छे--चवेचाळीसावें वर्ष मला हें आहे. अन् या वयांत दहाअकरा वर्षांच्या एकाद्या शेंबड्यालेंबड्या परकरवाल्या मुलीशीं लग्न करून मीं संकटांत पडूं वाटतें ? बरें, जाऊं द्या त्या साऱ्या गोष्टी. तुह्मांला मी एक काम सांगणार आहें--कराल का ?"

" काय तें ?"

" तुमच्या त्या नर्मदेला मी एकवार बोलावलें आहे ह्मणून सांगा--भारी जरूरीचें काम आहे ह्मणावें."

किंचित् हंसून नर्मदेनें विचारलें " अग बाई ! नर्मदेजवळ हो तुमचं कसलं काम आहे ?"

"तिला कांहीं पैसे द्यायचे आहेत मला."

"कशाबद्दल ?"

"तिचें कांहीं कर्ज मला आहे, तें फेडायचें आहे."

"अस्सं ! कितीसे पैसे मिळतील तिला ?"

"तें नर्मदा स्वतः इथें येऊन मला भेटली, ह्मणजे मग तिचें तिलाच सांगेन. मुद्दल अन् व्याज मिळून एकंदर किती रक्कम झाली आहे, तें मला एकवार हिशेब करून बघितलें पाहिजे."

नर्मदा आतां बरीच घोंटाळ्यांत पडली. कांहीं वेळ विचार करून ती ह्मणाली "नर्म-दा ती मी-च !"

तिचे हे शब्द ऐकतांच आपण जणूं काय आश्चर्यानें थक्कच होऊन गेलों, असा आविर्भाव दाखवून केशवराव ह्मणाले "काय ह्मणतेस ? तूंच नर्मदा ? मला नाहीं हें खरें वाटत ! पाहूं-पाहूं बरें तुझा चेहरा !" असें ह्मणून केशवराव तिच्यासमोर उभे राहून तिच्या चेहऱ्याकडे टक लावून पाहूं लागले. नर्मदा अर्थात्‌च चटकन्‌ मागें सरली !

नंतर एक उसासा सोडून केशवराव पुढें बोलूं लागले "हो-अगदीं तीच ! तोच चेहरा-तेच डोळे-तेंच नाक ! अगदीं संशयसुद्धां नको ! तुझें लग्न होतांना मीं तुला शेवटीं पाहिलें होतें, त्यानंतर आजपर्यंत कांहीं तुझेंमाझें दर्शन नाहीं. मग मी तुला ओळखणार तरी कशी ? तूंच सांग नर्मदे ! दैव-दैव माझें, दुसरें काय ?" असें ह्मणून केशवराव कपाळाला हात लावून निराशेनें खालीं पाहूं लागले.

केशवरावजींच्या या बेमालूम आविर्भावाला भोळी नर्मदा हां हां ह्मणतां फसली. निराशेचा एक उसासा टाकून तीहि क्षणभर स्तब्ध राहिली. शेवटीं ती ह्मणाली "बरं, त्या गोष्टी कशाला आतां ? तुह्मी जर मला पैसे देणार असाल, तर हिशेब करा बरं एकदां."

मान हलवून केशवराव ह्मणाले "हो, त्याला काय उशीर आहे ! करून टाकूं या हिशेब आतांच. तोंपर्यंत जरा बस तूं हां !" असें ह्मणून केशवराव खोलींत गेले व एक जीर्ण चोपडी हातीं घेऊन परत आले. चष्मा डोळ्यांना लावून, दरवाज्याच्या उंबरठ्यावर कांहीं वेळ उभे राहून त्यांनीं कांहीं पानें चाळलीं व शेवटीं एका पानावर थांबून कांहीं वेळ त्याचें निरीक्षण केल्यासारखें करून ते ह्मणाले "हें पहा, सांपडलें शोधतांशोधतां. तुझ्या सासऱ्याकडून कर्जाऊ घेतलेले चार रुपये हे इथें जमा केलेले आहेत. त्याला आज बरोबर वीस वर्षें झालीं. दरमहा दररुपयाला पाव पैसा व्याज असें धरलें—"

नर्मदा तत्क्षणीं मध्येंच ह्मणाली "पाव पैसा कां ह्मणून व्याज ? आह्मी तर इकडे दरमहा दर रुपयाला दोन पैसे व्याज घेतों. या दरानं आमचे वाटेल तितके रुपये व्याजीं लागताहेत–फार काय, नेणाराला भारीच गरज असली, तर तो चार पैशांच्या व्याजावर दिखील नेतो पैसे आमच्याकडून!"

केशवराव स्मितपूर्वक ह्मणाले " वहावा ! तूं तरी मला भली बायको दिसतेस ! तुझ्या सासऱ्यानें माझ्या बाबांनां हे रुपये उसने ह्मणून दिले होते, निदान व्याजाबिजासंबंधानें त्यांच्यांत बोलीभाषण कांहीं देखील झालें नव्हतें. फक्त मला कुणाच्या नरकांत रहायचें नाहीं, ह्मणूनच धर्मावर नजर ठेवून मी आपण होऊन रुपयाला पाव पैसा व्याज धरायला तयार झालों, दुसरें कांहीं नाहीं. अच्छा–तुला जर हें नाहीं कबूल, तर तुझेंमाझें आपलें राहूं दे. आपण दरासंबंधानें तोड करूं. रुपयाला अर्धा पैसाप्रमाणें मी व्याजाचा दर धरतों–मग तर नाहीं तुझी कांहीं हरकत ? त्या दरानें ह्मटलें ह्मणजे झाले दरमहा तुझे दोन पैसे–वर्षाला झाले सहा आणे. वीस वर्षांला झाले वीस सक विशासें आणे–सहा रुपये बारा आणे ! काय? झाले ना इतके ? त्यांत मिळवले मुद्दल रुपये चार–मिळून व्याज मुद्दल मिळून एकंदर झाले दहा रुपये बारा आणे. काय ? होय ना ? पण त्यांपैकीं वरचे बारा आण्यांचे पैसे मी आपला तुझ्याकडून सूट ह्मणून सांगूनसवरून मागून घेणार. ह्मणजे बरोबर दहा रुपये तुला माझ्याकडून रोख मिळतील. काय ह्मणणें आहे तुझें यावर ?"

कांहींशा खिन्न स्वरानें नर्मदा ह्मणाली " माझं काय ह्मणणं असणार आहे ? धर्माला स्मरून तुह्माला जें कांहीं मला द्यावंसं वाटेल, तें द्या–मी थोडीच तुमच्याशीं हुजत घालीत बसणार आहें !"

मान डोलवून केशवराव ह्मणाले " वाः ! फार चांगलें बोललीस तूं. तूंच सांग मला–धर्मबुद्धि जर माझ्या मनांत जागृत नसती, तर वीस वर्षांपूर्वी माझ्या बापानें तुझ्या सासऱ्याकडून उसनवार घेतलेल्या चार रुपड्या, मीं स्वतः होऊन तुझा शोध करून तुला बोलावून आणून वीस वर्षांचें व्याज आकारून तुला द्यायला मी तयार झालों असतों का ?

मीं तोंडाला खिळी घातली असती, तर यांपैकीं एक अक्षराक्षर देखील तुझ्या साऱ्या जन्मांत कळायला तुला मार्ग नव्हता. अन् असता हा कारभार तुला ठाऊक–फार काय माझ्या बापानें सही केलेलें कर्जखत तुझ्या अगदीं हातांत असतें, तरी देखील तूं काय केलें असतेंस? अग, हें कर्ज मुदतींतून तर कधींच गेलें. पण मुदतींच्या मुदतीच्या, अन् तिच्याहि मुदतीच्याबाहेर हें कर्ज गेलें ना! आहेस कुठें तूं? पण खरेंच सांगतों तुला नर्मदे, मी आपला नेहमीं धर्माला भिऊन वागणारा माणूस आहें. माझ्या गळ्यावर जरी कुणीं सुरी धरली, तरी कांहीं बापजन्मीं माझ्या हातून अकार्य किंवा अधर्माचरण ह्मणून व्हायचेंच नाहीं. पण जरा बसतेस का? पहातों पेटी उघडून आंत थोडेबहुत पैसेबिइसे आहेत का!"

असें ह्मणून केशवरावजींची स्वारी पुनः खोलींत गेली, व त्यांनीं आपली जुनी देवदारी पेटी उघडून कांहीं रुपये तींतून काढून घेतले. कांहीं वेळानें बाहेर येऊन ते ह्मणाले "काय करावें बुवा! तुझ्या सर्व रकमेची कांहीं आतांच भर होत नाहीं.सहाच रुपये सारे शिल्लक पेटींत पहातों तों! तूर्त जा तूं एवढेच घेऊन. बाकीचे रुपये कुणाकडून तरी उसनेपासने मिळाले, तर पाहून जमवून ठेवतों उद्यांपर्यंत. उद्यां याच वेळेला येऊन घेऊन जा ते. समजलीस?"

सहा रुपये तर सहा रुपये! तेवढे तरी रोख रुपये हातीं पडल्याबद्दल नर्मदेला कमी आनंद झाला, असें नाहीं. केशवरावांनीं दिलेले रुपये हातीं घेऊन पहिल्यानें तिनें ते जमिनीवर ठणठण असे एकएक वाजवून पाहिले–नंतर पुनः तिनें ते आंगठ्यानें उडवून त्यांतून नीट आवाज येतो कीं नाहीं, त्याबद्दल आपली पूर्ण खात्री करून घेतली. नंतर तिनें ते सूक्ष्म नजरेनें सर्व बाजूंनीं नीट निरखून पाहिले. ते सहाहि रुपये अगदीं खरे आहेत, अशी नर्मदेची पुरी खात्री झाल्यावर तिनें ते आपल्या लुगड्याच्या पदराच्या एका टोंकाला बांधले, व केशवरावांनां विचारलें "उद्यां या वेळीं आलें, तर मिळतील ना खात्रीनें बाकीचे रुपये?"

"मिळतील ह्मणजे? हें तूं काय मला विचारतेस नर्मदे? तुझ्या हक्काचे पैसे जातील कुठें?"असें ह्मणून त्यांनीं समोरच्या भांड्यावरचा रुमाल

दूर केला व भांड्यांतील एक सबंध पेढा तोंडांत टाकून बोबड्या स्वरानें ते म्हणाले "वा वा! मजेदार आहे बुवा हा पेढा! फार छान! तूं खातेस का दोन यांतले नर्मदे?"

नर्मदेनें हंसून आपली असंमति दर्शविली. केशवरावांना कांहीं त्या पेढ्यांचा लोभ सुटेना! पुनः एक मोठासा पेढा तोंडांत टाकून तो चघळतां चघळतां ते म्हणाले "वा जी वा! काय पेढा आहे मजेदार! या मुंबईच्या पेढ्यांपुढें तुमच्या सुरतेचे पेढे देखील तुच्छ आहेत पहा! नर्मदाबाई, जरा हात लांब करून त्या कळशींतलें एक पेलाभर पाणी मला देतां का आणून?"

नर्मदेच्या मनावर जरी अजून या अट्टल स्वारीच्या लुच्चेगिरीचें सूक्ष्म मोहजाल पूर्णपणें पसरलेलें नव्हतें, तरी सहा रुपये रोख मिळाल्यामुळें तिचें मन थोडेंबहुत भिजून गेलें होतें, यांत बिलकूल संशय नाहीं. तिनें उठून कळशींतील पाण्यानें जवळचें फुलपात्र भरून तें केशवरावांच्या समोर आणून ठेवलें.

केशवरावांनीं एकवार नर्मदेच्या तोंडाकडे पाहून एक उसासा टाकून फुलपात्रांतील पाण्याचा एक घोंट घेतला, आणि फुलपात्र खालीं ठेवून "फुटक्या कपाळांत तर मग एवढें तरी सुख लिहिलेलें होतें ह्मणायचें!" असें जणूं कांहीं आपल्या मनालाच उद्देशून ते म्हणाले.

नर्मदा या वेळीं दरवाज्यापर्यंत गेली होती. हे अर्धस्फुट शब्द कानीं पडतांच तिनें एकवार मागें पाहिलें, आणि किंचित् हंसून ती झोंपडीबाहेर पडली.

---

## प्रकरण नववें.

## 'मी पक्का सुधारक आहें!'

नर्मदा निघून जातांच केशवरावजींच्या मुखमंडलावरील घनांधकार हां हां ह्मणतां नाहींसा होऊन त्याची जागा कौतुक व विनोद यांनीं पटकावली. त्यांनीं आपला बटवा काढला, व त्यांतून पानसुपारीवगैरे सामान

काढून पद्धतशीर रीतीनें त्यांनीं एक पट्टी बनविली. ती चघळत असतां त्यांनीं चिलीमहि तयार केली, व तिचा समाचार घेतघेत आनंदानें डुलत-डुलत ते आपणाशींच हंसूं लागले. आपणाशींच ते बोलूं लागले " सांपडलें सांपडतांसांपडतां सावज एकदांचें जाळ्यांत! अगदींच बिचारी भोळसट! माझ्या थापांनीं खूबच बनली! आज रात्रीं कांहीं तिच्या डोळ्याला डोळा कसा तो नाहीं लागत! आज नर्मदेच्या मनांत एकच विचार कल्लोळ करून सोडणार–'अहाहा! यांच्याबरोबर जर माझं लगीन झालं असतं, तर आज मला या वैधव्याच्या यातना सहन कराव्या न लागतां मी कितीतरी सुखांत असतें!' माझेंहि वय होत आलें आहे, हें खरें; पण माझ्या चेहऱ्यांतलें तेज अगदींच कांहीं नाहींसें झालें आहे, असें नाहीं!"

केशवराव चिलमीचे झुरक्यांवर झुरके मारीत होते. कांहीं वेळानें चिलमींतील तंबाखूची अगदीं राखरांगोळी झाली, तेव्हां त्यांनीं चिलीम हातांतून खालीं ठेविली. ते पुढें आपणाशींच बोलूं लागले " आज नगद सहा रुपये मीं निवळ पाण्यांत टाकले! पण हे माझे रुपये पाण्यांतच जाणार काय खरोखर? सहा तर गेले–अन् त्यांच्या जोडीला आणखी चार जाणार! हें असें व्हायचेंच! मासा धरायचा असला, तर गळाला आमिष हें लावावेंच लागतें! आतां पाहूं या माझ्या आमिषानें केवढा मोठा मासा लागतो तो गळाला! उद्यां कांहीं मी तिला हे चार रुपये नाहींच देत! हा केशवराव कांहीं इतका दुधखुळा प्राणी नाहीं. कितीतरी दिवस तिला त्यासाठीं घिरट्या घालायला लावीन–हळुहळू तिच्या पोटांतली एकएक गोष्ट काढून घेईन--तेव्हां देईन तिला एकएक रुपया. पण हे चार रुपये सारे ती घेऊन गेल्यावर? पुढें काय? पुढें आणखीहि कांहीं युक्तिजुक्ति लढविली पाहिजे."

दुसऱ्या दिवशीं सकाळींच केशवराव उठले. आज त्यांच्या मनांत नर्मदे-शिवाय दुसरा विचार असणें शक्यच नव्हतें. नेहमींप्रमाणें स्नान, भोजन वगैरे आटोपून ते आपल्या कामावर गेले व नेहमींपेक्षां जरा लवकरच घरीं परत आले. आतां नर्मदा येईल, मग येईल, अशी वाट पहात असतां

त्यांनीं तीन चिलम्यांची राखरांगोळी करून टाकली. परंतु त्या दिवशीं कांहीं केशवरावजींना नर्मदेच्या दर्शनाचा लाभ घडला नाहीं.

दुसरा दिवसहि उगवून क्रमानें गेला, तरी नर्मदेचा पत्ता कोठें आहे? सावज जाळ्यांतून निसटलें कीं काय, अशी त्यांच्या मनाला शंका वाटूं लागली. त्या दिवशींहि नर्मदेचें दर्शन त्यांना घडलें नाहीं.

वाड्यांत नर्मदेचा शोध तरी करावा, असें केशवरावांना वाटूं लागलें; परंतु वाड्यांत बायकांच्या भागाकडे परकी पुरुषांनीं फिरकण्याची वहिवाट नसल्यामुळें तेंहि त्यांना करतां येणें शक्य नव्हतें. तिसऱ्या दिवशींहि संध्याकाळपर्यंत नर्मदेचा पत्ता नव्हता. संध्याकाळीं कामावरून येऊन केशवरावजी चिलम्यांवर चिलम्या फस्त करीत बसले आहेत, इतक्यांत झोंपडीच्या दाराशीं नर्मदेचा शब्द त्यांना ऐकूं आला 'आहांत का हो घरांत?'

झटपट बाहेर येऊन केशवराव ह्मणाले "कोण? नर्मदा? ये ये–आहें मी घरांतच."

दाराच्या उंबऱ्यावरच राहून नर्मदा ह्मणाली " मग काय? देतां ना बाकीचे रुपये आतां?"

"अशी अगदीं घोड्यावर स्वार होऊन कशाला आलीस? जरा बस तर खरी–अशी उभी कां?"

"नाहीं--मला बसायला वेळ नाहीं मुळींच! लवकर गेलं पाहिजे मला, फार वेळ नाहीं मला बसतां येणार."

"फार वेळ नाहीं बसतां आलें, तर थोडा वेळ तरी बसशील? पण काय ग नर्मदे! तुझा हा असा काय कारभार? त्या दिवशीं 'उद्यां येतें,' ह्मणून जी तूं सांगून गेलीस, तें आज तुला फावलें आहे का तोंड दाखवायला? रोज तुझी अगदीं वाट पहात बसावें आतां येशील, मग येशील ह्मणून, तर तुझा आपला कुठें पत्ताच नाहीं! पण जरा बसशील तर खरी?"

केशवरावजींच्या मोहिनीचा पगडा नर्मदेवर चांगलाच बसूं लागला होता. आपल्यासाटीं हा गृहस्थ आज दोन दिवस तिष्ठत बसला होता; या कल्पनेनें तिला मनांतून फारच आनंद झाला. खालीं बसून किंचित्

हंसतहंसत ती ह्मणाली "वाः! तुमचं आपलं उलटंच कांहीं तरी बोलणं! सावकारासाठीं कर्जदार का कधीं वाट पहात बसतो?" असें ह्मणून केशवरावांकडे पाहून ती अधिकच हंसूं लागली.

केशवराव गंभीरपणें ह्मणाले "हो, तूं हंसणारच अशी-मला ठाऊकच आहे. तुझ्याएवढा मी होतों कीं नाहीं, त्या वेळीं सगळ्या गोष्टींना मी याप्रमाणेंच हंसत असें. नर्मदे, खरोखर तूं मोठी दुष्ट आहेस—"

"ती कशी बाई?" नर्मदेनें आश्चर्यानें व थोडेंसें रागानें विचारलें.

"मला आशा लावून शेवटीं तूं माझी पूर्ण निराशा केलीस. या दोन दिवसांत तुझ्यामुळें माझ्या मनाला किती यातना झाल्या, त्या एक मला ठाऊक कीं त्या परमेश्वराला ठाऊक असतील!" असें ह्मणून केशवरावांनीं एक लांबलचक उसासा टाकला.

जोरानें येणारें हंसूं मोठ्या कष्टानें दाबण्याचा प्रयत्न करून नर्मदा ह्मणाली "अशा यातना तरी तुह्माला काय झाल्या, तें तरी ऐकूं द्या."

"वाः, तूं तर माझी थट्टाच करायला लागलीस! काय माझ्या मनाला कष्ट झाले, त्याचा मी तुला हिशेब का देत बसूं? आज तीन दिवसांत मीं अन्नाच्या एका कणालाहि स्पर्श केला नाहीं, ठाऊक आहे?"

नर्मदेनें आश्चर्यानें विचारलें "म्हणजे? काय सांगतां तुम्ही मला हें? तीन दिवसांत तुम्हीं अन्नाला स्पर्श नाहीं केला? कां बाई?"

"मला एक स्वप्न पडलें. त्यामुळें नाहीं मीं अन्नाला स्पर्श केला. नाहीं तर असा त्रागा करायला मी का वेडा आहें?"

केशवरावजींच्या या शब्दांनीं भोळ्या नर्मदेचें कुतूहल जागृत झालें. स्वप्न पडलें, ह्मणून यांनीं तीन दिवस कडकडीत उपास केला. खरोखर यांत कांहीतरी गूढ रहस्य असलें पाहिजे. असें अद्भुत स्वप्न तरी यांनां कसलें पडलें असेल? शेवटीं जिज्ञासेची तार अतिशय चढून तिनें केशवरावांनां विचारलें "काय पडलं स्वप्न?"

गंभीरपणानें मस्तक हलवीत केशवराव ह्मणाले "छे छे, तें नाहीं मी तुला सांगणार कांहीं झालें तरी! तुला सांगितलें, कीं, तें साऱ्या जगाला सांगितल्यासारखेंच झालें—ज्यालात्याला भडाभड तें तूं सांगत सुटशील!"

नर्मदेच्या जिज्ञासेची तार आणखीहि चढली. ती आपणाशीच विचार करूं लागली " हो, तसंच. या स्वप्नांत कांहींतरी गूढ रहस्य आहे खास! कुणीं एकाद्या देवीनं स्वप्नांत येऊन यांनां दृष्टांत दिला असेल, कीं, 'तीन दिवस उपास करून तूं अमूक ठिकाण शोधून पाहिलंस, कीं, तुला अमूक औषध मिळेल; किंवा अमूक एका ठिकाणीं तूं खणून पाहिलंस, तर तुला मोहरांनीं तोंडोतोंड भरलेला एकादा हांडा सांपडेल, किंवा एकादा पृथ्वीच्या मोलाचा दागिना सांपडेल, किंवा असाच दुसरा कांहींतरी लाभ होईल!' काय वाटेल तें करून केशवरावांनां देवीनें दिलेला दृष्टांत आपणाला हस्तगत करून घेतलाच पाहिजे, असा विचार करून नर्मदा अत्यंत उत्सुकतेनें म्हणाली "नाहीं हो, मी कुणाला नाहीं एक अक्षरहि कळवायची त्यांतलं—माझी जीभ जरी कुणीं कापली, तरी नाहीं कुणाला सांगणार—तुम्ही आपले खुशाल सांगा मला—"

केशवराव गंभीरपणें म्हणाले "छट्, कांहीं झालें तरी तूं बोलूनचालून बायकोमाणूस! बायकांचा कसला आला आहे विश्वास?"

केशवरावांच्या या शब्दांचा नर्मदेला जरा राग आला असावा, असें दिसलें. भ्रुकुटिभंग करून ती म्हणाली "कां वरं तुम्ही म्हणतां असं? बायका म्हणजे अगदींच हलकट वाटतं? अगदीं त्यांनां कांहीं किंमतच नाहीं ना? अहो, जगांत बायका आहेत, म्हणूनच ना जग चाललं आहे!"

आपल्या मनांत कसल्या तरी अत्यंत महत्त्वाच्या गोष्टीचा विचार चालला आहे, असा कांहीं वेळ आविर्भाव दाखवून केशवराव म्हणाले "बरं, मी सांगेन तें कुणालाहि सांगणार नाहीं, अशी शपथ घे. माझ्या पायांनां शिवून घे शपथ."

नर्मदेनें चंचल दृष्टीनें एकवार दाराकडे पाहिलें, आणि केशवरावांच्या पायांनां स्पर्श करून ती म्हणाली "तुमच्या पायांशपथ, कुणाला नाहीं मी सांगणार."

केशवराव जागेवरून उठले, व दाराजवळ जाऊन त्यांनीं आसपास चहूंकडे निरखून पाहिलें. कोणी कोठें नाहीं, असें पाहून ते परत

आपल्या जागीं येऊन बसले, व आपल्या स्वप्नाची हकीगत नर्मदेला सांगूं लागले. या वेळीं त्यांचा स्वर अत्यंत मृदु व कोमलतापूर्ण होता.

" तूं तर त्या दिवशीं संध्याकाळीं मजकडून सहा रुपये घेऊन घरीं निघून गेलीस. इथेंच पडल्यापडल्या मी तुझ्याबद्दलच चिंतन चालविलें होतें. तुझ्याबद्दलचे विचार माझ्या मनांत घोळत असतां मला झोंप लागली, अन् लगेच मला एक स्वप्न पडलें."

उत्कंठेनें नर्मदेनें विचारलें " काय पडलं स्वप्न ?"

कंठस्वर बराच खालवून केशवरावजी बोलूं लागले " स्वप्नांत मीं असें पाहिलें, कीं, तूं स्वयंपाकघरांत त्या चुलीपाशीं बसून नुकत्याच उतरलेल्या तपेल्यांतून माझ्यासाठीं भात उकरीत आहेस. तूं त्या वेळीं एक सुंदर महेश्वरी, वर कशिदा काढलेली चंद्रकळा नेसली होतीस. तुझ्या या सुंदर कपाळावर कुंकवाचा टिळा फार नामी शोभत होता. गळ्यांत सरी, पुतळ्या अन् भला थोरला एक मंगळसूत्राचा साज शोभत होता. ताट वाढून झाल्यावर तूं मला जेवायला बोलवायला आलीस, अन् मी जाऊन पाटावर बसून जेवायला लागलों. माझ्याजवळ बसून 'भाजी वाढूं का आणखी ?' 'पोळी कशी झाली आहे ? घ्यावी गडे आणखी दोन चौत तरी !' अशा तऱ्हेनें तूं मला प्रेमानें आग्रह करकरून वाढीत होतीस. अशा रीतीनें पोळी संपवून मी भात पुढें ओढणार, तों कढत कढीचा चटका माझ्या हाताला बसून त्या वेदनेनें मी चक्कन् जागा झालों ! पहातों तों माझें सुखाचें स्वप्न संपून मी हतभागी तेवढा सतरंजीवर पडलों आहे. ती वेळ माझी स्वयंपाकाला लागण्याची होती. पण त्या दिवशीं तें स्वप्न अन् तुझी सुंदर मूर्ति मला डोळ्यांसमोर सारखी दिसत असल्यामुळें विस्तव पेटवून भात चुलीवर चढवायला माझें मन कांहीं तयारच होईना ! तूं जी मिठाई अन् फळफळावळ इथें ठेवून गेली होतीस, त्यांतला एक पेढा अन् एक लिंबाची फोड तोंडांत टाकून एक फुलपात्रभर पाणी ढोसलें, अन् पडलों पुनः सतरंजीवर येऊन. पडल्यापडल्या पुनः तेच स्वप्नाचे विचार मनांत कल्लोळ करूं लागले. काय तरी

माझें फुटकें कपाळ ! मीं स्वप्नांत पाहिलें, तें सारें अगदीं खरें होण्यासारखें होतें. तुझ्याचबरोबर माझें लग्न व्हायचें ठरलें होतें–मुहूर्तनिश्चयदेखील झाला होता. त्याप्रमाणें आपलें लग्न होतें, तर वर्षाचे तीनशें साठ दिवस सकाळसंध्याकाळ तूं मला याप्रमाणें प्रेमाच्या आग्रहानें जेवायला नसतेंस का वाढलें ? सारी रात्र याच विचारांनीं डोक्यांत गोंधळ उडविल्यामुळें या कुशीवरून त्या कुशीवर याप्रमाणें मला तळमळत काढावी लागली. दुसऱ्या दिवशीं पुनः तीच गत. तळयावरून आंघोळ करून येऊन चुलींत विस्तव घालायला गेलों, तर पुनः त्या स्वप्नांतल्या गोष्टी एकुणएक डोळयांसमोर दिसायला लागल्या. झालें–मग कसला सैंपाक अन् कसलें काय ! पुनः थोड्या फळफळावळीच्या फोडी टाकल्या तोंडांत अन् गेलों तसाच कामावर. सकाळीं दोनचार फोडी ·रात्रीं दोनचार फोडी, याप्रमाणें नुसती फळफळावळ खाऊन हे तीन दिवस मीं काढले !"

केशवरावजींच्या या रसपूर्ण वक्तृत्वाचा नर्मदेच्या मनावर कल्पनातीत परिणाम झाला. एकाद्या मंत्रानें मोह पडलेल्या माणसाप्रमाणें केशवरावजींची ती विव्हल 'प्रेम--कहाणी' नर्मदा ऐकत राहिली. शेवटीं केशवरावांनीं थांबून एक मोठा उसासा टाकला, तेव्हां ती गद्गद स्वरानें म्हणाली " म्हणतां तरी काय तुम्ही ? गेल्या सबंध तीन दिवसांत तुम्हीं कांहींच खाल्लें नाहीं ?"

दृढ स्वरानें केशवराव म्हणाले " तूं आणलेल्या फळांच्या फोडी-शिवाय या तीन दिवसांत मीं कांहीं देखील तोंडांत टाकलें नाहीं. तुझीच शपथ ! नर्मदे -तुझ्याच गळयाची शपथ ! " असें म्हणून केशवरावजी सकरुण दृष्टीनें नर्मदेकडे पाहूं लागले.

केशवरावांच्या या करुण कहाणीनें नर्मदेचें मन अगदीं भिजून जाऊन त्याचें अगदीं पाणीपाणी होऊन गेलें ! त्यांच्या कृतींत किंवा कशांतहि तिला लवमात्र कृत्रिमता दिसली नाहीं. शेवटीं केशवरावजींनीं वाहिलेल्या शपथेनें तर ती अगदीं पूर्णपणें चीतच होऊन गेली! कांहीं वेळानें ती रुद्ध-कंठानें म्हणाली "छे बाई ! कोठल्या गांवची रीत ही मेली ! अशा तऱ्हेचे उपास का कोणी करतं ? अशानं किती दिवस निभाव लागेल तुमचा?"

तत्क्षणीं काय झालें कोण जाणे ! डोळे अगदीं पाण्यानें भरून आल्या-मुळेंच कीं काय कोण जाणे, केशवरावांनीं चटकन् डोळ्यांना उपरणें लावलें व तीव्र स्वरानें ह्मटलें "किती दिवस निभाव लागेल ? जोंपर्यंत तूं माझी बायको होऊन सैंपाक करून मला वाढणार नाहींस, तोंपर्यंत मी अस्सा रहाणार ! नर्मदे ! आश्चर्यानें इतके डोळे फाडून पहायचें कांहीं कारण नाहीं. आजकाल विधवांचे पुनर्विवाह अगदीं राजरोसपणें होतात ! अन् तुझ्याशीं पुनर्विवाह करायला मी एका पायावर तयार आहें. मी असा शबाळी दिसलों, तरी मी पक्का सुधारक आहें !"

बिचारी नर्मदा केशवरावांच्या तोंडाकडे टकमक पहातच राहिली ! त्यांच्या आवेशपूर्ण वक्तृत्वांत ती वहातच चालली होती. आश्चर्याचा भर कांहींसा ओसरतांच गालावर हात ठेवून ती ह्मणाली "काय तरी बाई भलतं न् सलतंच ह्मणतां हें तुह्मी ? कुणीं ऐकलं, तर ह्मणेल काय ? विधवांचीं का कुठं लग्नं होतात ? हलक्यासलक्या जातींत होत असतील विधवांचे पाट, ह्मणून ब्राह्मणांत का होतात पाट ? इश्श !"

किंचित् गंभीरतेनें केशवराव ह्मणाले " हेंच तें तुह्मां बायकांचें अज्ञान ! जगांत कुठें काय चाललें आहे, याची कांहीं बातमी तरी आहे का तुम्हाला ? अग, आतां मोठमोठ्या पवित्र ब्राह्मणांत—भटाभिक्षुकांत-सुद्धां पुनर्विवाह अगदीं राजरोसपणें व्हायला लागले आहेत हो !"

मान हलवून नर्मदा म्हणाली " छे छे—असं भलतं न् सलतं अधर्माचं कांहीं बोलूं नये हो ! ब्राह्मणांत जर पाट लागूं लागले, तर मग धर्म तरी राहिला कुठं ?"

विद्वत्तेचा आव घालून केशवराव म्हणाले " आतां करावें तरी काय तुझ्या या अज्ञानाच्या आग्रहाला ! एकदा पुण्यामुंबईकडे अन् काशी-रामेश्वराकडे जाऊन मोठमोठ्या शास्त्रीपंडितांना ये बरं याबद्दल विचारून !"

"काय म्हणतात पंडित अन् शास्त्री ?"

केशवरावांनीं ठासून सांगितलें "शास्त्रीपंडित म्हणतात, कीं, पुन-र्विवाहाला शास्त्रांची संमति आहे. ब्राह्मणांनीं देखील पुनर्विवाह केला, तर त्यांत कांहीं दोष नाहीं."

कांहीं वेळ विचार करून नर्मदा ह्मणाली "तुम्ही म्हणतां, हें खरं अगदीं?"

नर्मदेकडे पहात केशवरावांनीं म्हटलें "खरें नाहीं, तर काय मीं तुला हें सारें रचून सांगितलें?"

नर्मदेनें एक उसासा टाकला, व ह्मटलें "पुनर्विवाहाला असेल शास्त्राधार, पण आपल्या वयाच्या स्त्रीपुरुषांनीं का पुनर्विवाह करायचा?"

केशवराव जोरानें म्हणाले "त्याला काय हरकत आहे? वयानें, गुणांनीं एकमेकांनां योग्य अशा स्त्रीपुरुषांमध्येंच विवाह झाले पाहिजेत. माझ्या वयाच्या पुरुषाला जर लग्न करायचें असलें, तर तें एका दहाबारा वर्षांच्या कोंवळ्या पोरीशीं करणें बरें, का तुझ्यासारख्या प्रौढ विधवेशीं पुनर्विवाह करणें बरें? तूंच सांग."

केशवरावांचा हा मुद्दा नर्मदेला अगदीं बिनतोड वाटला. कांहीं वेळ ती अगदीं स्तब्ध बसली. केशवरावहि चेहरा गंभीर करून विमनस्कपणें दुसरीकडेच नजर लावून बसले.

अशा स्थितींत कांहीं वेळ गेल्यावर स्तब्धतेचा भंग करून केशवराव म्हणाले "मग काय नर्मदे? पटतें का कांहीं माझें बोलणें तुला? आपणा उभयतांचा पुनर्विवाह व्हावा, अशी तुझी इच्छा आहे का? मला तर त्यांत कांहीं शास्त्राच्या, धर्माच्या किंवा नीतीच्या दृष्टीनें कांहींच दोष दिसत नाहीं. पहिल्यापहिल्यानें आसपासचीं लोकें बडबडतील, आपली हेटाळणी करतील, पण तिकडे लक्ष्य देण्यांत कांहींच अर्थ नाहीं. खरेंच, सर्वांच्या मनाच्या कमकुवतपणामुळें माझ्या हक्काचें हें धन मी व्यर्थ घालवून बसलों!"

नर्मदा कांहींच बोलली नाहीं. केशवरावांनीं पुनर्विवाहाच्या समर्थनार्थ आणखी पुष्कळ वक्तृत्व करून तिचें मन वळविण्याचा अत्यंत जोराचा प्रयत्न केला. निरनिराळ्या तऱ्हांनीं तिची समजूत घातली. शेवटीं तिला विचारलें "मग काय म्हणणें तुझें?"

नर्मदेनें एक उसासा सोडून म्हटलें "छी, ही गोष्टहि बोलूं नका मज-जवळ. पण माझ्यासाठीं तुम्ही उगीच असा त्रागा करूं नका. उठा-आंघोळ करून सैंपाक करून पोटभर जेवा. अशा तऱ्हेनें उपास करून शरीराची खराबी करण्यांत काय अर्थ आहे ?"

केशवराव करुणावाणीनें म्हणाले "नर्मदे, या गोष्टी मी तुझ्याजवळ बोलूं नको, तर बोलूं तरी कुणाजवळ ? या साऱ्या अफाट जगांत माझें असें म्हणायला आहे तरी कोण ? मला आई नाहीं, बाप नाहीं, बायको नाहीं, बहीणभाऊ, आप्तमित्र कुणी नाहीं. या जगाच्या भयंकर रानांत मी एकटाच वणवण भटकतों आहें. नर्मदे, माझ्या म्हणण्याला तूं कधींहि कबूल व्हायची नाहींस, ही गोष्ट मला अगोदरपासूनच ठाऊक होती. माझ्यांत असें काय आहे, म्हणून तूं मला भुलावेंस ? माझ्यांत रूप नाहीं, चेहरा हा असा. माझ्यांत कांहीं गुण नाहींत, विद्या नाहीं—असती, तर असा या भिकार गांवांत कारकुनीवर रखडत कां पडलों असतों ? अन् सर्वांत माझा मोठा दोष हा आहे, कीं, माझ्याजवळ पैसा नाहीं. अग, '**सर्वा गुणा कांचनमाश्रयन्ति**' असें म्हणतात, तें का उगीच? ठीक आहे. तूं माझ्या म्हणण्याला कबूल होत नसलीस, तर नको होऊंस; पण मला आतां खाण्यापिण्याचा आग्रह मात्र तूं मुळींच करूं नकोस. मला आतां मरणच बरें वाटतें." असें म्हणून केशवरावजींनीं डोळ्यांना उपरणें लावलें, व त्या बुरख्यांतून ते हुंदक्यांवर हुंदके देऊं लागले.

नर्मदेचें अंतःकरण आतां तर अगदींच कळवळून गेलें. ती काकुळ-तीच्या स्वरानें म्हणाली "असं उगीच भलतं न् सलतं अभद्र नका बोलूं. माझ्या मनाच्या कशा चिंध्या न् चिंध्या होऊन जातात त्यामुळं ! चला उठा. सैंपाकाला लागा. नाहीं तर मी घालतें चुलींत विस्तव. मला इथं रहायला फार वेळहि नाहीं. लवकर गेलं पाहिजे—नाहीं तर होईल उगीच हांकाहांक ! "

उद्विग्नतेनें केशवराव म्हणाले " नको नर्मदे, विस्तव घालून काय करायचें आहे ? तूं येऊन सैंपाक केलास, तरच जेवायचें; नाहीं तर असें उपाशीं रहायचें, अशी मीं भीष्मप्रतिज्ञाच केली आहे."

"आतां काय करावं बाई या वेडाला? आतां तर मला मुळींच नाहीं अवकाश!"

जणूं काय आकाशांतला चंद्र हातीं आला, अशा तऱ्हेनें केशवरावजी उद्गारले "तर मग उद्यां सकाळीं? उद्यां सकाळीं येऊन सैंपाक करून जाशील तूं नर्मदे!"

"बघीन–उद्यांचं उद्यां–येतां आलं तर येईन. पण आतांतर सैंपाक करा तुम्ही!"

"छट्–ती गोष्टहि नको काहूं! तूं आणलेली फळफळावळ आहे अजून थोडीशी शिल्लक. त्यांतलेंच थोडें खाऊन वर पाणी पिईन म्हणजे झालें. माझ्या नर्मदेनें हीं फळें मला आणून दिलीं, ही गोष्ट माझ्या मनांत नेहमीं जागृत असल्यामुळें त्यांवरच मी जीव धरून आहें!"

नंतर कांहीं आठवल्याप्रमाणें करून ते म्हणाले "पण हो, उद्यां सकाळीं नको येऊं. मला उद्यां लवकरच शेजारच्या खेड्यावर वसुलाला जायचें आहे. उद्यां संध्याकाळींच ये, म्हणजे थोडी स्वस्थता मिळेल तरी—"

"बघीन त्याचं. पण आतां सगळीं उरलेलीं फळं अन् पेढेबरफी खा. आपल्या शरीराला उगीच असे कष्ट देणं चांगलं का? मी उद्यां संध्याकाळीं कांहींतरी निमित्तानं हळूच येऊन जाईन सैंपाक करून."

अत्यंत कृतज्ञतेचा आविर्भाव दाखवून केशवराव म्हणाले "नर्मदे! तूंच मला जीवदान दिलेंस. माझ्या जिवांत जीव आला आतां. पण त्याचें कांहीं नाहीं उत्तर दिलेंस मला तें?"

"कसलें?"

"लग्नाचें?"

"इश्श!--बरं पाहीन त्याचं पुढं!" असें म्हणून सलज्ज हास्य करून नर्मदा झटकन् निघून गेली.

---

## प्रकरण दहावें.

## स्वप्न खरें झालें !

नर्मदा निघून गेल्यानंतर केशवराव आपणाशींच खूब हंसूं लागले. मान डुलवीतडुलवीत ते ह्मणाले "वा! अगदीं मजा उडाली! भुलली माझ्या थापांनां पुरी! ती जी आली, ती 'बाकीचे रुपये देतां ना?' असेंच उंबरठ्यावरून विचारीत आली, परंतु लग्नाच्या नुसत्या गोष्टींचा देखील प्रभाव कांहीं विलक्षण आहे पहा! लग्नाच्या गोष्टींपुढें बिचारीला त्या पैशांची आठवण देखील राहिली नाहीं!" असें ह्मणून केशवरावजी उठले व त्यांनीं आपली चिलीम पुनरपि सज्ज केली.

विजयानंदाच्या भरांत चिलीम ओढतांओढतां केशवराव आपणाशींच गुणगुणूं लागले—

**"संतपदाची जोड । दे रे हरि। साधुपदाची जोड ॥**
**संतसमागमें आत्मत्वाचा । सुंदर उगवे मोड ॥**
**सुफलित करुनी पूर्ण मनोरथ । पुरविशि जिविंचें कोड ॥**
**अमृत ह्मणे रे हरि भक्तांचा । शेवट करिसी गोड ॥**

आहा! काय गोड पद केलें आहे हें अमृतरायांनीं! वा वा!"

चिलीम ओढतांओढतां केशवरावजी पोटाच्या उद्योगाला लागण्याच्या हेतूनें चुलीजवळ गेले. आगपेटी व एक मूटभर गवत घेऊन ते विस्तव पेटवूं लागणार, इतक्यांत त्यांच्या मनांत विचार आला "अरे अरे अरे! हें मी काय करतों आहें-वा वा! मी तर आपल्याच पायावर कुऱ्हाड मारून घेतों आहें कीं! आतां आह्माला सैंपाक करतां येत नाहीं! विस्तव पेटवला तर धूर दिसेल ना झोंपडीच्यावर! अन् ती माझ्या थापांनां चटावलेली नर्मदा जर कांहीं तरी निमित्तानें पुनः आली आमच्या झोंपडीकडे, तर मग खासा कारभार ह्मणायचा! ह्मणजे आमची सारी इमारत गडगडलीच कीं नाहीं! छे-तसें नाहीं उपयोगी. आज तर कांहीं भातबीत करायची नाहीं सोय! सैंपाक करायचा नाहीं, तर मग या कावलेल्या पोटोबांची काय करायची व्यवस्था? या दुधखुळीला थापा

मारल्या, त्याचें प्रायश्चित्त म्हणून खरोखरच उपास करावा लागतो कीं काय आम्हाला ?"

असें आपल्याशींच म्हणून केशवरावजी फिदीफिदी हंसूं लागले. नंतर ते तेथल्या कोंपऱ्यांत गेले व तेथें ठेवलेल्या एकदोन भांड्यांवरचीं त्यांनीं झांकणें काढून पाहिलीं. दुपारच्या स्वयंपाकापैकीं एक दशमी, थोडासा भात व बरीचशी आमटी शिल्लक होती. "मारावा झालें याच्यावर हात–कोण करीत बसतो आहे आतां नवा सैंपाक!" असें आपणाशींच म्हणून, हातपायतोंड धुऊन केशवरावजींनीं त्या सामग्रीवर क्षुधानिवृत्ति केली.

परंतु तेवढ्यावर कांहीं स्वारीचें समाधान झाल्यासारखें दिसलें नाहीं. भोजन उरकल्यानंतर भांड्यांची वगैरे निरवानिरव करून पानसुपारीचा बटवा सोडून पानांच्या शिरा काढतांकाढतां केशवराव आपणाशींच हंसून म्हणाले " काय पहा विलक्षण प्रकार! त्या नर्मदेसाठीं मला आतां खरोखरच उपास पडायेची पाळी आली आहे ना! असो–आपल्या कामासाठीं थोडीशी उपासमारहि केली पाहिजे सहन. उद्यां संध्याकाळीं ती दुधखळी आली, म्हणजे महत्त्वाच्या अन् मुद्द्याच्या अशा बऱ्याचशा गोष्टी तिच्याकडून युक्तियुक्तीनें हळुहळू काढून घेतल्या पाहिजेत. म्हटलें आहे ना कुठल्याशा एका कवीनें!—'**दुःख भोगिल्याशिवाय जीवा कैंचा सुखलाभ**!' अगदीं खरें आहे हें! थोडे हाल सोसल्यावांचून आपला मतलब कसा साधणार ?"

केशवरावजींच्या पोटाच्या भरतींत त्यांच्या मताप्रमाणें थोडें न्यून राहिलें होतें, तरी त्याचा त्यांच्या झोंपेवर कांहींसुद्धां परिणाम झाला नाहीं. लवकरच ते घोरूं लागले, व सकाळपर्यंत त्यांना चांगली गाढ झोंप लागली होती.

दुसरा दिवस त्यांचा चटकन् कामांतच गेला. संध्याकाळीं सहांच्या सुमारापासून केशवरावजी नर्मदेची उत्कंठेनें वाट पाहूं लागले. संध्याकाळ पडल्यानंतर नर्मदा हळहळ त्यांच्या झोंपडींत आली. आंत येतांच

आपल्या ओटीमधून तिनें एक मध्यमसें, परंतु चांगलें पिकलेलें टरबुज बाहेर काढून तें जवळच्या कोनाड्यांत ठेविलें.

तें फळ हातीं घेऊन केशवराव हंसतहंसत ह्मणाले "वाः! नामी टरबुज आहे बुवा हें! कुठून पैदा केलेंस हें नर्मदे?"

"पण तुह्माला आवडतं तरी का टरबुज?"

"वा! हें काय विचारतेस? टरबुजावर तर माझा प्राण! टरबुजाइतकें मला कोणतेंच फळ आवडत नाहीं ह्मणेनास! आज सहा वर्षांत कांहीं मला टरबुज खायला नव्हतें मिळालें! पण आणलेंस तरी कुठून?"

"इकडे येतांना मागल्या बागेंतून आणलें तोडून चट्‌दिशीं. पण हें काय बाई? सैंपाकाबियपाकाची कांहींच नाहीं तयारी दिसत ती? सारं आपलं चक्क दिसतं आहे!" असें ह्मणून नर्मदा तोंडांत पदर धरून हंसूं लागली.

परंतु या वेळीं केवशरावजींनीं तोंडावर असा कांहीं आविर्भाव आणला होता, कीं, नर्मदा आल्यामुळें आपल्या हातीं जणूं काय आकाशांतला चांदच आला असावा, असें त्यांनां वाटत होतें! तिच्या तोंडाकडे स्थिर दृष्टीनें पहात ते ह्मणाले "माझ्या विनंतीप्रमाणें तूं आलीस नर्मदे! आतां सैंपाक झाला तरी वहावा—न झाला तरी वहावा!"

नर्मदा स्मितपूर्वक ह्मणाली "काय तरी बाई एकाद्याला हरभऱ्याच्या झाडावर चढवायचं तें! आतां ती मेली थट्टाबिट्टा पुरे करा, अन् सैंपाकाच्या तयारीला लागा बघूं थोडेसे. मला सैंपाकाचं सामान द्या काढून, ह्मणजे चटकन् भातभाजी करून मी जातें निघून. इथं बसायला मला फार वेळ नाहीं आहे. बाईसाहेब अन् मुलं यांचं तर अक्षयीं माझ्यावांचून एक पान नाहीं हलायचं. सारा वेळ नर्मदा पाहिजे पाठीशीं त्यांनां. 'नमूमावशी' खेरीज मुलांचा एक क्षण नाहीं जायचा. पलीकडच्या वाडीला माझी चुलतबहीण आली आहे, तिला मला भेटायला गेलं पाहिजे, असा मीं बहाणा केला, तेव्हां कुठं बाईसाहेबांनीं मला जायची परवानगी दिली —पण लवकर परत यायची त्यांत अट घालून ठेवलीच!"

केशवरावजी उठले व नर्मदेला स्वयंपाकाचें सामान काढून देऊं लागले. फडताळें, पेट्या वगैरेंतून तांदूळ, डाळ, मीठ, तेल, मसाला, हळद, तूप वगैरे जिन्नस काढून त्यांनीं तिच्यापुढें आणून ठेवले. नर्मदा ते पाहून घेत असतां गवत, गोंवऱ्या व लांकडें यांच्या साहाय्यानें केशवरावांनीं चुलींत विस्तव पेटवून ठेवला व ते हंसून ह्मणाले "आतां असा सैंपाक झाला पाहिजे नर्मदे, कीं, त्यानें तीन जन्मांची तृप्ति व्हावी!"

नर्मदा यावर कांहीं उत्तर न देतां केशवरावांकडे पाहून हंसली मात्र. त्यांनीं काढून दिलेले पदार्थ घेऊन ती स्वयंपाक करूं लागली. तेथेंच थोड्या अंतरावर एक पाट मांडून केशवरावजींची स्वारी बसली, व प्रसन्न हृदयानें तमाखूच्या चिलमीच्या चिलमी फस्त करूं लागली.

नर्मदेचा स्वयंपाक चालला असतां गोष्टी बोलतांबोलतां युक्तियुक्तीनें, मोठ्या शिताफीनें केशवरावजींनीं तिच्याकडून पुष्कळ गोष्टींची माहिती काढून घेतली. नर्मदेवर वैधव्याचा दारुण घाला पडल्यापासून आज वीस वर्षे ती इनामदारांच्या वाड्यांत नोकरीला आहे. पहिल्यानें ती स्वयंपाकाला ह्मणून राहिली; परंतु पुढें तिच्यावर रमाबाईचा अत्यंत लोभ जडल्यामुळें ती त्यांच्या आणि त्यांच्या मुलांच्या तैनातीचेंच काम पाहूं लागली. वाड्यांतल्या साऱ्या माणसांची तिच्यावर मोठी मेहरबानी असून ती अत्यंत विश्वासू ह्मणून गणली जात असे. वीस वर्षे नोकरी करून नर्मदेनें कांहीं कुणगा केला होता. त्यापैकीं कांहीं रुपये भारी दरानें तिनें व्याजीं लावले असून, कांहीं रकम एका पितळेच्या कळशींत ठेवून ती कळशी तिनें कोठें लपवून ठेविली होती. ती कळशी नर्मदेनें कोठें लपवून ठेविली होती, हें कळण्याविषयीं केशवरावजींनां अतोनात जिज्ञासा उत्पन्न झाली; परंतु कदाचित् तिला आपला कांहीं संशय येईल, अशी भीति वाटल्यावरून तें ठिकाण सांगण्याबद्दल केशवरावजींनां तिला कांहीं आग्रहहि करतां येईना. परंतु एकंदर कुणगा तरी तिच्याजवळ किती आहे, हें तिला स्पष्ट न विचारतांहि काढून घ्यावयाच्या उद्देशानें ते ह्मणाले "व्याज कधीं तुंबवून ठेवणें कांहीं बरें नाहीं हो! व्याज तुंबून राहिलें

ह्मणजे काय होतें आहे का ठाऊक ? शेवटीं व्याजहि जातें अन् मुद्दलहि जातें, अन् धुपाटणें हातीं येतें ! व्याजानें रकम वाढली कीं नाहीं, ह्मणजे शेवटीं ती होते अजस्र, अन् कुळाला ती फेडणें अगदीं अशक्य होऊन जातें. महिन्याच्या महिन्याला व्याजाची रकम वसूल होत गेली, ह्मणजे ऋणकऱ्यालाहि, मुद्दलाची कांहीं फेड झाली तर पहावी, अशी आंच लागून रहाते. महिन्याला व्याजाची रकम कमी व्हावी, अशी त्यालाहि उत्कंठा असतेच कीं नाहीं ? महिन्याच्या महिन्याला तूं आपल्या साऱ्या व्याजाची वसुली करतेस ना नर्मदे ?"

नर्मदा क्षणभर स्तब्ध राहून ह्मणाली " हो, होतेच ह्मणायची ! पण सारींच माणसें कांहीं महिन्याच्या महिन्याला आपलं व्याज नाहीं देत. दोन महिने, चार महिने झाले, ह्मणजे कांहीं व्याज देतात, कांहीं बाकीहि ठेवतात; पण कांहींजण मात्र अगदीं महिन्याच्या महिन्याला देतात व्याज आणून."

" तर मग बरेंचसें व्याज कांहीं दर महिन्याला नाहीं वसूल होत ? बरें, गेल्या महिन्यांत किती झाली व्याजाची वसुली ?"

" गेल्या महिन्यांत ? पहातें अं हिशेब करून. एकापासनं आठ आणे, दुसऱ्याजवळून आला एक रुपया, अन् तिसऱ्याकडनं आले दहा आणे. अन् हो—त्या यानं दिलान् सवा रुपया. किती झाले एकंदर ?"

" तीन रुपये सहा आणे झाले एकंदर. बस्स ? एकंदर तीन रुपये सहा आणेच का झाली वसुली ? सर्वजण जर दर महिन्याच्या महिन्याला आपल्या रकमेचें सर्व व्याज देतील, तर मला वाटतें, पांचसहा रुपये होतील, नाहीं ?"

" छेः—इतके कुठून होणार ? तरी पण—चारएक रुपये होतील."

" ओः ! तरीहि कांहीं तुझी प्राप्ति इतकी वाईट नाहीं. बरीच चालवली आहेस ह्मणायची सावकारी ! पण ज्यांनां तूं पैसे दिले आहेस कर्जाऊ, ते तुझे ऋणकरी तरी सारे बऱ्यापैकीं आहेत ना ?"

" वा: ! चांगलं माणूस आहे, अशी मनाची खात्री झाल्यानंतरच तर त्याला मी पैसे देतें."

" तर मग तूं असें कां नाहीं करीत ? जे पैसे तूं पुरून ठेवले आहेस, ते काढून असेच व्याजाला कां नाहीं लावीत ? उगीच जमिनींत नाहीं तर भिंतींत ठेवण्यांत काय शहाणपण आहे ? ते रुपयेहि जर व्याजीं लागले, तर आणखीहि नाहीं का महिन्याला तुला चारएक रुपयांची प्राप्ति व्हायची ? "

नर्मदा जरा तीव्र स्वरानें ह्मणाली " चारच रुपये कां बाई ? चारच रुपये का फक्त मला व्याज येईल त्यांचं ? "

" मग किती येईल तुझ्या मतें ? "

" पांचसहा रुपये तरी कमींतकमी व्याज आलंच पाहिजे त्यांचं— कस्से रुपये लागले माझे तरी ! पण मी मनांतल्यामनांत असा विचार करतें, कीं, आपणाजवळ जें कांहीं असेलनसेल तें दुसऱ्यांच्या हवालीं करून शेवटीं त्याची नाहीं वसुली झाली, तर काय डोकींत राख घालून जन्मभर रडत बसायचं ? हो, आपण पडलों बायकोमाणूस. माणसाला वेळ आहे, प्रसंग आहे. वर्षाचे तीनशें साठ दिवस का सारखेच जातात त्याला ? प्रसंगीं गेली नोकरी, तर खायचं काय ? तपेली घेऊन घरोघर का हिंडायचं ?" असें ह्मणून नर्मदेनें मृदु स्मित केलें.

केशवराव मानभावीपणानें मान हलवून ह्मणाले " हो ग हो ! तूं ह्मणतेस, तें अगदीं खरें आहे नर्मदे ! तर मग तुझा तो कुणगा आपला त्या कळशींतच लपून असलेला बरा. त्याला तूं हात देखील नको लावूंस अगदीं. पण ते पैसे तूं अगदीं नीट सुरक्षित जागीं ठेवलं आहेस ना ? खूब सावध रहा हो—मला हें सांगितलेंस तर सांगितलेंस, पण दुसऱ्या कुणालाहि याचा थांगपत्ता लावूं देऊं नकोस हो ! अग, सारीं माणसें का सारखींच असतात ? "

" छेग वाई ! मी कशाला कुणाला सांगायला जाऊं ? मी का भोळी-खुळी आहें होय ?" असें ह्मणून नर्मदेनें आमटीला चर्रकन् फोडणी दिली.

इकडे केशवरावजी मनांतल्यामनांत हिशेब करूं लागले "त्या दिवशीं ही भोळसट मला ह्मणून चुकली, कीं, आपण दरमहा दर रुपयाला दोन पैसे व्याज घेतों–प्रसंगीं चार पैशांनीं देखील रुपये देतों! आतां सरासरी अडीच पैशांचा दर जरी धरला, तर पंचवीस रुपयांचा झाला अंदाजीं रुपया एक–अन् चार रुपये व्हायला पाहिजे एक शेंकडा. शंभरएक रुपये व्याजीं लावलेले दिसतात हिनें, अन् दीडशेंएक रुपये हिचे पुरून ठेवलेले असावेत. आतांच नाहीं—पण कांहीं दिवसांनीं तरी ही पुरलेली रक्कम आपल्या पेटींत येऊन पडेल, अशी कांहीं तरी तजवीज केलीच पाहिजे! माझ्या पेटींतले पैसे तरी अगदीं पुरून ठेवल्यासारखेच रहातील, नाहीं तर काय?" अशा प्रकारची ही फडणिशी चालू असतां केशवरावजींच्या मुखमंडलावर हास्याच्या क्षीण रेषा चमकूं लागल्या होत्या. परंतु प्रकाशाच्या अंधुकपणामुळें आणि केशवरावजींच्या चेहऱ्याच्या कृष्णत्वामुळें नर्मदेला त्या दिसून येणें शक्यच नव्हतें!

यानंतर हलुहळू रावसाहेब, मनोहरपंत आणि रमाबाई यांबद्दलच्या गोष्टी सुरू झाल्या. केशवरावजींनीं हळूच प्रस्तावना केली. "बरें पण काय ग नर्मदे, बाबुराव लग्न कां ग करीत नाहींत?"

"त्यांचं संसारांत मनच नाहीं, ह्मणून नाहीं करीत झालं. खरंच सांगतें तुह्माला, आमचे बाबुराव ह्मणजे अगदीं देवमाणूस पहा! रात्रंदिवस पूजाअर्चा, ह्मणणंवाचणं यांत आपले गर्क! त्यांच्या लग्नाचं तर सगळं अगदीं ठीकठाक झालं होतं. मुंबईहून त्यांनां बघायला दिखील आले होते–ती कीं नाहीं खूब श्रीमंत मंडळी–दुसरे राजे ह्मटलं तरी चालेल! पण आमच्या बाबुरावांनीं तोंडाला येईल तें त्यांनां बोलून त्यांचा भारी अपमान करून त्यांनां घालवून लावलं. असं झाल्यामुळं दोघां भावांत वांकडं आलं, अन् त्या नवराबायकोंतहि झालीं तंटेभांडणं सुरू!"

अत्यंत उत्सुकतेनें केशवरावांनीं विचारलें "हें काय बुवा प्रकरण? अप्पासाहेब अन् बाईसाहेब यांच्यांत कां तंटेभांडणें?"

" सांगतें, जरा दम धरा–" असें ह्मणून नर्मदेनें आधण आलेल्या तपेल्यांत रोवळींतले तांदूळ ओतले व ते पळीनें एकवार ढवळून, तपेल्या-वर झांकण टाकून ती पाय सोडून बसली. नंतर तिनें आपलें पुराण वाचावयाला आरंभ केला. " आतां मीं सांगितलं कीं नाहीं तुह्माला? ज्या दिवशीं ती मुंबईकर मंडळी बाबुरावांनां पहायला आली होती, त्या दिवशीं आमच्या बाईसाहेब सारा दिवस मोठ्या दुःखांत दिसल्या–साऱ्या दिवसांत कुण्णाशीं ह्मणून त्या चकार शब्द नाहीं बोलल्या. दररोज अप्पासाहेब सर्व माणसांबरोबर हंसतखेळत जेवण करून वर झोंपायला जातात. पण त्या दिवशीं पाहिलं तें त्यांनीं फराळाचं बाहेरच मागवलं अन् साऱ्या दिवसांत कांहीं आंत आले नाहींत. बाईसाहेबहि त्यांच्या समाचाराला बाहेर गेल्या नाहींत. मीं मनांत ह्मटलं 'यांचं दोघांचं बिनसलं तरी काय! लक्षण कांहीं ठीक नाहीं दिसत. दोघांत घनचक्कर भांडण होणार वाटतं!' "

केशवरावजींनीं आपला लांब चेहरा अधिकच लंबोत्तर करून ह्मटलें " अस्सें! पुढें काय झालें त्यानंतर?"

" तेंच तर मीं सांगतें आहें. त्या दोघां नवराबायकोंत असा जंगी तंटा व्हायला झालं तरी काय, तें समजून घेतलंच पाहिजे, अन् त्याला उत्तम उपाय ह्मटला ह्मणजे आड उभं राहून त्यांचीं भाषणं ऐकणं हाच होय, असं मीं ठरवलं. संध्याकाळ झाल्यानंतर पाहिलं, तों अप्पासाहेब आंत येऊन वर माडीवर गेले. बाईसाहेबहि त्यांच्या मागोमाग गेल्या, अन् झालं लगेच त्या नवराबायकोंत जंगी भांडण सुरू. मधु कुठं आहे, हें पहायच्या निमित्तानं ह्मणून मीहि त्यांच्या मागोमाग वर गेलें, अन् शेजारच्या खोलींत खिडकीच्या आड उभी राहून चाललेलं भांडण ऐकूं लागलें. अप्पासाहेब ह्मणाले ' मी मोतीबागेंत जातों.' बाईसाहेब कांहीं त्यांनां पहिल्यानं जाऊं देईनात; पण शेवटीं त्या ह्मणाल्या ' जाणार तर मलाहि घेऊन चलावं बरोबर. आपण मोतीबागेंत जाऊन काय कर-णार, तें मी पहाणार.' अप्पासाहेब तर रागारागानं बायकोला खूब बोलून

घरांतून निघून गेले. नंतर बाईसाहेब बाबुरावांच्या खोलींत गेल्या, अन् रडतरडत त्यांच्या पायांपाशीं धाड्कन् लोळण घेऊन ह्मणाल्या 'सकाळीं जें तुह्मी तिकडच्या स्वारीला ह्मणालांत, कीं, जर तुह्मी वाईट लोकांची संगत सोडणार नाहीं, तर मी तुमच्यावर जबरदस्ती करून ती सोडायला लावीन,–त्याचा अर्थ काय? स्वारीला कुणाची वाईट संगत जडली आहे ? तिकडे काय करायला होत असतं? सगळं खुलं मन करून मला सांगा.' बाईसाहेबांचे हे शब्द ऐकतांच बाबुराव तर रागानं लालबुंद होऊन गेले अन् त्यांनां ह्मणाले 'बोलूनचालून तूं एक बायको, तुला हे सातसतरा कारभार समजून घेऊन करायचं आहे काय ? ' असं ह्मणून रागारागानं बाबुरावहि घरांतून निघून गेले ! ”

ही हकीगत ऐकत असतां केशवरावजी उंच मान करून बसून राहिले होते. नर्मदा थांबली, तेव्हां "अस्सें !" एवढाच उद्गार त्यांनीं काढला. त्यांच्या हृदयांत या वेळीं आनंदानें तांडव चालविलें होतें. चालला हलु-हळू, क्रमाक्रमानें उलगडा होत ! केवळ 'लग्न करीत नाहीं,' असें धाकट्या भावानें ह्मटलें ह्मणून दोघां भावांत बोलाचाली बंद होते, असें कधीं कुठें झालें आहे ? आतां त्यांतलें खरें कारण आलें आपोआप बाहेर ! आतां आपली अक्कल चालवावयाला, आपली बुद्धि खेळवावयाला आपणाला मुबलक जागा मिळेल, असें वाटून त्यांनां अत्यंत आनंद झाला.

केशवरावांनीं विचारलें "बरें, पुढें काय झालें? त्यानंतर तूं ऐकलेंस का एकाद्या दिवशीं कांहीं ?"

नर्मदा सांगूं लागली " अप्पासाहेब दोन दिवस मोतीबागेंत राहिले; घरीं आले नाहींत. इकडे बाईसाहेबांच्या जिवाचा जो कांहीं तडफडाट चालला होता, तो कांहीं विचारूं नका. मला एकीकडे बोलावून त्या ह्मणाल्या 'नर्मदे, मोतीबागेंत जाऊन तिकडची तब्बेत कशी काय आहे, हें पाहून येतेस का ?' मीं ह्मटलं 'बाईसाहेब, मोतीबाग किती तरी दूर –जवळजवळ एक कोसभर तरी येईल. मी एकटी बायकोमाणूस तिथपर्यंत जाऊं तरी कशी ?' बाईसाहेब ह्मणाल्या 'मी कुणा तरी शिपायाला

बोलावून आणतें. तो तुला आपल्याबरोबर नेऊन मोतीबागेंत पोंचवील.' मग मला त्यांनां होय म्हणावंच लागलं. खाणींजेवणीं आटोपल्यावर बाईसाहेबांनीं दिलेल्या शिपायाबरोबर मी मोतीबागेकडे निघालें. मोतीबागेंत पोंचतांच तो शिपाई दरवाज्याशीं एका झाडाच्या सावलींत तसाच पडला, अन् मी शिरलें आंत. बंगल्यांत जाऊन पहातें, तों वर जायच्या जिन्याच्या तोंडाशींच एक जुनी घोंगडी पसरून, रस्ता बंद करून एक ताटका राक्षसी अस्ताव्यस्त पडली आहे."

विस्मयातिशयानें केशवराव उद्गारले " आँ ! काय म्हणतेस ? "

किंचित् हंसून नर्मदा म्हणाली " अहो, ताटका राक्षसी म्हणून मीं म्हटलं, तें का खरं समजतां ? तें मीं आपलं एक उदाहरण दिलं इतकंच! ती ताटका राक्षसी म्हणजे एक पांढऱ्या केंसांची म्हातारडी होती. ती अगदीं बेफामपणं निजली असून डरडरावून घोरत होती. मोठी आश्चर्याची गोष्ट ही, कीं, तिच्या माथ्याशीं एक गुडगुडी असून तिला एक लहानसा चिमटा दोरीनं बांधला होता ! अन् पायांशीं एक भली खाशी गोंवरी धुमसत असून तिच्या शेजारीं एका मोठ्या पानावर मूठभर घाणेरडा तंबाखू अन् डेखणं होतीं. पायांच्या आंगठ्यांवर चालून बिलकूल आवाज न करतां खालच्या मजल्यावरच्या झाडून साऱ्या खोल्या मीं शोधून पाहिल्या. त्यांत अप्पासाहेबच काय, पण कुणीदिखील माणूस नव्हतं, म्हणून हळूच वर जावं असा मीं विचार केला. पण तसं करायला मला जरा भय वाटूं लागलं बाई ! मग मनाला जरा दरडावून घट्ट करून म्हटलं ' आपल्या धन्याचं घर-वाटेल तिथं जायला आपणाला कसलं आलं आहे भय ? ' मग केला धीर, अन् चटकन् त्या थेरडीवरनं पलीकडे उडी मारून पटपट मधल्या पायऱ्या ओलांडून जिन्यावरनं मी गेलें वर. वरती जातांच एक मोठा थोरला दिवाणखाना लागतो, अन् त्याच्या आसपास बऱ्याच लहानमोठ्या खोल्या आहेत. दिवाणखान्यांतून पलीकडे जाऊन दक्षिणेकडल्या ग्यालरींत मी उभी राहून पहातें, तों झाडाझुडांतून माझ्या दृष्टीला अप्पासाहेब नेमके पडले. हातावर डोकें टेंकून नदीच्या

कांठाशीं कसला तरी विचार करीत बसलेले ते मला दिसले. मग चटकन् खालीं जाऊन त्यांची भेट घेऊन त्यांच्याशीं दोन शब्द बोलावे, असा विचार केला, अन् तशीच निघून दिवाणखान्यांत मी शिरलें अन् मध्य-भागीं आलें—तों—अगबाई! अजूनहि ती आठवण झाली म्हणजे अंगावर कसे शहारे उठतात!"

केशवरावांनीं अत्यंत उत्कंठेनें विचारलें "काय-काय-नर्मदे? झालें तरी काय?"

"दिवाणखान्याच्या मध्यभागीं मी येतें, इतक्यांत कोनाच्या बाजू-कडून मला एक आवाज ऐकूं आला, कीं, जणूं काय कुणी रडतं आहे. तो शब्द ऐकतांच माझ्या अंगावर भयानं थरारून कांटाच उभा राहिला!"

"काय म्हणतेस? रडण्याचा आवाज?"

"होय—अगदीं कुणीं तरी रडल्यासारखा आवाज! अगदीं हूं हूं हूं हूं--अशा रीतीचा आवाज अन् त्याच्याबरोबर हुंदके! त्याबरोबर चटकन् मनांत आलं, ही दुपारची वेळ, कुठं कोण हडळ—जखीण—शाकिणी-डाकिणी असेल, अगदीं उजाड भागांतलं हें घर--जवळपास माणसांचा वासवारा दिखील नाहीं--कशाला अशा ठिकाणीं जाणूनबुजून मी मरायला आलें तरी! काय सांगूं बाई--माझे पाय थरथरा कांपूं लागले. हळुहळू मी जिन्यावरून खालीं उतरूं लागलें, तों तोच रडण्याचा शब्द पुनः ऐकूं आला. त्याबरोबर माझी अधिकच धांदल होऊन मी घाईघाईनं जिना उतरूं लागलें. तेव्हांहि ती थेरडी निजलेलीच होती. जिन्याच्या शेवटच्या पायरीवर येऊन तिच्यावरून मी पलीकडे उडी मारून येणार—म्हटलं या थेरडीला आपल्या येण्याचा थांगपत्ता लागूं नये—तों माझा पाय धरून मला जणूं कुणीं मागं ओढलं, अन् मीं त्या ताटकाराक्षसीच्या अंगावर धाडकन् पडलें. मग काय विचारतां? 'ओ ओ ओ' करीत ती म्हातारडी उठून बसलीच. मी पडल्यापडल्याच डाव्या हातावर भार देऊन हळूच वर मान करून पहातें, तों आपलं बोळकं पसरून माझ्याकडे ती टकमकां पहात राहिली आहे, असं माझ्या दृष्टीला पडलं. त्या बोळक्यांत एक दांत,

तर त्याच्याजवळ भली थोरली एक खिड असल्यामुळं त्या थेरडीच्या तोंडाकडे पाहून मला मनांतून भीतिच वाटूं लागली. तिचे डोळे तर अगबाई! वाघाच्या डोळ्यांप्रमाणं जळतच होते. मला तिनं पाहिलं मात्र, अन् ती थेरडी 'चोर चोर' म्हणून ओरडूं लागली. मी उठून बसून 'आईग! देवारे!' असं ओरडत रडत राहिलें. माझे हात, गुडघे अन् नाक पडल्या-मुळं झाजरून गेलं होतं! त्या थेरडीच्या आरोळ्या ऐकून बागेचा तो मेला भय्या माळी–"

केशवरावांनीं मध्येंच विचारलें "भय्या माळी म्हणजे? मोतीबागेंतला माळी परदेशी का आहे?"

"हो, परदेशी आहे; पण इकडे तो बरींच वर्षं असल्यामुळं आमच्यां-सारखंच पण जरा हेंगाड्या स्वरानं मराठी बोलतो. हो–काय बरं म्हणत होतें मी आतां? त्या माळ्यानं येऊन मला विचारलं 'कोण ग तूं? आलीस कुठून? चोर, हरामजादी–' मला जरी भारी लागलं होतं, तरी त्या मेल्या दीडदमडीच्या माळ्याच्या तोंडून असले अपशब्द ऐकतांच माझ्या पायांची आग मस्तकाला गेली. मी त्याच्या अंगावर ओरडून म्हणालें 'तूं रे कोण मेल्या चावटा, मला चोर हरामजादी म्हणणार? मेल्या, तूं कोण, मी कोण, आहे का तुला ठाऊक? कुणाला काय म्हणतोस, तें आहे का ध्यानांत? अप्पासाहेबांनां सांगून तुला नोकरीवरून हाकलून देववीन, समजलास मेल्या?' माझं हें बोलणं ऐकून तो मेला माळी संतापला अन् म्हणाला 'आतां तर तूं खास चोरच आहेस! तुला आतां अशी धरून नेतों धनीसाहेबांकडे चल–' मीं म्हटलं 'खबरदार मेल्या माझ्या अंगाला हात लावशील तर–चल–मीच येतें तुझ्याबरोबर धनीसाहेबांकडे.' त्याच्याबरोबर मी नदीवर गेलें. तेव्हां तो मेला अप्पासाहेबांनां सलाम करून काय म्हणतो 'धनीसाहेब, एक चोर पकडून आणला आहे मीं!' 'चूप रहा मेल्या!' असं त्याच्या अंगावर ओरडून मीं अप्पासाहेबां-समोर जाऊन म्हटलं 'आपली प्रकृति आतां कशी काय आहे, तें पाहून येण्यासाठीं बाईसाहेबांनीं मला पाठवलं आहे. त्यांनां भारीच काळजी

लागून 'राहिली आहे–' हें ऐकून अप्पासाहेब तर माझ्या तोंडाकडे नुसते टकमकां पहातच राहिले. नंतर क्षणभरानं मला त्यांनीं विचारलं "नर्मदे, तूं बंगल्यांत गेली होतीस का ? ' मीं ह्मटलं ' हो, आपणाला शोधायला गेलें होतें. ' त्यांनीं मला पुनः विचारलं ' पण वर गेली होतीस का ?' मीं ह्मटलं 'नाहीं बाई ! ' अप्पासाहेबांच्या त्या वेळच्या चेहऱ्याकडे अन् डोळ्यांकडे पाहून 'वर गेलें होतें ' असं कांहीं बाई माझ्यानं सांगवलं नाहीं. त्यांनां मीं आपलं चटकन् ह्मटलं ' वर जावं ह्मणून मी जिन्याशीं गेलें, तों तिथं एक कोणशी ह्मातारडी निजली होती, तिच्या पायांला अडखळून मी दाणकन् पडलें.' थोडा वेळ गप्प राहून अप्पासाहेब मला ह्मणाले ' जा, घरीं जाऊन सांग--माझी प्रकृति अगदीं बरी आहे--काळजी करण्याचं कांहीं कारण नाहीं.' "

केशवरावांनीं विचारलें " मग काय ? तूं आलीस घरीं परत ?"

" हो, दरवाज्याशीं येऊन पहातें, तों तो मेला शिपाई मोठमोठ्यानें घोरत तस्सा पडला आहे. त्याला हांका मारून उठवलं अन् बरोबर घेऊन तश्शी वाड्याकडे आलें, अन् बाईसाहेबांची एकीकडे गांठ घेऊन त्यांनां म्हटलं '' बाईसाहेब, अप्पासाहेबांची प्रकृति तर मला चांगली दिसली, अन् आपण खुशाल आहों, असं तुम्हाला कळवायला त्यांनीं मला सांगितलंहि. पण एक मोठी भयंकरच गोष्ट मला तिथं आढळून आली ! ' तेव्हां बाईसाहेब भयानं कपाळांत डोळे चढवून मला घाईनं म्हणाल्या 'काय ग ? काय ग ? काय पाहिलंस मोतीबागेंत तूं नर्मदे ?' मीं म्हटलं ' अगबाई ! काय सांगूं बाईसाहेब तुम्हाला ! मनांत आलं, म्हणजे अंगावर कसा कांटा उठतो माझ्या ! मोतीबाग भुताटकीनं पछाडली आहे बाईसाहेब ! दिवसाढवळ्या आंतल्या बंगल्यांत भुतं वावरताहेत ! अप्पासाहेबांनां तिकडे फिरकूं दिखील नका देऊं तुह्मी ! अन् तिथं भुताटकी असली, तर त्यांत मोठं नवल काय आहे बाईसाहेब ? बारा महिने तीनशें साठ दिवस बंगला असायचा बंद, रात्रीं दिवा दिखील नाहीं कधीं लागायचा, कधीं म्हणजे बंगल्यांत वेदाक्षरांचा–

निदान रामरक्षेचा उच्चार तरी झाला आहे, असं नाहीं. मग असला भयाण जागेंतला बंगला भुतांनीं पछाडला, तर त्यांत कांहीं आश्चर्य का आहे बाई-साहेब ? अहो, त्यांत एक जखीण का हडळ हल्लीं येऊन राहिली आहे हो!' असं म्हणून सारी हकीगत मीं बाईसाहेबांनां इत्थंभूत रीतीनं सांगितली."

"मग ती ऐकून तुझ्या बाईसाहेब काय म्हणाल्या ?"

"कांहींच नाहीं बोलल्या–नुसत्या मुकाट्यानं बसून राहिल्या. त्या दिवशीं संध्याकाळीं अप्पासाहेब मोतीबागेंतून घरीं परत आले, अन् तस्से आंत येऊन आपल्या माडीवर गेले. कांहीं तरी कामाचें निमित्त करून मीहि त्यांच्या मागोमाग वर गेलें. दरवाज्याच्या आड उभी राहून मी ऐकूं लागलें, तों त्या नवराबायकोंत भांडण चाललं होतं–पण मोठ्यानं चाललं नव्हतं–म्हणून साऱ्याच गोष्टी कांहीं मला ऐकूं आल्या नाहींत. मात्र अप्पासाहेबांनीं रागारागानं एवढं म्हटलेलं मला ऐकूं आलं, कीं, 'बाबू जर माझं कांहीं वांकडं करूं लागला, तर मी त्याला याद राखेशी शिक्षा करीन! पाठचा भाऊ म्हणून त्याला कांहीं गय नाहीं करणार!'"

नर्मदेनें सांगितलेली ही चमत्कारिक हकीगत ऐकून केशवरावजींच्या डोक्यांत नानाविध विचार खेळूं लागले. मोतीबागेसंबंधानें त्यांनीं नर्मदेला किती तरी प्रश्न विचारले. बागेंतला बंगला कोठेंसा आहे, वरती किती खोल्या आहेत, त्या कोठकोठें आहेत, इत्यादि माहिती तिला त्यांनीं युक्तियुक्तीनें विचारली; परंतु थोड्या सामान्य माहितीशिवाय विशेष असें तिला कांहींच सांगतां आलें नाहीं. या गूढ रहस्यासंबंधानें आपणाला नीट खोल चौकशी केलीच पाहिजे, असा केशवरावजींनीं आपल्या मनाशीं निश्चय केला.

थोड्याच वेळांत सारा स्वयंपाक तयार झाला. पदार्थ वाढून पान तयार केल्यावर केशवरावजींची स्वारी त्यांचा समाचार घ्यावयाला पाटावर येऊन बसली. नर्मदा हळुहळू त्यांनां वाढूं लागली. त्यांच्याजवळ बसून "हा पदार्थ खा–तो पदार्थ कसा झाला आहे ? थोडा तरी आणखी घ्याच," अशा तऱ्हेनें आग्रह करकरून ती केशवरावजींनां वाढूं लागली. अशा रीतीनें केशवरावजींचें स्वकपोलकल्पित स्वप्न खरें झालें !

जेवण झाल्यानंतर आंचवून, दांतकोरण्यानें दांत कोरीत केशवराव हंसतहंसत म्हणाले "तूं इथेंच माझ्याच पानांत वाढून घेईनास नर्मदे?"

परंतु किती झालें, तरी नर्मदा ही एक हिंदु विधवा होती. ती केशवरावजींच्या या प्रस्तावाला कांहीं केल्या कबूल होईना. इकडे केशवरावजीहि आपला हेका सोडीनात! तेव्हां अगदींच रागावून, त्रागा करून नर्मदा म्हणाली " हें पहा, तुम्ही असा जर कांहीं चावटपणा कराल कीं नाहीं, तर मी आपली ही अश्शी निघून जातें, अन् फिरून साऱ्या जल्मांत तुमचं कधीं तोंड दिखील नाहीं बघणार-सांगून ठेवतें!"

प्रकरण अगदींच विकोपाला गेलें, आतां अतिप्रसंग करण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं, असें धूर्त केशवरावजींनीं तेव्हांच ताडलें. तेव्हां स्वारी आर्जवाच्या नरम सुरांत तिला म्हणते " असा अगदीं त्रागा काय बरें करतेस नर्मदे? अग, मीं ती सारी तुझी थट्टा केली. मला समजत का नाहीं, कीं, लग्न झाल्याशिवाय बायका नवऱ्याच्या पानावर जेवायला बसत नाहींत तें? पाहिली आपली तुझी थोडी थट्टा करून! पण इथें जेवल्याखेरीज मात्र तुला मी जाऊं देणार नाहीं खास!"

नर्मदेचाहि राग आतां बराच शांत झाला होता. केशवरावांशीं कांहीं न बोलतां तिनें आपलें निराळें पान वाढून घेतलें, आणि ती मुकाट्यानें जेवावयाला बसली. इकडे केशवरावहि बाहेर येऊन सतरंजीवर बैठक मारून बटवा सोडून विड्याची तयारी करूं लागले.

थोड्याच वेळानें नर्मदा कामाची निरवानिरव करून बाहेर आली व केशवरावांजवळ निरोप मागूं लागली.

तिच्याकडे टक लावून केशवराव म्हणाले " पण मला त्याबद्दल तूं कांहींच नाहीं जबाब दिलास नर्मदे?"

" कशाबद्दल?"

" अस्सल महत्वाच्या गोष्टीबद्दल? आपल्या पुनर्विवाहाबद्दल?"

नर्मदा कांहीं न बोलतां खालीं मान घालून थोडा वेळ स्तब्ध राहिली. नंतर ती म्हणाली "त्याबद्दल मी इतके दिवस विचार करतें आहें—"

"मग काय झाला तुझा निश्चय?"

"तुह्माला जें वरं दिसेल, तें करायचं! तुमच्यावांचून मला बरं बघणारं आहे कोण?"

संतोषाच्या स्वरानें केशवरावजी डुलतडुलत ह्मणाले "तर मग लग्नाला तुझी संमति आहे ह्मणायची! वा वा! फार आनंदाची, अत्यंत संतोषाची गोष्ट आहे. नर्मदे! या तुझ्या संमतीनें मला तूं किती सुखी केलेंस, याची तुला कल्पनाहि नसेल! एक दिवस आतां पुनः कधीं तरी एके ठिकाणीं बसून आपण त्यासंबंधानें सारें निश्चित करून टाकूं. कधीं येशील अशीच पुनः सांग पाहूं नर्मदे?"

"संधि सांपडतांच येईन मी!" असें ह्मणून नर्मदा दाराकडे जाऊं लागली. केशवरावहि उठून तिच्या मागोमाग तिकडे जाऊं लागले.

"विसरूं नकोस हो यायला!"

नर्मदा मागें वळून ह्मणाली "हें का मला सांगायला पाहिजे तुह्मीं! पण माझी एक गोष्ट ऐकायचं तुह्मीं कबूल केलं पाहिजे."

"काय ती गोष्ट नर्मदे?" केशवरावांनीं अत्यंत उत्कंठेनें विचारलें.

"उद्यांपासून उपास करायचं तुह्मीं अजीबात सोडून दिलं पाहिजे. पूर्वीप्रमाणं सकाळसंध्याकाळ सैंपाक करून तुम्हाला जेवलं पाहिजे. आहे क़बूल हें तुम्हाला?"

केशवरावजींनीं नर्मदेला हंसून संमति दिली. नंतर नर्मदा तेथून वाड्याकडे निघून गेली.

---

## प्रकरण अकरावें.

## मोतीबाग.

जुनगांवच्या पूर्वेकडील सीमेबरोबर 'भुईखादी' नांवाची एक लहानशी नदी वहात गेली आहे. नदीचें पात्र कांहीं तसें मोठें नाहीं; परंतु वर्षाकालीं यानदींत पाणी भारीच असून त्याला जोरहि विशेष असतो. कधींकधीं आजूबाजूच्या शेत–शेतकीचें नुकसान करण्यासारखा तिला पूरहि येतो.

अशा वेळीं आपल्या दोन्ही कांठांची जमीन खणून आपल्या पात्रांत गडप करून तें रुंद करण्याचा ती नदी प्रयत्न करीत असते. तिच्या या प्रतापावरूनच तिला 'भुईखादी' हें सार्थ नांव पडलें असावें.

या नदीच्या तीरावरच बनगांवापासून जवळजवळ एक कोस अंतरावर रावसाहेबांची मोतीबाग आहे. सुमारें वीसपंचवीस विघे जमीन या मोतीबागेनें व्यापिली आहे. बागेच्या चारहि बाजूंला कोठें बांबूंच्या कांटेऱ्यांचें कुंपण आहे, तर कोठें फडेनिवडुंगाच्या झाडांनींच सीमेवरील कुंपणाचें कार्य केलें आहे. बागेंतील बंगला दुमजली असून अगदीं नदीवरच आहे. बंगल्याच्या एका बाजूनें नदीच्या पाण्यापर्यंत पायऱ्या बांधिलेल्या आहेत. आंबा, जांभूळ, डाळिंब, लिंबू, पपनस, पेरू, रामफळ, सीताफळ वगैरे फळांच्या झाडांची बागेंत अगदीं रेलचेल आहे. खुद्द बंगल्याच्या आसपास मात्र निरनिराळ्या प्रकारच्या फुलझाडांची दाट राई आहे. मोठमोठ्या झाडांमध्यें बकुल, कण्हेरी, पांढरा व पिवळा चांफा हीं झाडें, व तांबड्या पांढऱ्या जास्वंदीहि विशेष दिसत आहेत. मोठमोठ्या फुलांनीं डंवरलेले गुलाबाचे ताटवेहि जिकडेतिकडे खूब दृष्टिगोचर होत असून इतर कांहीं फळझाडेंहि चहूंकडे वर माना करून उभीं आहेत.

मागील प्रकरणांत वर्णन केल्याप्रमाणें नर्मदेकडून माहिती काढून घेतल्यानंतर केशवरावजींची स्वारी किती वेळ तरी आपल्या सतरंजीवर विचार करीत पडली होती. नर्मदा मोतीबागेंत गेली असतां तिच्या कानीं जो रडण्याचा शब्द आला, तो भुतपिशाचाच्या रडण्याचा ध्वनि, या गोष्टीवर केशवरावजींचा कांहीं केल्या विश्वास बसेना. भुताखेतांच्या अस्तित्वावर केशवरावांचा विश्वास नव्हता, असें मात्र बिलकूल नाहीं. भूतयोनीवर त्यांचा संपूर्णपणें विश्वास होता; परंतु भरदिवसा दोनप्रहरीं मोतीबागेसारख्या ठिकाणीं—जेथें थोडी तरी मनुष्यवस्ती आहे, अशा ठिकाणीं भुतेंखेतें गळा काढून रडत कां बसतील, याचें कारण केशवरावजींना पुष्कळ डोकें खाजवून कळेना! अर्थात्, त्या धूर्त चाणक्यानें

मोतीबागेंतील बंगल्यांत कोणीतरी माणूस बंदिवान करून ठेविलें असलें पाहिजे, असा साहजिकपणेंच तर्क केला. इनामदारीचा व्यवहार हांकीत असतां मधुनमधून अशा प्रकारचें एकाददुसरें बेकायदेशीर काम केलें असतां सहज पचून जातें—आणि केशवरावजींनीं आपल्या 'अमदानीं'त अशीं कामें करून पचवूनहि टाकिलीं होतीं !

मोतीबागेंत कोणी तरी माणूस बंदिवान करून ठेवलेलें आहे खरें; पण तें असावें कोण ? मोतीबागेसारख्या ठिकाणींच त्याला ठेवण्यांत कां आलें आहे ? आणि ज्या बंगल्यांत अशासारखें एकादें बंदिवान माणूस ठेविलेलें आहे, त्या बंगल्यांत रावसाहेब दोनतीन दिवस स्वतः वस्ती करून रहातात, याचा तरी अर्थ काय ? मग तें बंदिवान माणूस एकादी स्त्री आहे, असा साहजिकपणेंच निष्कर्ष निघत नाहीं काय ? मनोहरपंतांनीं रावसाहेबांनां भांडणांत जी कडक धमकावणी दिली, तिचा संबंध या बंदिवान पुरुषाशीं किंवा स्त्रीशीं तर पोहोंचत नसेल ना ? काय वाटेल तें करून, हरएक युक्तिजुक्ति लढवून, रावसाहेबांच्या या गूढ रहस्याचा उलगडा आपणाला ताबडतोब केलाच पाहिजे!

अशा प्रकारचा निश्चय करून, अंगांत एक खादीची बारबंदी चढवून व डोकीला जुपरीच उपरण्याची टेपशी बांधून, हातीं एक भली थोरली उंच अशी बांबूची काठी घेऊन केशवरावजींची स्वारी प्रातर्भ्रमणाला म्हणून सहज बाहेर पडली. आज कचेरी बंद असल्यामुळें त्यांनां मागचा कांहीं घोर नव्हता. यामुळें घरीं परत यावयाला थोडाफार वेळ लागला, तरी चालण्यासारखें होतें.

केशवरावजी फिरावयाला म्हणून निघाले खरे, पण त्यांचा मोर्चा मात्र वळला मोतीबागेच्या दिशेकडे! फिरतांफिरतां हळुहळू ते बागे-जवळ तर येऊन ठेपले. परंतु ते ताबडतोब बागेंत मात्र शिरले नाहींत. दुरून बागेचा व बंगल्याचा जितका भाग दिसत होता, तेवढ्याचेंच ते बारीक नजरेनें निरीक्षण करूं लागले. बंगल्याचा जो भाग त्यांनां दृष्टि-

गोचर होत होता, त्या भागांतील सर्व खिडक्या अगदीं लावलेल्या होत्या—कोठेंहि मनुष्यप्राण्याचा वासवाराहि नव्हता.

केशवराव हलुहळू नदीच्या तीरावर येऊन ठेपले. नदीच्या पार व्हावयाला कांहींच साधन नाहीं, असें त्यांनां आढळून आलें. पलीकडील तीरावरचीं शेतें, मैदानें बालार्काच्या कोमल किरणांत हंसतडुलत आनंदानें नटलेलीं दिसत होतीं. दूरदूरच्या सीमाप्रदेशावरील बांबूंच्या दाट झाडींतून एका देवळाचें उंच शिखर व एका डौलदार वाड्याचा वरचा भाग अंधुकपणें दिसत होता—अर्थात् तेथें एकादा गांव असावा, असा कोणाचाहि सहज तर्क होण्यासारखा होता. तोंडानें एक अभंगाचा चरण गुणगुणत, हातांतील काठी मजेनें फिरवीतफिरवीत केशवरावजींची स्वारी या मनोरम सृष्टिसौंदर्याचा मनमुराद उपभोग घेऊं लागली. इतक्यांत एकाएकीं, जवळच थोड्या अंतरावर बागेच्या नजीकच्या नदी-तीरावरील घाटावर उभी राहून एक वृद्ध स्त्री एक लहानशी कळशी नदीच्या पाण्यानें भरीत आहे, असें त्यांच्या दृष्टीला पडलें. त्या म्हातारीपासून बऱ्याच अंतरावर असल्यामुळें तिचें तोंड वगैरे अवयव केशवरावजींनां स्पष्टपणें दिसणें शक्य नव्हतें. तरी तिच्या वेषादिकावरून ती बाई दक्षिणी नव्हे—कोणी तरी ‘ परदेशी ’ असावी, असा त्यांनीं सहजच तर्क केला. केशवरावजी आतां त्या जागेकडे अगदीं स्थिर दृष्टीनें पाहूं लागले. पाणी भरून कळशी कमरेवर घेऊन म्हातारी बंगल्याकडे निघाली आहे, असें त्यांच्या दृष्टीला पडलें. कदाचित् ती आपल्या दृष्टिआड होईल, या आशंकेनें केशवरावजीहि हलुहळू चालूं लागले. थोड्या क्षणांनीं ती वृद्ध बाई बंगल्याच्या एका दाराशीं पोहोंचली, व कमरेवरची कळशी खालीं ठेवून कमरेला खोंचलेली एक चावी तिनें बाहेर काढली. त्या दरवाज्याच्या कुलुपाला ती चावी लावून तिनें तें उघडलें व दार उघडून आंत शिरून तिनें तें आंतून बंद करून घेतलें. हा सर्व प्रकार केशवरावजींनीं झाडांमधून अंधुकअंधुक रीतीनें पाहिला. म्हातारी आंत गेल्यानंतर त्या दरवाज्या-कडे दृष्टि ठेवून केशवराव हलुहळू इकडूनतिकडे येरझारा करूं लागले.

थोड्या वेळांत ती म्हातारी दार उघडून बाहेर आली व तिनें तें बंद करून त्याला पुनः कुलूप घातलें, असें त्यांच्या दृष्टीला पडलें. त्या म्हातारीनें पुनः नदीतीरावर जाऊन पाण्यानें कळशी भरली व परत येऊन कुलूप काढून ती बंगल्यांत गेली. हें पाहून केशवराव हंसतहंसत आपणाशींच म्हणाले "वाः, हें मोठें जबरदस्त भूत दिसतें आहे बुवा! याची मोठी पखालीच तहान आहे! किती शिंच्याला पाणी लागतें हें!"

या वेळीं मात्र तीम्हातारी जी आंत गेली, ती फिरून कांहीं बाहेर आली नाहीं. थोड्याच वेळानें जवळच्या एका खिडकींतून हळुहळू धूर बाहेर पडत आहे, असें केशवरावांच्या दृष्टीला पडलें. तें पाहून ते आपणाशींच हंसून म्हणाले " वाः! हें भूत मोठें शोकीहि दिसतें आहे! बेट्याला कच्चें अन्न कांहीं चालत नाहीं—शिजवून अन्न तयार करावें लागतें! "

हळुहळू नऊ वाजण्याचा सुमार झाला. आपणाशींच अमृतरायाच्या एका पदाचा एक चरण गुणगुणत केशवराव बागेच्या थोरल्या फाटकाकडे जाऊं लागले. इकडेतिकडे पहातपहात, सावधपणें पाय टाकीतटाकीत फाटकाच्या आंत शिरून त्यांची स्वारी माळ्याच्या खोपटीपाशीं येऊन ठेपली. माळी त्या वेळीं झोंपडीच्या बाहेर एका खाटेवर बसून आपल्या मुलासाठीं एक कुडतें शिवण्यांत गढून गेला होता. गेल्या महिन्याचा आपला पगार घ्यावयाला ज्या वेळीं माळी बनगांवांत इनामदारांच्या वाड्याकडे गेला होता, त्या वेळीं त्यानें केशवरावजींनां तेथें पाहिलें होतें. अर्थात् त्यांनां पहातांच त्याला त्यांची तत्क्षणीं ओळख पटली. माळ्यानें चटकन् उठून केशवरावजींनां सलाम केला.

गंभीरपणानें केशवरावांनीं विचारलें "काय रे माळी! बरा आहेस ना?"

बरेंच मराठी व थोडें हिंदुस्तानी अशा मिश्र भाषेंत, हेंगाड्या स्वरानें " जी, बरा आहें!" असें म्हणून खाटेवरील सारे जिन्नस झटकन् उचलून तिच्यावर एक जुनी घोंगडी पसरून माळ्यानें केशवरावांनां बसावयाला जागा करून दिली.

केशवराव बसून म्हणाले "वा! मोठी छान सोय केली आहेस बुवा तूं! अच्छा! तंबाखूबिंबाखू बाळगतोस कीं नाहीं?"

"वा–तंबाखू नाहीं म्हणजे काय साहेब? आतां आणून देतों आपणाला तयार करून!" असें म्हणून माळी घाईघाईनें झोंपडींत निघून गेला व कांहीं वेळानें रसरशीत निखारे वर ठेवलेल्या गुडगुडींवरील विस्तव फुंकीत, हातांत एक कमळाच्या पानांची नळी घेऊन बाहेर आला. केशवरावांनीं खिशांतून चाकू बाहेर काढून ती नळी दोन्ही तोंडांना कापली व एक टोंक गुडगुडीच्या मोंकाला लावून व दुसरें आपल्या तोंडांत घालून ते फुरुक् फुरुक् करूं लागले.

तमाखूचा समाचार घेतघेत केशवरावांनीं विचारलें "काय रे माळी! थोडीं हिरवीं केळीं अन् एकाददुसरें नामी असें केळफूलबिळफूल देतोस का पाहून? काय सांगूं तुला? आजकाल बाजारांत भाजीबिजीसुद्धां चांगलीशी मिळत नाहीं. जेवणाचे मोठे हाल चालले आहेत माझ्या!"

माळी नम्रपणें म्हणाला "हो हो, देतों पाहून! येतों हा असाच घेऊन."

"अरे येशील–येशील घेऊन मग! काय मोठी घाई आली आहे मला! बस, बस तर खरा. दोन गप्पाटप्पा तर मारूं या, अन् मग जातांना जाईन घेऊन काय देशील भाजी ती!"

"जी, हुकूम साहेब!"

माळी जवळच खालीं भुईवर बसला. तो कोठला, कोण, त्याचीं माणसें वगैरे कोणकोण आहेत, त्याची स्थिति कशी काय आहे वगैरे माहिती, साळसूदपणें एकएक प्रश्न विचारून केशवरावांनीं हळुहळू त्याच्यापासून काढून घेतली. माळी रहाणारा मुळचा उत्तर हिंदुस्तानांतील चंपारण जिल्ह्यांतला. बारापंधरा वर्षांपूर्वी घर सोडून तो पोटाच्या निमित्तानें महाराष्ट्रांत आला. येथें त्याची स्त्री, एक मुलगा व एक मुलगी एवढें कुटुंब होतें. या दोन मुलांशिवाय आणखीहि त्याला दोन मुलें झालीं होतीं–पण तीं फार दिवस वांचलीं नाहींत.

केशवराव व माळी या उभयतांमध्यें संभाषण सुरू असतां माळ्याचा मुलगा उड्या मारीतमारीत तेथें येऊन उभा राहिला. त्याच्या पायांत कांशाचे वाळे, अंगांत एक मळकासा गंजिफ्राक, हातांत छोटेंसें धनुष्य व तीर होतीं. त्याला पाहून केशवरावांनीं विचारलें "हा तुझा मुलगा वाटतें माळी ? क्या रे छोकरा, क्या नाम तुह्मारा ?"

मुलगा त्यांच्याकडे टक लावून ह्मणाला "रामदासोग्या."

"रामदासोग्या ! ठीक ठीक ! ये लेकर जाव एक पैसा–मिठाई लेवो."

मुलानें चटकन् तो पैसा हातीं घेतला व तो पटकन् आपल्या डाव्या हातीं घेऊन त्याची घट्ट मूठ वळून धरली. तो हात पाठीमागें घेऊन उजवा हात केशवरावांपुढें करून तो ह्मणाला "आऊ—"

केशवराव हंसून ह्मणाले "और एक पैसा ? आच्छा--ये ले—"

'रामदासोग्या'नें पूर्वींप्रमाणें तोहि पैसा तत्क्षणीं मागच्या डाव्या हातांत लपवून सांठवून ठेवला व पुनः उजवा हात पुढें पसरून तो ह्मणाला "आऊ—"

आपल्या पोराची ही विलक्षण कर्तबगारी पाहून माळी बिचारा लज्जित होऊन गेला. "तूं तो बडा बदमाष पाजी लडका है," असें ह्मणून त्याला ओढीतओढीत तो आंत घेऊन जाऊं लागला. बापाच्या या अन्यायी वर्तनाचा निषेध करण्यासाठीं 'रामदासोग्या'नें सप्तम स्वरांत 'संगीता'ला आरंभ केला. हें पाहून केशवराव हंसून ह्मणाले "सोड–सोड माळी त्याला. आच्छा ! रामदासोग्या ! येहि ले तीसरा पैसा !"

तिसराहि पैसा याप्रमाणें पचनीं पडतांच आनंदानें नृत्य करीतकरीत 'रामदासोग्या' तेथून निघून गेला.

भावाला पैसे मिळाले, हें ऐकतांच त्याची लहान बहीणहि तेथें येऊन हजर झाली, आणि बिलकूल कांहीं 'प्रस्तावना' न करतां तिनें केशवरावजींपुढें हात पसरला. इतक्यांत माळ्याची बायको तेथें येऊन "आगे छोडी ! कैसी बदमाष है ! तोरा हम् मारतें मारते–" असें ह्मणून तिला धरून घेऊन जाऊं लागली. त्याबरोबर आपल्या भावाचें अनुकरण

करून तिनेंहि 'संगीता'ला आरंभ केला. हें पाहून केशवराव हंसून म्हणाले "थांब थांब–नेऊं नको तिला. आओ लडकी–तुई ओ दो पैसा जा लेकर."

माळी व केशवराव या उभयतांमध्यें गप्पाटप्पा सुरू असतां चिलमीवर चिलमी ओढून फस्त होऊं लागल्या. केशवरावजींच्या हातांतून मधुनमधून माळ्यालाहि प्रसाद मिळत असे. परंतु केशवरावांच्या ब्राह्मण्यनाशाच्या भयानें त्यांच्या नळीला मात्र स्पर्श न करतां तो नुसत्या हाताच्या मुठीनेंच आपली तलफ भागविण्याचा प्रयत्न करीत असे! अशा रीतीनें आणखीहि कांहीं चिलमी फस्त झाल्या.

आपल्या संसारसंबंधाच्या सुखदुःखांचें वर्णन करीत असतां माळी म्हणाला "आजकाल तर काळ मोठाच कठिण आला आहे साहेब! चहूंकडे पैशांचा दुष्काळ भोंवतो मला. या महिन्याची प्राप्ति त्या महिन्याला कांहीं पोंचत नाहीं. धनीसाहेबांनां सांगून मला जर कांहीं थोडा पगार वाढवण्याचें आपण मनावर घ्याल साहेब, तर गरीबावर भारी उपकार होतील! जन्मभर आपले हे उपकार स्मरूं आम्ही सारीं माणसें!"

माळ्याबद्दल वाटत् असलेल्या सहानुभूतीच्या उद्रेकानें आपलें हृदय अगदीं गळून गेलें आहे, असा विलक्षण आविर्भाव दाखवून केशवराव म्हणाले "अस्सें? तुझ्या सध्याच्या पगारांत तुझें अन् तुझ्या कुटुंबाचें कांहीं भागत नाहीं म्हणतोस? भारी कष्ट पडतात तुला अं? मग ही गोष्ट इतके दिवस तूं माझ्यापाशीं काढलीरे कां नाहींस? हे जे लोक घरेंदारें सोडून परदेशांत नोकरी करण्याकरितां येतात, ते कशाकरतां? तूं इतक्या लांब आलास–मी आलों–कशाकरतां आलों आम्ही? जर धडपणें पोटहि भरत नाहीं, तर आपलें घरदार सोडून इतक्या दूर देशीं येऊन पडण्यांत फायदारे काय? अच्छा! तुझ्यासाठीं धनीसाहेबांजवळ मी रदबदली करतों –त्याबद्दल नको तूं कांहीं काळजी करूं. अन् इकडे पहा, धनीसाहेब इकडे येतील कीं नाहीं कधीं, तेंव्हां तूंहि काढ त्यांच्याजवळ एकदां ही गोष्ट!"

"पण धनीसाहेब इकडे लवकर येणार आहेत का?"

"हो, येतील लवकरच एकाद दिवशीं. या वेळीं कामाची ह्मणजे कोण गर्दी आहे म्हणतोस! थोडकी सुटका झाली त्यांतून, म्हणजे धनीसाहेब आल्याशिवाय रहातील का काय इकडे?" असें म्हणून केशवरावांनीं एकवार बंगल्याकडे पाहिलें व तत्क्षणीं तेथून दृष्टि काढून ते गालांतल्या गालांत हळुहळू हंसूं लागले. हें पाहून माळी संदिग्ध भावानें केशवरावांच्या तोंडाकडे पहातच राहिला.

कांहीं वेळ निस्तब्ध राहून केशवरावांनीं विचारलें "एक म्हातारी होती इथें माळी, ती नाहींरे कुठें दिसत ती?"

"आहे, तीहि आहे इथें."

हें ऐकून माळ्याकडे पाहून केशवराव आतां उघडपणें हंसूं लागले. नंतर त्यांनीं विचारलें "ती बुड्डी तुझी कोण होतेरे माळी?"

"जी-ती होते माझी सासू. पण माझ्या बायकोची ती खुद्द आई नव्हे -चुलती लागते."

"अस्सें! माळी, तू अगदीं निमकहलाल नोकर आहेस, अशी आमची पक्की खात्री आहे. तुझ्या हिताकडे जर पहायचें नाहीं, तर पहायचें तरी कुठें? धनीसाहेबांनां सांगून मी तुझा पगार कांहीं तरी खास वाढवतों, याबद्दल तूं अगदीं निश्चित रहा! पण हें मात्र पहा हां बाबा-कधीं स्वप्नांत देखील--चुकूनसुद्धां धन्याशीं निमकहरामी नको करूं. समजलास ना?"

"कद्धीं नाहीं! यीं जिवांत जीव आहे, तोंपर्यंत माझ्या हातून कधींहि निमकहरामी व्हायची नाहीं!" असें ह्मणून माळी विशेष कुतूहलपूर्ण नजरेनें केशवरावजींकडे पहात राहिला.

"बरें तर-उठतों मी आतां. चल-मला थोडीं केळीं अन् केळफुल-बिळफूल भाजी दे थोडी काढून."

केशवरावांच्या हुकुमाप्रमाणें माळ्यानें थोडीं केळीं, दोनतीन केळफुलें आणि आणखी कांहीं भाजी आणली व ह्मटलें "पण ही तुह्मी नेणार कशांतून साहेब?"

" तुझ्याकडच्या एकाद्या फडक्याबिडक्यांत देना बांधून. उद्यां येऊन देईन मी तुझा फडका आणून. "

माळ्यानें आंत जाऊन एक साधारण पांढरा फडका शोधून आणला व त्यांत ती भाजी बांधून केशवरावांच्या हवाली केली. जातांना केशवराव त्याला ह्मणाले " बरें तर–येतों मी आतां. पहा, एक गोष्ट मी तुला सांगतों–पण ही कुणाच्या कानावर देखील जातां उपयोगी नाहीं, समजलास ना ? मी तर तुझा पगार वाढवण्याची खटपट करून पहातोंच ह्मणा, पण समज–नाहीं धनीसाहेबांनीं हें मनावर घेतलें, तर तुझ्याजोगती एक नोकरी आहे माझ्या टेहळणींत–पगारहि इथल्यापेक्षां चांगला मिळेल. काय आहे कबूल ? करशील नोकरी ती ?"

" कुठें आहे ती नोकरी साहेब ? "

" मी पूर्वी ज्या धन्यांकडे नोकरी करीत होतों कीं नाहीं, त्यांनां एका माळ्याची आहे जरूर. पुष्कळ दिवसांपासून ते एकाद्या परदेशी माळ्याच्या शोधांत आहेत. आमच्या इकडचे हे कोंकणी माळी अगदीं कुचकामाचे आहेत, असें त्यांचें ठाम मत झालें आहे. अन् तिकडले उत्तरहिंदुस्तानांतले माळी मोठे कष्टाळु, इमानी अन् भारी हुषार असतात, असें त्यांच्या तिकडे राहिलेल्या एका मित्रानें त्यांनां सांगितल्यावरून तसा एकादा माळी मिळवण्याच्या खटपटींत ते आहेत. ते नुकतेच एकदां मला ह्मणाले होते, कीं, 'एकादा असा माळी जर आपणाला मिळेल; तर पंधरावीस रुपयांपर्यंत आपण त्याला पगार देऊं !' "

माळी कांहींसा अधीरतेनें ह्मणाला " किती लांब आहे तें ठिकाण साहेब ?"

"तसें कांहीं फार लांब नाहीं. पुण्याच्या जवळच आहे त्यांचें तें गांव. माझा भाऊच तेथला मुख्य कारभारी आहे. पंधरावीस रुपये तर तुला दरमहा पडेलच; पण शेतीबिती करायची असली तुझ्या मनांत, तर कांहीं बिघे जमीन–अगदीं उत्तमापैकीं बघ–तुला नुसत्या नांवाच्या खंडावर माझ्या भावाच्या मार्फत देवविण्याची व्यवस्था करीन. पहा बुवा विचार आपला."

माळी क्षणमात्र विचार करून ह्मणाला "आपण अगोदर याच धनी-साहेबांकडे खटपट करून पहा. धनीसाहेबांनां कांहीं माझी दया येऊन थोडा पगारबिगार त्यांनीं वाढवला, तर ही नोकरी कांहीं मी नाहीं सोडीत. कशाला इकडूनतिकडे वाऱ्या करीत बसा! पण माझ्या दुर्दैवानें नाहींच धनीसाहेब वळले, तर–तर मग आपण ह्मणतां त्या ठिकाणीं मला लावून द्या–गरीबावर आपले उपकारांचे डोंगर होतील पहा!"

"अरे, खटपट करून पहातोंच मी. तूं का मला हें सांगायला पाहिजेस? होईल–इथल्या इथेंहि होईल तजवीज कांहीं तरी तुझा पगार वाढायची! अरे, हजारों असल्या गोष्टी, तरी धनी जुना तर खरा? जुन्या तांदळांचा भात केला तर देखील जर वाढतो, तर जुना धनी तुझा पगार कां नाहीं वाढवणार?" असें ह्मणून, जणूं काय आपल्या कोटिबाजपणावर अत्यंत खूष होऊन केशवरावजी खदखदां हंसूं लागले.

"तेंच ह्मणतों मी! गरीबावर दया असावी, दुसरें काय?" असें ह्मणून माळ्यानें केशवरावजींनां लवून सलाम केला व भाजीची झोळी हलवीत डुलवीत स्वारी हळूहळू गांवाकडे निघाली.

---

## प्रकरण बारावें.

## वैद्युतिक हिंदुसभा.

सातारा शहराच्या एका बाजूला एका लक्ष्मीपुत्राच्या मालकीची उपयोगांत नसलेली अशी एक जुनी लहानशी बंगली आहे. ही बंगली दुमजली असून तिच्या चारीहि बाजूंच्या भिंतींत वरपासून खालपर्यंत लहानमोठ्या बऱ्याचशा चिरा पडल्या आहेत. भिंतींवरील गिलावा तर बहुधा अजिबातच उडाला असून एकाद्या क्षयरोगी माणसाच्या देहाप्रमाणें ती बंगली दिसत आहे. भिंतींतून लहानलहान वडपिंपळांचीं झाडें उगवलेलीं दृष्टिगोचर होत आहेत. बंगल्याच्या चारहि बाजूंला पूर्वी बाग असल्याचीं कांहीं चिन्हें अवशिष्ट आहेत; परंतु या बंगल्याकडे किंवा बागेकडे कोणीच न पाहिल्यामुळें त्या बागेचें आतां

जंगलांत रूपान्तर झालें आहे. बागेचें फाटक तर अगदीं भग्नावस्थेत आहे; परंतु या फाटकाच्या एका बाजूच्या लाकडी खांबावर एक पाटी लटकावली असून तीवर इंग्रजी आणि देवनागरी लिपींत पुढील मजकूर लिहिलेला दिसत आहे:—

SOCIETY FOR THE PROPAGATION
OF
ELECTRICAL HINDUISM.
वैद्युतिक हिंदुधर्मप्रचारिणी सभा.

प्रत्येक रविवारीं संध्याकाळीं या 'वैद्युतिक हिंदुधर्मप्रचारिणी सभे'ची साप्ताहिक बैठक भरत असे. या सभेचे दोन प्रकारचे सभासद होते— एक साधारण सभासद व दुसरे विशिष्ट सभासद. साधारण सभासदांत बहुतेक नवी, तरुण मंडळी असून त्यांचीं वयें सोळापासून वीस-बावीस वर्षांचीं होतीं. या साधारण सभासदांना दरमहा आठ आणे सभेची वर्गणी द्यावी लागे. दुसऱ्या वर्गाच्या—म्हणजे 'विशिष्ट' सभासदांना वर्गणी वगैरे कांहीं द्यावी लागत नसे; आणि ही विशिष्ट मंडळी सभेच्या आठवड्याच्या बैठकीला हजरहि रहात नसत. या वर्गांतील बहुतेक सभासद शहरांतील मोठे लोक असून त्यांतील बहुतेकांची आचार-धर्म-निष्ठ हिंदु म्हणून प्रसिद्धि असे. सभेच्या अध्यक्षांनीं वारंवार विनंतिपत्रें पाठवून, भेटी घेऊन, आग्रह करकरून या मंडळीला सभेचे 'विशिष्ट' सभासद व्हावयाला लाविलें होतें. तरुण मंडळाच्या मस्तकांत शिरलेलें हें भलतेंच वेड पाहून या शिष्ट मंडळीला भारी दुःख होत असे, व मधुनमधून ही मंडळी त्यांना उपदेशाच्या चार गोष्टी सांगावयाला कमी करीत नसे.

या वैद्युतिक हिंदु सभेच्या अध्यक्षांचें नांव लक्ष्मणराव डोंगरकर. यांनीं पुण्याच्या डेक्कन कॉलेजांत कांहीं वर्षें काढिलीं होतीं. परंतु यांना युनि-

व्हर्सिटीच्या डिग्रीचा लाभ न झाल्यामुळें आज दोनतीन वर्षें ते घरींच बसून होते. लक्ष्मणरावांचे वडील साताऱ्यांतले एक श्रीमंत सावकार असून त्यांचा जमीनजुमलाहि मोठा होता. या लक्ष्मणरावांनींच या सभेची स्थापना केली होती. वारंवार गांठचे बरेचसे पैसे खर्च करून या सभेला त्यांनीं जीवंत राखिली होती, आणि या सभेचीं मतें किंवा तत्त्वें ह्मणून जीं कांहीं होतीं, त्यांपैकीं बहुतेकांचा उगम याच स्वारींच्या मस्तकांतून झाला होता, असें ह्मटलें असतां चालेल. कोठलाहि नवीन पंथ, मार्ग किंवा धर्मभेद निघाला, कीं, त्याला कमीअधिक प्रमाणानें अनुयायी हे मिळावयाचेच ! त्याप्रमाणें लक्ष्मणरावजींनांहि बरेचसे भक्तिमान् अनुयायी ऊर्फ शिष्य मिळाले होते, आणि सभेच्या सभासदांची संख्या दिवसेंदिवस फुगत असून हल्लीं ती जवळजवळ साठांच्या घरापर्यंत येऊन ठेपली होती.

या सभेचें ह्मणा, किंवा खुद्द लक्ष्मणरावजींचें ह्मणा, मुख्य तत्त्व किंवा मत असें होतें, कीं, विद्युत् ऊर्फ 'इलेकट्रिसिटी' ही आध्यात्मिक जगताची केवल शक्ति किंवा ' फोर्स ' आहे. पूर्वी ऋषि वगैरे मंडळी ज्याला 'ब्रह्मतेज' अशी संज्ञा देत, तें दुसरें कांहींहि नसून केवळ विद्युत् होय ! मनुष्याच्या आत्म्याचा देखील या विद्युत्मध्येंच अंतर्भाव होतो, असें ह्मटलें असतां चालेल. पूजाअर्चा, जपजाप्य वगैरे करण्याचा उद्देश हाच, कीं, त्यांच्या योगानें या विद्युत्च्या परिमाणाची वृद्धि व्हावी. आर्यांचीं सर्व क्रियाकर्में ही विद्युत् वाढविण्याकरितां योजिलेल्या युक्त्या होत, दुसरें कांहीं नाहीं. हिंदूंनां जे पदार्थ शास्त्रानें निषिद्ध ह्मणून सांगितले आहेत, ते एवढ्याकरतांच, कीं, ते सेवन केले असतां आत्म्याच्या विद्युत्ची हानि होते ! शास्त्रकारांनीं गंगास्नानानें पुण्य जडतें, असें जें सांगितलें आहे, त्याचें कारण दुसरें कांहींहि नाहीं—तर सर्व नद्यांपेक्षां गंगानदींत अधिक परिमाणानें विद्युत् आहे, हेंच होय. या प्रकारचीं या वैद्युतिक हिंदुसभेचीं मतें होतीं. ही मंडळी एका बाजूनें ज्याप्रमाणें नवीन सुधारकांनां, आर्य-ब्राह्म प्रार्थनासमाजांनां किंवा 'ईश्वर, धर्मबिर्म सब झूट है ' ह्मणणाऱ्या लोकांनां शिव्या देत, त्याप्रमाणेंच सर्वसाधारण सनातनधर्मवादी हिंदु लोकांनां,

ह्मणजे जे सरळ भक्तिभावानें आजे-पणजे-निपणजे यांनीं आचारिलेल्या धर्माचें पालन करीत असून तिळमात्र शंकाकुशंका घेतल्याशिवाय जे अंधश्रद्धेनें शास्त्रवाक्यावर पूर्णपणें विश्वास ठेवतात, अशा जुन्या मंडळीलाहि ' अंध, ' ' कुसंस्कारांनीं झपाटलेले ' अशा तऱ्हेचीं नांवें ठेवून त्यांची निंदा करावयालाहि कमी करीत नसत !

प्रत्येक रविवारीं वर सांगितलेल्या ठिकाणीं या सभेची आठवड्याची बैठक भरत असून तींत साधारण सभासद जमत असत. नाना प्रकारच्या वैद्युतिक तत्त्वांसबंधीं या बैठकींत चर्चा होत असून सभासदांपैकीं कोणी ना कोणी तरी सभासद अशाच तऱ्हेच्या एकाद्या विषयावर निबंध वाचीत असे. बैठकीला संध्याकाळीं चारपांच वाजतां आरंभ होऊन रात्रीं आठ-आठ नऊनऊ वाजेपर्यंतहि ती लांबत असे. अर्थात् सायंसंध्येचा वेळहि सभेच्या कामांत साहाजिक रीतीनें निघून जाई. तेव्हां संध्या टळण्याचें अधर्माचरण घडूं नये, ह्मणून सर्वांनीं मिळूनच एके ठिकाणीं सायंसंध्या आटोपण्याचा एक संक्षिप्त उपाय सभेच्या चालकांनीं आपल्या सुपीक मेंदूतून शोधून काढला होता. सभेचें मत तरी हेंच होतें, कीं, विद्युत्‌ची वृद्धि करण्यासाठींच संध्येच्या मंत्रांचें उच्चारण करावयाचें ! अर्थात् कोणत्या तरी उपायानें देहांतील विद्युच्छक्तीची वृद्धि होईल असें केलें, म्हणजे संध्या करण्याचें फळ पदरीं पाडून घेण्यासारखें आहे. असा विचार करून सभेच्या कायमच्या अध्यक्षांनीं बरेच पैसे खर्च करून एक विद्युद्वाहनयंत्र (बॅटरी) मुंबईहून मुद्दाम विकत आणलें होतें. सायंसंध्येची वेळ झाली, कीं, या यंत्राच्या साधनानें सर्व सभासदांच्या शरीरांत विजेचा प्रवाह उत्पन्न करून ते सायंसंध्येचें श्रेय व पुण्य संपादन करून घेत असत !

आज रविवार. संध्याकाळीं पांच वाजावयाच्या पूर्वीं सभेचे सभासद सभेच्या जागीं हळुहळू जमूं लागले होते. या सभासदांत साताऱ्याच्या बऱ्याचशा वकिलांचे चिरंजीव असून, एकदोघे श्रीमंत सावकारइनामदारांचे पुत्रहि होते. इतर सर्व सभासदांच्या वडिलांना लहानमोठ्या सरकारी किंवा सावकारी नोकऱ्या होत्या. ह्मणून सारे सभासद तरुण

ह्मणजे सोळा ते वीसबावीस वर्षांचे होते-त्यांपैकीं एकजण मात्र वृद्ध होता. या वृद्ध सभासदाचें नांव गुंडशास्त्री सोनटक्के. हे शास्त्रीबुवा शरीरानें अगदींच पाप्याचे पितर दिसत होते. यांनां आज कित्येक दिवस मलेरियानें चांगलाच हात दाखविला होता. शास्त्रीबुवांच्या सुरकुत्या पडलेल्या मुखमंडलाला त्यांची ती शुभ्र दाभणकांटी मिशी अपूर्व शोभा देत असे. त्यांचें तें भलें थोरलें भसाडें नाक गर्वभरानें आत्मघोषणा करीत असे. डोकीच्या बहुतेक सर्व भागाला लख्ख टक्कल पडलें असून तें प्रकाशांत चांगलें तळपत असे. शास्त्रीबुवांनीं अंगावर एक जुनी, वर्णहीन शालजोडी ऐटीनें लपेटली होती. ही शालजोडी आणि एक लांब बांबूचें सोडगें यांचा शास्त्रीबुवांशीं वियोग झालेला फारसा कधीं कोणाच्या पहाण्यांत नव्हता, असें ह्मटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. शास्त्रीबुवा सभेचे साधारण सभासद नव्हते; विशिष्टहि सभासद नव्हते. ते एक सभेचे वृत्तिभुक् आश्रित असून त्यांनां दरमहा सभेकडून दहा रुपये वेतन होतें. सभासदांच्या अर्थात् सभेच्या मतांचें व तत्त्वांचें समर्थन करणें, व शक्य असेल तर प्राचीन संस्कृत ग्रंथांतून एकाद-दुसरा श्लोक त्या मतांच्या प्रमाणार्थ शोधून काढणें, एवढेंच शास्त्रीबुवांचें काम असे. दरमहा बहुतेक बिनश्रमानें मिळणाऱ्या या दहा रुपयांच्या लोभानें सभासदांच्या वैद्युतिक तत्त्वांचे नवीननवीन 'रहस्योद्ग्राही' शोध ऐकून शास्त्रीबुवा माना डोलवून वहावा वहावा करीत असत, हें खरें; परंतु सभेंतून एकदां ते घरीं गेले, ह्मणजे शास्त्रीणबाईजवळ या सभेची नाना-प्रकारें थट्टाहेटाळणी करून ते ह्मणत "हे बऱ्या लोकांचे दिवटे चिरंजीव दुसऱ्या घाणेरड्या बदफैलींत वेळेचा अपव्यय न करतां असले खुळें पण निरुपद्रवी चाळे करतात, हा कांहीं लोकांच्या दृष्टीनें कमी फायदा नाहीं!"

पांच वाजून गेले. फुलस्केप कागदांची, वर जाड कव्हर असलेली एक मोठी चोपडी बगलेला मारून सेक्रेटरीसाहेबांची स्वारी सभागृहांत उपस्थित झाली. तुंदिलतनु अध्यक्षमहाराजहि हलतडुलत हलुहळू येऊन पोहोंचले. त्यांच्या मागून सभेच्या नांवाचा पट्टा आणि खाकी

पोषाक केलेला एक शिपाईहि आला. सभासद जमण्यापूर्वीच एका नोकरानें येऊन सभागृहांतील केर काढून, बैठकी वगैरे घालून सारी व्यवस्था चक्क करून ठेविली होती. सभागृहाच्या मध्यभागीं एक अर्धा हात उंचीची लांकडी फळ्यांची लहानशी बैठक असून तीवर एक गालिचा पसरलेला होता. हा 'प्लॅटफॉर्म' सभेची 'वेदी' म्हणून समजला जात असे.

शास्त्रीबुवांना बरोबर घेऊन अध्यक्षमहाराज–लक्ष्मणरावजी–वेदीवर येऊन बसले. शास्त्रीबुवांची जागा अर्थात्च त्यांच्या डाव्या बाजूला होती. वेदीच्यासमोर मध्यभागीं एक पांढऱ्या शुभ्र रंगाची भली थोरली धाबळी पसरली असून तीवर ब्राह्मणसभासद विराजमान झाले. उजव्या बाजूला तशाच एका काळ्या घोंगडीच्या बैठकीवर ब्राह्मणेतर पांढरपेशे सभासद बसले, व डाव्या बाजूला पसरलेल्या एका जीर्ण झालेल्या जाजमावर इतर सर्व जातींच्या सभासदांनीं आसन ग्रहण केलें. शास्त्रीबुवांनीं अस्पष्ट स्वरांत तीनचार संस्कृत श्लोक म्हणून सभेच्या कामाला आरंभ करून दिला. सेक्रेटरीसाहेब आपली चोपडी उघडून तीवर सभेच्या कार्यक्रमाची हकीगत भरभर उतरून घेऊं लागले.

शास्त्रीबुवांचें स्तोत्रपठन संपतांच अध्यक्षमहाराजांच्या आज्ञेवरून सभेचे त्या दिवशींचे व्याख्याते श्रीयुत बंडोपंत जोगळेकर हे आपला निबंध वाचावयाला उठले. त्यांच्या या निबंधाचा विषय "**सर्व जगांत भरतभूमि हीच कर्मभूमि कां?**' हा होता.

कोटाच्या आंतल्या खिशांतून व्याख्यात्यांनीं पांढऱ्या स्वच्छ रुमालांत बांधलेलें एक पुडकें बाहेर काढलें, व एकदोन वेळ त्यांतील पानें इकडेतिकडे चाळून, एकवार खांकरून घसा साफ करून, त्यांनीं निबंध वाचावयाला सुरुवात केली. निबंधाच्या पहिल्या पॅरिग्राफाची भाषा अतिशय संस्कृतमय, जड आणि गंभीर होती. '**विलायतचा प्रवास**'-कर्त्यांच्या भाषेचें अनुकरण करण्याचा त्यांत व्यर्थ प्रयत्न केल्याचें स्पष्ट दिसत होतें. बंडोपंत वाचूं लागले:—

" रजतकिरीटशाली मेघचुंबि भूभृद्राज हिमाचल ज्या भारतवर्षाच्या मौलिदेशाला अलंकारस्वरूप होऊन युगयुगान्तरापासून उभा राहिला आहे, नवीनजलदकान्तिनीलाटविपरिकीर्ण सिंहशार्दूलव्यालभल्लूकोद्वेजित विन्ध्यगिरि ज्या महाभूमीचें महार्ध मेखलाभूषण आहे, कूलप्लाविनी आल्हादिनी गंगागोदावरीनर्मदायमुनादि शततरंगिणी ज्या देशाला अहरहः आपल्या पीयूषधारांनीं परिसिंचित करून कलकलस्वन करीत विसर्पितगमनानें सरित्पतीच्या दिशेकडे धावमान होत आहेत, ती भरतभूमिच या विशाल जगतीतलावर एकटीच कर्मभूमि कां?हा आजच्या माझ्या प्रबंधाचा विषय आहे. अज्ञानतमसाच्छन्न, अतिकदर्य अशा जडतम बुद्धिबलानें युक्त असा मी मूढ या गूढतम गंभीर प्रश्नाचें सदुत्तर कसें देऊं ?"

निबंधकारांनीं अशा संस्कृतप्रचुर विचित्र भाषेंत निबंधाचा आरंभ केला खरा, परंतु दोनतीन पॅरिग्राफांच्या आंतच स्वारींची 'प्रौढ' भाषा अगदीं हलकीहलकी होऊं लागली. जेव्हां त्यांनीं प्रतिपक्षावर—अर्थात् एका बाजूनें, भारतवर्ष ही देव व ऋषिगण यांची लीलाभूमि असल्यामुळेंच ती जगावरची एकमात्र कर्मभूमि आहे असें प्रतिपादन करणारे सनातनधर्मवादी साधारण हिंदु, व दुसऱ्या बाजूनें भारतवर्षाखेरीज जगावरील इतर देशहि मानवजातींची कर्मभूमि होऊं शकतील असें प्रतिपादणारी नवीन अविश्वासी सुधारक मंडळी—या उभयतांवरहि हल्ला करावयाला आरंभ केला, तेव्हां मराठी वर्तमानपत्रांची कुचाळकीची ग्राम्य भाषा सुरू झाली. विरुद्ध पक्षाला सपाटून शिव्या देऊन निबंधाच्या शेवटीं निबंधकारांनीं आपल्या मताचें समर्थन करतांना खालीं दिलेल्या प्रकारानें अपूर्व युक्तिवाद केला होताः—

" या जगावर आपला हिंदुस्तान हीच एकटी कर्मभूमि आहे, पृथ्वीवरील दुसरा कोणताहि देश कर्मभूमि होऊं शकणार नाहीं, या आमच्या विधानाचें प्रमाण, अहो नवीन मताचे सुधारकपुंगव व सुधारकपुंगविणी हो! तुम्हांला आम्ही तुमच्या पाश्चात्य विज्ञानांतूनच काढून दाखविण्याची नम्र परवानगी घेतों. ग्यानोसाहेबांच्या 'फिजिक्स'मध्यें असें लिहिलेलें आप-

णांला आढळून येईल, कीं, इसवी सन १८२१ सालीं बर्लिन येथील प्रोफेसर सीबेकसाहेब यांनीं, दोन धातुखंडांनीं एक 'सर्कीट' तयार करण्यांत येऊन त्याच्या एका संयोगस्थलीं जर आगीची आंच देण्यांत आली, तर विद्युत्प्रवाह ताबडतोब सुरू होतो, असा शोध लावला. ही जी विद्युत्प्रवाहाची क्रिया सुरू होते, तिचें कारण इतकेंच, कीं, धातुखंडांच्या दोन्ही टोंकांशीं जर उत्तापाचें वैषम्य उत्पन्न झालें, तर विद्युत्प्रवाह सुरू होतो.

"आतां सभासदबंधुहो! आमच्या या भरतखंडाची नैसर्गिक स्थिति काय आहे, याचें आपण अवलोकन करा. दोनच काय, परंतु शेंकडों धातु या भारतवर्षाच्या मृत्तिकेंत गुप्त असल्याचें आढळून येतें. आपल्या देशाच्या शिरोभागीं चिरहिमाचा अति प्रचंड निधि असा हिमालय युगयुगान्तरापासून उभा ठाकलेला आहे, आणि हिंदुस्तानाचा पायथा निरक्षवृत्ताच्या अर्थात् 'इक्वेटर'च्या अगदीं जवळ आहे. याचा अर्थ असा, कीं, आमच्या देशाच्या माथ्यावर बर्फ आणि पायाशीं आग आहे! अशी स्थिति असल्यामुळें कन्याकुमारीच्या टोंकापासून तों वर हिमालयाच्या अत्युच्च शिखरापर्यंत भरतखंडांत सदासर्वदा विद्युत्प्रवाह सुरू असतो. इतकी विलक्षण शक्तीची विद्युत् पृथ्वीवरील दुसऱ्या कोणत्याहि देशांत नाहीं, ही गोष्ट आमच्या पाश्चात्यनृत्यशील सुधारक नर्तकनर्तकिणींनीं अवश्य ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. आपण सर्वांनीं भूगोलशास्त्राचें अध्ययन केलेंच आहे. पृथ्वीचा नकाशाहि पाहिलाच आहे. डोक्यावर बर्फ आणि पायांशीं विस्तव असा दुसरा एक तरी देश साऱ्या पृथ्वीवर आपण दाखवून द्याल काय? अशा प्रकारच्या विद्युत्प्रवाहाचा सुयोग आणखीं कोठल्या देशाला लाभलेला आहे, तें आपण कृपा करून मला सांगा. या सर्व कारणांमुळेंच भरतभूमि हीच एकटी या पृथ्वीतलावर कर्मभूमि आहे, असें मी ठांसून ह्मणतों!

"आपल्या परमपूज्य परमपवित्र पुराणग्रंथांतहि गोष्टींच्या रूपानें हेंच तत्त्व प्रकट झाल्याचें आढळून येत आहे. आम्हां आर्य लोकांचा जो त्रिगुणात्मक ईश्वर आहे, तो वैद्युतिक शक्तीचाच पूर्ण विकास होय. कुसंस्कारांनीं ज्यांचीं मस्तकें अगदीं कुजून गेलीं आहेत, अशी आमची जुनी

सनातनधर्माभिमानी मंडळी ज्याचें 'नारायण' ह्मणून पूजन करतात, ह्मणजे त्यांचा सृष्टिकर्ता–विष्णु–तो 'पॉझिटिव्ह इलेक्ट्रिसिटी'चा आधार होय. सृष्टीचा संहारकर्ता जो महेश्वर, तो 'निगेटिव्ह इलेक्ट्रिसिटी' शिवाय दुसरें कांहींहि नाहीं. ब्रह्मा हा केवळ 'झीरो पॉइन्ट' होय! महेश्वर--अर्थात् 'निगेटिव्ह इलेक्ट्रिसिटी'--बर्फाच्छादित हिमालयपर्वतावर वास करतो. विष्णु--अर्थात् 'पॉझिटिव्ह इलेक्ट्रिसिटी' हिंदी महासागरांत अनन्त-शय्या पसरून तीवर निजून राहिला आहे. अर्थात् देशाची अशी स्थिति असल्यामुळें कन्याकुमारीपासून माउंट एव्हरिस्टपर्यंत सर्व प्रदेशांत प्रचंड विद्युत्प्रवाह वाहिल्याशिवाय रहाणार कसा? या प्रचंड विद्युच्छक्तीमुळें आह्मां भारतवासीयांचा आत्माहि सदासर्वदा 'वैद्युतिक' अर्थात् 'इलेक्ट्रिफाइड' बनलेला असला, तर त्यांत मोठें नवल असें काय आहे?

शेवटीं, एका आधुनिक स्थानिक कवीच्या शब्दांनीं मी आपल्या या निबंधाचा उपसंहार करतों:—

'होवो विद्युलतेचा जय!
जय विद्युलतेचा जय!
संचरो ती विश्वांत निर्भय—
सर्वबलप्रतापी!
'गा गा विद्युच्छक्तिचा जय!
न धरी किमपि मानसीं भय!
तींतचि होवो मनाचा लय—
सदासर्वदा आपुल्या!'" •

बंडोपंतांनीं आपल्या या निबंधाचें वाचन संपवितांच सभासदांनीं जो टाळ्यांचा प्रचंड कडकडाट केला, त्याला केवळ प्रत्यक्ष विद्युल्लतेच्या प्रचंड कडकडाटाचीच उपमा शोभण्यासारखी आहे! हा टाळ्यांचा गजर संबंध दोन मिनिटें चालू असून त्यानें तें जीर्ण सभागृह अगदीं हादरूनच गेलें! सर्व सभासद बंडोपंतांच्या अपूर्व विद्वत्तेची, लेखन-पद्धतीची, सारवत्तेची, युक्तिकौशल्यप्रदर्शनक्षमतेची अगदीं 'यत्परो-

नास्ति ' स्तुति करूं लागले. बंडोपंत विनयशालीनतेमुळें खालीं दृष्टि लावून आपल्या जागीं शांतभावानें बसले होते.

दोनतीन मिनिटें सभास्थल अगदीं निस्तब्ध होतें. नंतर अध्यक्ष महाराज गंभीर वाणीनें सर्व सभासदांना उद्देशून म्हणाले "राजश्री बंडोपंत जोगळेकर यांनीं जो अपूर्व युक्तिकौशल्यपूर्ण विद्वत्ताप्रचुर निबंध वाचून दाखविला, तो आपण सर्वांनीं लक्ष्यपूर्वक, शांतपणानें ऐकलाच आहे. या निबंधासंबंधानें जर कोणाला कांहीं बोलावयाचें असेल, तर त्यांनीं थोडक्यांत बोलावें, अशी मी आपणांला विनंति करतों."

बंडोपंतांच्या वक्तृत्वाच्या किंवा विद्वत्तेच्या तेजानें दिपून गेल्यामुळें म्हणा, किंवा अन्य कांहीं कारणामुळें म्हणा, त्यांच्या निबंधावर कोणालाच कांहीं बोलावयाची स्फूर्ति अथवा छाती झाली नाहीं! अशा स्थितींत थोडा वेळ गेल्यावर शेवटीं डाव्या हातांत आपली जीर्ण तपकिरीची डबी घेऊन, आंगठा आणि तर्जनी या दोन अंगुलींमध्यें किंचित् तपकीर धारण करून आणि ती नासिकारंध्रांत बऱ्याच अंतरापर्यंत कोंबून शास्त्रीबुवा आपल्या कंपित-वाणीनें बोलूं लागले " राजश्री बंडोपंत जोगळेकर यांनीं जें कांहीं आपणांला आपल्या अधिकारयुक्त वाणीनें सांगितलें, तें संपूर्ण सत्य आहे! या विश्वांत 'इलेक्ट्रिरी'शिवाय दुसरें कांहींहि नाहीं. या विश्वाचें मूळ तत्त्वच आहे मुळीं इलेक्ट्रिरी! आपली ही भरतभूमि आहे कर्मभूमि, आणि पृथ्वीतलावरील इतर सर्व देश होत भोगभूमि! आपल्या विद्वान् पूर्वजांनीं लिहूनच ठेविलें आहे असें! विष्णुपुराणांत मी म्हणतों याचें प्रमाण आहे:—

' तत्रापि भारतं श्रेष्ठं जम्बुद्वीपे महामुने ।
यतोहि कर्मभूरेषा ततोऽन्या भोगभूमयः ॥ '

बंडोपंत जे आतां म्हणाले, कीं, हिमालयामध्यें खूब इलेक्ट्रिरी आहे, ती गोष्ट अगदीं संपूर्ण सत्य आहे. यासाठींच तर उत्तरेकडे डोकें करून निजूं नये, असा आपल्या धोरणी शास्त्रकारांनीं निर्बंध घालून ठेवला आहे. तस्य प्रमाणं यथाः—



" पांचसहा रुपये तरी कमीतकमी व्याज आलंच पाहिजे त्यांच-
दस्से रुपये लागले माझे तरी !" (पृष्ठ १२७.)

'प्राक्शिराः शयने विद्यां धनमायुश्च दक्षिणे ।
पश्चिमे प्रबलां चिन्तां हानिं मृत्युं तथोत्तरे ॥'

इति श्रीमार्कंडेयपुराणे ।

याचा अर्थ असा, कीं, उत्तर दिशेला डोकें करून निजलें असतां मनुष्याच्या शरीरांतील इलेक्ट्रिसिटी हिमालय आकर्षण करून नेतो आणि हा क्रम चालला असतां तो मनुष्य हळुहळू दुर्बल होऊन शेवटीं मृत्युमुखीं पडतो !"

असें ह्मणून शास्त्रीबुवांनीं दोनतीन वेळ जोरानें सडकून तपकीर ओढली. नंतर डबी आपल्या कनवटीला खोंचून बंडोपंतांकडे पाहून ते गंभीरतेनें ह्मणाले "बाबा बंडोपंत ! तूं आज ज्या तत्त्वांच्या गोष्टी आह्मांला ऐकविल्यास, त्यांनीं मी अत्यंत संतुष्ट झालों ! तूं आपल्या विद्वत्तेनें सर्व जगांत आपलें यश पसरशील आणि चिरंजीव होशील, असा माझा तुला पूर्ण आशीर्वाद आहे !"

शास्त्रीबुवांच्या या स्तुतीनें बंडोपंत लज्जित होऊन मस्तक खालीं घालून निस्तब्ध राहिले.

---

## प्रकरण तेरावें.

## उत्सवाची तयारी.

सायंकाळ झाला. सभेच्या नोकरानें येऊन दिवे लाविले. अध्यक्ष-महाराज सर्व सभासदांना ह्मणाले "सायंसंध्येची वेळ झाली आहे, तेव्हां आतां तीच अगोदर उरकून घेऊं या."

अध्यक्षांनीं खूण करतांच नोकरानें विजेची पेटी आणून वेदीवर ठेविली. तत्क्षणीं लक्ष्मणरावजी वेदीवरून खालीं उतरून ब्राह्मणसभासदांच्या कंपूंत येऊन उभे राहिले. सर्व ब्राह्मणसभासद एकमेकांच्या हातांत हात घालून उभे रहातांच पहिल्या आणि शेवटच्या सभासदांनीं

आपल्या मोकळ्या हातांत बॅटरीच्या पितळेच्या नळ्या धरिल्या, व शास्त्रीबुवांनीं हळुहळू बॅटरीची चावी फिरविण्याला आरंभ केला. पहिल्यानें जेव्हां विद्युद्यंत्र आणलें, तेव्हां एकजण नोकर चावी फिरवीत असे; शास्त्रीबुवा इतर ब्राह्मणसभासदांच्या चक्रांत उभे राहून त्यांच्याबरोबर विद्युत्प्रवाहाचा स्वीकार करीत असत. पण हात अतिशय झणझणतात, असें पाहून त्या त्रासांतून आपली सुटका करून घ्यावयाच्या उद्देशानें शास्त्रीबुवांनीं एका युक्तीचें अवलंबन केलें. ते लक्ष्मणरावजींनां ह्मणाले " हें पहा लक्ष्मणरावजी, तुह्मां सर्वांबरोबर मिसळून मीं विद्युद्ग्रहण करणें कांहीं बरें नाहीं. माझें वय तुह्मां सर्वांपेक्षां कितीतरी अधिक असून स्नानसंध्या, जपजाप्य इत्यादि साधनांमुळें मीं कितीतरी इलेक्ट्रिसिटीचा संचय केला आहे. तुह्मां तरुण मंडळीचें वय पडलें लहान. आहारादिकांसंबंधानें माझ्याइतकें मनःसंयमन करणें तुह्मांला शक्य नाहीं. तुमची इलेक्ट्रिसिटी माझ्यापेक्षां अर्थात्च कितीतरी कमी असणार, हें उघड आहे. तुह्मां सर्व तरुण सभासदांबरोबर उभा राहून मी जर इलेक्ट्रिसिटी घ्यावयाला गेलों, तर उलट माझ्यांत सांठून राहिलेल्या कांहीं इलेक्ट्रिसिटीचा अपव्यय होऊन ती तुमच्या शरीरांत निघून जाईल. म्हणून माझी तुम्हांला अशी सूचना आहे, कीं, तुम्हीं तरुण मंडळांनीं चक्र करून उभें रहावें, अन् मी यंत्राचा दांडा फिरवून तुमच्यांत इलेक्ट्रिसिटीचा संचार करवितों." अध्यक्षांनां शास्त्रीबुवांच्या या युक्तिवादाची सत्यता पटली, आणि त्या वेळेपासून शास्त्रीबुवांची इतर सभासदांच्या चक्रांतून मुक्तता होऊन त्यांची चावी फिरविण्याच्या कामावर योजना झाली.

ब्राह्मण सभासदांची सायंसंध्या आटोपल्यावर क्षत्रिय जातींत अंतर्भूत होणारे सभासद वेदीसमोर येऊन उभे राहिले. ब्राह्मणमंडळीपेक्षां जलदी जलदीनें चावी फिरवून शास्त्रीबुवांनीं त्यांचीहि संध्या उरकून घेतली. त्यांच्यानंतर वैश्य व शूद्र जातींच्या सभासदांचीहि संध्या अधिकाधिक त्वरेनें शास्त्रीबुवांनीं आटोपून दिली. नंतर सर्व सभासद पुनरपि आपापल्या जागेवर येऊन बसले.

कांहीं वेळानें सभेचे चिटणीस ह्मणाले " पहिली तारीख हळुहळू जवळ येत चालली आहे. या वर्षी आपल्या सभेच्या वार्षिक उत्सवाचा दिवस त्याच दिवशीं पडत आहे. अर्थात् उत्सवासंबंधीं कायकाय करावयाचें, तें ठरविण्यासाठीं व उत्सव पार पाडण्यासाठीं एक पोटकमिटी नेमणें आवश्यक आहे."

अध्यक्षांनीं विचारलें " वार्षिकोत्सवाच्या खर्चाची यादी तुह्मीं तयार केली आहे काय ?"

सेक्रेटरींनीं खिशांतून चटकन् एक कागद बाहेर काढला आणि खर्चाची याद ते भडाभड वाचूं लागले. निमंत्रणपत्रिका व कार्यक्रमपत्रिका छापविण्याचा खर्च, सभागृह शृंगारण्याचा खर्च, चहाकॉफी, बासुंदीपुरी, पानतंबाखू, सिगारेट वगैरे पदार्थांचा खर्च मिळून त्यांनीं जवळजवळ शंभर रुपये खर्चाचा अंदाज दाखविला होता.

अध्यक्ष ह्मणाले " हा खर्च सर्व सभासदांनीं सारखा वांटून घेतला पाहिजे. यासंबंधीं सर्वांचें मत काय आहे ?"

सभासदांपैकीं कोणींहि आपलें मत प्रगट केलें नाहीं. बसलेल्या थोंगऱ्यांकडे नजर लावून सर्वजण निस्तब्ध बसले होते. जणूं काय एकाद्या वैद्युतिक नव्या तत्त्वाविषयीं त्यांचें गंभीर चिंतन चाललें असावें, असें दिसत होतें!

चिटणीससाहेब उद्वेगाच्या स्वरानें ह्मणाले "सभेच्या फंडांत तर एक पैसादेखील जमा नाहीं; उलट आगाऊ खर्चच कितीतरी होऊन बसला आहे. सभेच्या बऱ्याचशा सभासदांकडे सभेची वर्गणी कितीतरी महिन्यांची येणें आहे. कोणाकडे दोन तर कोणाकडे पांच, कोणाकोणाकडे तर दहादहा रुपये बाकी येणें आहे. गेल्या वर्षाच्या उत्सवाप्रीत्यर्थ जी वर्गणी सभासदांवर बसली होती, तीपैकीं एक पैसुद्धां कोणीकोणीं सभासदांनीं आजमितीपावेतों दिलेली नाहीं! आपापल्याकडे निघणारी बाकी जर सभासदांनीं दिली नाहीं, तर उत्सव होणार कसा अन् सभा तरी चालणार कशी? आपले परमपूज्य अध्यक्षमहाराज उदार हृदयानें

आपल्या पदरचे पैसे खर्च करण्याची मेहरबानी करताहेत, ह्मणून सभा आजवर कशी तरी जीव धरून तरी आहे. या बाबतीकडे सभासद मंडळी जर अतःपर लक्ष्य देणार नाहींत, तर सभेच्या कामाला मोठीच हरकत येणार आहे."

अध्यक्षमहाराजहि खेदानें ह्मणाले "सभासदांच्या पटावर दरमहाच्या वर्गणीचा आंकडा जो दिसतो, त्यापैकीं अर्धी रकमसुद्धां नियमित रीतीनें वसूल होत नाहीं. आणि सभेचा खर्च तर मासिक वर्गणीहून थोडासा अधिकच आहे. आणखीहि थोडाबहुत जर खर्च आह्मांला करतां आला असता, तर त्यानें सभेचें केवढें तरी हित साधतां आलें असतें. विद्यु-द्विषयक चांगलेचांगले इंग्रजी भाषेतले ग्रंथ विकत घेणें आह्मांला अत्यंत आवश्यक आहे. आपल्या सभेमार्फत एक मासिकपुस्तक प्रसिद्ध होणेंहि अत्यंत जरूरीचें आहे. येथें जो गंभीर विषयांवर वादविवाद किंवा समालोचन होतें, जे उत्तमोत्तम निबंध येथें वाचले जातात, ते सर्व आमच्यांतल्या आमच्यांत जिरून जातात; जगाला त्यांचा कांहींसुद्धां उपयोग होत नाहीं. आपल्या सभेचें जर एकादें मासिकपुस्तक असेल, तर हे सर्व विषय, हीं सर्व तत्त्वें, त्यांत हळुहळू प्रकाशित करतां येऊन त्यापासून जगाचें कितीतरी कल्याण आपणांला करतां येणार आहे. परंतु या सर्व कामांला कितीतरी भांडवलाची आवश्यकता आहे. मासिक आठ आणे वर्गणीवर हीं सारीं कामें निभावणार कशीं? मी एकटा मनुष्य सभेच्या निमित्त खर्च तरी किती करूं शकणार? यासंबंधानें कांहीं ना कांहीं तरी व्यवस्था करणें आवश्यक आहे."

शास्त्रीबुवा म्हणाले "सभेच्या जमाखर्चाची गोष्ट ज्या अर्थी आपणां-समोर निघाली आहे, त्या अर्थी याच बाबतीसंबंधानें मलाहि जें कांहीं सांगावयाचें आहे, तेंहि या प्रसंगीं आपल्या कानांवर घालून ठेवणें मला उचित दिसतें. मला दरमहा दहा रुपये सभेकडून जें वेतन मिळतें, त्यांत कोणत्याहि तऱ्हेनें आतां माझा निभाव लागेनासा झाला आहे. डाळ, तांदुळ वगैरे धान्यधुन्याची अलीकडे जी विलक्षण महर्घता झाली आहे,

तीमुळें आम्हांला आतां एकभुक्त दिवस काढावे लागणार, असें मला वाटूं लागलें आहे."

शास्त्रीबुवांची ही करुणावाणी ऐकून सर्व सभासद एकदम समस्वरानें ओरडले "सर्वनाश ! सर्वनाश ! असें कांहीं करूं नका शास्त्रीबुवा ! त्यामुळें आपल्या शरीरांतली इलेक्ट्रिसिटी कमी होईल ना !"

"इलेक्टिरी कमी होईल, या भयानेंच तर मी आजवर आंबेमोहराचा भात अन् चपात्या खातों आहे. आंबेमोहराचे तांदुळ, गहूं, साजुक तूप वगैरे जिनसांत सर्वांपेक्षां अधिक इलेक्टिरी असते. तांदुळ, गहूं वगैरेंबद्दल तर मीं आपणांला सांगितलेंच. साजुक निर्भेळ तूप तर अलीकडे बहुतेक दुर्मिळच झालें आहे. जर कुठें मिळालें थोडेंबहुत, तर त्याचा भाव कांहीं विलक्षणच चढून बसला आहे. बाजाराला तर अशी अलीकडे आग लागून गेली आहे, कीं, नुसती एकादी साधी भाजी जरी घ्यायला गेलों, तर दोनचार पैशांला एवढाएवढी येते ! आतां खावें काय अन् शरीरांतली इलेक्टिरी वाढवावी तरी कशी ? आपणच सांगा सर्वजण ! माझें वेतन जर आणखी पांच रुपयांनीं आपण वाढविलें नाहीं, तर माझी कांहीं धडगत नाहीं, हें मी आपणाला स्पष्ट सांगतों." असें म्हणून शास्त्रीबुवा व्याकुलतेनें अध्यक्षमहाराजांकडे पहात राहिले.

लक्ष्मणराव म्हणाले "या बाबतीसंबंधानेंसुद्धां आपणांला अवश्य विचार केला पाहिजे. सभेची अलीकडे जी अत्यंत शोचनीय अवस्था झालेली आहे, तिच्यांतून जर आपणांला पार पडायचें असल, तर आणखीहि कांहीं तरी श्रीमंत सभासद आपणाला मिळविले पाहिजेत; नाहींतर कांहीं आपली धडगत नाहीं. या आपल्या सातारा जिल्ह्यांतच पहाना, कितीतरी श्रीमंत इनामदार, सावसावकार आहेत; त्यांचे 'बडे बापके बेटे' मोटार गाड्याघोडे उडवीत, नानातऱ्हेचे नबाबी खेळ खेळून पैशांचा चक्काचूर उडवीत असतील. यांपैकीं कांहीं लक्ष्मीपुत्रांना जर आपल्या सभेचे सभासद आपणांला करतां आलें, तर अनायासेंच आपल्या सभेचें दारिद्र्य दूर होणार असून आपलें कामहि दुप्पट उत्साहानें आपणाला चालवितां

येईल. यासाठीं सभासदांनां माझी अशी सूचना आहे, कीं, या वर्षाच्या आपल्या उत्सावाला कांहींकांहीं निवडक बड्या लोकांच्या या बेट्यांनां निमंत्रणपत्रिका पाठवून आग्रह करकरून त्यांनां येथें आणलें पाहिजे. आपल्या सभेचे उद्देश, तत्त्वें आणि जगावर तिचे होणारे उपकार यांविषयीं त्यांनां प्रत्यक्ष माहिती मिळाली, तर ते आपल्या सभेचे सभासद झाल्याशिवाय कधींहि रहाणार नाहींत, अशी माझी खात्री आहे."

सर्व सभासदांनीं म्हटलें "बा: ! फार चांगली आहे आपली योजना!"

सेक्रेटरी म्हणाले " यांतली मुळांतली खुबी काय आहे, ती आली का आपल्या लक्ष्यांत ? धर्माच्या ठिकाणीं श्रद्धायुक्त अशी बुद्धि थोड्याच लोकांची आहे. गंभीरपणानें कोठल्याहि विषयाचें चिंतन करणें हें सर्वथा उचित आहे; पण तें होतें आहे किती थोड्या लोकांच्या हातून ! ज कोणी अलीकडच्या मंडळीपाशीं तात्त्विक चर्चा करूं लागले, तर ते हंसून हेटाळणीनें गोष्ट अजिबात उडवूनच देतात ! त्या दिवशीं आमच्याकडे मुंबईहून दोघे चांगले सुशिक्षित गृहस्थ आले होते. अस्सल हिंदु म्हण विण्यांत त्यांनां मोठा आभिमान वाटत असतो. पण आमच्या सभेची उद्देशपत्रिका वाचून ते जे हंसायला लागले, ते बेसुमारच ! त्यांपैक एकजण तर मला म्हणाला "अच्छा महाराज ! एक विजेची तार आणू तिच्या दोन टोंकांनां आपल्या सभेंतील दोघे बडे सभासद बसवून ज त्यांच्या पोटांशीं त्या तारेचा संयोग करून दिका, तर भपकन् त्या तारे तून विजेची ज्वाला निघेल ना ? आपणाला अशा रीतीनें वाटेल तें विजेचे दिवे लावतां येतील ! "

सेक्रेटरींनीं सांगितलेली ही हकीगत ऐकून सर्व सभासदांचे डो रागानें लालबुंद होऊन गेले ! फक्त एक शास्त्रीबुवांच्या अधरावर म हास्याची क्षीण रेषा दिसूं लागली होती; परंतु त्यांनीं धूर्तपणानें तत्का ती हर्षरेखा तेथून नाहींशी करून टाकली !

साताऱ्यांत भाऊसाहेब बिनीवाले म्हणून एक प्रसिद्ध वकील हो त्यांचे चिरंजीव रघुनाथराव ऊर्फ बाळासाहेब या सभेचे उत्साही स

सद होते. ते ह्मणाले "दुष्ट अन् हलकट स्वभावाचे लोकच या जगांत फार असतात, हें उघड आहे. तरी शोधायलाच लागलें, तर आमच्या अध्यक्षमहाराजांसारखे तत्त्वज्ञानी लक्ष्मीपुत्र निदार चारदोन तरी सांपडणें कांहीं अशक्य नाहीं. थोड्या दिवसांपूर्वी इथें प्रॅक्टिस करावी ह्मणून चौकशी वगैरे करण्याकरितां एक तरुण वकील चारदोनदां इथें येऊन गेले होते. त्यांचें नांव मनोहरपंत देशमुख. पुढें त्यांनीं इथें प्रॅक्टिस केली नाहीं; मुंबईला वर्षभर केली, पण विशेष कांहीं जमली नाहीं, अन् वकिलीचा धंदाहि त्यांनां आवडत नसल्यामुळें ते घरीं–वनगांवला येऊन बसले आहेत. मनोहरपंत एम्. ए., एल्एल्. बी. आहेत, तरी अत्यंत धर्मनिष्ठ अन् सरळ हृदयाचे आहेत. अद्यापि ते अविवाहितच आहेत. सुपारीच्या खांडाचेंहि त्यांनां व्यसन नाहीं. कांदेलसूणहि गृहस्थाला चालत नाहीं. ते नेहमीं स्नानसंध्या, जपजाप्य, वेदांताध्ययन इत्यादि कृत्यांतच निमग्न असतात. मनोहरपंतांच्या इनामतींतल्या तांवखेड गांवचा सखाराम कुडव नांवाचा एक इसम कांहीं मुकद्दम्यानिमित्त बाबांकडे आला आहे. या सखारामाच्या तोंडून मनोहरपंतांविषयीं मीं ज्या गोष्टी ऐकिल्या, त्यांवरून ते एक आधुनिक ऋषिच आहेत, अशी माझी कल्पना झाली आहे. अशा गृहस्थाला जर आपल्या सभेचे उद्देश, उपयोग वगैरे नीट समजावून दिले, तर ते उदार हातानें आपल्या सभेला द्रव्यसाहाय्य केल्याशिवाय राहणार नाहींत, अशी माझी पक्की खात्री आहे."

लक्ष्मणराव मान डोलवून ह्मणाले "हो हो, या मनोहरपंतांची एकदां मुंबईला अन् एकदां इथें माझी गांठ पडली होती खरी. गृहस्थ ज्ञानी अन् सज्जन आहे, यांत कांहीं संदेह नाहीं. मनोहरपंतांनां उत्सवाला इथें आणलेंच पाहिजे!"

सेक्रेटरींनीं विचारलें "मनोहरपंतांचा पत्ता काय? त्यांनां आतांच्या आतां निमंत्रणाचें पत्रच लिहितों."

अध्यक्ष ह्मणाले " नुसतें निमंत्रणाचें पत्र पाठवून काम होईल, असें मला वाटत नाहीं. मी स्वतः त्यांनां एक पत्र लिहितोंअन् बाळासाहेब तुमच्या त्या सखारामाच्या हातीं तुह्मीहि एक पत्र मनोहरपंतांनां अवश्य पाठवा; अन् या सखारामाला आग्रहानें सांगा, कीं, काय वाटेल तें करून आमच्या उत्सवाच्या दिवशीं मनोहरपंतांनां स्वतः इथें घेऊन आल्या-खेरीज कांहीं राहूं नकोस ! हा सखाराम परत कधीं जाणार आहे गांवाला? "

" मला वाटतें, उद्यांच जाईल तो. "

" तर मग उद्यां सकाळीं मनोहरपंतांनां एक पत्र लिहून मी तुमच्या-कडे तें पाठवून देतों. तें सखारामापाशीं देऊन, मीं सांगितल्याप्रमाणें मनोहरपंतांनां काय वाटेल तें करून उत्सवाच्या दिवशीं इथें घेऊन यायला सांगा त्याला. "

यानंतर आणखीहि कांहीं लक्ष्मीपुत्रांचीं नांवें सुचविण्यांत आलीं. त्यांनां कोणत्या उपायांनीं उत्सवाच्या दिवशीं सभास्थलीं आणतां येईल, याविषयीं सभासदांमध्यें चर्चा चालू झाली. उत्सवाकरितां कार्यकारी मंडळहि नेमण्यांत आलें.

हलुहळू नऊ वाजावयाचा सुमार होत आला. अध्यक्षांनीं विचारलें "आजच्या सभेच्या बैठकींत आतां कुणाला कांहीं बोलायचें किंवा कांहीं शंकानिवृत्ति वगैरे करून घ्यायची आहे काय ?"

यशवंतराव रानडे नांवाचे एक सभासद ह्मणाले " होय—"

" काय ?"

"एक मोठा संशय माझ्या मनांत उपस्थित होऊं पहात आहे. आमच्या या सभेच्या मतें भुताखेतांचें अस्तित्व नाहीं—"

बरेचसे सभासद एक स्वरानें एकदम ह्मणाले "नाहीं—अर्थात् नाहीं ! त्यांचें अस्तित्व असणेंच शक्य नाहीं. या प्रगतीच्या कालीं विज्ञानयुगा-मध्यें—कुसंस्कारांनीं कुजलेल्या माथ्यांच्या जुन्या हिंदूंशिवाय, किंवा वायूनें झपाटलेल्या थिऑसफिस्टांशिवाय भुतांवर कोणाचा विश्वास असणार आहे ?"

यशवंतरांव कांहींसे शरमिंदे होऊन ह्मणाले " माझेंहि मत आपणां सर्वांप्रमाणेंच आहे. परंतु काल एका सभ्य गृहस्थाच्या तोंडून जी एक विलक्षण गोष्ट मीं ऐकली, त्यामुळें मला आश्चर्यानें थक्कच व्हावें लागलें! त्या गृहस्थानें केवळ एकवारच नाहीं, तर दोनदोन वेळ भूत पाहिलें– अन् हा गृहस्थ ह्मणजे कांहीं तेलीतांबोळ्यांसारखा अज्ञान नव्हे. चांगला बी. ए. ची पदवी धारण करणारा, सरकारी शिक्षणखात्यामध्यें बरींच वर्षें चाकरी करून हल्लीं पेन्शन घेऊन राहिलेला आहे. कांहीं तरी खोटें-नाटें सांगून किंवा भुलथापा देऊन मला फसविण्यांतहि त्याला कांहीं मोठा उद्देश साधायचा नव्हता, अशी माझी खात्री आहे. अर्थात् अशा सद्गृहस्थानें स्वतःच्या डोळ्यांनीं जें कांहीं पाहिलें, त्यावर विश्वास ठेवल्या-खेरीज मला गत्यंतर नाहीं!"

यशवंतरावांचें हें भाषण ऐकून अध्यक्षमहाराजांची स्वारी तर मोठमोठ्यानें खोखो करून हंसूं लागली. हंसतहंसत ते हेटाळणीनें मान डोलवूं लागले. ते हंसत आहेत असें पाहून इतर सभासदहि मोठमोठ्यानें हंसूं लागले. फक्त एक शास्त्रीबुवा मात्र यशवंतरावजींकडे, उत्सुकतेच्या दृष्टीनें पाहूं लागले.

हंशाचा ओघ बराचसा ओसरल्यावर लक्ष्मणरावजी यशवंतरावांकडे पाहून गंभीरपणें ह्मणाले " यशवंतराव, डोळ्यांनीं पहाणें ह्मणजे अगदीं बिनतोड प्रमाण, असाच तुमचा समज आहे का? मनुष्याला जितकीं ह्मणून इंद्रियें आहेत, त्यांपैकीं सर्वांत डोळाच मनुष्याला अधिक फसवीत असतो, हें तुह्माला माहीत नाहीं का यशवंतराव?"

बिचारे यशवंतराव तर अगदींच खजील झाल्यासारखे झाले. अत्यंत लज्जित होऊन एकाद्या अपराध्याप्रमाणें खालीं मान घालून ते म्हणाले "होय, खरें आहे हें. अन् यासाठींच तर सभेपुढें हा प्रश्न मीं मुद्दाम या वेळीं उपस्थित केला. या हकीगतीमुळें कांहीं तरी उपयुक्त चर्चा होऊन कांहीं तरी तत्त्वबोध होईल, असें मला वाटलें."

सेक्रेटरीसाहेबांनीं खसाखस प्रेन चालवून यशवंतरावांचा संशय व प्रश्न आपल्या पक्क्या चोपडींत लिहून घेतला. नंतर त्यांच्याकडे वळून ते म्हणाले " यशवंतराव, तर मग तुम्ही सर्व हकीगत अगदीं सविस्तर रीतीनें सांगा. म्हणजे मग या प्रश्नाचा योग्य असा उलगडा करून द्यायचा सभा प्रयत्न करील."

यशवंतराव म्हणाले " त्या गृहस्थाकडून ती हकीकत जशी मीं ऐकली, तशीच गोष्टीच्या रूपानें मीं ती कागदावर लिहून ठेविली आहे. नंतर मीं तो लिहिलेला मजकूर त्या गृहस्थाला दाखविला, तो वाचून पाहून 'सर्व कांहीं बरोबर लिहिलें आहे,' असें तो म्हणाला. इतकेंच नाहीं, तर ही हकीगत अगदीं खरी आहे, अशा मजकुराचा शेराहि त्यानें लेखाच्या शेवटीं सहीनिशीं लिहिलेला आहे. जर सभेची अनुमति असेल, तर मी तो लेख आपणांला वाचून दाखवितों."

घड्याळांतील कांटा त्या वेळीं साडेनवांची वेळ दाखवीत होता. बाहेर अंधकार पडला असून झाडांतून वारा सणसण करीत वहात होता. सभागृहांतील मोठ्या दिव्यांतील ज्योत त्या वायूच्या लहरींनीं कंप पावून धुराचे फवारे सोडूं लागली. आकाशांत अकालीं मेघावडंबर जमून वृष्टिहि पडत असावी, असें भासत होतें. मधुनमधून आकाशांतु कसला गुरगुर असा ध्वनिहि होत होता. अध्यक्षांच्या आज्ञेनें यशवंतरावांनीं पुढील प्रकरणांत ग्रथित केलेला लेख मृदु मंद स्वरानें वाचावयाला आरंभ केला.

---

## प्रकरण चवदावें.

## भुताटकीची एक गोष्ट.

" माझें नांव गंगाधर गोविंद गुप्ते. ठाणें जिल्ह्यांत चिंचगांव म्हणून एक खेडें आहे, तेथील मी रहाणारा. १८—सालीं बी. ए.ची परीक्षा पास झाल्यानंतर मी नोकरीचा शोध करूं लागलों. पुष्कळ दिवसपर्यंत पुष्कळ ठिकाणीं नोकरीबद्दल अतिशय खटपट केली; परंतु कोठेंहि फारसें यश

आलें नाहीं. मुंबईला मला चांगलीशी नोकरी मिळावी, अशी माझी फार इच्छा होती; परंतु ती नीटपणें साध्य होण्याचा रंग दिसेना. इतक्यांत ठाण्याच्या हायस्कुलांतच थर्ड असिस्टंट मास्तराची जागा रिकामी झाली असल्याचें मला कळलें. तत्क्षणीं मी ठाण्याला जाऊन बरीचशी खटपट करून ती जागा तर मिळविली. एकदांचे घोडें गंगेंत न्हाऊन मला पन्नास रुपये दरमहा मिळूं लागले.

"आमचा गांव ठाणें शहराहून दहाबारा कोस अंतरावर असून त्या दोन स्थळांमध्यें साधारण बऱ्यापैकीं अशी एक सडक आहे. नोकरी मिळाल्यानंतर मी तसाच गांवीं गेलों, व आपलें सामानसुमान, कपडे वगैरे घेऊन येऊन तिसऱ्या दिवशीं आपल्या नोकरीवर रुजू झालों. माझी घरची गरीबी असल्यामुळें आणि पगारहि बेताचाच असल्यामुळें रहावयासाठीं मी लहानसें व थोड्या भाड्याचें घर शोधूं लागलों; परंतु बरीच खटपट करूनहि 'अल्पमोली, बहुगुणी, आंखूडशिंगी व बहुदुधी' अशी 'गाय' मला मिळेना! आमच्या सुस्वभावी आणि स्नेहशील अशा हेडमास्तरांच्या घरींच मीं पहिल्यानें भोजन व झोंप यांची व्यवस्था केली होती. नोकरीचें काम संभाळून मला जो वेळ मिळे, तो मी घरें शोधण्यांत घालवीत असें. शेवटीं, शहराच्या एका दूरच्या टोंकाला एक बरेंच मोठें व थोड्या भाड्याचें असें घर आहे, असें ऐकल्यावरून मी त्या घराच्या शोधाला गेलों. घर पुष्कळ दिवस रिकामें पडलें होतें. घर होतें जुनेंच—कांहींकांहीं ठिकाणीं तर भिंतींना लहानलहान भेगा देखील पडल्या होत्या; परंतु घराचा बराचसा भाग रहावयाला योग्य असा शाबूत होता. घराचें भाडें सारें होतें दरमहा पांच रुपये; परंतु हें घर भुताटकीनें पछाडलेलें आहे, अशी लोकांत बरीच कुणकुण होती.

"त्या वेळीं आम्ही कॉलेजांतून नुकतेच बाहेर पडलेले विद्वान् ग्रॅजुएट! यंग इंडिया! भुताखेतांच्या भयानें अशा वेळीं जर मीं माघार घेतली, तर माझें शिक्षण आणि संस्कृति यांची किंमत ती काय राहिली! असा विचार करून मीं तें घर घ्यायचा तर निश्चय केलाच. परंतु शहरापासून-

मनुष्यवसतीपासून-जरा दूरच आणि अगदीं भयाण अशा जागीं तें घर असल्यामुळें तेथें एकटेंच रहाणें बरें नाहीं, चोरांचिलटांचा उपद्रव होणें शक्य आहे, असें वाटल्यावरून कोणी तरी 'सहवासी' मित्र मी शोधूं लागलों, आणि थोड्याच वेळांत मला असा एक मित्र आढळलाहि. हे गृहस्थ आमच्याच हायस्कुलांत फिफ्थ असिस्टंट असून त्यांचें नांव रामकृष्णपंत गोखले, असें होतें. जरी यांनां युनिव्हर्सिटीचा बी. ए. चा टिळा लागला नव्हता, तरी त्यांनीं दोनतीन वर्षे कॉलेजांत काढलीं असून ते आपणाला सुधारक ह्मणवीत असत. अर्थात् त्यांचाहि भुताखेतां-वर बिलकूल विश्वास नव्हता. रामकृष्णपंतांनां त्यांची पूर्वीची जागा अलीकडे कांहीं कारणामुळें भारी अडचणीची वाटूं लागल्यामुळें ती सोडून ते माझ्याबरोबर त्या घरांत रहावयाला यावयाला कबूल झाले होते. आह्मीं उभयतांनीं एक आचारी व एक गडी असे दोघे नोकर मिळविले; परंतु रात्रीं त्या घरांत निजावयाला ते मुळींच कबूल होईनात. कामकाज करून स्वयंपाक भांडींकुंडीं वगैरे आटोपून रात्रीं नऊसाडेनऊ वाजतां आपण शहरांत निघून येऊं, अशी त्यांनीं आह्मांला चक्क नोटिस देऊन ठेविली होती. काय करणार ? झालों आह्मी त्यांच्या या अटीला कबूल ! सर्व व्यवस्था याप्रमाणें कायम करून एकदोन दिवसांनीं आलेल्या रविवारीं आह्मी सामानसुमान वगैरे घेऊन त्या घरांत जाऊन राहिलों.

"घर बऱ्याच वर्षांपूर्वी बांधलेलें होतें. घराच्या भिंतींत ठिकठिकाणीं लहानलहान चिराहि पडल्या होत्या. अशा जीर्ण गृहाचें रक्षण करण्या-कारितांच जणूं काय त्याच्या सभोंवतीं फडनिवडुंगें व बांबूंचीं कांटेरी झाडें वगैरेंचें कुंपण घातलेलें होतें. घराभोंवतीं बाग असून तींत नारळी, आंबे, पेरू, जांब वगैरे फळझाडें पुष्कळ होतीं. परंतु हीं फळें घरचा मालक काढून नेत असल्यामुळें आमच्या क्षुधानिवारणाला फारशीं उपयोगीं पडण्यासारखीं नव्हतीं. घर दुमजली असून खालीं समोरासमोर दोन मोठमोठीं दालनें होतीं. हीं दालनेंच काय तीं वापरांत घ्यावीं, असें आम्हीं ठरविलें. कारण, आम्हांला अधिक जागेची जरुरी नव्हती.

घराच्या मागें एक लहानशी विहीर होती, परंतु तिचें पाणी पिण्यासारखें नव्हतें; स्नानालाहि योग्य नव्हतें; तरी भांडीं घांसणें वगैरे कामाला तें उपयोगीं पडण्यासारखें होतें. घरांत नळाची सोय नव्हती; परंतु जवळच एक दुसरी मोठी छानदार विहीर असून तेथेंच आह्मी स्नान करीत असूं. पिण्याचें व स्वयंपाकाचें पाणी आमचा आचारी तेथूनच आणीत असे स्वयंपाक, भोजन वगैरेंकरितां खालच्या दोन खोल्या आह्मीं घेतल्या होत्या. वरच्या मजल्यावरील एक दिवाणखाना साफसूफ करवून, दोन खाटा टाकवून तेथें आम्हीं निजण्याची व्यवस्था केली होती. सर्व रात्रभर येथें दिवा तेवत ठेवण्याची मात्र आह्मी काळजी घेत असूं.

"अशा रीतीनें कांहीं दिवस गेले. इतक्यांत कसलीशी दोन दिवसांची शाळेला एक सुटी आली. याच सुटीला जोडून एक रविवारहि मिळाला. या तीन दिवसांच्या सुटींत मी घरीं गेलों.

"घरीं दोन दिवस राहून तिसऱ्या दिवशीं सकाळीं पायींच मी ठाण्याला यावयाला निघालों. आमच्या गांवाला लागूनच एका कोसावर 'हातसाळें' नांवाचा एक गांव होता. पूर्वी हा गांव भारी भरभराटींत असून एका लक्ष्मीपुत्राचे बरेच हत्ती येथें बांधीत असत; या 'हस्तिशाले'—वरून या गांवाला 'हातसाळें' असें नांव पडलें, अशी या गांवाच्या नांवाची उपपत्ति आहे. या गांवाच्या एका टोंकाला सडकेच्या बाजूला एक सुंदर देवालय असून या देवळांत मोरोबा गोंसावी ह्मणून एक ब्रह्मचारी ब्राह्मण रहात असत. हे मोरोबा मोठे सत्त्वशील ब्राह्मण असून आपल्या जपजाप्यांत सदासर्वदा निमग्न असत. हे एक सिद्ध पुरुष आहेत, अशी आसपासच्या पुष्कळ गांवांत त्यांची मोठी ख्याति असून आसपासच्या लोकांची मोरोबांवर मोठी भक्तिहि असे. या देवळाच्या जवळून सडकेनें मी चाललों असतां मोरोबांची स्वारी देवळाच्या बाहेर उभी आहे, असें माझ्या दृष्टीला पडलें. मी 'यंग इंडिया'पैकीं असलों तरी संस्कारवशतेमुळें ह्मणा अथवा अन्य कांहीं कारणामुळें ह्मणा, या मोरोबांबद्दल मला पूज्यबुद्धि वाटत होती, हें कांहीं खोटें नव्हे. त्यांना पहातांच सडकेवरून

खालीं उतरून त्यांच्याजवळ जाऊन मीं त्यांना प्रणाम केला. मला आशीर्वाद देऊन मोरोबा ह्मणाले 'कुठें चालला आहेस तूं या वेळीं गंगाधर?'

"मीं ह्मटलें 'ठाण्याच्या हायस्कुलांत मला नोकरी लागली आहे. तीन दिवसांची सुटी होती, त्यामुळें मी घरीं आलों होतों. उद्यां शाळा उघडणार, ह्मणून मी आज ठाण्याला चाललों आहें.'

"मोरोबा हें ऐकून कांहीं क्षण विचारांत स्तब्ध राहिले; नंतर ते मला ह्मणाले 'बाबा, आज तूं नाहीं गेलास ठाण्याला, तर नाहीं का चालण्यासारखें? आज आतां तूं परत घरीं जा, अन् उद्यां पाहिजे तर जा तुझ्या नोकरीच्या गांवीं.'

"मी नम्रपणें ह्मणालों 'उद्यां शाळा उघडणार आमची. मी नुकताच नोकरीवर रुजू झालों आहें; वेळेवर हजर झालों नाहीं, तर तें कांहीं मला बरें नाहीं. तेव्हां आपण मला अशी आज्ञा करूं नये.'

"मजकडे स्थिर दृष्टीनें पहात मोरोबांनीं विचारलें 'ठाण्याला तूं रहातोस कुठें?'

" 'ठाण्याच्या दक्षिणेच्या टोंकाला एक जुनें घर आहे, तें भाड्यानें घेऊन तेथें मी अन् आमच्याच शाळेंत रामकृष्णपंत गोखले ह्मणून एक मास्तर आहेत ते, असे दोघे मिळून रहात असतों. बरें, येतों मीं.' असें ह्मणून मोरोबांना पुनः एकवार प्रणाम करून मी रस्ता चालूं लागलों.

"सुमारें तीनसाडेतीन वाजतां मी ठाण्याला पोहोंचलों. स्नान, भोजन वगैरे आटोपावयाला पांचसाडेपांच झाले. भोजन आटोपून खालच्या व्हरांड्यांत मी सिगारेट ओढीत कांहीं वाचीत पडलों आहें, इतक्यांत आमच्या गांवचा, आमच्या घराशेजारींच रहाणारा गणू तेली हातांत एक थोरली काठी घेऊन माझ्यासमोर येऊन उभा राहिला! त्याला माझ्या मागोमाग आलेला पाहून मला भारी आश्चर्य वाटलें.

"मीं त्याला विचारलें ' काय रे गणू! तूं कुठें या वेळीं एकाएकीं इकडे?'

तो ह्मणाला 'आपल्या आईसाहेबांनीं हें पत्र दिलें आहे आपणाला, अन् त्याबरोबर हा तांब्याचा ताईतहि पाठवून दिला आहे आपणाकरतां.' असें ह्मणून गणूनें पत्र व ताईत माझ्या हातीं दिलीं.

"मीं पत्र वाचून पाहिलें. आईनें मला लिहिलें होतें:—'तूं घरून निघून गेल्यावर हातसाळ्याचे मोरोबा गोसावी आपल्या घरीं एकाएकीं आले, व माझ्या हातीं एक तांब्याचा ताईत देऊन ह्मणाले 'माई, तुमचा मुलगा आज सकाळीं ठाण्याला जायला निघून गेला; तो मला रस्त्यांत भेटला. त्याच्यासाठीं हा एक मीं रामकवचाचा ताईत आणला आहे. काय वाटेल तें करून हा ताईत त्याच्या हातीं आजच्या आज जाऊन पडेल असें करा, आणि हा आपल्या दंडावर ताबडतोब बांधायला त्याला आग्रहानें लिहा. आणि त्याला लिहा, कीं, 'जर तुला कसलेंहि कधीं भय वाटलें, तर तूं रामनामाचा जप कर.' या कवचाच्या गुणानें आणि रामनामाच्या बलानें त्याची सर्व संकटांतून मुक्तता होईल.' गोसावीबुवांच्या अत्यंत आग्रहावरून आपल्या गणू तेल्याला हा ताईत आणि पत्र देऊन मुद्दाम तांतडीनें तुझ्या मागोमाग रवाना केला आहे. हें पत्र पोहोंचतांच रामनाम घेऊन हा ताईत तूं भक्तिपूर्वक आपल्या उजव्या दंडावर बांध. अगदीं क्षणाचाहि विलंब न करतां बुवांच्या सूचनेप्रमाणें अवश्य कर. ही तुझ्या आईची तुला निक्षून आज्ञा आहे, असें समज.'

"पत्र व ताईत बाजूला ठेवून मी गणूला ह्मणालों 'तूं आज इथेंच ना रहातोस गणू? तुझी खाण्यापिण्याची इथेंच व्यवस्था करूंना?'

"गणू ह्मणाला 'नको बापूसाहेब! तूं स्वतः उभा राहून आपल्या समक्ष बापूला ताईत आपल्या दंडाला बांधायला सांग, अन् त्यानें तो बांधलेला प्रत्यक्ष पाहिल्यावर ताबडतोब तसाच्या तसा येऊन मला तसें कळव; किती रात्र पडली तुला परत यायला, तरी हरकत नाहीं! असें मला आईसाहेबांनीं तीनतीनदां बजावून सांगितलें आहे.'

"आतां अर्थातच गणूला रहावयाला मला आग्रह करतां येईना त्याच्या हातावर एक पावली टाकून मी म्हणालों 'हें घे तुला चार आणे रस्त्यांत कांहीं तरी डाळेंकुरमुरे विकत घेऊन ते खातखात जा.'

"गणूच्या समक्ष मीं तो रामकवचाचा ताईत आपल्या उजव्या दंडावर बांधला. क्षणभरानें मला रामराम करून गणू तेथून निघून गेला.

"त्या दिवशीं रात्रीं भोजनोत्तर नेहमींच्या वेळीं मी व रामकृष्णपंत आपापल्या खाटांवर जाऊन पडलों. दोघांच्याहि खाटांच्या उशाशीं दोन मोठाल्या खिडक्या असून त्या या वेळीं उघड्या होत्या. आकाशांत मेघ जमले असून पावसाची थोडी बुरबुर चालली होती. मधुनमधून सोसाट्याचा वारा सुरू होऊन मेघांची वाताहत करून एकादशीच्या चंद्रकलेचें पृथ्वीला दर्शन घडवीत असे. आमच्या दोघांच्या कांहीं वेळ गप्पाटप्पा झाल्यावर आम्ही बोलावयाचे बंद झालों. वाटचालीचे बरेच श्रम मला आज झाले होते, त्यामुळें मला ताबडतोब झोंप लागली.

"मला बरीच वेळ झोंप लागली असावी. एकाएकीं मी जागा होऊन पहातों, तों वाऱ्यानें दिवा विझून गेला आहे. विरल मेघपुंजांतून चंद्रप्रकाश खिडक्यांमधून आंत प्रवेश करीत असून समोरच्या भिंतीचा थोडासा भाग प्रकाशित करीत होता. निद्रेनें जड झालेले डोळे थोडेसे किलकिले करून मीं सहज पाहिलें—तों काय चमत्कार! जणूं काय पंजरप्राय झालेला एक म्हातारा माझ्या अंथरुणावर गुढगे टेंकून हात पसरून बसला असून माझ्याकडे तीव्र दृष्टीनें पहात राहिला आहे. म्हाताऱ्याचा चेहरा जणूं काय पुष्कळ दिवसांच्या एकाद्या रोगानें शीर्ण झाला असून गालांच्या चामड्याच्या झोळया झाल्या होत्या. त्याच्या दंतविहीन तोंडाच्या बोळक्यावर त्याचे दोन्ही ओंठ चिकटल्यासारखे झाले होते. त्याच्या मस्तकाच्या मागील पांढऱ्या शुभ्र शेंडीच्या लहानशा बटीचे केंस जणूं काय ताठून उभे राहिले होते. त्याच्या दोन्ही डोळयांतून जणूं क्रोध, तिरस्कार आणि हेटाळणी या विकारांच्या मिश्र ज्वाला बाहेर पडत होत्या.

"हा विलक्षण देखावा पाहून माझें शरीर नखशिखान्त थरथरा कांपूं लागलें. अंगावर थरारून कांटा उभा राहिला. भयानें मीं डोळे झांकून घेतले. परंतु त्या स्थितींत अधिक वेळ मला रहातां आलें नाहीं. पुनः

मीं डोळे उघडले-ती भयंकर मूर्ति अजूनहि तशीच बसून राहिली आहे, असें माझ्या दृष्टीला पडलें. पुनः मीं डोळे मिटले. तत्क्षणीं एकाएकी आईच्या पत्राचें मला स्मरण झालें. मनांत मीं म्हटलें 'मला कसलें आलें आहे भय! माझ्या दंडावर तर रामकवचाचा ताईत बांधलेला आहे!' तावडतोब मृदुस्वरानें मी रामनामाचा जप करूं लागलों. कांहीं क्षणांनीं मीं फिरून डोळे उघडून पाहिलें, तों काय! ती मूर्ति कोठें अदृश्य झालेली! हें पाहून धीर येऊन मी उठून बसलों व रुद्ध कंठानें रामकृष्णपंतांना हांका मारूं लागलों.

"रामकृष्णपंतांनीं तावडतोब जागृत होऊन मला विचारलें 'कां–कांहो गंगाधरपंत?'

"मीं उठून पहिल्यानें दिवा लावला व हळुहळू सर्व हकीगत रामकृष्णपंतांनां सांगितली. माझी हकीगत ऐकून तेहि फार भ्याले. ती सर्व रात्र आह्मीं एकमेकांशीं बोलूनच काढली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठल्याबरोबर आह्मीं पहिल्यानें काय केलें असेल, हें सांगावयाला नको! त्या भुताटकीच्या घराला रामराम ठोकून तावडतोब दुसरीकडे बिऱ्हाड ठोकलें.

"भोजन वगैरे उरकून साडेदहांच्या सुमाराला मी शाळेंत गेलों. मधल्या सुटीच्या तासांत पोस्टाच्या शिपायानें एक पत्र आणून माझ्या हातीं दिलें. पत्र फोडतांच तें मोरोबा गोसाव्यांकडून आलें आहे, असें मला वाटलें. पत्रांत तारीख व वर लिफाफ्यावर छाप आदल्या दिवसाचा होता. पत्र पुढें लिहिल्याप्रमाणें होतें:—

'श्रीरामप्रसन्न.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधरपंत गुप्ते,
मुक्काम ठाणें, यांसीः—

मोरोबा गोसावी, मौजे हातसाळें याचे वेदोक्त आशीर्वाद. श्रीरामप्रभूच्या कृपेंकरून—पावेतों मौजे मजकूर येथें सुखरूप. असो विशेष.

आज सकाळीं तुमची भेट झाल्यानंतर तसाच मी तुमच्या घरीं गेलों. तुमच्यासाठीं तुमच्या मातुःश्रीपाशीं रामकवचाचा एक ताईत देऊन ठेविला आहे. आजच्या आज तो कोणत्याहि उपायानें तुमच्याकडे पोहोंचता करण्याविषयीं व तो आजच्याआज रात्र पडण्यापूर्वी आपल्या दंडावर बांधावयाला तुह्माला आग्रहानें लिहिण्याविषयीं मीं त्यांनां सांगितलें. आज रात्रीं तुह्माला कांहीं तरी भय वाटण्यासारखा प्रसंग उपस्थित होईल, असें मला वाटतें. परंतु रामकवचाच्या प्रतापानें तुमच्यावर कसलेंहि संकट येणार नाहीं. मीं पाठविलेला ताईत तुह्मीं सदोदित दंडावर धारण करावा. त्याचा कधींहि वियोग होऊं देऊं नये. जर कधींहि भयाचें कारण उपस्थित झालें, तर रामनामाचा जप करावा. सर्वदा शुद्धाचरणानें असावें. प्रभु रामचंद्र तुमचें सदासर्वदा मंगल करील-जाणिजे.—'

"हें पत्र वाचून माझ्या विस्मयाला सीमा राहिली नाहीं.पत्र मीं रामकृष्णपंतांनां दाखविलें. त्यांनांहि अतोनात आश्चर्य वाटलें.

"थोड्याच दिवसांनीं दिवाळीच्या सुटींत मी घरीं गेलों. जातांना मी हातसाळ्याच्या देवळांत जाऊन गोसावीबुवांची मुद्दाम भेट घेतली. ज्या भयंकर संकटांतून त्यांनीं माझी सुटका केली होती, तें त्यांनां समग्र कळवून मीं त्यांचे अतिशय उपकार मानले. नंतर मीं बुवांनां विचारलें ' मला त्या रात्रीं भय वाटेल, ही गोष्ट आपणाला कशी बरें कळली ?'

" माझ्याकडे पाहून बुवांनीं मृदु हास्य केलें व ते मला ह्मणाले 'त्या दिवशीं तूं रस्त्यानें जात असतां मला नमस्कार करून निघून गेलास, त्या वेळीं तुझ्या मागेंमागें एक पिशाच रेंगाळत आहे, असें माझ्या दृष्टीला पडलें. कोणत्या तरी कारणामुळें तें तुजवर अतोनात क्रुद्ध झालें असून केवळ तुझे प्राण हरण करण्याकरतांच तुझ्या मागेंमागें तें हिंडत असावें, असें मला वाटलें. केवळ योग्य संधि न मिळाल्यामुळें त्या वेळेपर्यंत त्यानें तुझा घांत केला नव्हता. तूं निघून गेल्यानंतर मीं गणित करून पाहिलें, त्यावरून मला असें आढळून आलें, कीं, त्याच दिवशीं

रात्रीं त्या पिशाचाला पाहिजे तशी संधि उपस्थित होणार आहे. ह्मणून मी ताबडतोब तुझ्या घरीं जाऊन तुझ्या आईजवळ रामकवचाचा ताईत देऊन आलों. कांहीं झालें, तरी तो रामकवचाचा ताईत तूं कधींहि टाकूं नकोस, बरें का ?'

"कांहीं वेळ विचार करून मी ह्मणालों 'बुवाजी, माझ्याबरोबर माझा एक मित्रहि त्याच दालनांत निजला होता, त्याला कांहींसुद्धां भयोत्पादक देखावा दिसला नाहीं; असें कां झालें ? आह्मी दोघेहि त्याच घरांत एकत्र रहात होतों; मग माझ्यावरच त्या पिशाचाचा इतका कटाक्ष कां ?'

"गोसावीबुवा कांहीं वेळ मजकडे स्थिर दृष्टीनें पहात होते. नंतर त्यांनीं विचारलें ' तुझ्या त्या मित्राचें नांव काय ?'

" 'त्यांचें नांव रामकृष्णपंत गोखले.'

" 'ह्मणजे ब्राह्मण ? अस्सें ! तुझा मित्र जातीनें ब्राह्मण, ह्मणून त्या भुताचा प्रभाव त्याच्यावर कांहीं चालला नाहीं. तूं पडलास कायस्थ. तुझा प्राण हरण करणें त्याला फारसें कठिण गेलें नसतें.'

"बुवाजींच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच मी थोडा वेळ विचार करीत स्तब्ध बसून राहिलों. नंतर मीं विचारलें 'तें पिशाच अजूनहि माझ्या अनिष्टावरच आहे काय ?'

" 'होय. अजूनहि तें तुझें अनिष्टच चिंतन करीत आहे. आणखी एकदां दर्शन देऊन तें तुला भिवविण्याचा प्रयत्न करील; परंतु ती वेळ नक्की कधीं येईल, हें अजून मला बरोबर कांहीं सांगतां येत नाहीं. परंतु तुझ्या दंडावरच्या त्या ताईताच्या प्रभावानें तें तुझें कोणत्याहि तऱ्हेनें अनिष्ट करूं शकणार नाहीं, ही तुझी खात्री असूं दे.'

"यानंतर अठरा वर्षें गेलीं. त्या पिशाचाच्या गोष्टीचें मला स्मरण देखील राहिलें नव्हतें. परंतु मोरोबा गोसाव्यांनीं दिलेल्या त्या रामकवचाच्या ताईताला मात्र मी क्षणभरहि कधीं विसंबलों नव्हतों. हळुहळू सेकंड असिस्टंटवरून मी फर्स्ट असिस्टंटहि झालों. नंतर कांहीं दिवस मी हेडमास्तरहि होतों. यानंतर दोनतीन ठिकाणीं हेडमास्तरच्या हुद्दयावर

कामें करून मी एज्युकेशनल इन्स्पेक्टर झालों. शिक्षणखात्याच्या डायरेक्टरसाहेबांची मजवर पूर्ण मेहरनजर असून मला या वेळीं पगारहि तीनशें रुपये झाला होता.

"या वेळीं मला रत्नागिरी जिल्ह्यांत नेमण्यांत आलें होतें. ठिकठिकाणीं फिरतफिरत मला शाळांची तपासणी करावी लागत असे. एके दिवशीं राजापूरतालुक्यांतील एका गांवाच्या शाळेची तपाणी करावयाला मला जावयाचें होतें. संध्याकाळीं जेवण वगैरे लवकर आटोपून, एक बैलगाडी भाड्यानें करून मी त्या गांवाकडे निघालों. शरदृतूंतील ती एक रमणीय रात्र होती. आकाशांत चंद्र आपल्या सुंदर शांत कांतीनें विराजमान झाला होता. डिस्ट्रिक्ट बोर्डाच्या सडकेनें आमची गाडी हलुहळू मजेनें चालली होती. गाडींत पडून पहिल्यानें मीं झोंपण्याचा प्रयत्न करून पहात होतों. दोनएक तास या कुशीवरून त्या कुशीवर याप्रमाणें माझी तळमळ चालली होती; परंतु कांहीं केल्या झोंप म्हणून येत नाहीं, असें पाहून कंटाळून मी उठून बसलों, आणि डोळे चोळून पहातों, तों आपल्या त्या एवढ्याशा जागेंतच गाडीवानमहाराज कसे तरी झोंपी जाऊन खुशाल घोरत आहेत, असें माझ्या दृष्टीला पडलें. चांदणें पिठासारखें लख्ख पडलें होतें—सडकहि चांगली व सरळ होती; त्यामुळें गाडीचे बैल आपल्या आपणच मजेनें चालले होते. सडकेच्या दोन्ही बाजूंला, कोठें अगदीं घनदाट तर कोठें दूरदूर अशा उभ्या असलेल्या वृक्षांच्या रांगा दिसून येत होत्या. वायूच्या लहारि झुळुझुळु वहात होत्या. गाडीवाला निजला आहे असें पाहून 'निजेना कां बिचारा!' असें मनाशीं म्हणून मीं कांहीं त्याला उठविलें नाहीं; परंतु केवळ गाडीच्या बैलांवरच सर्व विश्वास टाकणें बरें नाहीं, कदाचित् कोठें तरी भलतीकडेच गाडीला ते नेऊन टाकतील, असा विचार करून मीं पुनः झोंपण्याच्या भरीला पडलों नाहीं—तसाच बसून राहिलों.

"अशा स्थितींत कांहीं वेळ गेला. मलाहि हलुहळू झोंप घेरूं लागली. बसल्याबसल्याच मी डुकल्या घेऊं लागलों. मधुनमधून खडबडून जागाहि

होत होतों. इतक्यांत एकाएकीं बैल झटकन् थांबले. अर्थात् त्यामुळें गाडीला थोडासा हादरा बसून तीहि थांबली. त्याबरोबर माझ्याहि तंद्रेचा भंग झाला.

"मी डोळे चोळून समोर पहातों, तों ती अठरा वर्षांपूर्वीची वृद्धाची मूर्ति! बैलांचा रस्ता समोरून अडवून त्यांच्या जोकडावर आपले दोन क्षीण हात ठेवून शुष्क चर्मानें झांकलेला तो वृद्धाच्या हाडांचा पिंजरा ताठ उभा असून आपल्या जळजळणाऱ्या नेत्रद्वयांतून मजवर क्रोधाग्नीचा वर्षाव करीत आहे! ती मूर्ति पाहून माझ्या शरीरांतील रक्ताचा कण ना कण जागच्या जागीं गोठून गेला! शरीराला थरथरा कंप सुटला. छातीवर आपला कांपणारा हात ठेवून अस्फुट स्वरानें मी रामनामाचा जप करूं लागलों. कांहीं वेळ याप्रमाणें जप करतांकरतां, ती मूर्ति झरझरां वातावरणांत विलीन होत आहे असें माझ्या दृष्टीला पडलें. ती मूर्ति जेव्हां पूर्णपणें नाहींशी होऊन गेली, त्या वेळीं गाडी एकदम जोरानें मागें फिरवून बैलांची जोडी कमालीच्या वेगानें धांवूं लागली! ज्या रस्त्यानें आह्मी तेथपर्यंत आलों होतों, त्याच रस्त्यानें ते धूम पळूं लागले!

"गाडी जोरानें मागें फिरतांच गाडीवानाची झोंप झट्कन् उडाली. तो धडपडून उठून बसून मला ह्मणाला 'हे काय रावसाब हे? बैल असं येड्यावानी काय् धूम पळत चालल्याती हे?'

"खरी गोष्ट गाडीवानाला न सांगतां मीं त्याला शुष्क स्वरानें ह्मटलें कदाचित् सडकेनें चालतांचालतां त्यांनां कुठें भयबीय दिसलें असेल, ह्मणून ते असे पळत घराकडे चालले असतील!'

"गाडीवानानें गाडी थांबविण्याचा व गाडीची दिशा फिरविण्याचा आपल्याकडून शिकस्तीचा प्रयत्न केला; दोन्ही बैलांच्या शेंपट्या पिळपिळवटून त्यांच्या दोऱ्या बनविण्यापर्यंत मजल आणली; परंतु कांहीं केल्या ते ह्मणून बिलकूल थांबले नाहींत! धांवतांधांवतां शेवटीं ते जेव्हां एका गांवच्या बाजारांत येऊन पोहोंचले, आणि तेथें दुसऱ्या गाड्या आणि बरींच माणसेंबिणसें त्यांच्या दृष्टीला पडलीं, तेव्हां ते एकदांचे थांबले!

दोन्ही बैलांनां धांवण्याचे भयंकर श्रम झाले आहेत, असें पाहून मी गाडीवानाला ह्मणालों 'असूं दे–पुरे आतां. आतां आज परत जायची कांहीं जरूरी नाहीं. बैलांनां सोडून त्यांच्या दाणापाण्याची चांगली व्यवस्था कर. उद्यां सकाळीं मग जायचें पहातां येईल. आज रात्रीं इथेंच कुठें तरी विश्रांति घ्यायची मी तजवीज करतों.'

"त्यानंतर आणखीहि बरींच वर्षें गेलीं; परंतु पुनः कधीं एकवारहि मला भय वाटलें नाहीं. मोरोबा गोसाव्यांचें तें रामकवच अद्यापि माझ्या दंडाला बांधलेलें आहे, व माझ्या आयुष्याच्या अंतापर्यंत तें तसेंच तेथें राहील. माझ्या आईचें आणि मोरोबा गोसाव्यांचें अशीं तीं दोन्ही पत्रें अद्यापि मजपाशीं आहेत. जर कोणाला तीं पहावयाची इच्छा असेल, तर तीं मी त्याला दाखवावयाला तयार आहें."

* * * *

"गंगाधरपंत गुप्ते यांजकडून जी हकीगत मीं ऐकिली, ती अगदीं जशीच्यातशीच वर मीं लिहून काढली आहे.

यशवंत नारायण रानडे."

* * * *

"वर लिहिलेली हकीगत, ज्याप्रमाणें मीं रा. यशवंतराव रानडे यांनां सांगितली, त्याप्रमाणेंच अगदीं जशीच्यातशी त्यांनीं लिहून काढली आहे. ही हकीगत मीं प्रत्यक्ष पाहिलेली असून ती पूर्णपणें सत्य आहे.

गंगाधर गोविंद गुप्ते,
गव्हर्मेंट पेन्शनर.
मौजे चिंचगांव, जिल्हा ठाणें."

* * * *

यशवंतराव रानडे यांचें निबंधवाचन जेव्हां संपलें, त्या वेळीं सर्व सभासद मंत्रानें हतबुद्ध झालेल्या मनुष्यांप्रमाणें अगदीं मूक होऊन

आ पसरून राहिले ! शेवटीं चिटणीस ह्मणाले " यशवंतराव, तीं दोन पत्रें तुम्हीं प्रत्यक्ष पाहिलीं आहेत काय ? "

" होय, पाहिलीं आहेत. "

" त्यांचे लिफाफेहि आहेत काय ? "

" होय, आहेत. "

" पोस्टाचे शिक्के, तारखा वगैरे सारें बरोबर आहे ? "

" अगदीं बरोबर आहे !"

"असें ह्मणतां ?" असें म्हणून सेक्रेटरीसाहेब आश्चर्यमग्न होऊन स्तब्ध राहिले. सर्व सभासदहि एकमेकांच्या तोंडांकडे टकमकां पहात राहिले.

शेवटीं, एकदोन वेळ खाकरून गळा साफ करून अध्यक्षमहाराजांनीं या निस्तब्धतेचा भंग केला. ते ह्मणाले " यशवंतरावांनीं वाचलेली ही हकीगत ऐकून आपण सारे आश्चर्यानें थक्क झाल्याचें पाहून मात्र मला आश्चर्य वाटतें. आपणांला यांत विचार तो कसला पडला ? गंगाधरपंतांनीं सांगितलेल्या हकीगतींतील अगदीं प्रत्येक अक्षर सत्य आहे असें जरी धरलें, तरी भूतांखेतांचें अस्तित्व बिलकूल सिद्ध होत नाहीं!"

एक सभासद जरा तीव्र स्वरानें ह्मणाला " भूत नव्हे. तर गंगाधरपंतांनां दोन वेळ दिसलें, तें काय ? "

अध्यक्षमहाराज गंभीरपणानें बेलाशक ह्मणाले "अहो, ती इलेक्ट्रिसिटी !"

अध्यक्षांचें हें उत्तर ऐकून सारी सभासद मंडळी पुनरपि निस्तब्धपणें बसून राहिली. सर्वांकडे विजयाच्या गर्वाची नजर फेंकून लक्ष्मणरावांनीं शास्त्रीय शोधांनीं ओतप्रोत भरलेलें असें खालीं दिलेलें भाषण सभासदांनां उद्देशून सुरू केलें:—

" सभासदबंधूंनों ! गंगाधरपंतांनां दिसलें, तें भूत नव्हे—ती इलेक्ट्रिसिटी ! मनुष्याचा आत्मा ह्मणजे इलेक्ट्रिसिटीशिवाय दुसरें कांहींहि नाहीं, हें आपणां सर्वांनां ठाऊकच आहे. गंगेसारख्या नदीला पूर येऊन जेव्हां तिचें पाणी वाढतें, त्या वेळीं तिचीं दोन्ही तीरें ओलांडून

तें किती तरी दूर अंतरापर्यंत जातें. जेव्हां पूर ओसरतो, तेव्हां तिच्या तीरांच्या बाहेर आलेलें हें पाणी कुठें इकडे थोडें, तर कुठें तिकडे थोडें, याप्रमाणें तें विच्छिन्नपणानें पडून रहातें. हें जें बाहेरचें पाणी, त्याचा गंगेच्या प्रवाहांत अंतर्भाव झाला नाहीं, तरी तें गंगेचाच एक भूतपूर्व अंश आहे, यांत कांहीं संदेह नाहीं. याचप्रमाणें मनुष्याच्या आत्म्यालाहि क्षय अन् वृद्धि आहे. कोणत्याहि कारणानें आत्म्याच्या विद्युत्‌ची वृद्धि झाली, तर ती मनुष्याच्या शरीराला सोडून बाहेरहि थोडीबहुत येऊन पडते. आणि जेव्हां तिला ओहोट लागते, तेव्हां आत्म्याचा–अर्थात् विद्युत्‌चा—थोडा अंश निराळा पडून बाहेरच रहातो! विद्युत्‌चा हा बाहेरचा अंश नेहमीं मनुष्याच्या मागेंमागें फिरत असतो. त्या मनुष्याचें डोकें जर कुसंस्कारांनीं कुजून गेलें असेल, तर या अंशाला पाहून तो तें 'भूत' म्हणून समजतो, अन् त्यामुळें भयानें त्याची घाबरगुंडी उडते!"

यशवंतरावांनीं शंका काढली "हें जर खरें, तर रामनामाचा जप करण्यानें, तें भूत म्हणा किंवा इलेक्ट्रिसिटी म्हणा, अदृश्य कां झाली?"

ही शंका ऐकून लक्ष्मणराव यशवंतरावांकडे पाहून तुच्छतेनें हंसले व म्हणाले "अजून नाहीं का तुमच्या तें लक्ष्यांत आलें? गंगेचें पाणी जेव्हां पुनः वाढतें, तेव्हां खरोखर होतें काय? पूर्वीचा तो निराळा पडलेला गंगेच्या पाण्याचा अंश पुनः तिच्या प्रवाहाशीं एकजीव होतो, अन् त्याच्या स्वतंत्र अस्तित्वाचाहि लोप होतो. त्याप्रमाणेंच रामनामाचा जप करण्यानें गंगाधरपतांचा आत्मा-अर्थात् इलेक्ट्रिसिटी-धाडधाड करीत वाढूं लागली. त्यामुळें झालें काय, तें आलें तुमच्या लक्ष्यांत? त्यांच्या इलेक्ट्रिसिटीचा तो पूर्वी अलग पडलेला अंश–ज्याला ते भूत असें समजत होते, तो अंश–आंतल्या इलेक्ट्रिसिटीशीं पुनरपि मिळून त्यांचा एकजीव झाला! अन् त्यांना भास झाला, कीं, भूत हवेंतल्या-हवेंत अदृश्य झालें!"

अध्यक्षमहाराजांनीं केलेली ही मीमांसा ऐकून सर्व सभासदांच्या तोंडांवर व डोळ्यांत विस्मयाचा, त्याप्रमाणेंच संतोषाचाहि भाव दिस

लागला.आपल्या सभापतीच्या अतुल,गंभीर विद्वत्तेबद्दलचा त्यांचा अगोदर असलेला पूज्यभाव शतपटीनें वृद्धिंगत झाला. त्यांची स्तुति करावयाला त्यांचे ओंठ फुरफुरूं लागले. अस्फुट स्वरांत कोणीकोणी तर "अध्यक्ष-महाराजांनीं किती थोडक्यांत, किती सुंदर उपपत्ति लावून दिली या साऱ्या प्रकाराची! आमच्या तर बुवा संशयाचे अगदीं धुडके न् धुडके उडाले!" असें एकमेकांशीं हळुहळू बोलूंहि लागले.

परंतु अध्यक्षांनीं लाविलेल्या या उपपत्तीनें यशवंतरावांचें कांहीं चांगलेंसें समाधान झाल्यासारखें दिसलें नाहीं. शंकेच्या स्वरानें ते ह्मणाले "अच्छा, तर मग गाडीच्या बैलानीं असें चमत्कारिक भीतीचें वर्तन कां करावें? जर खरोखरच त्यांनां कांहीं दिसलें नाहीं, तर मग भयभीत होऊन ते वेड्यांप्रमाणें दौडूं कां लागले?"

लक्ष्मणरावांनीं निःशंकपणें ताबडतोब उत्तर दिलें "अहो, त्याचें समाधान अगदीं थोडकें आहे! गाईबैलांचा देह ह्मणजे एक उत्कृष्ट विद्युन्मानसयंत्र ह्मणजे गॅल्व्हॅनोमिटर आहे. अगदीं थोड्या प्रमाणांत जरी विद्युत् जवळ आली, तरी त्यांनां तत्क्षणीं तिचा सुगावा लागतो. यासाठींच तर गाईबैलांनां हिंदुधर्मांत अत्यंत पवित्र ह्मणून गणिलें आहे. जगांत इतकीं जीवजंतु, जनावरें असतांहि महादेवांनीं बैलालाच आपलें वाहन ह्मणून पसंत केलें, याचें कारण तरी काय? हेंच–"

गुंडशास्त्री ह्मणाले "अध्यक्षमहाराजांनीं ही गोष्ट मात्र अगदीं बरोबर सांगितली, यांत तिळमात्र संशय नाहीं. बैल हें महादेवाचें वाहन आहे, असें शास्त्रांत लिहिलेंच आहे– तस्य प्रमाणं यथा–"

इतक्यांत घड्याळांत ठण ठण ठण असे अकरा ठोके पडले. ते ऐकून शास्त्रीबुवांच्या प्रमाणकथनांत बाधा आणून लक्ष्मणराव मध्येंच ह्मणाले "रात्र भारीच झाली–आतां सभा बरखास्त करावी हें बरें."

सभासद उठून बाहेर पडूं लागले. सेक्रेटरींनीं लक्ष्मणरावांनां विचारलें "मनोहरपंतांनां पत्र लिहून पाठवायची आठवण राहील ना तुह्मांला?"

"अगदीं चांगली राहील. उद्यां सकाळीं उठतांच पत्र लिहून मी बाळासाहेबांकडे पाठवतों."

सर्व सभासद बंगलीच्या बाहेर पडले. चहूंकडे गाढ अंधकार पसरला होता. अकालींच दुर्दिन उद्भवून टपटप वृष्टिहि होत होती. त्या भयाण जनशून्य प्रदेशांतून तशा रात्रीं जावयाच्या विचारानें बहुतेक सभासदांचें हृदय कंप पावूं लागलें होतें; परंतु अर्थात्‌च तें भूतपिशाचांच्या भयानें नव्हे—कारण भुतांचें अस्तित्वच नाहीं! एकाद्या झाडाबिडावर कोठें 'अलग पडलेलें एकादें विद्युत्खंड' दबा धरून बसलें असेल, असा विचार मनांत आल्यानेंच केवळ त्यांच्या हृदयांचें या वेळीं तीव्र स्पंदन चाललें होतें!

---

## प्रकरण पंधरावें.

## संसार विरुद्ध संन्यास!

कृष्णगांवच्या इनामदारांच्या वाड्यांत बाहेरच्या भागांत एक मध्यमसें दालन असून ती मनोहरपंतांच्या बसण्याउठण्याची जागा असे. तेथील चारहि भिंतींनां पांढरें शुभ्र ऑइलपेंट केलें असून त्यांवर वरच्या भागांनां देवदेवींच्या तसबिरी व्यवस्थित रीतीनें टांगलेल्या होत्या. यांशिवाय रामदास, तुकाराम, रामकृष्ण परमहंस, स्वामी दयानंद सरस्वती, राममोहन राय इत्यादिकांचीं चित्रें व फोटोग्राफ सुंदर बहुमूल्य चौकटींत बसवून तीं भिंतींवर मध्यभागीं लटकवलेलीं होतीं. खोलींत एका बाजूला एक मोठें सुंदर कांचेचें कपाट असून त्यांत इंग्रजी, संस्कृत व मराठी भाषांतील ग्रंथ होते. जवळ जाऊन त्यांचीं नांवें पाहिलीं, तर ते बहुतेक सर्व धर्म व तत्त्वज्ञान या विषयांवरीलच होते, असें आढळून येत असे. एका खिडकीशीं एक मध्यमाकृति टेबल असून त्यावर दौत, टांक वगैरे लिहिण्याचें सामान सुबक आणि व्यवस्थित रीतीनें ठेविलेलें होतें. टेबलाच्या समोर एक सुंदर फिरती खुर्ची असून त्यावर उत्तर-हिंदुस्ताननिवासी एक पंडित बसले होते. खालीं पसरलेल्या स्वच्छ सतरंजीवर एका पांढराशुभ्र अभ्रा चढवलेल्या तक्क्यापाशीं मुंबईहून आलेले

मनोहरपंतांचे एक स्नेही बसले असून त्यांच्याजवळच तशाच एका तक्क्याशीं–परंतु त्याला टेंकून नव्हे–मनोहरपंत बसले होते.

सकाळची वेळ होती. दिवाणखान्याच्या उघड्या खिडक्यांतून वायूच्या मृदुमंद लहरि आंत येत होत्या. या वेळीं मनोहरपंतांचे जे मित्र त्यांच्याकडे आले होते, ते त्यांच्याशीं वादविवाद करण्यांत अगदीं अंतःकरणपूर्वक गढून गेलेले दिसत असून 'पंडतजी' तो वाद मुकाट्यानें ऐकत होते. मधुनमधून ते त्या वादाला एकादी पुस्ती जोडावयाचेंहि धाडस करीत असत.

हे पंडतजी मूळचे रहाणारे मिथिलेचे; परंतु आज कित्येक वर्षें ते मुंबईतच वास्तव्य करून होते. यांनां गुजराती व मराठी या भाषांत बोललेलें चांगलें समजे; पण बोलतां मात्र नीटसें येत नसे. हे ज्योतिषी होते. मुंबईतील एका श्रीमंत मारवाडी व्यापाऱ्याच्या आश्रयाला हे रहात असून क्रयविक्रयाच्या शुभ वेळा वगैरेंबद्दल हे त्याला माहिती देत असत. मुंबईतील सट्टेबाज अशा गुजराती व दक्षिणी मंडळीला हे ज्योतिषाचा पुरवठा करीत असत. मधुनमधून महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं प्रवासहि करावयाला निघत असत. आपल्या ज्योतिषशास्त्रपटुतेची साक्ष पटवून कांहीं भोळ्या लक्ष्मीपुत्रांकडून यांनीं वार्षिक वृत्तिहि ठरवून घेतली होती. ज्या घरांकडून त्यांनां अशी नियमित वृत्ति नव्हती, अशा घरींहि पंडतजी जात व यथाशक्य पैसा संग्रह करावयाचा प्रयत्न करीत. बहुतेक ठिकाणीं ते सांगत " रावसाहेबांनां 'नच्छत्र' हल्लीं भारीच खराब जात आहे; परंतु अमूक तिथीनंतर एका अत्यन्त शुभ 'नच्छत्रा' चा उदय होणार आहे. त्या दिवशीं सकाळीं उठून स्नान करावयाच्या पूर्वीं एकाद्या हिरव्या रंगाचें फळ–जितकें तें मोठें असेल तितकें चांगलें–वरुणदेवतेचें नामस्मरण करून विहिरींत किंवा नदीच्या प्रवाहांत सोडून द्यावें आणि स्नान केल्यानंतर उठून दोन्ही कानांवर लाल रंगाचीं फुलें धारण करावीं."

पंडतजी सामुद्रिकविद्येंतहि पारंगत होते. लोकांचा हात पाहून ते म्हणत " आपण लहान असतां आपल्या जिवावरचें एक दुखणें गेलें–त्यांतून

आपण वांचाल, अशी कांहीं कुणाला आशा नव्हती. एकदां उंच ठिकाणा वरून आपण खालीं गडगडलां होतां." आणि आश्चर्य हें, कीं, बहुतेक पृच्छकांनां या गोष्टी पूर्णपणें पटत असत! वर्षांतून एकदां पंडतजी मुंबई हून बाहेर पडून तीनचार महिने महाराष्ट्रांत प्रवास करीत, आणि कमरेच कसा बराच जड झाला, ह्मणजे पुनः मुंबईला परत जात.

पंडतजी पायांत नागरी तऱ्हेचा चढाव घालीत असून तो त्यांनं या वेळीं बाहेर काढून ठेविला होता. नेसलेल्या जाड धोतराचा त्यांनं कांचा मारला होता. त्यांच्या अंगांत जाड्याभरड्या रेशमाचा गुडघ्यां पर्यंत पोहोंचणारा अंगरखा असून तो इतका जुना झाला होता, कीं, त्याचा मूळचा रंग काय होता, हें सांगणें कठिण आहे! त्यांच्या मस्तकावर एक प्रबलप्रतापान्वित पागडी होती. पंडतजींच्या मिशा भल्या खाशा मोठ्या होत्या. त्यांनीं दाढी मात्र ठेविली नव्हती. त्यांच्या आंगरख्याच्या खिशांत पितळेच्या दोन डब्या असून त्यांपैकीं एक मोठी आणि दुसरी लहान होती. मोठ्या डबींत तमाखूचीं पानें असून लहान डबी चुन्यानें भरलेली होती. मधुनमधून दोन्ही डब्या काढून पंडतजी तमाखूच्या पानाचा चुरा करून त्याला चुना लावीत व तें मिश्रण डाव्या हातावर ठेवून उजव्या हाताच्या आंगठ्यानें जोरानें त्याचें कांहीं वेळ मर्दन करून त्याची ते गोळी बनवीत व ती चिमटीमध्यें धरून डाव्या हातानें आपला अधर किंचित् ओढून ती हळूच तोंडांत सोडून देतं! तमाखूच्या तिखट-पणामुळें एकादे वेळेला पंडतजींनां ठसका लागे आणि असा ठसका लागतांच टिचकी वाजवीत 'सीताराम! सीताराम!' असें ते नामस्मरण करीत.

मनोहरपंतांच्या दिवाणखान्यांत त्यांच्या शेजारीं या वेळीं त्यांचे जे मित्र बसून त्यांच्याशीं वादविवाद करीत होते, त्यांचें नांव अच्युत-राव देशपांडे. हे मनोहरपंतांचे सहपाठी मित्र असून एम्. ए., एलएल्. बी. होऊन हेहि मनोहरपंतांप्रमाणेंच घरीं बसले होते. वकिलीच्या धंद्याचा यांनांहि त्यांच्याप्रमाणेंच मोठा तिटकारा होता. परंतु सरकारी नोकरींत

शिरण्याचा त्यांचा इरादा असून त्याप्रमाणें एकादी जागा मिळविण्याची यांची खटपट चालू होती व त्यांच्या त्या खटपटीला यश येण्याचाहि बराच संभव होता. यासंबंधानें खटपट करण्याकरितां अच्युतरावजींचे वडील मुंबईला नुकतेच जाऊन आले असून सेक्रेटरीएटमध्यें त्यांच्या किती तरी खेपा झाल्या होत्या. अच्युतरावांनां एक उपवर झालेली बहीण असून मनोहरपंतांनां ती द्यावी, असा त्यांचा व त्यांच्या वडिलांचा विचार होता. आपल्या या 'विचारा'ला कितपत यश येण्याचा संभव आहे, याचा अंदाज करण्याच्या अन्तःस्थ उद्देशानेंच या प्रसंगीं अच्युतरावजींचें बनगांवला येणें झालें होतें.

भिंतीला टांगलेल्या थोरल्या घड्याळ्यांत सातांचे ठोके पडले. इतक्यांत एक शागीर्द चहाची रुप्याची कपबशी घेऊन आंत आला. मनोहरपंतांनीं त्याच्या हातून ती घेऊन अच्युतरावांच्या हातीं दिली. अच्युतराव सतरंजीवरून उठले आणि टेबलाजवळच्या एका स्टूलावर जाऊन बसले. हाताला चटके बसत असतांहि कपबशी त्यांनीं टेबलावर ठेविली नाहीं. सतरंजीवरून आपण चहा प्यालों, किंवा टेबलावर कपबशी ठेविली, तर कदाचित् तें धर्माचारनिष्ठ मनोहरपंतांनां बरें वाटणार नाहीं, अशीच अच्युतरावांची कल्पना होती. मनोहरपंत आणि पंडतजी या दोघांनांहि चहा चालत नाहीं, हें ठाऊक असल्यामुळें अच्युतरावजींनीं निःशंकपणें चहापानाला सुरुवात केली, आणि चहा पिऊन शागिर्दानें आणलेल्या रुप्याच्या गडूंतल्या पाण्यानें तोंड व हात धुऊन ते पुनः सतरंजीवर आपल्या जागीं येऊन बसले.

क्षणभर ते दोघेहि मित्र स्तब्ध होते. नंतर आपल्या तुरळक मिशांच्या टोकांनां लीलेनें पीळ देत अच्युतरावजी मनोहरपंतांकडे पाहून ह्मणाले "त्यानंतर–काय बरें चाललें होतें आपलें बोलणें? हां–तुह्मी ह्मणत होतां मनोहरपंत, कीं, मनुष्याला आपली आध्यात्मिक उन्नति जर करायची असेल, तर त्याला संसारबंधनाचा त्याग करणें अवश्यच आहे. संसारांत राहून त्याची आध्यात्मिक उन्नति होणें शक्य नाहीं,

त्याला संन्यासच ग्रहण केला पाहिजे! परंतु तुमचा हा मोठा भ्रम आहे मनोहरपंत! या गृहस्थाश्रमांत राहूनच मनुष्याला धर्माच्या तत्त्वांची चर्चा करतां येईल, पूजाअर्चा, जपजाप्य, आत्मचिंतन करून त्याला या संसारांत राहूनच मोक्षलाभ करून घेतां येईल. रामदासांनी ह्मटलेंच आहे "**प्रपंच साधुनि परमार्थाचा लाभ जयानें केला, तो नर भला भला रे भला!**" मोक्षासाठीं संसाराचा त्याग करून बैरागी किंवा संन्यासी बनून मनुष्यांला अरण्यांत जायची आवश्यकताच आहे, असें नाहीं. काय ह्मणतां पंडतजी?"

पंडतजी मान हलवून ह्मणाले "यह तो बात ठीक है रावसाहेब! बिलकूल बराबर! देखिये जनकजीमहाराज कित्ना बडे माहात्मा थे. राजर्षी थे–किंतु गृहीभी थे–"

मनोहरपंत गंभीर स्वरानें ह्मणाले "घरांत–संसारांत–राहूनहि धर्माचरण करतां येणें शक्य आहे, हें मी एक वेळ कबूल करतों; परंतु संसारांत रहाणाऱ्य धार्मिक व्यक्तीला ज्या गतीचा 'लाभ होईल, तीपेक्षां संसाराचा त्याग करून वनांत जाऊन रहाणाऱ्या तपस्व्याला श्रेष्ठ गतीचा लाभ होणार नाहीं काय? आपल्या पुराणेतिहासांत काय दृष्टीला पडतें? तपश्चरण करूं इच्छिणारे ऋषिमुनि, संसाराच्या तीव्र कोलाहलापासून दूर–अनेक दूर पळून जाऊन गहन विजन वनांत, पहाडावरील गुहांत, घनदाट गुंफांत, लोकसमाजाच्या दृष्टीच्या टापूच्या अगदीं बाहेर जाऊन तप करीत असत, असेंच नाहीं का त्यांत आपणांला आढळून येत?"

अच्युतराव ठांसून ह्मणाले "तपस्या करायची असेल, तर त्यासाठीं संसार सोडून गहन वनांतच जाऊन राहिलें पाहिजे, अशीच कांहीं तुह्मी ह्मणतां त्यापासून अर्थनिष्पत्ति होत नाहीं! मी तर ह्मणतों, कीं, संसारांत–घरांत–राहूनहि तपश्चरण करतां येणें शक्य आहे. इतकेंच नव्हे, तर अशा तपस्येचें फल वनांतल्या तपाच्या फलापेक्षां श्रेष्ठ आहे. संसारांतला मोह, बायकोपोरांची मायाममता, लोभ, काम, मद, मत्सर या सर्वांचीं जाळीं खाडकन् तोडून जी तपस्या करतां येईल, तीच खरी-

खरी तपस्या होय ! निर्जन वनांत जाऊन तपश्चरण करणें ह्मणजे लुचेगिरीनें मोक्षलाभ करून घेणें होय, असें मी तर स्पष्टपणें ह्मणतों !"

अच्युतरावांच्या या वक्तृत्वाचा मनोहरपंतांवर फारसा परिणाम झाल्यासारखें दिसलें नाहीं. ते शांतपणें ह्मणाले "हें पहा अच्युतराव ! या वादविवादांत शिरण्यापूर्वीं तपस्या हा पदार्थ तरी काय आहे, हें अगोदर समजून घेतलें पाहिजे. तपस्या तीन प्रकारची आहे, असें शास्त्रांत सांगितलें आहे. ते प्रकार ह्मटले ह्मणजे शारीर, वाङ्मय अन् मानस, हे होत. हे तीन प्रकार काय आहेत, तें ऐका:—

'सुरविप्रगुरुप्राज्ञपूजा पावित्र्यमार्जवम् ।
अहिंसा ब्रह्मचर्यं च शारीरं विद्धि तत्तपः ॥
'सत्यं प्रियं हितं वाक्यं यतो नोद्विजते जनः ।
वेदाद्यभ्यसनं चाऽपि तपो वाङ्मयमुच्यते ॥
'सौम्यता चेतसः शुद्धिर्मौनमिन्द्रियनिग्रहः ।
स्वभावस्य पराशुद्धिरुच्यते मानसं तपः ॥'

ह्मणजे देवता, ब्राह्मण, गुरु आणि विद्वज्जन यांचें पूजन, पवित्रता, सत्पथचारिता, अहिंसा आणि ब्रह्मचर्य या सर्वांची शारीरतपांत गणना होते. ज्याच्या योगानें कोणाचेंहि मन दुखवलें जात नाहीं, अशा तऱ्हेचें सत्य, प्रिय आणि हित असें वचन, वेदादिकांचा अभ्यास, यांचा वाङ्मय तपांत अंतर्भाव होतो; सौम्यभाव, चित्तशुद्धि, मौन ह्मणजे व्यर्थभाषण न करणें, इन्द्रियदमन, स्वभावाला कमालीचें शुद्ध ठेवणें, हीं सारीं मानसतपाचीं लक्षणें होत. आतां अच्युतराव ! गृहस्थाश्रमांत रहाणाऱ्या इसमाला शारीरतप अगदीं पूर्णपणें करतां येणें शक्य आहे कीं काय, याचा तुमचा तुह्मीच विचार करा. देवता, ब्राह्मण, गुरु अन् विद्वज्जनांचें पूजन हें त्याला करतां येणें शक्य आहे, असें मी घटकाभर धरून चालतों; परंतु संसाराश्रमांत राहूनहि सर्वदा पावित्र्याचें रक्षण करणें, अहिंसा अन् ब्रह्मचर्यपालन हीं सारीं त्या माणसाला सांभाळतां येणें शक्य आहे काय ? संसाराश्रमांतच ज्याला रहायचें असेल, त्याला विवाहहि केला पाहिजे.

मग त्याला मुलेंहि होणारच. या बायकोपोरांच्या भरणपोषणासाठीं त्याला पैसाहि कोठून ना कोठून तरी मिळवणें भागच आहे. मग अच्युतरावजी ! ब्रह्मचर्याचें पालन, अहिंसा, स्वभावाची पराशुद्धि हीं त्याला कशीं साधतां येणार ? या संसाराच्या सभोंवतीं निरनिराळया तऱ्हेची घोर अपवित्रता तांडव करीत आहे. मनुष्य कितीहि सावध असूं द्या, तो कितीहि काळजी घेऊं द्या, अपवित्रतेचें केवळ आगर अशा संसारांत राहून स्वतःला तो पवित्र राखूं शकेल, ही कल्पनाच मुळीं अगदीं असंभवनीय आहे ! संसारांत राहून मोक्षप्राप्ति करून घेणें ह्मणजे विष्ठेंत लोळूनहि अंग स्वच्छ अन् सुगंधित ठेवतों म्हणण्यासारखेंच आहे!"

पंडतजी मनोहरपंतांचें हें भाषण अगदीं लक्ष्यपूर्वक ऐकत होते. ते मान डोलवून त्यांनां उद्देशून ह्मणाले "ठीक-रावसाहेब ठीक! बराबर ठीक है आपका कहना! प्रभु तुलसीदासजीने आपके एक दोहेमें कहा है, एक कमराके चारही दिवालोंपर जदि साही लगायली होंगी, और एक आदमी उस कमरेमें सदोदित बास करता होगा, तब ओ आदमी कित्नाहि सावधान रहे; तो उस्का अंग साही काला करेंगीहि करेंगी !"

मनोहरपंतांचा हा युक्तिवाद अच्युतरावांनां फारसा पटला असावा, असें दिसलें नाहीं. ते जोरानें म्हणाले "मनोहरपंत, तपस्येचे प्रकार अन् त्यांचीं तीं शास्त्रोक्त लक्षणें यांचा काथ्याकूट करीत बसायचें आपणांला मुळीं कारणच नाहीं. तुमची ही तपस्याबिपस्या, मुक्तिबिक्ती हीं सारीं केवळ मनाचा भ्रम आहेत. दुसरें कांहीं नाहीं. एका सुप्रसिद्ध आधुनिक कवीनें मोक्षाविषयीं जे उद्गार काढले आहेत, ते मला यथार्थ वाटतात."

कपाळाला थोड्या आंठ्या चढवून मनोहरपंतांनीं तुच्छतेनें विचारलें "काय म्हटलें आहे तुमच्या कविवर्यांनीं ?"

"त्यांनीं म्हटलें आहे—

**'मोक्ष कशाचा घेउनि बससी? कसली मनुजा! मुक्ति?**
**पुण्यसाधना निर्मियली ही कविंनीं सुंदर युक्ति !'**

हें पहा मनोहरपंत! मीं कांहीं तुमच्यासारखें शास्त्राबिस्त्रांचें आलोडन केलें नाहीं. माझ्या सरळ मनाला अन् नैसर्गिक बुद्धीला असें वाटतें, कीं, ज्या अर्थी मी मनुष्यरूपानें या पृथ्वीवर जन्मलों आहें, त्या अर्थी मानवजातीचीं विविध दुःखें, यातना, पापताप, हीं जर लवमात्र माझ्या हातून कमी झालीं अन् मनुष्याचें स्वास्थ्य, शांति, सुख किंवा ज्ञान, हीं थोडीं तरी वाढवायला मी तिळमात्र तरी कारणीभूत झालों, तरच माझ्या जीविताचें सार्थक झाल्यासारखें होईल–तरच मीं आपलें कर्तव्य योग्य रीतीनें बजाविलें, असें मला वाटेल."

मनोहरपंत आपल्या मित्राकडे पाहून खेदानें म्हणाले "अरे अरे! मला तुमची भारी कींव येते अच्युतराव! तुम्ही आर्यपूर्वजांचे वंशज असून मोक्षाची कल्पना तुम्हाला मान्य नाहीं, तर मग आत्म्याचें अस्तित्वहि मला वाटतें, तुम्ही कबूल करीत नाहीं?"

"आत्म्याचें अस्तित्व जरी कबूल केलें, तरी त्यामुळें मोक्षाची आवश्यकता आहे, असें मानणें भाग पडत नाहीं. अरण्यांत जाऊन झाडांचा पाला ओरबडून खाल्ला, चारहि बाजूंला जळत्या ओंड्यांच्या प्रचंड धुम्या पेटवून हात वर करून किंवा खालीं डोकें वर पाय करून तोंडानें 'राम राम' किंवा 'नमो भगवते वासुदेवाय' म्हणून ओरड केली; तरच आत्म्याला मोक्षलाभ होतो, एरवीं नाहीं, हें तर मला कधींच कबूल नाहीं!"

मनोहरपंत खिन्नतेनें स्मित करून म्हणाले "हा तुम्हीं वितंडवाद चालविला आहे कांहीं तरी अच्युतराव! असें कधीं कुणीं म्हटलें आहे, कीं, झाडांचा पाला ओरबडून सभोंवार आगीच्या धुम्या पेटवून खालीं डोकें वर, पाय करून लोंबकळत रहाणें हाच खरा मुक्तीचा उपाय आहे म्हणून? संसाराच्या कोलाहलाचा कांहीं व्यत्यय येऊं नये, म्हणून निर्जन, शांत अशा ठिकाणीं जाऊन परमेश्वराचें निरापद्‌पणानें एकमनानें ध्यानमनन करतां यावें, याच उद्देशानें ऋषिमुनि अरण्यांत जाऊन रहात असत. मुक्ति ही कांहीं हत्तीघोड्यासारखा प्राणी किंवा दुसरा एकादा पदार्थ नव्हे. '**शरीरेन्द्रियाभ्यामात्मनो मुक्तत्वं मुक्तिः!**' वेदान्ताच्या

मतानें नित्यसुखावाप्ति हीच मुक्ति! नैयायिकांच्या मताप्रमाणें आत्यन्तिक दुःखनिवृत्ति हीच मुक्ति होय! शेवटीं सतरा वळसे अन् एकच गांठ! सर्वांचा निष्कर्षांश एकच! **वेदान्तरामायणांत** लिहिलें आहे:—

**'समाधिस्थो हृदि सुखी क्रीडते यः प्रकाशते।**
**ब्रह्मभावं स संप्राप्य नरो मोक्षमवाप्नुयात्॥**

म्हणजे जो समाधिस्थ पुरुष मनांत सुखी राहून मनांत क्रीडा करतो, मनांतच प्रकाशित होतो, त्याच पुरुषाला ब्रह्मभाव प्राप्त होऊन त्याला मोक्षलाभ होतो.'"

मनोहरपंतांच्या या वक्तृत्वानें अच्युतराव वादविवादांतील आपल्या जागेवरून तिळमात्रहि हटले नाहींत. उत्तेजित स्वरानें ते म्हणाले "हें तर झालें आत्मसुख! आपलीच आत्यंतिक दुःखनिवृत्ति–आपलीच नित्यसुखावाप्ति! पण याला कांहीं मी मानवी जीवनाचें उच्चतम ध्येय किंवा लक्ष्य ठरवीत नाहीं!"

"तर मग तुमच्या मतानें मानवी जीवनाचें उच्चतम ध्येय तरी काय?"

अच्युतराव जोरानें म्हणाले "लोकसेवा–लोकसेवा! जो दुःखी असेल त्याचें दुःखविमोचन करणें; जो रोगानें पीडिलेला असेल त्याला रोगापासून होणाऱ्या यातनांचा उपशम होण्याविषयीं प्रयत्न करणें; जो अज्ञानांधकारांत असेल त्याच्यावर ज्ञानतरणीचे किरण पडतील असें करणें; हीच खरी लोकसेवा असून माझ्या मतें हाच मनुष्याचा अत्यंत श्रेष्ठ धर्म होय!"

वादविवाद ऐन रंगांत आला. मनोहरपंतांहि उत्तेजित स्वरानें म्हणाले "लोकसेवा? लोकसेवा हें एक अत्यंत श्रेष्ठ दर्ज्याचें सत्कार्य होय, यांत तिळप्राय संदेह नाहीं! परंतु लोकसेवा हाच मनुष्याचा परमधर्म होय, ही गोष्ट मला बिलकूल कबूल नाहीं. ही गोष्ट आमच्या हिंदुसमाजांतली नाहीं–इंग्रजी संस्कृतीनें, इंग्रजी शिक्षणानें तुमचें मन बदलून गेल्यामुळें तुम्ही हें बोलत आहां, अच्युतरावजी!"

पंडतजी या वेळपर्यंत गप्प होते. एकदां अच्युतरावांकडे, तर एकदां मनोहरपंतांकडे, याप्रमाणें आळीपाळीनें पहात ते उभयतांमध्यें चाललेला वादविवाद कौतुकानें ऐकत स्वस्थ बसले होते. ते आतां ह्मणाले "हां रावसाहेब! ए तो अत्यंत ठीक बात! लोकसेबाई हिंदुधर्म, ए बात तो कोनसाभी पोथीपुस्तकमें तो हम देखी नहीं! तब जदि बोलोगे–गोसेबा–हां, एतो अलबत् हिंदूका धर्म है! ए विषयपर हम एकबार गोरच्छनी सभामें बडी वक्तृता की थी. द्रव्यनिधि भेगा करनेके लिये हम अनेक स्थल घूमते थे. किन्तु क्या कहूं? इंग्रजी विद्या शीखनेसे आजकल हिंदुधर्म तो कोईभी नही मानते! काल तो बहुत बूरा आया है! ऐसेहि बहुत बडे लोक है, के साधूसंन्यासी घर आये, ब्राम्हण पंडत आये, तो एक पैसाभी नही छोडेंगे हातमेसे. किंतु इस्पितलको हाजार दशदश हजार रुपय्योंकी छूटे हाथसे खैरात करते है! बापका श्राद्धभी नहीं करते–किन्तु कहां दुर्भिक्ष हो, तो उधर रुपय्या हजार हजार भेजता है! अन्नदान तो महादान, ए बात सच है; किन्तु डोम चमार महारक्या को अन्नदान? साधूसंन्यासी, ब्राह्मणपंडत, ज्योतिषी उन्होंको अन्नदान येहिच महादान और बडा पुण्यकार्य है!"

पंडतजींचें हें भाषण–विशेषतः त्यांतील शेवटचा भाग–ऐकून अच्युतराव व मनोहरपंत एकमेकांकडे पाहून गालांतल्यागालांत हंसूं लागले.

अशा तऱ्हेनें त्या उभयतां मित्रांत वादविवाद चालला असतां नऊ वाजावयाची वेळ झाली. तों एका नोकरानें येऊन मनोहरपंतांनां ह्मटलें "दादासाहेब, आपणाकडे कोणी माणूस आला असून आपणाला भेटायचें आहे, असें तो ह्मणतो."

"कोण रे आहे तो?"

"तांबखेडचा आपलाच आहे तो एक माणूस."

"ठीक आहे, दे त्याला आंत पाठवून."

मिनिटभरानें एक मध्यम वयाचा, फारसा स्थूल नाहीं, असा एक माणूस आंत आला व त्यानें नम्रभावानें मनोहरपंतांनां रामराम केला.

त्याच्या अंगांत एक पिवळ्या रंगाचा शॉर्टकोट असून डोकीला हिरव्या रंगाचें पागोटें होतें. एक बरेंच पांढरें धोतर तो नेसला असून त्याच्या कांसेचा शेव थोडा मागें लोंबत होता. पायांत करकरणाऱ्या वहाणा थोड्या वेळापूर्वी होत्या—परंतु त्या अर्थातूच त्यानें या वेळीं बाहेर काढून ठेवल्या होत्या.

आलेल्या माणसाची ओळख न पटल्यामुळें क्षणभर त्याच्याकडे दृष्टि लावून मनोहरपंतांनीं त्याला विचारलें "काय नांव तुझें ?"

"जी, माझें नांव सखाराम कुडव."

"कुठला तूं ?"

"आपल्याच इनामतींत रहातों हुजूर, तांबखेडला."

"अस्सें ! माझ्याकडे कांहीं काम आहे का तुझें ?"

सखारामानें खिशांतून एक लिफाफा बाहेर काढला व म्हटलें "कांहीं कामाकरतां मी सातारला गेलों होतों हुजूर, तिथल्या माझ्या वकीलांच्या चिरंजीवांनीं—बाळासाहेब बिनीवाल्यांनीं—हें पत्र हुजुरांना दिलें आहे." असें म्हणून सखारामानें तो लिफाफा मनोहरपंतांच्या हातीं दिला.

मनोहरपंतांनीं लिफाफा फोडला व सखारामाला बाजूच्या बांकावर बसावयाला सांगितलें. त्यांच्या सूचनेप्रमाणें तो तेथें बसला.

मनोहरपंत मुकाट्यानें तें पत्र वाचूं लागले. शेवटपर्यंत पत्र वाचून ते म्हणाले "ठीक आहे. या पत्राचें उत्तर फुरसतीनें मी डांकेनें पाठवीन बाळासाहेबांना."

सखाराम बांकावरून उठला व नम्रपणें हात जोडून म्हणाला "तसें करूं नये हुजुरांनीं ! आपली कोणतीहि हरकतबिरकत ऐकायची नाहीं, असें बाळासाहेबांनीं मला तीनतीनदां बजावून सांगितलें आहे. या महिन्याच्या तीस तारखेला हुजुरांना साताऱ्याला जाऊन पोंचलेंच पाहिजे. पहिल्या तारखेला त्यांचा तो कसला समारंभ आहे. हुजूर स्वारी जर त्या दिवशीं तेथें हजर झाली नाहीं, तर बाळासाहेबांना अन् त्यांच्या साऱ्या मित्रमंडळीला भारी वाईट वाटल्याखेरीज रहाणार नाहीं. त्यांनीं

मला निक्षून सांगितलें आहे, कीं, 'आपण त्या दिवशीं खास येतों, असें आपल्या सहीचें पत्र घेतल्याशिवाय तूं तेथून उठूंच नको!' "

सखारामाचें हें कांहींसें निर्वाणीचें भाषण ऐकून मनोहरपंत थोडेसे विचारांत पडले. शेवटीं ते त्याला ह्मणाले "मला आतां तर पत्राचें उत्तर लिहायला फुरसत नाहीं. शिवाय, त्या दिवशीं साताऱ्याला मला जातां येईल कीं नाहीं, हेंहि नीट विचार करून ठरविलें पाहिजे. तूं साताऱ्याला जायला निघशील, त्याच्या अगोदर इकडे येऊन मला एकदां भेटून जा. माझें काय ठरेल त्याप्रमाणें उत्तर लिहून तुझ्यापाशीं देईन."

सखारामानें मनोहरपंतांनां पुनः प्रणाम करून हंसतहंसत ह्मटलें " हुजूर, काय ठरेल तें पत्रांत लिहून नाहीं चालायचें! जायलाच हवें आपणाला. आपण जर त्या दिवशीं जायचें कबूल केलें नाहीं, तर त्याचा दोष माझ्यावर ठेवून बाळासाहेब माझ्यावर भारी रागावतील! आपणाला गेलें हें पाहिजेच. उद्यां तिसऱ्याप्रहरीं येऊन मी हुजुरांचें उत्तर घेऊन जाईन. "

मनोहरपंत ह्मणाले "ठीक आहे–तर मग उद्यां संध्याकाळीं ये. उत्तराचें पाहूं काय तें."

सखारामानें लवून रामराम करून मनोहरपंताचा निरोप घेतला, तेव्हां पुनः अच्युतरावांबरोबर त्यांचें वादयुद्ध सुरू झालें.

अच्युतराव ह्मणाले "हें पहा मनोहरपंत, तुह्मी जी ही मुक्तिमुक्ति ह्मणून पागल झालां आहां, तें नुसतें मृगजल आहे! आत्मा असेल, तर न त्याची मुक्तता व्हायची?–अगोदर आत्मा आहे, याबद्दल तुह्माला प्रमाण सांपडलें आहे का?"

मनोहरपंत कांहींसे तीव्र स्वरानें ह्मणाले "कसलें प्रमाण पाहिजे तुह्माला? डोळ्यांनीं तर मीं आत्मा पाहिलेला नाहीं–दुसऱ्या कुणींहि पाहिलेला नाहीं. याचें मुख्य कारण हें आहे, कीं, आत्मा हा प्रत्यक्ष प्रमाणानें सिद्ध होणारा पदार्थ नाहीं."

"चाक्षुष प्रमाणांशिवाय दुसरें कोणत्याहि तऱ्हेचें प्रमाण• तरी सांपडलें आहे का तुह्माला आत्म्याच्या अस्तित्वाविषयीं ?"

"प्रमाण तर आपल्या हृदयांतच आहे! मृत्यूनंतरहि मनुष्याला स्वतंत्र अस्तित्व आहे, असा विश्वास जगाच्या प्रारंभापासून या क्षणापर्यंत सर्व देशांमध्यें अन् सर्व जातींमध्यें प्रचलित आहे. साकाराच्या मृत्यूबरोबरच त्याचें सर्व कांहीं नाहींसें झालें असें नाहीं, अशी एक प्रबल आकांक्षा पृथ्वीवरील सुधारलेल्या किंवा रानटी जातींच्या लोकांच्या मनांत वास्तव्य करून राहिली आहे. मृत्यूनंतर जर मनुष्याचें कांहींहि रहाणार नाहीं, तर सर्व कालीं सर्व जातींच्या मनांत असा हा विश्वास आला तरी कोठून ? मनुष्याला जशी तहान लागते, तसें ती पूर्ण व्हायला पाण्याचीहि व्यवस्था आहे. जशी क्षुधा लागते, तसें खाद्यहि आहे. त्याच्या सर्व आकांक्षांची किंवा इच्छांची परितृप्तीहि आहे. जर परलोकाचें अस्तित्व नसेल, तर परलोकासंबंधाची अशी प्रबल आकांक्षा मनुष्याच्या मनांत कां आहे ?"

मनोहरपंतांचा हा युक्तिवाद ऐकून अच्युतराव गालांतल्या गालांत हंसूं लागले. क्षणभरानें ते ह्मणाले " रानटी जातींच्या मनांत परलोकाची धारणा कोणत्या प्रकारानें झाली, तें हर्बर्ट स्पेन्सरनें अतिशय उत्कृष्ट रीतीनें दाखाविलें आहे. स्पेन्सर ह्मणतो, कीं, ज्या सर्व कारणांमुळें मनुष्याला अधिक स्वप्नें दिसतात, तीं सारीं कारणें रानटी जातींच्या जीवनयात्राप्रणालींत पूर्णपणें विद्यमान असतात. अतिशय अधिक प्रमाणांत भूक आणि अतिशय अधिक प्रमाणांत भोजन हीं रानटी जातींत नेहमीं आढळून येतात. असेंहि त्यांच्यांत होतें, कीं, जंगलांत शिकार करीत फिरत असतां दोन दिवस नाहींहि कांहीं त्यांनां खायला मिळत–अन् जेव्हां खायला मिळेल तेव्हां दोनदोन दिवसांचेंहि अन्न ते खाऊन घेतात! आळंदीला किंवा पंढरपुरला जाऊन उपाशांनीं धरणें धरून बसलें, ह्मणजेच ज्ञानोबा किंवा विठोबा साक्षात्कार देतात असें नाहीं. तुह्मी दोन दिवस कांहीं न खातां या खोलींतच पडून रहा, ह्मणजे

पहा तुह्माला कधीं एकएक अद्भुतअद्भुत स्वप्नें पडतात तीं! पुनः अतिशय अन् जड भोजनानेंहि असेंच होतें. या रानटी लोकांपैकीं एक मनुष्य रानांत शिकारीला गेला असतां सर्व दिवस शिकारीमागें वणवण फिरूनहि कांहीं खायला न मिळतां रात्रीं तसाच उपाशीं एके जागीं पडला असतां त्याला झोंप लागली. त्याला एक स्वप्न पडलें, कीं, तो शिकार करीत रानांत हिंडत असतां एक सपाटून मोठा हरीण त्यानें ठार केला. त्याचे तुकडेतुकडे करून ते विस्तवावर त्यानें शिजत लावले. शिजून तें अन्न तयार झाल्यावर तें खावयाला तो आरंभ करणार, इतक्यांत त्याची झोंप उडून तो जागा झाला. तो दुसऱ्या दिवशीं आकंठ भोजन करून निजला असतां त्याला असें स्वप्न पडलें, कीं, एका रानडुकरानेंच आपली शिकार चालविली आहे! मुसंडी मारीत तें जवळ येऊन त्याला ठार करणार, इतक्यांत भयानें चीत्कार करीत तो झोपेंतून धडपडून उठला! त्याच्या बरोबरच्या सोबत्यांनीं त्याला विचारलें 'कां रे गड्या? तूं ओरडलास कां? काय झालें तुला?' तो पडला अस्सल रानटी मनुष्य. स्वप्न कशाला ह्मणतात, तेंसुद्धां त्याला कांहींच माहिती नाहीं. मीं स्वप्न पाहिलें, या गोष्टीची त्याला कल्पनाहि करतां येणें शक्य नव्हतें. त्यानें उत्तर दिलें 'मी अमूकअमूक ठिकाणीं गेलों होतों, असें असें झालें, नंतर एक रानडुकर माझ्या अंगावर मुसंड्या मारीत येऊन माझा जीव घेऊं लागलें.' हें ऐकून त्याचे सोबती ह्मणाले 'चल, कांहीं तरी सांगतोस तूं. तूं तर अगदीं याच जागीं निजून राहिला होतास, अन् हें सारें भलतेंच काय सांगतो आहेस?' प्रत्येक दिवशीं निरनिराळ्या लोकांनां असाच कांहीं तरी अनुभव आलेला पाहून या 'मी'शिवाय, 'दुसराहि एक मी' ( otherself ) अस्तित्वांत आहे, अशी या रानटी लोकांत श्रद्धा उत्पन्न झाली. या दुसऱ्या 'मी'ला हळुहळू ते 'आत्मा' ह्मणून समजूं लागले!"

मनोहरपंत ह्मणाले "बरें, झालेंहि असेल तसें. व्हायला हरकत काय आहे?"

अच्युतराव हंसून ह्मणाले " वाः! तुमच्या ह्मणण्याचा मला मोठा चमत्कार वाटतो. मनुष्याचा आत्मा शिकार करीत हिंडतो, त्याला रानडुकर मुसंडी मारूं शकतें, असें प्रतिपादन करायची तुमची इच्छा आहे काय? आत्म्याला जर धनुष्यांतून तीर सोडतां येतो, किंवा रानडुकर त्याला मारूं शकतें, तर तो जडदेहविशिष्ट असला पाहिजे. आत्मा जड पदार्थ आहे, ही गोष्ट तुह्मी कबूल करतां का मनोहरपंत?"

मनोहरपंत जोरानें ह्मणाले "अलबत् नाहीं! परंतु या रानटी लोकांच्या चुकीच्या धारणेपासूनच सुधारलेल्या मनुष्यांची सत्यधारणा हळुहळू उन्नत होत गेली आहे."

अच्युतराव जरा तीव्र स्वरानें ह्मणाले "मला जें कांहीं तुम्हाला दाखवून द्यायचें आहे, तें हें. तुम्ही म्हणालांत, परलोक अन् आत्मा यांच्या अस्तित्वासंबंधानें एक धारणा किंवा कल्पना अथवा एक आकांक्षा मनुष्यसृष्टीच्या आदिकालांत देखील अस्तित्वांत होती! माझा तुम्हाला असें दाखविण्याचा प्रयत्न आहे, कीं, आम्ही ज्याला ' आत्मा ' अशी संज्ञा देतों, ती धारणा किंवा कल्पनाच मुळीं नाहीं! तो पूर्णपणें जडवाद आहे–दुसरें कांहीं नाहीं! अजूनहि पृथ्वीच्या पाठीवर अशा कांहीं रानटी जाति आहेत, कीं, त्यांच्यामध्यें माणूस मेला असतां त्याच्या कबरेंत त्याच्याबरोबर खाण्याचे पदार्थ, कापडचोपड हीं देखील ते पुरतात. त्यांची धारणा अशी असते, कीं, माझ्या या मृत बापाचा आत्मा हे पदार्थ खाईल, हीं वस्त्रें नेसून थंडीवाऱ्यापासून आपलें संरक्षण करील. मनोहरपंत! फार दिवसांची कांहीं गोष्ट नाहीं–थोड्या वर्षांपूर्वी मॅडॅगॅस्करची राणी मेली, तेव्हां तिच्या कबरेंत बहुमूल्य रेशमी पोषाक, रत्नांचे अलंकार, कांचेचीं भांडीं, टेबलखुर्चा, तेतीस हजार नगद रुपयांनीं भरलेली एक पेटी इत्यादि जिन्नस तिच्याबरोबर पुरण्यांत आले! आतां तुम्ही याला काय ह्मणाल?"

मनोहरपंत जरा चांचरत ह्मणाले "ही तर चुकीची कल्पना आहे, यांत कांहीं संशयच नाहीं. पण असें पहा अच्युतराव, या जीवनाच्या नंतर दुसरें एक जीवन आहे, ही प्रबल आकांक्षा आली कोठून?"

अच्युतराव मृदु स्मित करून ह्मणाले " वा: ! आकांक्षा किंवा इच्छा असली, ह्मणजे तिची परितृप्तिहि आहे, असें का तुमचें ह्मणणें आहे मनोहरपंत ? भिन्नभिन्न रानटी जातींच्या स्वर्गाच्या ' प्रबल आकांक्षा ' कशा भिन्नभिन्न आहेत, हें स्पेन्सरनें आपल्या सोशिऑलजींत फार चांगल्या रीतीनें सांगितलें आहे. पॅटागोनियन रानटी लोकांची 'प्रबल आकांक्षा ' अशी आहे, कीं, स्वर्गांत जाऊन मद्यावर असा ताव मारायचा, कीं, अनन्तकालपर्यंत त्याची नशा उतरूं नये ! ( To enjoy the happiness of being eternally drunk ). मनोहरपंत ! तुह्मी असें ह्मणायला तयार आहांत का, कीं, परलोकांत त्यांच्याकरतां अशी व्यवस्था खात्रीनें केलेली असल्यामुळेंच त्यांच्या मनांत अशी ' प्रबल आकांक्षा ' वास करून आहे ? तुमच्या या ' प्रबल आकांक्षावादा 'चें उत्तर जॉन् स्टुअर्ट मिलनें फारच समर्पक रीतीनें दिलें आहे. मिल ह्मणतो–एखादा कारकून जेव्हां महिना तीस रुपये पगारावर एखाद्या ऑफिसांत रखडत असतो, त्या वेळीं एके वेळीं या ऑफिसांतला तीनशें रुपये दरमहा मिळविणारा मी हेडक्लार्क होईन, अशी प्रबल आकांक्षा त्याच्या मनांत जागत असते. परंतु अनुभव तर नेहमीं असा येतो, कीं, बहुतेक कारकुनसाहेबांच्या साऱ्या जन्मांत त्यांच्या या प्रबल आकांक्षेची परितृप्ति कांहीं होत नाहीं ! "

"या सर्वांपासून निष्पन्न काय झालें ?"

"निष्पन्न हें झालें, कीं, प्रबल आकांक्षा असली, ह्मणजे तिची परितृप्तिहि निश्चयपूर्वक असते, ही कल्पना साफ चुकीची आहे !"

अच्युतरावांनीं ठांसून सांगितलेला हा सिद्धान्त ऐकून मनोहरपंत खालीं मान घालून कांहीं वेळ स्तब्ध बसले. कांहीं वेळानें ते ह्मणाले "हें पहा अच्युतराव ! तर्क अन् युक्तिवाद या साधनांनींच केवळ या सर्व गोष्टींची मीमांसा व्हायची नाहीं. चिरकालपासून या सर्व विषयांसंबधानें वाद चालू आहेत; त्यांचा निकाल आजपर्यंत कांहीं लागलेला नाहीं, अन् कधीं काळीं तो लागेल असा संभवहि बहुतेक दिसत नाहीं. तर्कयुक्तीच्या

साधनानें किंवा आपल्या बुद्धीच्या जोरावर या सर्व विषयांचें आकलन मला झालें आहे, असें नाहीं. मला अत्यंत पूज्य वाटत असलेल्या प्राचीन ऋषिमुनींनीं जें कांहीं लिहून ठेविलें आहे, त्यावरच भक्तिश्रद्धायुक्त अंतः-करणानें मी विश्वास ठेवीत आलों आहें."

मनोहरपंतांचा हा मुद्दा एका प्रकारानें बिनतोड असल्यामुळें अच्युत-राव अर्थात्च अगदीं निरुत्तर झाले. मनोहरपंतांच्या भाषणांत अशा तऱ्हेची एक सरलता आणि दृढता ध्वनित झाली होती, कीं, त्याचा कोणत्याहि रीतीनें प्रतिकार करावयाला विवादपटु अच्युतरावांनां भारी संकोच वाटूं लागला. अंधभक्तिश्रद्धेचाच जेथें प्रश्न आला, तेथें वाद कसला करावयाचा, आणि त्याचा उपयोग तरी काय व्हावयाचा?

तेव्हां वादाच्या गतीला निराळेंच वळण देण्याच्या उद्देशानें अच्युत-राव पंडतजींकडे वळून म्हणाले "महाराज, गणित करून आपण जें ज्योतिष लोकांनां सांगतां, त्यांपैकीं बऱ्याचशा गोष्टी खऱ्या होत नाहींत, हें खरें ना?"

यानंतर पंडितजी आणि अच्युतराव या उभयतांमध्यें तुमुल वाक्सं-ग्राम सुरू झाला.

---

## प्रकरण सोळावें.

## 'शैले शैले न माणिक्यम्!'

ज्या वेळीं मनोहरपंतांच्या बैठकखान्यांत मागील प्रकरणांत वर्णन केल्याप्रमाणें ते व अच्युतराव या उभयतां मित्रांमध्यें तत्त्व-चर्चा चालली होती, त्याच वेळीं वाड्यांतील दुसऱ्या एका खोलींत रावसाहेबांच्या मस्तकांत निराळ्याच प्रकारच्या कांहीं विचारांनीं दंगल चालविली होती. रावसाहेब एका लहानशा खोलींत नुसत्या सतरंजीवरच पांढरा शुभ्र अभ्रा चढविलेल्या एका तक्याला रेलून पडले असून मुंबई-हून मुद्दाम आणविलेल्या उंची सुवासिक सिगारेटस्पैकीं एकीचा समा-

चार घेत होते. त्यांच्या शेजारीं सिगारेटची रुप्याची डबी पडली असून जरा पलीकडे एक खुलें पत्र व त्याचा लिफाफा पडला होता.

दोनतीन वेळ सिगारेटचे जोराचे दम मारून रावसाहेबांनीं तिचें उरलेलें लहानसें थोटूक कोपऱ्यांत फेंकून दिलें आणि जवळचें पत्र उचलून घेऊन ते तें पुनः वाचूं लागले. पत्र शेवटपर्यंत वाचून त्यांनीं तें परत दूर भिरकावून दिलें व भृकुटि आकुंचित करून ते पुनः कसला तरी विचार करूं लागले.

पत्र कांहीं तसें मोठें महत्त्वाचें नव्हतें, किंवा त्यांत कांहीं काळजी लागून रहाण्यासारखाहि मजकूर नव्हता. तें पत्र सोनगांवचे कारभारी ऊर्फ कुळकर्णी गोविंदराव बर्वे यांच्याकडून आलें असून त्यांत त्यांनीं दोन महिन्यांची रजा मंजूर होण्याविषयीं विनंति केली होती. गोविंदरावजी हे अत्यंत विश्वासू कारभारी होते. त्यांच्या जागीं कोणाची नेमणूक करून पाठवावें, याविषयीं रावसाहेब या वेळीं विचार करीत होते. सोनगांवचा कारभार ज्यांच्यावर संपवावयाचा, तो माणूस हुषार, बुद्धिमान् आणि विशेषतः अत्यंत नेकीचा व विश्वासू असणें आवश्यक होतें; आणि रावसाहेबांनां तर असा माणूस विचार करकरूनहि सांपडत नव्हता. इकडे तर गोविंदरावांची विनंति अमान्य करून चालण्यासारखें नव्हतें. ते मोठ्या संकटांत होते.

विचार करतांकरतां आमच्या केशवरावजींची मानसमूर्ति रावसाहेबांच्या मनश्चक्षूंसमोर दिसूं लागली. या थोड्याशा दिवसांत केशवरावांचा जो सामान्य परिचय रावसाहेबांनां झाला होता, त्यावरून ते हुषार, चतुर व विश्वासू असावेत असें त्यांनां वाटत होतें, हें खरें; परंतु किती झालें तरी केशवराव हा नवीन माणूस—त्यावर सोनगांवचा महत्त्वाचा कारभार सोंपविणें इष्ट होतें काय? आतां त्यांच्या वतीनें एक मात्र मुद्दा विचार करण्या सारखा होता. केशवरावांवर नवीनच काम सोंपविण्यांत येणार होतें. तेव्हां आपल्या भावी उन्नतीच्या आशेनें आपल्यावर संपविलेला कारभार इमानेंइतबारें करण्याचा त्यांच्याकडून मनःपूर्वक प्रयत्न होण्याचा

बराच संभव होता. केशवराव माणूस तर आंतल्यागांठीचा असून त्याला भाषण फारसें नको होतें. पण हा तर एक सद्गुणच होय. त्याला बोलावून आणून एकवार गोष्ट काढून पहावयाला काय हरकत आहे ?

असा विचार करून रावसाहेबांनीं केशवरावांना बोलावणें तर पाठविलें. केशवराव त्या वेळीं कचेरींत बसून आपलें कामकाज पहात होते. रावसाहेबांकडून बोलावणें आलें, असें पाहून जरा शंकितहृदयानें ते हळुहळू त्यांच्या खोलींत जाऊन हजर झाले व अतिशय नम्रतेनें नमस्कार करून मुकाट्यानें उभे राहिले.

डबींतील एक सिगारेट काढून ती शिलगावून तिच्या सुगंध धुराचे फूत्कार सोडीत रावसाहेबांनीं विचारलें "केशवराव, तुह्माला तालुक्यांच्या कारभाराची माहिती आहे का ?"

"आहे हुजूर !"

"अनुभव आहे का असल्या कारभाराचा ?"

"होय श्रीमंत. सर्व प्रकारचें कुळकर्णपण, वसुली, कारभार हीं माझ्या हातून झालेलीं कामें आहेत. मला त्याबद्दल पूर्ण माहिती आहे.'

"पूर्वी प्रत्यक्ष काम कोठें केलें आहे का ?"

"आहे हुजूर ! कोल्हापुर इलाख्यांत शिरपुर ह्मणून इनामत आहे. तेथल्या भाऊसाहेब पंडितांच्या इस्टेटीचा कारभार मीं केला आहे. भाऊसाहेब आतां स्वर्गवासी झाले असून त्यांच्या चिरंजीवांकडे आतां इनामतीचा अधिकार आला आहे !"

हें ऐकून रावसाहेब पुनः विचार करीत स्तब्ध राहिले. नंतर कांहीं वेळ ते बाहेर आकाशाकडे पहात होते. शेवटीं केशवरावांकडे वळून म्हणाले " हें पहा केशवराव ! इनामतीचा कारभार हांकायचा म्हणजे वेळींप्रसंगीं सुष्टदुष्ट अन् अन्यायाचींहि कामें करावीं लागतात. धर्म किंवा राम बनून सरळ न्यायाचेंच वर्तन करून इनामतीचा कारभार करणें आतां कधींच शक्य नाहीं. हें तुम्हाला ठाऊक आहे ना ? ".

केशवराव कांहीं न बोलतां खालीं मान घालून गालांतल्यागालांत हंसूं लागले.

केशवरावांचें हें वर्तन पाहून रावरासाहबे त्यांच्यावर भारी खूष झाले. केशवरावांनीं उडी मारून छातीवर हात ठेवून "हां हुजूर! तसेंहि करायला माझ्याकडून एका पायावर तयारी आहे!" असें दिमाखानें सांगितलें असतें, तर रावसाहेबांच्या मनांत त्यांच्या कार्यक्षमतेविषयीं संदेह उत्पन्न झाला असता. ते म्हणाले "तुम्ही आतां अनुभवलेले वयस्क माणूस आहांत–हें सर्व तुम्हाला माहीत असलेंच पाहिजे. केशवराव, हल्लीं इंग्रजी राज्य आहे. कायदेकानूंचेंच हें साम्राज्य आहे. वाटेल तसा बेकायदेशीर गोंधळ चालायला ही पूर्वीची पेशवाई किंवा मोंगलाई नव्हे; तेव्हां आपला मतलब तर साधावा, अन् धन्याचा मान अन् इज्जत हीं तर कायम रहावीं, अशा दोन्ही बाजू सांभाळून जो अधिकारी कारभार करील, त्यालाच दक्ष अन् हुषार कारभारी असें म्हटलें पाहिजे. अशा कारभाऱ्याची उन्नति होते, त्याला पैशांकडूनहि कांहीं कमी पडत नाहीं–"

केशवराव हळुहळू मंद स्वरानें बोलूं लागले "हुजूर; मी मूर्ख, अक्षरशत्रु माणूस खरा; परंतु मला एवढें समजतें, कीं, ज्याचें आपण मीठ खातों, त्याच्याकरतां प्रसंगीं प्राणहि दिला पाहिजे! श्रीमंतांनीं आतां धन्याचा मान अन् इज्जत यांचें रक्षण करण्याविषयीं गोष्ट काढली होती. आतां गोष्ट निघालीच आहे, तेव्हां सांगायला हरकत नाहीं. माझ्या धन्याच्या अब्रूचें रक्षण करण्यासाठींच मीं तुरुंगांत सहा वर्षें खडी फोडीत होतों श्रीमंत!"

अत्यंत आश्चर्यचकित होऊन रावसाहेब म्हणाले "काय? तुम्ही तुरुंगांत होतां केशवराव?"

केशवराव गर्वभरानें म्हणाले "होय हुजूर!"

"कां? काय झालें होतें?"

" मोठा दंगा झाला होता हुजूर! एकदोन खूनहि त्यांत पडले! त्यामुळें खटल्याला मोठें भयंकर स्वरूप आलें. धन्यावरचा आरोप आपणावर ओढून घेऊन मीं सहा वर्षे तुरुंगाच्या हालअपेष्टांत काढलीं. इतक्या दिवसांत ही गोष्ट मी बोललों नव्हतों कुणापाशीं. आज श्रीमंतांनींच गोष्ट काढली म्हणून बोललों मी."

केशवरावांचें हें भाषण ऐकून रावसाहेबांचें मन त्यांच्यावर अत्यंत प्रसन्न झालें! 'हां—नोकर असावा तर धन्याच्या हिताला असा जपणारा असावा,' असें ते आपणापाशीं म्हणाले. इतका वेळ केशवराव उभे होते. त्यांना त्यांनीं आतां खालीं बसावयाला सांगितलें. केशवराव सतरंजी-खालींच बसले.

रावसाहेबांनीं विचारलें "तुरुंगांतून सुटून किती दिवस झाले तुम्हाला?"

" फार दिवस नाहींत—"

" तुम्ही तुरुंगांत असतांना तुमचे पूर्वींचे यजमान मरण पावले वाटतें?"

" होय हुजूर! मी तुरुंगांत गेल्यानंतर कांहीं फिरून त्यांचे पाय या सेवकाच्या नाहीं दृष्टीला पडले!" असें म्हणून केशवरावांनीं रडवा चेहरा करून दुःखानें खालीं मान घातली.

रावसाहेब सहानुभूतिपूर्वक म्हणाले "समजलों. तुमचे यजमान जीवंत असते, तर तुम्हाला नोकरीसाठीं दुसऱ्याच्या तोंडाकडे कां पहावें लागलें असतें! ते असते, तर त्यांनीं तुमच्यासारख्या एकनिष्ठ नोकराला कांहीं झालें तरी सोडलें का असतें? पण तुमच्यासारख्या नोकराची किंमत तुमच्या यजमानाच्या मुलाला कांहींच का कळली नाहीं?"

"नाहीं कशी हुजूर? मला ठेवून घेण्यासाठीं त्यांनीं खूब खटपट केली. अन् कां नाहीं करणार श्रीमंत? ते एवढेसे होते, तेव्हांपासून अंगाखांद्यावर खेळवून त्यांनीं मीं लहानाचे मोठे केलें ना! वास्तविक मी त्यांचा नोकर; पण मला ते 'केसुकाका' म्हणतात! मला श्रीमंत म्हणाले 'केसुकाका, तुम्ही जर इथें नाहीं राहिलां, तर माझ्या इष्टेटीचें वाटोळें होऊन जाईल—तुम्ही मला सोडून नका जाऊं—' पण शिरपुरला

काहीं माझें मन रमेना. पहिली गोष्ट ही, कीं, ज्या धन्यासाठीं प्रसंगीं मी प्राण देखील द्यायला तयार होतों, तो धनी स्वर्गवासी झाला होता. दुसरें असें, कीं, मी तुरुंगांत असतां माझ्या कुटुंबांतलीं माणसें एकएक मृत्यूच्या तोंडांत पडलीं होतीं–तुरुंगांतून सुटून येतों, तों जिकडेतिकडे भयाण रान!–अन् मी त्या रानांत एकटाच! वाडवडिलांच्या वेळचें जें लहानसें माझें घर होतें, तेंहि पडूनझडून त्याचा अगदीं निकाल लागला होता. या साऱ्या कारणांमुळें माझें मन नाहीं टिकलें तिथें. ह्मणून मी शिरपुर सोडून बाहेर पडलों. बोलूनचालून एक पोट; जिथें जाईन तिथें दोन घांस भात मिळायला कांहीं हरकत पडणार नाहीं, अशी माझी खात्री होती. हुजूरांचें नांव ऐकून आलों इकडे. दर्शन होतांच श्रीमंतांना माझी दयाहि आली अन् दिला हुजुरांनीं आश्रय गरीबाला!"

रावसाहेब मृदुहास्य करून ह्मणाले " तुमच्यासारखा एकनिष्ठ नोकर मिळाल्यानें मला तर मोठा लाभच झाला; पण तुह्माला इतक्या सहज रीतीनें सोडणें कांहीं तुमच्या यजमानांच्या चिरंजीवांना शोभलें नाहीं!"

केशवराव एक उसासा टाकून ह्मणाले "श्रीमंतांनीं तसाच जर जोराचा आग्रहच मला केला असता, अन् जर ह्मणते मला ते, कीं, 'केसुकाका, तुमचें घर पडलें आहे, तर मी देतों तें बांधून,' किंवा 'आमच्यासाठीं तुह्माला भारी हाल काढावे लागले, हे घ्या पांचशें रुपये–मी तुह्माला हे बहाल करतों,' असें ते मला ह्मणाले असते, तर मीं काय केलें असतें, तें मात्र नाहीं सांगवत. पण आंतलें खरें मर्म काय आहे, तें आहे ठाऊक हुजूरांना? पूर्वीच्या अमदानीचे दिवस आतां जाऊन सारा काळच मुळीं अजिबात बदलला आहे. मनांत मीं विचार केला, ज्या इज्जतीनें अन् मानानें मीं स्वर्गवासी श्रीमंतांच्या अमलांत दिवस काढले, तसे या नवीन कारकीर्दींत काढतां येतील, अशी खात्री नाहीं. आजकालच्या या साऱ्या इंग्रजी शिकलेल्या कालिजांतल्या छोकऱ्यांना मी भारी डरतों हजूर! वाघाची, सापाची किंवा एखाद्या पिसाळलेल्या कुत्र्याची जशी मला मोठी भीति वाटते, त्याहूनहि या तरुणपणींच नाकावर सोनेरी चाळशी

चढविणाऱ्या छोकऱ्यांनां मी भारीच भितों सरकार! कां भितों, तें नाहीं मला सांगतां येत—पण मनांतल्यामनांत या तरुण मंडळीची मला अतोनात भीति वाटते, हें मात्र अगदीं खरें आहे." असें ह्मणून केशवरावजी चूप राहिले.

कॉलेजांतील चष्मा चढविलेल्या तरुण मंडळीबद्दल केशवरावजींचा हा तिटकारा पाहून रावसाहेबांच्या मनोवीणेच्या तारांतून अत्यंत अनुकूल असा ध्वनि निघाला! सोनगांवच्या कारभारावर या केशवरावाचीच हंगामी नेमणूक करून त्याला तिकडे पाठवावा, असें त्यांनीं ठरविलें. नंतर ते ह्मणाले "हें पहा केशवराव, येथून तीन कोस अंतरावर आमचा एक मोठा तालुका आहे. त्या गांवाचें नांव सोनगांव. या तालुक्याची वर्षाची पांचसहा हजार रुपये आदा आहे. तेथें आमचे हल्लीं गोविंदराव बर्वे ह्मणून कारभारी आहेत, त्यांनां दोन महिन्यांच्या रजेवर जायचें आहे. त्यांचा मुलगा भारी आजारी असून त्याला मुंबईला नेऊन एकाद्या चांगल्या डॉक्टरचें औषध सुरू करावें, असें त्यांच्या मनांत आहे. या गोविंदरावांच्या कामावर दोन महिने तुह्माला पाठवावें, असें माझ्या मनांत आहे."

हात जोडून अत्यंत नम्रतेनें केशवराव ह्मणाले "हुजूर मायबाप आहेत! श्रीमंतांकडून जी आज्ञा होईल तीप्रमाणें करायला हा सेवक एका पाया-वर तयार आहे!"

"तुह्माला हल्लीं पगार किती आहे? पंधरा रुपये ना?"

"जी हुजूर!"

"हे दोन महिने तुमची जी ही हंगामी नेमणूक मी करणार आहें, त्या नेमणुकीबद्दल तुह्माला गोविंदरावांचा पुरा पगार ह्मणजे दरमहा तीस रुपयेप्रमाणें मिळेल. तुमच्या कारभारानें जर मी संतुष्ट झालों, तर अशाच एकाद्या महालाच्या कारभाऱ्याची जागा रिकामी होतांच ती तुह्मांला देऊन तुमची नेमणूक पक्की करून टाकूं."

केशवराव दोन्ही हात जोडून खालीं दृष्टि लावून स्तब्ध राहिले.

रावसाहेबांनीं पुनः तिसरी सिगारेट शिलगावली आणि ते कांहीं वेळ स्वस्थ पडून राहिले. नंतर ते ह्मणाले "हें पहा केशवराव, सोनगांवच्या कारभारासंबंधानें एक गुप्त गोष्ट मला तुह्माला आतां सांगितलीच पाहिजे. पण जरा पहा बरें बाहेर कुणी आहे काय तें?"

केशवरावांनीं बाहेर जाऊन इकडेतिकडे हिंडून पाहिलें. नंतर आंत येऊन ते ह्मणाले "नाहीं हुजूर—कोणी नाहीं."

"ठीक आहे. जरा तुह्मी जवळ येऊन बसा."

रावसाहेब ज्या जागीं पडले होते, त्या जागेच्या अगदीं जवळ-जवळ, परंतु अत्यंत संकोचानें केशवराव येऊन बसले. नंतर स्वर खालावून रावसाहेब बोलूं लागले. "मी सांगतों तें नीट लक्ष्यपूर्वक ऐकून ठेवा केशवराव. या सोनगांव महालांत गवळ्याचें एक घर आहे. या घरांत दोघे भाऊ होते—एकाचें नांव पांडू वाडकर अन् दुसऱ्याचें नांव नरू. धाकटा भाऊ नारायण ऊर्फ नरू हा आपल्या मागें एक तरुण बायको ठेवून मयत झाला. त्याला मूलबाळ वगैरे कांहीं झालें नव्हतें. धाकट्या भावाच्या मरणानंतर थोरल्या भावानें त्याच्या वांटणीचीं शेतें वगैरे संपत्ति घशांत टाकली, अन् आपल्या त्या बिचाऱ्या अनाथ विधवा भावजईचा तो अतोनात—शिकस्तीचा छळ करूं लागला. बिचारीला दोन वेळ पोटभर अन्नहि मिळेनासें झालें. पांडू तिला मारहाणहि करूं लागला अन् तिच्या हालांना सीमा नाहींशी झाली. छळाची अगदीं जेव्हां कमाल झाली, यातना अगदीं सहन होईनाशा झाल्या, त्या वेळीं बिचारीनें घरांतून पोबारा केला. ती हल्लीं कुठें तरी गुप्तपणानें राहिलेली आहे. तुह्मी सोनगांवाला गेलांत, ह्मणजे या पांडु गवळ्यावर खूब कडैक नजर ठेवा. पण तसें तुह्मी कांहीं करीत आहां, असा त्याला वासवाराहि लागूं देऊं नका. पांडू पोलिस ठाण्यावर जातो आहे, किंवा जिल्ह्याला वगैरे चालला आहे, असें तुमच्या नजरेला पडतांच तत्क्षणीं मला खबर द्यायला चुकूं नका. काय समजलें ना?"

केशवराव नम्रपणें ह्मणाले " समजलों हुजूर ! तो सारा बंदोबस्त मी अगदीं ठीकठाक करतों पहा ! त्याबद्दल श्रीमंतांनीं तिळभरसुद्धां काळजी करूं नये ! सात जन्मांत त्या पांड्याला आपल्या भावजयीचा शोध लागूं नये, अशी मी पक्की व्यवस्था करून टाकतों ! "

केशवरावजींचें हें भाषण ऐकून रावसाहेबांच्या मनांत एक प्रकारचें कौतुक उत्पन्न झालें. त्यांनीं विचारलें " काय व्यवस्था कराल ?"

" या गोष्टीला पुष्कळ युक्तया अगदीं सहज रीतीनें करतां येतील. पण इतक्यांतल्या इतक्यांत जी युक्ति माझ्या डोक्यांत आली आहे, ती मी श्रीमंतांना पाहिजे तर सांगतों. मी विचारतों याबद्दल हुजूरांनीं गरिबावर रागावूं नये–त्या बाईचें नांव काय ?"

रावसाहेबांनीं जरा शंकित स्वरानें विचारलें " नांवाचें काय कारण ?"

"जी हुजूर, कारण आहे. एक पत्र तयार करावें, अशी माझी कल्पना आहे."

" अच्छा–तिचें नांव गंगा. "

" माझा विचार असा आहे, कीं, या गंगा गवळणीच्या नांवानें अगोदरपासूनच एक पत्र तयार करून ठेवावें. सोनगांवला गेल्यानंतर तीनचार दिवसांनीं एके दिवशीं मी पांडूला बोलावणें पाठवीन. तो आल्यानंतर त्याला एकीकडे घेऊन जाऊन मी त्याला विचारीन 'काय रे पांडू, तुला एक भाऊ होता काय–नरू नांवाचा ?' तो ह्मणेल 'होय साहेब !' मी विचारीन ' तुझा तो भाऊ मेला नव्हे ?' तो उत्तर देणार ' होय सरकार !' ' त्या तुझ्या भावाचा वारस कोण ?' तो नव्याण्णव हिश्शांनीं ह्मणणार ' जी हुजूर, त्याचा वारस मी. मी विचारीन 'त्या नरूची बायको आहे ना रे ?' ' आहे साहेब !' मी नंतर त्याला विचारीन ' तर मग त्याचा वारस तूं रे कसा ? त्याचा वारस झाली त्याची बायको. नरूच्या हिश्शाची जी कांहीं जमीनबिमीन असेल, तिचें उत्पन्न तिच्या जीवमानापर्यंत अर्थात्च तिला मिळणार. तिच्या पाठीमागें फार तर तूं तिचा वारस ठरशील, असा हिंदुलॉचा अभिप्राय आहे. सरकारच्या डायरींत

देखील असें लिहिलें आहे.' माझें हें भाषण ऐकून स्वारीची गडबड उडाल्याशिवाय कांहीं रहात नाहीं. नंतर जवळच्या पेटींतून हें मी तयार केलेलें पत्र बाहेर काढून, डोळ्यांनां चाळशी लावून आपल्याशींच एकवार वाचल्यासारखें करीन्, अन् मग त्याला ह्मणेन "हें पहा पांडू, हें पत्र मला त्रिंबकेश्वराहून आलें आहे. वाचतों मी, हें ऐक–' श्रीत्रिंबकेश्वर प्रसन्न. राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री गोविंदरावजी बर्वे, कारभारी सोनगांव महाल, यांच्या चरणीं त्रिंबकेश्वराहून गंगा वाडकरीण हिचे अनेक रामराम विशेष. आज तागायतपावेतों आपल्या आशीर्वादानें कशी तरी जिवंत राहिलें आहें. मी एक अनाथ स्त्री आहें. सोनगांवला माझें सासर. माझे भ्रतार मयत झाले असून विधवा झाल्यापासून मी माझे दीर पांडूजी वाडकर यांच्या घरीं राहून त्यांच्या घरसंसाराचें काम बहुतेक मीच करीत असें. पण माझे दीर मला धडपणें खायलाप्यायलाहि देत नसत, इतकेंच नव्हे, तर विषप्रयोग करून माझा मधला कांटा समूळ काढून टाकावयाचाहि त्यांनीं मतलब केला होता. या वार्तेमुळें भयभीत होऊन प्राणांच्या भयानें एके दिवशीं घर सोडून मी हळूच पळून गेलें. ती तेव्हांपासून त्रिंबकेश्वरीं येऊन त्रिंबकेश्वराच्या पायांशीं पडून राहिलें आहे. दररोज गोदेचें स्नान अन् देवाचें दर्शन घेऊन बाकीचे आयुष्याचे दिवस शांततेंत कंठावे, अशी माझी इच्छा आहे. माझ्या अन्नवस्त्राच्या खर्चासाठीं मला दरमहा दहा रुपये तरी जरूर पाहिजेत. माझ्या भ्रतारांच्या हिश्शाचें जें जें ह्मणून कांहीं होतें, तें आपल्या अंगाखालीं घालून माझे दीर त्यांचें उत्पन्न अविच्छिन्नपणें खात आहेत. वास्तविक पाहिलें तर माझ्या देहांत प्राण आहे तोंपर्यंत माझ्या भ्रतारांच्या हिश्शाची मी मालकीण आहें, आणि त्यांच्या शेताबितांचें सारें उत्पन्न मलाच मिळालें पाहिजे. हें उत्पन्न घशांत पडावें ह्मणून मला विषप्रयोग करून माझ्या दीरांनीं मला ठार मारण्याचा बेत केला होता. माझी इच्छाच असती, तर पोलिसांत जाऊन मला वर्दी देतां आली असती, सरकारदरबार करून माझ्या भ्रतारांचा हिस्सा मला आपल्या ताब्यांत

घेतां आला असता–परंतु मला रंडकीला आतां पैशाशीं आणि जमीन-जुमल्याशीं काय करावयाचें आहे? कसा तरी करून माझा उदरनिर्वाह चालला, धर्म करावयाला मला दोन पैसे मिळाले, ह्मणजे मग खुशाल मी रामराम ह्मणत स्वस्थ बसेन. ह्मणून आपल्या पायांशीं या अनाथ स्त्रीची इतकीच विनंति आहे, कीं, माझ्या स्वतःच्या हिश्शाचें जें उत्पन्न येत असेल, त्यापैकीं दरमहा दहादहा रुपये माझे दीर पांडूजी वाडकर यांच्यापासून काढून घेऊन खालीं लिहिलेल्या पत्त्यावर मला मनीआर्डर करून दरमहाच्या दरमहा पाठविण्याची आपण कृपा करावी. आपण आमच्या अन्नदात्या इनामदारांचे प्रतिनिधि, गांवचे कर्तेहर्ते. आपणच आमचे सरकार, आपणच आमचे मॅजिस्टर आणि पोलिस. यासाठीं मी आपणालाच शरण आलें आहें. ज्याच्या योगानें या दीन अनाथ विधवेच्या प्राणांचें रक्षण होईल, असें पुण्याचें काम करण्याचें श्रेय आपण संपादन करावें. सेवेशीं श्रुत होय, हे विज्ञापना. पैसे पाठवण्याचा पत्ता. वासुदेव भटजी सप्रे, पुजारी, माधवदासाची वाडी, त्रिंबकेश्वर–जिल्हा नाशिक.' याप्रमाणें पत्र वाचून मी पांडूला ह्मणेन 'काय रे पाजी माणसा! असा आहे काय तुझा नीचपणाचा कारभार? बिचाऱ्या विधवा भावजयीचे हालहाल करून अन्नाचा घांसहि न देतां तिला तूं घर सोडायला लावलेंस, नाहीं का हरामजाद्या? तिला विषप्रयोग करून ठार मारायचा तूं बेत केला होतास नाहीं का? पांड्या, तूं तर मला नुसता राक्षस दिसतोस! गंगेचें–तुझ्या भावजयीचें हें पत्र जर मीं ठाण्यावर नाईकसाहेबांकडे पाठविलें, तर काय तुझी दशा होईल, सांग पाहूं! इथें शिपाई येऊन तुला हातकड्या घालून मारीतमारीत नेतील ना ठाण्यावर धरून? अन् शेवटीं तीनशेंसात कलमाप्रमाणें तुझ्यावर खटला होऊन जाशील ना बेट्या चामडीं कुटायला दहा वर्षें?' पांड्या अर्थात्च शेवटीं आपला गुन्हा कबूल करणार. त्या वेळीं मी त्याला ह्मणेन–'जा, या पत्त्यावर दरमहाच्या दरमहा दहा रुपये पाठवून देत जा. गंगेनें मला तुझ्याकडून पैसे वसूल करून घेऊन आपणाला पाठवायला मला लिहिलें आहे, पण तें कांहीं

माझ्यानें नाहीं व्हायचें. अरे, मला का एवढेंच एक वसूली करून पैसे पाठवायचें काम आहे? माझेंच काम मुळीं नाहीं मला उरकत. तो दुसऱ्याचीं कामें काय मी उरकणार? मी काय कोर्टाचा बेलीफबिलीफ आहें, तो काय तुझ्यावर डिक्रया बजावीत बसूं? तुला मी म्हणतों, हें कबूल आहे का सरकारदरबार करून गंगेला आपला हिस्सा घेणें भाग पाडतोस?' असें म्हणून मी डोळे लाल करून बसून राहीन. त्याच्या भावजयीचा पत्ता तर त्याला बापजन्मीं देखील नाहींच लागणार; पण तीनशेंसात कलमाप्रमाणें गिरफदार व्हायच्या भीतीनें तो बेटा ठाण्यावरहि जायला धजणार नाहीं!"

असें म्हणून केशवराव थांबले. रावसाहेब त्यांचें हें अलौकिक वक्तृत्व मुकाट्यानें ऐकत बसले होते. ते आश्चर्यानें निस्तब्ध होऊन नुसते आ पसरून राहिले होते! ते ओढीत असलेली सिगारेट तर केव्हांच विझून जाऊन तो हात जशाचा तसा सतरंजीवर पडून राहिला होता. केशवरावजींची ही अलौकिक बुद्धिमत्ता, त्यांचें अपूर्व युक्तिकौशल्य, कुटिलनीतींतील त्यांची पारंगतता, त्यांचें विलक्षण वक्तृत्व, हीं पाहून व ऐकून ते आश्चर्यानें नुसते चीत होऊन गेले होते! केशवराव दिसावयाला तर अगदीं साधाभोळा, तोंडांत बोट घातलें तर चावावयाची देखील अक्कल नाहीं, असा माणूस दिसतो; दृष्टीला पडतांच नम्रपणें नमस्कार करून जरा अंतरावर जाऊन खालीं मान घालून उभा रहातो; त्याच्या मस्तकांत इतका युक्तिबाजपणा, चातुर्य आणि कौटिल्य खेळत असेल अशी बिचाऱ्या रावसाहेबांची कधीं स्वप्नांतहि कल्पना नव्हती!

ह्या भेटींत केशवरावजींनीं रावसाहेबांच्या मनावर अगदीं विलक्षण, वर्णनातीत परिणाम केला. ते त्यांच्यावर अत्यंत प्रसन्न झाले. ते मनांत म्हणाले "खरोखरच हा केशवराव म्हणजे एक अमोलिक झांकलें रत्न आहे. असलें रत्न आपलें नशीब थोर म्हणूनच आपणाला लाभलें! '**शैले शैले न माणिक्यम्**' हेंच खरें! काय वाटेल तें झालें, तरी या अशा मान्य माणसाला कांहीं आपल्या हातून घालवून उपयोगी नाहीं!"

नंतर रावसाहेब केशवरावांनां उद्देशून ह्मणाले "तुह्मी ह्मणतां तें खरें केशवराव, पण पोज्यानें जर खरोखरच मनीआर्डर पाठवली तर हो ?"

केशवराव स्मितपूर्वक ह्मणाले " असें होणें संभवनीय नाहीं श्रीमंत! पैसा हा जिन्नसच असा आहे, कीं, तो कुणाला सहजासहजीं हातांतून दवडण्याची इच्छाच होत नाहीं. अन् असें असल्यामुळेंच तर मी त्याला ह्मणणार, कीं, 'तुह्मी मर्जी असेल तर तूं पाठव तिला पैसे मी कांहीं या तुमच्या कारभारांत नाहीं पडणार! अन् समजा, कीं, वासुदेवभटजी सप्रयांच्या नांवानें त्यानें पैसे पाठविले, तर त्रिंबकला खरोखरच त्या पत्त्यावर तो भट आहे, व तो भट ते पैसे केव्हांच गिळंकृत करून बसेल, याबद्दल हुजुरांनां तिळप्राय शंका नको; त्या वासुदेवभटाला मी केव्हांपासून चांगला ओळखतों आहें!"

रावसाहेब संतोषाच्या स्वरानें ह्मणाले " वाः, फार उत्तम! तर मग अशाच कांहीं तरी युक्तीनें बंदोबस्त करून टाका त्या प्रकरणाचा. तुमचें चातुर्य अन् बुद्धि पाहून मी तुमच्यावर फार संतुष्ट झालों आहें. सोनगांवच्या दोन महिन्यांच्या हंगामी बदलीपुरताच नव्हे, तर मीं तुह्माला दरमहा तीस रुपये कायमचाच पगार करून टाकला आहे."

केशवरावजींच्या डोळ्यांतून जणूं काय कृतज्ञतेच्या लहरिच उसळूं लागल्या. ते गद्गद कंठानें ह्मणाले "हुजूर माझे मायबाप आहेत! गरीबावर हुजुरांची नेहमीं अशीच कृपादृष्टि असावी."

"ठीक आहे तर. तुह्मी सोनगांवाला परवां निघा. गोविंदरावांपासून कागदपत्र, पैसेबियसे नीट सारें तपासून घेऊन तुम्ही एकदम आपल्या कामाला सुरुवात करा. परवांपासून तुमची सुटी मी मंजूर करतों."

"जशी श्रीमंतांची आज्ञा!" असें म्हणून पुनः एकवार नम्रपणें प्रणाम करून केशवरावजींची स्वारी तेथून निघाली.

केशवराव बाहेर येऊन पहातात, तों कचेरीच्या इमारतीच्या विस्तीर्ण अंगणांतून पिवळा कोट आणि हिरवें पागोटें घातलेला सखाराम कुढव बाहेर चालला आहे! केशवरावांच्या छातींत धस्स झालें! सखारामाच्या

आपण दृष्टीला पडूं नये, म्हणून ते चटकन् तेथल्या एका खांबाच्या आड दडाले.

सखाराम मोठ्या दरवाजाच्या पार झाल्यावर केशवराव कचेरींत जाऊन बरोबरच्या एका कारकुनाला म्हणाले "काय हो राजारामभाऊ, पिंवळ्या कोटाचा अन् हिरव्या पागोट्याचा एक मनुष्य आतां इथून गेला, तो कोण हो ?"

" तो तांबखेडचा—आपलें एक कुळ आहे. त्याचें नांव सखाराम कुडव."

" खंड वसूल द्यायला आला होता वाटतें ? "

" नाहीं. दादासाहेबांची भेट घ्यायला गेला होता तो. त्यांच्याशीं कांहीं महत्त्वाचें काम आहे आपलें, असें तो म्हणाला. माझ्यापाशींच तो चौकशी करीत होता."

" कसलें हो काम ? " जरा चिंतातुर मुद्रेनें केशवरावजींनीं विचारलें. त्यांच्या छातींतील धडकी अद्याप कमी झाली नव्हती.

" नाहीं बुवा, त्यानें कांहीं मला नीटसें नाहीं सांगितलें. बेटा बराच घाईत होता, असें दिसलें."

" अस्सें !" असें उद्गारून केशवरावजी पुनः आपल्या कामाला लागले. परंतु त्या दिवशीं त्यांच्या कामांत कधीं नाहीं त्या चुका होऊं लागल्या. कारण, त्या दिवशीं त्यांच्या मस्तकांत निरनिराळ्या विकारांनीं, त्याप्रमाणेंच युक्तिजुक्तींनीं मारे दंगल चालविली होती !

---

## प्रकरण सतरावें.

## केशवराव निघाले.

दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं इतर कारकुनांना आपलें कामकाज समजावून देऊन व कागदपत्र वगैरे त्यांच्या हवालीं करून केशवरावजींची स्वारी यजमानांचा निरोप मागावयाला गेली. त्या वेळीं रावसाहेब आपल्या कांहीं मित्रांबरोबर सोंगट्या खेळत बसले होते. केशवराव

जाऊन उभे राहिले व त्यांनीं यजमानसाहेबांना नमस्कार केला. हें राव-साहेबांनीं पाहिलें, परंतु ते प्रथम त्यांच्याशीं कांहीं बोलले नाहींत. आपलें एक दान कसें जुळवावें, या विचारांत त्यांचें डोकें निमग्न झालें होतें. थोडा वेळ वाट पाहून केशवराव आपण होऊनच ह्मणाले "उद्यां मीं सोनगांवला जावें, असा हुजुरांचा हुकूम झाला आहे."

रावसाहेबांनीं त्यांच्याकडे न पहातांच विचारलें "मग जातां उद्यां?"

"होय हुजूर! उद्यां पहांटेच निघतों आहें."

रावसाहेब ह्मणाले "ठीक आहे, सावधपणानें कामकाज करा—" असें ह्मणून पुनः त्यांनीं 'पोबारा' ह्मणून फांसे टाकले. केशवराव नमस्कार करून तेथून निघून गेले.

सूर्यास्त व्हावयाचा सुमार झाला होता. नेहमींच्या रस्त्यानें केशवराव आपल्या घराकडे चालले असतां त्यांचा शत्रु-सखाराम कुडव आपल्या हिरव्या पागोट्यानिशीं कचेरीच्या समोरून चालला आहे, असें त्यांच्या एकाएकीं दृष्टीला पडलें. सखारामाला पहातांच केशवराव चटकन् एका झाडाआड दडाले. सखाराम त्यांच्या दृष्टीच्या टापूच्या बाहेर निघून गेल्यावर ते पुनः आपल्या रस्त्याला लागले.

घरीं येतांच केशवरावांनीं हातपायतोंड धुतलें. नंतर चिलीम सज्ज करून तिचा ते आस्वाद घेत असतां नानाप्रकारच्या विचारांनीं त्यांच्या मस्तकांत कल्लोळ करून सोडला. आपला शत्रु जो सखाराम, तो इनाम-दारांच्या वाड्याकडे वारंवार खेपा कां घालूं लागला आहे? त्याचा उद्देश तरी काय असावा? आपल्याला गोत्यांत आणावयाचा कांहीं गुप्त विचार तर नाहीं ना त्याचा? हे व अशाच तऱ्हेचे कितीतरी प्रश्न या वेळीं त्यांच्या मनांत तांडव घालीत होते.

केशवरावजींनीं ती चिलीम केव्हांच फस्त केली. परंतु तिनें त्यांच्या मनाचें समाधान झालें नसावें, असें दिसलें. त्यांनीं पुनः दुसरी चिलीम सज्ज करून तिचे चारदोन सडकून दम मारले, आणि ती बाजूला ठेवून दोन्ही हात कपाळावर ठेवून पुनः ते चिंतासागरांत मग्न झाले. ते विचार

करूं लागले "या सख्याचा–चांडाळाचा कांहीं विश्वास नाहीं येत. हा इकडे कशाला येतो? काल बाबूरावांकडे जाऊन हा कांहीं गुप्त मसलत तर नव्हता करीत? शेतशेतकी, खंड-वसुली, कर्जेबिर्जे यांपैकीं प्रकरण तर खात्रीनेंच नाहीं! कारण, यांपैकीं एकाहि गोष्टींत बाबूराव कधीं मन घालायचे नाहींत. ते तर नेहमीं आपल्या पूजेअर्चेंत, जपजाप्यांत अन् गीतापाठांत मग्न असतात. तर मग काय हा सखाराम एकदम मोठा धार्मिक बनला? बाबूरावांकडून धर्मशास्त्राच्या गोष्टी ऐकायला का तो येत असतो? बाबूरावांना गुरु करून हा सखाराम का त्यांचा शिष्य होणार आहे? परंतु बाबूरावांची तर धर्माचारांवर पूर्णपणें निष्ठा आहे–शूद्राला शिष्य करून ते त्याला उपदेश करतील, अशा तर कांहीं संभव दिसत नाहीं! तर मग या हरामखोर सख्याचा इकडे खेपा घालण्यांत कांहीं तरी निराळाच उद्देश आहे. आपण इथें नोकरीला राहिलों आहों, ही गोष्टी त्याला कोणत्या ना कोणत्या तरी वाटेनें कळली असावी. आपल्या चारित्र्याबद्दल, दुर्गुणांबद्दल बाबूरावांपाशीं चुगल्या करायलाच हा येत असावा, यांत कांहीं संशय नाहीं. त्या बेट्याला वाटलें असेल, कीं, बाबूराव मोठे कडक, सरळ अन् लांडीलबाडी बिलकूल खपवून न घेणारे आहेत. जर हा केशवराव तुरुंगांत जाऊन आलेला आहे, हा एक पक्का बदमाष आहे, असें त्यांनीं एकदां ऐकलें, तर आपल्या वडील भावाला सांगून या बदमाषाला तावडतोब हांकलून देतील! पण अशी जर त्या सख्याची कल्पना असेल, तर मात्र ती साफ चुकीची आहे! कारण रावसाहेब कांहीं नीतिबीतीच्या खुळया कल्पनांनीं पछाडलेले अलीकडचे लोण्याच्या मनाचे सुधारक नाहींत, कीं, या साऱ्या गोष्टी ऐकून त्यांना अगदीं मूर्च्छा येईल!"

अशा प्रकारचे विचार त्यांच्या मनांत खेळत असतां त्यांनीं बाजूला ठेविलेली चिलीम पुनः हातीं घेतली व दोनचार वेळ चांगली सडकून ओढली; परंतु कांहीं केल्या त्यांतून धूरच निघेना! ह्मणून त्यांनीं नीट पाहिलें, तों चिलमीच्या डोकीवरील सारा विस्तव साफ विझून गेला

होता! पुनः चिलीम प्रज्वलित करावयाच्या भानगडींत न पडतां त्यांनीं ती बाजूला ठेवली, व पुनः ते विचार करूं लागले "अच्छा-आज जेव्हां मी अप्पासाहेबांचा निरोप घ्यायला गेलों, त्या वेळीं ते माझ्याशीं असे तुटकपणें कां बरें वागले ? माझ्याशीं धडपणें ते बोलले देखील कां बरें नाहींत ? फार काय, माझ्या तोंडाकडे देखील त्यांनीं पाहिलें नाहीं! माझ्यावर ते रागावले आहेत काय ?-निदान असंतुष्ट तरी झाले आहेत काय ? कदाचित् बाबूरावांनीं आज माझ्याबद्दल त्यांना कांहीं सांगितलें असेल ! नाहीं तर एकाएकीं अप्पासाहेबांच्या मनांत मजबद्दल इतका विलक्षण फरक कसा पडला ? मी तुरुंगांत जाऊन आलों आहें, किंवा मी खोड्यानाड्या गोष्टी, लांड्यालबाड्या करतों हें ऐकून अप्पासाहेब कांहीं माझ्यावर रागावले नाहींत किंवा असंतुष्टहि झाले नाहींत. उलट माझ्या तुरुंगवासाची गोष्ट ऐकून ते तर माझ्यावर खुषच होऊन गेले ! तर मग 'हा केशवराव मोठा निमकहराम आहे-बडा विश्वासघातकी, गळेकापू आहे,' अशाच अर्थाची चुगली या सख्यानें बाबूरावांच्या मार्फत अप्पासाहेबांजवळ खात्रीनें केली असली पाहिजे ! पण अजूनहि काय झालें आहे मोठेंसें ?' फार नाहीं कांहीं उशीर झाला. ही बाबूरावांची स्नानसंध्या करण्याची वेळ--अंजून कदाचित् सख्या बसूनहि राहिला असेल. बाबूरावांची स्नानसंध्या, जपजाप्य आटोपण्याचा अगोदर त्याला ते भेटतील, असा फारसा संभव दिसत नाहीं. छेः, गेलेंच पाहिजे परत अन् काय ती बित्तंबातमी काढून आणलीच पाहिजे ! नाहीं तर सर्व रात्र विचारांत तळमळून काढावी लागेल-सबंध रात्रींत डोळ्याला डोळा नाहीं कसा तो लागायचा !'

असा विचार करून केशवरावजी उठले. त्या वेळीं संध्याकाळ टळून जाऊन चांगला अंधकार पडूं लागला होता. घराचा दरवाजा बंद करून, कुलूप लावून केशवरावजी तसेच बाहेर पडले. कचेरीशीं येऊन पहातात, तों कोणीच तेथें नसून कचेरीला केव्हांच टाळें लागलें आहे. इकडेतिकडे अंगणांत वगैरे कोणीच नसून वाड्याच्या दरवाज्यापाशीं मात्र एकदोघे शिपाई बसले होते.

केशवरावांनां पाहून एका शिपाईबुवांनीं हटकलेंच " काय कारभारी साब, पुन्हां आलांसांजी या वक्ताला ?"

केशवराव साळसूदपणें ह्मणाले " एक भारी जरूरीचा कागद मी इथें विसरून गेलों होतों--तो उद्यां सोनगांवला न्यायला हवा आहे. त्यासाठीं यावें लागलें पुनः, करतां काय ? पण कचेरी पहातों तों केव्हांच बंदहि होऊन गेली." असें ह्मणून केशवरावजींनीं मनोहरपंतांच्या बैठकखान्याकडे पाहिलें. एका उघड्या खिडकींतून उजेड बाहेर येत आहे, असें त्यांच्या दृष्टीला पडलें. हलुहळू केशवरावजींची स्वारी तिकडे निघाली. ती खिडकी मागच्या बाजूच्या भिंतीच्या भुईपासून थोडी उंच होती. खिडकीखालीं शेवाळी धरलेल्या विटांच्या तुकड्यांची रास होती; तिच्या आसपास दुसरींहि कांहीं जंगली झुडुपें उगवलेलीं होतीं. पायांच्या बोटांवर हळूच चालतचालत जाऊन केशवराव त्या खिडकीच्याखालीं जाऊन उभे राहिले. खिडकी उंच असल्यामुळें आंतलें कांहींसुद्धां त्यांनां दिसलें नाहीं. कोणीतरी दोन व्यक्ति एकमेकांशीं बोलत आहेत, एवढें मात्र त्यांनां कळून आलें. त्यांच्या कंठस्वरांवरून त्या व्यक्ति बाबूराव व सखाराम कुडव याच आहेत, असें त्यांनीं तत्काल ओळखलें; परंतु त्या उभयतांमध्यें चाललेल्या सगळ्या गोष्टी कांहीं त्यांनां धडपणें ऐकूं येईनात! ज्या एकदोन गोष्टी केशवरावजींच्या कानांवर मोठ्या शिकस्तीनें आल्या त्या या—

" कधीं ह्मणालास तो उत्सव आहे ?"

"या पहिल्या तारखेला. पण त्यांनीं मला आग्रह करकरून सांगितलें आहे, कीं, काय वाटेल तें करून हुजूर निदान आदल्या दिवशीं तरी तिथें हजर होतील, असें तुला केलेंच पाहिजे !"

थोडा वेळ कोणींच कांहीं बोललें नाहीं. नंतर "बरें तर--ठीक आहे. काल तूं जेव्हां इकडे आला होतास, त्या वेळीं अच्युतराव ह्मणून माझे एक स्नेही इथें बसले होते. त्यांचाहि गांव साताऱ्याजवळच आहे. आपल्या घरीं येऊन पांचसात दिवस तरी मीं रहावें, ह्मणून अच्युत-

रावांनीं मला अतोनात आग्रह केला आहे. साताऱ्याला पहिल्या तारखेला त्यांच्या उत्सवाला हजर राहून दुसऱ्या दिवशीं जाईन मी अच्युतरावांच्या घरीं, ह्मणजे झालें. तूं कधीं जाणार आहेस इथून ?"

" मी उद्यां पहांटेला निघणार आहें हुजूर ! "

" अच्छा–तूं जा आतां. पत्राचा जबाब लिहून देतों, तो घेऊन जा. तोंडानेंहि सांग त्यांनां, ह्मणावें पहिल्या तारखेच्या अगोदरच एकादा दिवस मी येऊन पोंचतों तिथें. "

यानंतर मृदुमंद स्वरांत त्या दोघांत आणखीहि कांहीं गोष्टी झाल्या. परंतु त्यांपैकीं एक अक्षरहि आमच्या केशवरावजींनां कळलें नाहीं. इतक्यांत जवळच्या झुडपांत खसखस असा कांहीं आवाज होऊन कांहीं हालचाल झाल्यासारखाहि त्यांनां भास झाला. अंधार तर त्या वेळीं भारी पडला होता–कांहींहि दिसत नव्हतें. सर्पविर्प या प्रकरणापैकीं तर कांहीं नसेल ना ? आतां केशवरावजींनां कांहीं तेथें उभें रहाण्याचें धाडस होणें शक्य नव्हतें. "देवा, तूंच माझें आतां रक्षण कर !" अशी आपल्या मनाशीं देवाची प्रार्थना करून हळूच आंगठ्यांवर पावलें टाकीत केशवरावजी तेथून निसटले, व कचेरीच्या अंगणांतून बाहेरच्या दरवाज्यांतून घाईघाईनें पार होऊन ते आपल्या घराकडे जाऊं लागले.

कांहीं अंतरावर ते गेले नाहींत, तों एक शिपाई त्यांच्यासमोर येऊन ह्मणाला " कोण, केशवरावजी ? "

केशवरावांच्या छातींत कांहीं चमत्कारिक होऊं लागलें. आतां आपण जे खिडकीखालीं उभे राहून चोराप्रमाणें लपून आंतील गोष्टी ऐकत होतों, हें बाबूरावांनां कळून आल्यामुळें त्यांनीं आपणाला पकडण्याकरतां तर हा शिपाई नसेल ना पाठविला ? शंकित स्वरानें केशवरावांनीं विचारलें " हो मीच तो. कां रे बुवा ? काय काम आहे ? "

" तुह्माला हुजुरांनीं बोलाविलें आहे ?"

" हुजुरांनीं ? कोणत्या हुजुरांनीं ? "

" कोणत्या हुजुरांनीं ? वाः–धनीसाहेबांनीं– अप्पासाहेबांनीं ! "

" अप्पासाहेब बोलावताहेत मला? कशाला रे ? "

" तें कुणाला ठाऊक ? आमच्यासारख्या माणसांनां तें कसें समजणार ? मला नुसता हुजुरांनीं हुकूम केला 'जा आतांच्या आतां बोलावून आण केशवरावांनां.' "

कांहीं न बोलतां केशवरावजी त्या शिपायाबरोबर चालूं लागले. कांहीं वेळानें रावसाहेबांच्या बैठकखान्यांत ते जाऊन पहातात, तों रावसाहेबांची स्वारी एकटीच बसली असून कसलेंसें एक पुस्तक वाचीत आहे, असें त्यांच्या दृष्टीला पडलें.

नम्रपणें नमस्कार करून केशवराव ह्मणाले " हुजुरांनीं माझें स्मरण केलें होतें ? "

" होय. उद्यां तुह्मी सोनगांवला जातां आहां ना ?"

" होय हुजूर ! पहांटे उठून निघून जावें असा माझा बेत आहे. "

" कसे जाणार तुह्मी ? पायांनींच ? "

" पायांनीं गेलों असतों; पण चारदोन गांठोडीं, थोडीं भांडींबिंडीं, एकदोन फुटक्यामोडक्या पेट्याबिट्या आहेत, ह्मणून एक बैलगाडी ठरवून ठेवली आहे आजच. "

रावसाहेब ह्मणाले " तुमचें सामानसुमान जें कांय असेल, तें त्या गाडींतूनच जाऊं द्या. पण तुह्मी इनामदारांचे कारभारी—आमचे प्रतिनिधि होऊन जाणार—तुह्मी बैलगाडींतून—तिकडे जाणें नाहीं बरें दिसत. यांत तुमच्या तशीच आमच्याहि मानाची हानि आहे. मी तुमच्यासाठीं मेणा तयार करायला सांगतों—मेण्यांतून जा सोनगांवला. "

आतांपर्यंत केशवरावजींच्या मनांत ज्या साऱ्या शंकाकुशंकांनीं दंगल चालविली होती, त्या रावसाहेबांचें हें वर्तन पाहून चटकन् नाहींशा झाल्या ! तर मग आपणावर श्रीमंत कांहीं रागावले नाहींत, त्यांच्याशीं कोणीं आपल्याबद्दल चुगल्याहि केल्या नाहींत, अशी त्यांची आतां खात्री झाली. दोन्ही हात जोडून केशवराव ह्मणाले "जशी हुजुरांची आज्ञा !"

क्षणभरानें रावसाहेब ह्मणाले " आणखी तुह्माला एक सांगायचें आहे. काल मी तुम्हाला त्या गवळणीबद्दल बोललों होतों ना ?"

" होय हुजूर!"

" पांडूला बोलावून आणून त्याला तिच्याबद्दल बोलायविचारायची कांहीं जरूरी नाहीं. तरी त्याच्यावर तुम्ही चांगली नजर मात्र ठेवा. जर कुठें ठाण्याबिण्यावर तो जाऊं लागला, तर तत्क्षणीं त्याची मला बातमी द्या–"

"जी आज्ञा!"

" त्या स्त्रीला घर सोडून एक महिन्याच्यावर दिवस होऊन गेले. जर पोलिसांत पांडूला वर्दी द्यायची असती, तर इतक्या दिवसांत त्यानें ती दिलीहि असती. ती ज्या अर्थी त्यानें दिली नाहीं, त्या अर्थीं आतां तो तशी कांहीं खटपट नाहीं करीत असें वाटतें. अहो, बोलूनचालून ती इष्टेटीची वांटेकरीण, गेली तर पीडा चुकली, असा त्यानें विचार केला असेल. आतां आपण होऊन ती खाजवून खरूज काढायची कांहीं जरूर नाहीं."

"ठीक आहे. जशी श्रीमंतांची मर्जी!"

"जर पुढें कांहीं करायची जरूरी आहे असें मला वाटलें, तर मीं तुह्माला त्याबद्दल जरूर कळवीन. मधुनमधून तुह्मी इकडे येऊन मला तेथली खबरबखर देत जा. आठवड्यांत एकदां किंवा दोनदां येऊन मला भेटून जा."

"हुजुरांच्या आज्ञेप्रमाणें करीन."

"ठीक आहे तर, या आतां."

रावसाहेबांच्या पायांनां हात लावून केशवरावांनीं त्यांचा आज पुनः दुसऱ्यानें निरोप घेतला व ते तेथून निघून गेले.

---

## प्रकरण अठरावें.

## जाळें तर टाकलें!

वाड्याच्या आवाराच्या बाहेर पडून केशवरावजी हळुहळू आपल्या झोंपडीकडे निघाले. बराच वेळपर्यंत ज्या दुर्भावनांनीं त्यांच्या मनाला अतोनात यातना दिल्या होत्या, त्या आतां नाहींशा झाल्यामुळें

त्यांचें मन या वेळीं अत्यंत प्रसन्न झालें होतें. '**इतुकें दे मजला दे मजला। मागतसें हरि तुजला !**' एवढाच चरण आपणाशीं गुणगुणत त्यांची स्वारी रस्त्यानें चालली होती.

मोठ्या रस्त्यावरून पुष्करिणीच्या तीरावरील आपल्या झोंपडीकडे जाणाऱ्या वाटेवर जों केशवरावजी उतरतात, तों आपल्यापासून सुमारें पांच हातांच्या अंतरावर आपादमस्तक पांढऱ्याशुभ्र वस्त्रानें शरीर झांकलेली एक स्त्रीमूर्ति आपणाकडेच येत आहे, असें नक्षत्रांच्या क्षीण प्रकाशांत त्यांच्या दृष्टीला पडलें. हा विलक्षण देखावा पहातांच त्यांच्या छातींत धस्स झालें—पाय लटलटां कांपूं लागले. ही खास कोणी तरी हडळ असून आपणाला गट्ट करावयाला येत असावी, असें वाटून केशवरावजींची भयानें नुसती गाळणच उडाली! एकदां दौड मारून कशी तरी झोंपडी गांठावी, असा त्यांनीं विचार केला; परंतु भयाच्या अतिरेकामुळें त्यांच्या पायांतील सर्व शक्तिच जणूं काय कोणीं हिरावून नेली होती, त्यामुळें आपणाला धूम ठोकणेंहि अशक्य आहे, असें त्यांनां आढळून आलें.

इतक्यांस ती स्त्रीहि केशवरावांच्या पुढें येऊन थबकली व भीतीच्या स्वरानें ओरडली "अगबाई ! कोण तें ?"

केशवरावजींच्या जीवांत जीव आला एकदांचा ! तो कंठस्वर नर्मदेचा, हें त्यांनीं तत्क्षणीं ओळखलें. तिच्याकडे पाहून हंसतहंसत त्यांनीं विचारलें "कोण ! नर्मदा ?"

नर्मदेनें उलट प्रश्न केला "अस्सें ! तुम्हीच का हे ? इतक्या रात्रीं आपली स्वारी कुणीकडे गेली होती ?"

केशवराव फिदीफिदी हंसले व म्हणाले "इतक्या रात्रीं ? इतकी अशी रात्र तरी कितीशी झाली आहे नर्मदे ? ही नुसती संध्याकाळ तर होते आहे. पण तूंच सांग अगोदर मला, तूं कुठून आलीस ?"

परंतु केशवरावांच्या या प्रश्नाचें कांहींच उत्तर न देतां नर्मदा तीव्र स्वरानें म्हणाली "काय हो महाराज, आपण उद्यां पहांटेला म्हणे सोनगांवला जातां आहां !"

" होय. पण तुला कुणीं हें सांगितलें ? "

नर्मदा चिडून म्हणाली "कुणीं सांगितलं–कुणी का सांगेना--तुम्हाला काय त्याचं ? पण एका शब्दानं दिखील मला न सांगतांसवरतां तुम्ही निघून जात होतां नाहीं का इथून ? "

नर्मदा अभिमानानें आपणावर रागावली आहे असें केशवरावांनीं ओळखलें. ती आपणाला भेटावयाला आपल्या झोंपडीकडेच गेली असावी; परंतु दाराला कडीकुलूप पाहून ती परत फिरली असावी, असें त्यांनीं अनुमान केलें. तेव्हां चालून आलेल्या संधीचा फायदा घ्यावा, असा विचार करून ते म्हणाले "वा–वा ! तुझा आपला उलटाच राग माझ्यावर ! तुझी एकीकडे कुठें तरी गांठ घेऊन तुला हें सांगावें, या विचारानेंच तर मी या अशा वेळीं वाड्याकडे गेलों होतों. नाहीं तर काळाकभिन्न अंधार–डोळ्यांत बोट घातलें तर दोन हातांवरचें माणूस दिसण्याची देखील मारामार, अशा वेळीं का मी झोंपडींतून कुठें बाहेर पडणार ! "

" काय म्हणतां ? मला शोधीत होतां तुम्ही ? अगबाई ! " नर्मदा केशवरावजींच्या बतावणीनें अगदींच गळून गेली.

केशवराव अगदीं सद्गदित होऊन म्हणाले "हें तूं काय विचारतेस नर्मदे ? तुला नाहीं तर मीं कुणाला शोधूं ? या जगांत माझें असें आहे कोण ? पण ये–इथें अंधारांत अशीं आपण बोलत किती वेळ रहाणार ? चल, जरा झोंपडींत ये. पुष्कळ गोष्टी सांगायच्या आहेत तुला." असें म्हणून केशवराव झोंपडीकडे चालूं लागले. नर्मदाहि त्यांच्या मागोमाग जाऊं लागली.

झोंपडींत जाऊन केशवरावजींनीं दार बंद करून त्याला खीळ घातली आणि दिवा लावून आपली जीर्ण सतरंजी एकवार जोरानें झाडून त्यांनीं ती परसली. तीवर हळूच अंग टाकून केशवरावांनीं नर्मदेलाहि तिच्यावर बसावयाला आग्रह चालविला. परंतु जोरानें डोकें हलवून सतरंजीवर बसावयाला नर्मदेनें आपली असंमति प्रदर्शित केली व ती थोड्या अंतरावर जमिनीवरच बसली.

नंतर एक जांभई देऊन केशवरावांनीं विचारलें "मग काय नर्मदे?"

नर्मदा तीव्र स्वरानें ह्मणाली "मग काय नर्मदे! तुह्मीं ही माझी थट्टा चालविली आहे वाटतं होय? आतां ही सारी थट्टाबिट्टा राहूं द्या तुमची! तुह्मी कोणत्या तऱ्हेचे माणूस आहां, तें मला चांगलं कळून आलं आहे, समजलं? तुह्मी ह्मणे सोनगांवचे कारभारी झालांत? होय ना कारभारी-साहेब?"

केशवराव ह्मणाले "पण कांहीं कायमचा नाहीं–ॲकटिन्!"

"कायमबियम तें कांहीं नाहीं मला कळत! तुह्मी मोठे बडे लोक झालांत ह्मणून वाटतं डोळयांवर अगदीं धुंदी आली तुमच्या वैभवाची?"

'करावा थोडासा विनोद,' असा विचार करून केशवराव हंसून ह्मणाले "अग, पण झाला आहे कोण बडा अन् श्रीमंत? म्हणतात ना वैभव हें भोगायचें बायकांनीं! तूं जर माझ्याशीं लग्न करशील, तर मग पहा मी खराच बडा लोक होतों कीं नाहीं तो! पण तुला कुठें येते आहे माझी दया?"

नर्मदा जरा कुऱ्यानेंच ह्मणाली "दया ती आणखी काय यायची? मला नाहीं बाई हा असला चटोरपणा आवडत! कां–मी काय त्या दिवशीं सांगितलं तुम्हाला? मी बायकोमाणूस असतां 'मी राजी आहें लगीन करायला!' असं स्वतःच्या तोंडानं निर्लज्जपणानं तुम्हाला सांगितलं नाहीं का! अन् तुम्ही दिखील म्हणालांत, कीं, एके दिवशीं कधीं तरी बसून सारा बेत ठाकठीक करून टाकूं म्हणून! नंतर कथा नाहीं वार्ता नाहीं त्याच्याबद्दल–अन् मला फसवून हळूच दडी द्यायचा विचार चालवला होतात नाहीं का तुम्हीं कारभारीसाहेब!"

मान हलवून केशवरावजी मानभावीपणानें म्हणाले "वा–वा! खूब आहेस बुवा तूं नर्मदे! स्त्रीचरित्र म्हणतात तें यालाच! काय ग नर्मदे! अगदीं खरें खरें सांग तूं हां मला–त्यानंतर तूं कधीं एकदां तरी आली होतीस का इकडे चुकून तरी? दोघेंजणें बसून मग सारे बेत कायम करून टाकायचे, असें ना ठरलें होतें आपलें दोघांचें? मी आपला दररोज संध्या-

काळीं इथें पडून वाट पहातों आहे तुझी-आज येईल नर्मदा-आज नाई। आली तर उद्यां तरी खास येईलच येईल! पण आहे कुठें नर्मदा न् आहे कुठें गोदावरी! अन् उलट आतां सारा दोष माझ्यावरच ठेवतेस तूं! वा-वा! कमाल आहे तुझी तरी नर्मदे!"

केशवरावजींच्या या भाषणानें नर्मदा बहुतेक अगदीं चीत होऊन गेली! केशवराव ह्मणतात तें खरें असून सारा दोष आपलाच आहे, असा विचार तिच्या मनांत येऊन ती मनांतून बरीच ओशाळली. केशवराव कारभारी बनून सोनगांवला जात आहेत, ही बातमी एकाएकीं आज तिच्या कानांवर येतांच नर्मदेच्या अंगाची नुसती आगीआग झाली. 'आपण तुझ्याशीं पुनर्विवाह करतों, पुनर्विवाहाला शास्त्राधार आहे,' इत्यादि इत्यादि केशवरावांनीं ज्या आपणाला सातसतरा गोष्टी सांगितल्या, त्या साऱ्या थापा-ती शुद्ध आपली फसवणूक-भोळीभाबडी बायको पाहून त्यांनीं आपली प्रतारणा मात्र केली, अशी नर्मदेची सहजच समजूत झाली, आणि त्या रागाच्या भरांत तिला दुसरेंतिसरें कांहीं सुचेनासें होऊन रात्रीच्या अंधारांत ती तशी केशवरावजींच्या शोधाला आली.

नर्मदा कांहींच बोलत नाहीं, असें पाहून केशवराव पुढें ह्मणाले "काय ग नर्मदे, इतक्या दिवसांत तूं इकडे अगदीं फिरकली देखील नाहींस, हें काय? त्या दिवशीं सैंपाक करून मला वाढलेंस, अन् 'संधि मिळतांच मी आल्याशिवाय रहाणार नाहीं,' असें ह्मणून जी निघून गेलीस, ती आज तोंड दाखवते आहेस का? वा!"

नर्मदा आतां बरीच शांत झाली होती. ती ह्मणाली "मी येऊं तरी कशी, तें तुह्मीच सांगा. इकडे यायचं ह्मणजे काय सोपी गोष्ट आहे? चोरून-मारून यावं लागतं. किती झालं तरी मी पडलें थोरामोठ्यांच्या घरची नोकर, अन् त्यांत बाईसाहेबांच्याजवळ मला नेहमीं असावं लागतं. मला का एवढा तरी वेळ मिळतो आहे मेला इकडेतिकडे हिंचमिचायला? आज बाईसाहेबांजवळ कितीकिती बहाणे करावे लागले आहेत, तेव्हां कुठं मेली जरा संधि मिळाली यायला इकडे!"

"तरी मी म्हणतों, आज तरी बरी आलीस! मला वाटलें, कीं, कदाचित् माझ्याशीं लगीनबिगीन करावें लागेल, या भीतीनें केलास तूं कुठें तरी पोबारा, अन् म्हणून नाहीं तूं इकडे तोंड देखील दाखविलेंस तें—"

नर्मदा किंचित् कर्कश स्वरानें म्हणाली "पोबारा कुणीं केला? मीं का? का लगीन करावं लागेल, म्हणून तुम्हीच करतां आहां पोबारा? काय तरी बाई आश्चर्य! सोनगांवला तर तुम्ही जातां आहां, मग लग्नाची व्यवस्था, मुहूर्तनिश्चय हें सारं होणार तरी कसं अन् करणार तरी कोण?"

"होईल ग सारें तें—सारें होईल! हळुहळू मुहूर्त देखील टाकूं ठरवून. आहे काय त्यांत?"

केशवरावजींच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच नर्मदेच्या अंगाचा तिळपापड झाला. ती संतापानें म्हणाली "अशीं अगदीं उडवाउडवीचीं उत्तरंशीं चालवलीं आहेत तुम्हीं आज?"

केशवराव शांतपणें म्हणाले "तुला यांत काय ग उडवाउडवी दिसली नर्मदे? तुम्हां बायकांचें हें असेंच! विश्वास म्हणून तुम्हाला कुणाचा कधीं पटायचा नाहीं."

नर्मदा आतां अगदीं निकरावरच येऊन म्हणाली "हें पहा, माझ्याशीं लगीन करावं, असं खरंखरं जर मनापासून वाटत असेल तुम्हाला, तर सारा बेतबात कायम करून टाका एकदांचा! आतां कांहीं माझं मन नाहीं इथं लागत—तुम्हाला आपली मी खरं खरं सांगतें. जर खरोखरच तुम्हाला नसेल माझ्याशीं करायचं लगीन, तर आपलं मला तसं स्पष्ट सांगा! तें आपलं मला पत्करलं. माझी एक मावशी होती, ती नुकतीच मेली अन् मरतांना ती मला थोडंबहुत देऊनहि गेली आहे. नसलं तुम्हाला लगीन करायचं, तर मी आपली काशीला जाणार निघून. माझे जे थोडेफार पैसे आहेत, ते, अन् मावशी मला जें कांहीं ठेवून गेली आहे तें, मिळून काशीला माझं बेश खासं चालेल. सकाळसंध्याकाळ गंगेचं स्नान करून देवाचं नांव घेत मी स्वस्थ बसेन. आतां हा दासीपणा करायला नाहीं माझं मन लागत."

नर्मदेचें हें निकराचें भाषण ऐकतांच आमच्या तैलबुद्धि रावजींच्या डोक्यांत झटकन् एक मिस्किल युक्ति आली. ते विचार करूं लागले—'त्या दिवशीं आपण हिशेब करून पाहिला, त्यावरून या सटवीजवळ अडीचशेंएक रुपयांची माया असावी, असें दिसतें. त्यांत पुनः हिच्या मावशीच्या पैशांचीहि थोडीफार भर पडल्याचें ही सांगते. ते पैसे किती असतील अन् किती नाहीं, तें कुणाला ठाऊक! स्पष्ट विचारलें, तर ही कांहीं दाद नाहीं लागूं द्यायची! इतकेंच नाहीं, तर उलटा माझा हिला संशय यायचा.'

नर्मदेचे पैसे अलग आपल्या पेटींत उतरावे, असा उपाय केशवरावजींनीं तेथल्यातेथें आपल्या सुपीक मेंदूंतून तत्काल योजून काढला!

नर्मदेकडे स्थिर दृष्टीनें पहात अत्यंत गंभीर मुद्रेनें, खालच्या स्वरानें केशवराव बोलूं लागले''नर्मदे, तूं तयार असतां आज जर तुझ्याशीं मला लग्न करतां आलें, तर उद्यांपर्यंत मला धीर निघेल, असें तुला वाटतें तरी कसें? मजकडून अशी किंचित् दिरंगाई कां होते आहे, याचें खरें कारण आहे का तुला ठाऊक? तुझा माझा व्हायचा आहे हा विधवाविवाह--सधवाविवाह नव्हे! अग, विधवेच्या लग्नाला किती किती संकटें उपस्थित होतात, याची तुला कल्पना तरी आहे? पुनर्विवाहाची रीत तरी का सोपी असते ह्मणतेस? हें जर एकाद्या कुंवार पोरीचें लग्न असतें, तर मंगळाष्टकें ह्मणून टाकल्या चार अक्षता वधूवरांच्या डोक्यावर अन् दोन मंत्र ह्मणून होमाच्या अग्नींत दोनचार पळ्या तूप ओतलें असतें, ह्मणजे आटोपला असता सारा कारभार! विधवेच्या लग्नाचे मंत्र ह्मणेल, असा हुषार उपाध्या या खेडेगांवांत का मिळणार आहे? मुंबईशिवाय असला वरच्या दर्जाचा विद्वान् ब्राम्हण कुठेंहि नाहीं मिळायचा. म्हणजे आपलें लग्न व्हायला आपणाला मुंबईला गेलें पाहिजे. मुंबईला जायला, तिथें एकादें घर भाड्यानें घेऊन रहायला, किती खर्च येईल, याची तुला कल्पना तरी आहे? मुंबई इतकी महागडी जागा साऱ्या जगांत नाहीं! माझ्याजवळ हल्लीं आहेत सारे साठ रुपये. त्यांत हा सारा

खर्च निभावेल, असें स्वप्नांतसुद्धां नको आणायला ! अधिक पैसे कोठून तरी मिळवून आणले पाहिजेत, त्या वेळीं ना आपलें लग्न होणार ! मी याच विवंचनेंत होतों–पण देवाच्या दयेनें पैसे मिळावयाचा एक उपाय माझ्या हातीं येऊन माझी चिंता दूर होणार असें वाटतें."

नर्मदेनें उत्सुकतेनें विचारलें "कसली असली युक्ति सांपडली आहे तुम्हाला ? मला सांगा तरी—"

केशवराव साळसूदपणें म्हणाले "एका मोठ्या साधुपुरुषाचें मला दर्शन झालें. मला थोडीशी पैशांची मदत होईल, अशी एक युक्ति त्यांनीं मला दाखवून दिली आहे."

आतां तर नर्मदेची जिज्ञासा आणि कुतूहल हीं भारीच वाढलीं ! ती आर्जवानें म्हणाली "काय हो युक्ति ती ? सांगा ना मला ?"

गंभीरतेनें केशवराव म्हणाले "बायका माणसांनां असल्या गोष्टी कुणी सांगत नसतें !"

"सांगा हो सांगा–तुमच्या गळ्याशपथ मी कुणाजवळ नाहीं बोलायची! सांगा–तुमच्या मी पायां पडतें."

आणखीहि थोडे आढेवेढे घेऊन, नर्मदेनें बरींच आर्जवें केल्यावर, केशवराव मृदुस्वरानें हळुहळू सांगूं लागले. "काल संध्याकाळीं घरांत बसून-बसून आला अगदीं कंटाळा. तेव्हां गेलों असा नदीच्या कांठानें फिरत-फिरत. थोड्या अंतरावर मी जातों, तों एका पिंपळाच्या झाडाखालीं एक बैरागी धुमी पेटवून बसला आहे, असें माझ्या दृष्टीला पडलें. त्याच्या डोकीवर केवढ्या जटा होत्या म्हणतेस ! अगदीं मातीवर लोळत होत्या ना ! त्याची कांति काय होती म्हणतेस–अगदीं लिंबासारखी ! एकेक हात हा असा ! छाती ही अशी भक्कम ! त्याच्या सर्व अंगभर विभूति माखलेली होती. गळ्यांत भल्याथोरल्या रुद्राक्षांच्या माळा होत्या. त्याच्या शेजारीं एक दारूची बाटली असून एका मातीच्या खापरांत ती मधुनमधून ओतून तो पीत असे. दारूच्या नशेनें त्याचे दोन्ही डोळे जास्वंदीच्या फुला-प्रमाणें लालभडक दिसत होते. त्या बैराग्याजवळ जाऊन त्याला नमस्कार

करून दोन्ही हात जोडून मी तसाच उभा राहिलों. मला पाहून तो म्हणतो 'क्यंवरे बेटा, तेरा मू ऐसा मलीन का है ?' मीं म्हटलें 'मी अतिशय गरीब आहें. लग्नकरायची तर मला इच्छा आहे-बायकोहि ठरली आहे-पण केवळ एक पैसा जवळ नसल्यामुळें मला लग्न करतां येत नाहीं आहे. ही चिंता मला सारखी लागून राहिली असल्यामुळें माझा चेहरा असा खराब झाला आहे बुवाजी !' माझें हें बोलणें ऐकून बुवाजी गालांतल्या गालांत हंसले व मला म्हणाले 'रुपय्या तो तेरे पास है-कित्ना रुपय्या तेरा चाहे?' मी हात जोडून म्हणालों 'एक दोनशें रुपये मला मिळतील, तर माझें लग्न होतें आहे बुवाजी!' हें ऐकून बुवाजी म्हणाले 'तेरेपास कित्ना रुपय्या है?' मी म्हणालों 'फारफार तर माझ्या-पाशीं पन्नास नाहींतर साठ रुपये असतील. गरीब माणूस मी-कुठून मिळणार मला पैसे?' बुवाजी म्हणाले 'अच्छा, फिकिर मत करो कुछ! हम तुझे एक मंतर शिखा देगा-मंतरका जोरसे तेरा एकएक रुपय्या चारचार रुपय्या हो जायगा!' मी उत्सुकतेनें म्हणालों 'तर मग मला तो मंत्र सांगा बुवासाहेब !' ते हंसून म्हणाले 'जाओ, नदीमें अस्नान करके आओ.' मीं चटकन् जाऊन नदींत दोनचार बुड्या मारून आलों व भिजलेल्या धोतरानिशींच बुवाजींच्याजवळ जाऊन बसलों. नंतर ते मला म्हणाले "हम जो जो बात बोलता है, मन देकर सुनो. तेरा जेत्ता रुपय्या है, एक लकड़ीका बाकसमें बन्द करना, क्रिस्नपक्खचौदसके रातमें कोई बिधवा औरतको कहना कि तुम अपना केश मुक्त करके अपना दांतसे माटीमें उबुड़हि एक निंब वृक्षका मूल उपड़के लावो.ए मूल लाल सूतरसे बाकसमें बांध देना. बाकसमें पतिका ताल बंध करके चाबियें औरतको दे देना. रोज रात दुपुरमें बाकसके उपर एकसौ आठबार मंतरका जप करना. एक महिना बाद फिर जब कृष्ण-चतुर्दशीका रात आयेगा-औरतको बोलायके ताला खोलना. तब देखोगे कि एकएक रुपय्या चारचार रुपय्या हो गया.' असें म्हणून त्यानें माझ्या कानांत तो मंत्र सांगितला. कांहीं मोठा नाहीं बघ-फक्त तीन अक्षरें ! "

नर्मदा गालावर हात ठेवून अगदीं निस्तब्धतेनें केशवरावजींचें हें भाषण लक्ष्यपूर्वक ऐकत होती. ती आश्चर्यानें इतकी थक्क होऊन गेली होती, कीं, केशवराव बोलावयाचे थांबल्यावरहि तिच्या तोंडून किती वेळ तरी शब्द फुटेना !

नंतर कांहीं वेळानें आश्चर्याचा भर ओसरल्यानंतर नर्मदा ह्मणते "अगदीं खरं हो हें तुह्मी ह्मणतां हें ?"

केशवराव गंभीरपणानें ह्मणाले "खरें कीं खोटें हें प्रत्यक्ष प्रतीति पाहिल्याशिवाय कसें समजणार ? त्या बैराग्यानें ज्याप्रमाणें मला करायला सांगितलें आहे, त्याप्रमाणें मी करून पहाणार आहें. रुपये चौपट झाले, तर ठीकच आहे. नाहीं झाले, तर माझे मूळचे अस्सल रुपये तर कुठें नाहीं ना जात ? मग करून पहायला काय हरकत आहे ?"

"कधीं पहाणार आहां तुह्मी तसें करून ?"

क्षणभर विचारांत पडल्यासारखें करून केशवरावजी ह्मणाले "त्याचाच तर मला जरा विचार पडला आहे ! मी तर जातों आहें सोनगांवला दोन महिने एकटिन् करायला–तेव्हां निदान दोन महिने तरी नको कांहीं त्याची आशा ! सोनगांवची माझी एकटिन् आटोपली, कीं, अप्पासाहेबांजवळून एक महिन्याची रजा घेऊन जाणार आहें मी आपल्या गांवीं. तिथें आहे माझी एक मावशी–विधवाच आहे. कृष्णपक्षाच्या चतुर्दशीच्या दिवशीं तिच्याकडून मी निंबिणीचें मूळ उपटून काढवीन. पण मावशी आतां बरीच ह्मातारी झाली आहे कीं नाहीं, तेव्हां तिचे सारे दांत गेले आहेत पडून–हीं एक मोठी अडचण येऊन पडली आहे मला. हें सारें प्रकरण गुप्तपणें उरकायला मिळते कोण मला, विधवा ! हो, हा प्रकार कुणाच्या कानांवर तर नाहीं जाऊं देतां उपयोगी ! नाहीं तर आपली थट्टा तरी व्हायची किंवा एकादें भलतेंच संकट तरी उपस्थित व्हायचें नसतें–ही मावशी माझी बरी होती–पण दांत नाहींत तिला—"

' येत्या कृष्णचतुर्दशीलाच ही परीक्षा या ठिकाणींच होऊं द्या, ' असें नर्मदा आपणाला ह्मटल्याशिवाय कधीं रहाणार नाहीं, अशी धोरणी

केशवरावजींच्या मनाची पुरी खात्री होती. बुवाजींनीं दिलेल्या मंत्राचा परिणाम काय होईल, हें जाणण्याविषयीं तिच्या मनांत किती जोराची जिज्ञासा व उत्सुकता असावी, हें तिच्या आतुर कंठस्वरावरूनच कोणालाहि ताडतां येण्यासारखें होतें.

शेवटीं, केशवरावजींची जशी कल्पना होती, तसेंच बरोबर झालें! मिनिटभरानेंच नर्मदा त्यांनां अत्यंत उत्कंठेनें ह्मणाली "इकडे पहा, काळोख्या चतुर्दशीला कांहीं आतां फारसा अवकाश नाहीं. तर मग तुह्मी सोनगांवाहून त्या रात्रीं इथें कां येत नाहीं? उगीच दोनतीन महिने लांबण लावण्यांत तरी काय अर्थ आहे, ह्मणतें मी? झालं बुवांचं म्हणणं खरं, तर तेवढं तें आपणांलाच बरं होणार आहे—"

केशवराव मनांत हंसले; परंतु तें बाहेर न दाखवतां किंचित् विचार केल्यासारखें करून ते म्हणाले "सोनगांवाहून मला येतां आलें समज कसें तरी करून—पण बुवाजींनीं सांगितल्याप्रमाणें करायला कबूल होणारी विधवा मला कुठें मिळणार इथें? पुनः वाटेल ती विधवा का या कामाला चालायची आहे? ती दांतवाली तर असलीच पाहिजे, परंतु शिवाय मुख्य गोष्ट ही, कीं, ती माझ्या अतिशय विश्वासाची पाहिजे."

नर्मदा तत्काल म्हणाली "इतके त्याबद्दल तुम्ही विचारांत कशाला पडलांत? मी नाहीं का चालणार त्या कामाला? मी देईन निंबिणीचें मूळ उपटून आपल्या दांतांनीं—हात्तिच्या! आहे काय त्यांत एवढं मोठंसं!"

नर्मदेचें हें भाषण ऐकून आपणाला पराकाष्ठेचा आनंद झाल्यासारखें दाखवून कृतज्ञतेच्या स्वरानें केशवराव ह्मणाले "अहाहा! तूं जर तें काम करायला कबूल होशील नर्मदे, तर आणखी काय पाहिजे मला? मला मग दुसऱ्याच्या तोंडाकडे पहायची, किंवा आर्जवें करून युक्तिप्रयुक्तीनें कुणाला वळवायची गरज का आहे? आज तर झाली सप्तमी—आणखी सातच दिवसांनीं चतुर्दशी आली. तूं जर मला खात्रीचें वचन देत असशील बुवाजींनीं सांगितल्याप्रमाणें करायचें, तर मी खास येतों चतुर्दशीच्या दिवशीं रात्रीं!"

" अगदीं वचन देतें मी तुह्मांला! त्याबद्दल नका तुह्मी कांहीं काळजी करूं! पण तुह्मी याल केव्हांसे ?"

"इथून सोनगांव ह्मणजे तीन कोसांचा रस्ता आहे. कामकाज पुरें करून कचेरीबिचेरी आटपून दिवस असतांनाच जरी निघालों, तरी चारएक घटका रात्रीं येऊन पोंचेन इथें."

" ठीक आहे तर. मीहि त्या दिवशीं त्या वेळेच्या सुमाराला बाई-साहेबांनां कांहींतरी निमित्त सांगून थोडीशी सुटी घेऊन येतें इकडे. पण निंबिणीचं झाड कुठं मिळेल? तें पुनः एकीकडे हवं—"

केशवराव हंसून ह्मणाले " वा वा-काय शंका ही तुह्मी नर्मदे? घोडा मिळाल्यावर नालासाठीं का कुणी अडून बसतें? तूं जर येशील, तर निंबिणीच्या झाडासाठीं कांहीं मी काम नाहीं अडूं देत आपलें! किती पाहिजेत तुला निंबिणीचीं झाडें? माझ्या झोंपडीच्या त्या कोंपऱ्याला बघ किती हवीं तेवढीं आहेत—ये, चल दाखवतों तुला."

असें ह्मणून केशवरावांनीं दिवा हातीं घेतला व तीं दोघें बाहेर पडून त्या कोंपऱ्याकडे गेलीं. नर्मदेनें पाहिलें तों तेथें निंबिणीचीं पुष्कळ झाडें होतीं खरीं!

कांहीं शंका मनांत येऊन नर्मदेनें विचारलें " पण काय हो, दांतांनीं मूळ उपटायचं ह्मणतां, पण जर तें झाड दांतांनीं तुटलं अन् मूळ नाहीं बाहेर निघालं, तर कसं?"

केशवराव ह्मणाले "निंबिण कांहीं इतकी लेचीपेंची नसते. दांतांनीं ती सहसा नाहीं तुटायची; अन् एकदोन झाडें तुटलींच, तर एकाद्या झाडाच्या अंगाला लुगड्याचा पदर लपेटून, त्यावर दांतांचा जोर द्यावा अन् वर उपटून काढावें, ह्मणजे झालें. अग बुद्धि असली माणसाला ह्मणजे त्याला अशक्य काय आहे?"

प्रसन्न दृष्टीनें केशवरावजींकडे पाहून नर्मदा ह्मणाली "खरंच बाई, तुमची कीं नाहीं बुद्धि अचाटच!"

"पण माझी कितीहि अचाट बुद्धि असली, तरी तुझें मन कांहीं नाहीं मिळालें मला !"

बोलतबोलत तीं उभयतां पुनः झोंपडींत आलीं; परंतु नर्मदा कांहीं आतां बसली नाहीं. ती ह्मणाली "जातेंच मी आतां—नाहींतर उगीच होईल हांकहांक माझ्या नांवानं वाड्यांत !"

"अग, जाशील ग नर्मदे—जरा बस ना! मनच्या दोन गोष्टी तुझ्यापाशीं सांगून मन मोकळं करीन ह्मटलें, तर कांहीं वेळ नाहीं मिळत तुला! देव जर दिवस दाखवील आह्मांला, आमचे पैसे जर चौपट होतील, तर थोड्याच दिवसांनीं मुंबईला जाऊन पहिल्याच मुहूर्ताला आपण लगीन उरकून घेतल्याखेरीज कांहीं नाहीं रहात !" असें म्हणून नर्मदेला पोहोंचवीत पोहोंचवीत केशवराव झोंपडीच्या बाहेर आले.

नर्मदेनें उत्सुकतेनें विचारलें "चतुर्दशीला संध्याकाळीं यालना खात्रीनं पण ?"

"हो हो—येईन म्हणजे ? अगदीं खात्रीनें येतों. तूं मात्र विसरूं नकोस, म्हणजे झालें !"

"हो, विसरतें आहे तर !" असें म्हणून एकवार केशवरावांकडे प्रसन्न दृष्टीनें पाहून नर्मदा तेथून निघून गेली.

---

## प्रकरण एकोणिसावें.

## सावध मनुष्य नाश पावत नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं नऊ वाजावयाच्या सुमाराला केशवराव सोनगांवला पोहोंचले, व त्यांनीं गोविंदरावजी बव्यांजवळून हिशेबठिशेब, कागदपत्र, शिल्लक वगैरे आपल्या ताब्यांत घेऊन कामकाजाचीहि साधारण माहिती करून घेतली. दुसऱ्या दिवशीं पहांटेला गोविंदराव मुंबईला निघून गेले.

या नवीन जागेवर आल्यापासून आमचे केशवरावजी बडे धार्मिक बनले. आपल्या लहानच असणाऱ्या मिशा न्हाव्याला मुद्दाम बोलावून

त्यांनीं अगदींच दाभणकांठो करून घेतल्या. गळयांत रुद्राक्षांच्या माळा चढवून त्या ठळकपणें लोकांच्या दृष्टीला पडाव्या अशी तजवीज केली. वेळ सांपडला ह्मणजे बारीक रुद्राक्षांची एक स्मरणी हातीं घेऊन तिचे मणि ओढीत, तोंडानें कांहीं पुटपुटत पायांत खडावा चढवून ते गांवांत हिंडूं लागले. साधारण प्रौढ असा एकादा ब्राह्मण दृष्टीला पडला, कीं, केशवरावांनीं त्याला अत्यंत नम्रपणें नमस्कार केलाच! कोणी साधु, बैरागी, संन्यासी गांवांत आला, तर त्याला कचेरींत बोलावून आणून त्याच्या चर्व्यचोष्य आहाराची व्यवस्था ते तावडतोब करीत. लहानमोठ्या ह्मातून साऱ्या स्त्रियांनां 'माई' किंवा 'आई' असें ते संबोधूं लागले. लांडी-लबाडीनें, अन्यायानें मिळविलेल्या पैशाला गोरक्ताची किंवा ब्रह्मरक्ताची उपमा ते मोठ्या आवेशानें देत; गरीब, दुःखी लोक आपल्या पोटच्या पोरांप्रमाणें आहेत, असें ते ज्यालात्याला गहिंवरून सांगत. केशवरावांच्या या साऱ्या युक्त्यांमुळें गांवांत अगदीं अल्पावधींतच त्यांची बडे धार्मिक अशी मोठी ख्याति झाली. त्यांची दयाधर्मशील वृत्ति पाहून सर्व लोक अगदीं तटस्थ होऊन गेले.

याप्रमाणें एक आठवडा लोटला. आठव्या दिवशीं बनगांवला केशवराव रावसाहेबांची भेट घेण्याकरतां आले. रावसाहेब त्या वेळीं एका एकान्त खोलींत बसले होते. त्या खोलींतच येऊन भेटावयाला केशवरावांनां वर्दी मिळाली.

केशवरावांनीं केलेल्या नम्र प्रणामाचा स्वीकार करून रावसाहेब ह्मणाले "काय आलांत? काय खबरबात तिकडची?"

हात जोडून केशवराव ह्मणाले "आपल्या पायांच्या कृपेनें सर्व कांहीं यथास्थित आहे हुजूर! मी गेल्यापासून आज तागायत दोनशें बहात्तर रुपये तेरा आणे सात पै वसूल झाला. पंधराएक दिवसांत आणखीहि तीनचारशें रुपये वसुली होईल, असें मला वाटतें. तिथलीं कुळें पडलीं गरीब–ह्मणून–"

"वा:! फार उत्तम! तालुक्यांतले सारे गांव घातलेत का नजरेखालीं?"

"नाहीं हुजूर, सर्व नाहीं पाहिले–थोडेसे अजून पहायचे राहिले आहेत. सकाळच्या वेळीं आठ ते अकरापर्यंत कचेरीचें काम पहातों. नंतर स्नान भोजन वगैरे उरकून घोड्यावरून एक वाजायच्या सुमाराला गांवबींव पहायला निघतों. संध्याकाळीं येतों परत ठाण्यावर. महालांतल्या सर्व गांवांत हुजुरांचा दोर्दंडप्रताप गाजतो आहे श्रीमंतांच्या नांवाच्या जोरावर सर्व ठिकाणीं वाघ अन् गाय एके जागं पाणी पिताहेत! हें पाहून मनाला कसें समाधान वाटलें माझ्या–आनंद झाला—"

केशवरावजींच्या या चाटुस्तुतीनें स्तुतिप्रिय इनामदारासाहेब अगदीं गारीगार होऊन गेले! संतोषाच्या स्वरानें ते ह्मणाले "वा वा! ठीक आहे. तुह्मी भारी कष्टाळु अन् हुषार आहां केशवरावजी! स्वतः लवकरच आपली उन्नति करून घेणार खास!"

खालीं मान घालून केशवराव ह्मणाले "हुजुरांच्या दयेनें काय वाटेल तें होणार आहे."

इनामतीच्या व्यवस्थेसंबंधीं इनामदार व कारभारी या दोघांमध्यें आणखीहि कांहीं गोष्टी झाल्या. नंतर रावसाहेबांनीं विचारलें "बरें, पण काय हो केशवराव, त्या गोष्टीबद्दल तुह्मीं कांहीं शोध केला का?"

"जी हुजूर! श्रीमंतांचा ज्याप्रमाणें मला हुकूम होता, त्याप्रमाणें त्याच्यावर फक्त कडक नजर मात्र ठेविली होती. ती सुद्धां अतिशय सावधगिरीनें–कुणाला काडीभरसुद्धां संशय येऊं नये अशा रीतीनें! पांड्याच्या घराजवळून सध्यां मी ये–जा चालवली आहे. परंतु नेहमीं मला असें करतां येणार नाहीं. गांवबींव पहायचें काम संपलें, कीं, मोठी अडचण पडणार आहे. कांहीं कारणाशिवाय त्याच्या घरावरून नेहमीं ये–जा कशी करतां येणार? ह्मणून त्यासाठींहि एक युक्ति योजली आहे, पण तिला हुजुरांची अनुमति पाहिजे आहे–"

"काय योजना आहे तुमची? सांगा."

"त्या पांड्याच्या घराजवळ एक जागा पडीत आहे. ती जागा पूर्वी होती एका कुळाची—पण तो गांवांतून निघून गेल्यामुळें ती आतां आपल्या ताब्यांत आली आहे. तेव्हां माझा विचार असा आहे, कीं, ती जागा साफसूफ करवून तिथें एक छानदार फळबाग द्यावी उठवून! चारहि बाजूंला कांटेऱ्यांचें वगैरे नामी कुंपण करून आंत लिंबू, पपनस, रामफळ, सीताफळ, पेरू, आंबा वगैरे फळझाडें लावावीं. या बागेच्या निमित्तानें पांड्याच्या घराजवळ मला सहज जा—ये करतां येऊन त्याच्यावर नजर राखतां येईल—अन् मग कुणाला संशयाचा वासवारा दिखील नको यायला."

संतोषानें मान डोलवून रावसाहेब ह्मणाले "वाः! उत्तम युक्ति आहे ही तुमची! ही बाग मी मंजूर करतों. या बागेच्या मध्यभागीं थोडी फुलबागहि होऊं द्या—अन् तिच्या मधोमध एक नामी कुंज तयार करवा. ह्मणजे दुपारबिपारच्या वेळीं त्यांत बसून आपणाला आरामानें कामबीमहि पहातां येईल."

"जी हुजूर! आपली ही योजना भारी उमदी आहे! पण हे फळझाडांचे रोपे कुठें मिळवावे, या विचारांत मी आहें."

"अंः—त्यासाठीं विचार तो कशाला करायला पाहिजे? आपल्या मोतीबागेंत वाटेल तितकें रोपे मिळतील कीं! तिथले कांहीं रोपे एक-दोन बैलगाड्यांमध्यें भरून जा घेऊन सोनगांवला, ह्मणजे झालें."

"ठीक आहे. श्रीमंतांच्या आज्ञेप्रमाणें करीन. हो, एक गोष्ट हुजुरांनां कळविण्याजोगती झाली आहे. एका गोष्टीविषयीं मला थोडासा संशय आला आहे."

"काय ती गोष्ट?"

"त्या पांड्याच्या घरावरून जातयेत असतां एके दिवशीं एक इसम त्याच्या घरांतून बाहेर पडतो आहे, असें माझ्या सहज दृष्टीला पडलें. तो माणूस कांहीं पांढरपेशांपैकीं नाहीं दिसला, हें खरें; पण तो चांगला वरच्या दर्ज्याचा होता—तेलीतांबोळ्यांपैकीं नव्हता. ह्मणून चटकन

माझ्या मनांत कांहीं निराळाच संशय आला. त्याच्या अंगांत पिवळ्या रंगाचा आंखूड कोट, डोकीला हिरवें पागोटें असून गळ्याला एक लोंकरी रुमाल लपेटला होता. त्याचें वय असावें जवळजवळ पन्नास. पहातों, तो आपला पांडूच्या घरांतून बाहेर पडतो आहे! मीं तत्क्षणीं त्याला हटकून विचारलें ' कोठले हो तुह्मी ?' तो ह्मणाला ' मीं तांबखेडचा रहाणारा.' 'नांव काय तुमचें ? ' ' सखाराम.' ' सगळें नांव सांगा कीं ! ' ' सखाराम दाजी कुडव.' मग मीं त्याला विचारलें ' तुह्माला पूर्वीं मीं कुठेंतरी पाहिल्यापाहिल्यासारखें वाटतें.' त्यानें आश्चर्यानें विचारलें ' कुठें बुवा ? ' ' झाले असतील आठएक दिवस. बनगांवाला इनामदारांच्या वाड्यांत.'—माझ्या तोंडचे हे शब्द ऐकतांच बेटा अगदीं ओशाळा होऊन गेल्यासारखा झाला. हें पाहून माझा संशय तर अधिकच दृढ झाला. मीं त्याला विचारलें 'इथें कशाला आलां होतां बरें तुम्ही ? ' तो म्हणाला ' होतें थोडेंसें माझें काम. ' असें ह्मणून त्यानें चटकन् काढता पाय घेतला. आज इकडे येतांना रस्त्यांत फिरून त्याची गांठ पडली. पहातों तों स्वारी चालली आहे सोनगांवाकडे. मीं हंसून त्याला विचारलें ' काय सखारामजी, कुठें चालली आहे आपली स्वारी ? ' तो ह्मणाला ' चाललों आहें केणवलीला माझें एकाकडे येणें आहे तें वसूल करायला. ' बेट्यानें केणवलीचें नांव घेतलें खरें; पण सोनगांवला तो गेला होता कीं नाहीं, याचा तिकडे परत गेल्यावर शोध केला पाहिजे मला. "

इतकें बोलून केशवरावजी स्तब्ध राहिले. रावसाहेब क्षणभर विचार करून ह्मणाले " तांबखेडचा सखाराम कुडव म्हणालांत नव्हे तुम्हीं ? "

" जी हुजूर ! असें त्यानें सांगितलें खरें मला. "

" छे—त्याला तर अलीकडे मीं इकडे आलेला कधींच नाहीं पाहिला."

" मी तर पुनःपुनः दोनदां पाहिला त्याला इकडे. कदाचित् कारभारीसाहेबांकडे आला असेल कांहीं कामाबिमाकरतां. "

रावसाहेबांनीं तत्क्षणीं कारभाऱ्यांनां बोलावणें पाठविलें. ते आल्यावर त्यांनीं त्यांनां सखारामाबद्दल विचारलें. "सखाराम इकडे आला होता खरा, पण तो कचेरीकडे आला नव्हता. बाबूरावांच्या बैठकखान्याकडे मात्र गेला होता." अशी माहिती देऊन कारभारी निघून गेले.

रावसाहेब कांहींसे चिंतातुर होऊन ह्मणाले "हें पहा केशवराव, तुह्मी जाऊन पांड्याशीं या सखारामाचा कांहीं स्नेह वगैरे आहे कीं काय, याबद्दल गुप्तपणें बातमी काढा. अन् हल्लींच त्याच्या घरीं त्याची जा-ये सुरू झाली आहे, कीं, पूर्वींपासूनच आहे, याबद्दलहि नीट चौकशी करा."

"जी हुजूर! मी गेल्याबरोबर ही चौकशी करतों, अन् जी बातमी मिळेल ती आपणाला तांबडतोब कळवितों." असें ह्मणून केशवरावांनीं रावसाहेबांचा निरोप घेतला.

कचेरीच्या अंगणांतून पार होऊन मनोहरपंतांच्या बैठकखान्याच्या समोरून केशवरावजी चालले असतां, पायऱ्यांजवळ झाडून टाकलेल्या कचऱ्याची रास पडली असून तेथें जवळच एक पोस्टकार्डहि पडलें आहे, असें त्यांच्या दृष्टीला पडलें. तें पाहतांच कुतूहलानें प्रेरित होऊन केशवरावांनीं तें उचलून घेतलें. तें एक जुनें पत्र असून त्यावर मनोहरपंतांचें नांव व पत्ता लिहिलेला होता. आसपास कोणी कोठेंहि नाहीं, असें पाहून केशवरावांनीं तें चटकन् आपल्या खिशांत घातलें.

आपल्या झोंपडींत आऊन, भोजन वगैरे उरकून थोडी वामकुक्षी करून चारपांच वाजण्याच्या सुमाराला केशवराव घोड्यावर स्वार होऊन मोतीबागेकडे निघाले. दरवाज्यांतून आंत जाऊन माळयाच्या झोंपडीच्या अगदीं जवळ जेव्हां ते जाऊन पोहोंचले, तेव्हांच त्यांची स्वारी घोड्यावरून खालीं उतरली. जवळच एक पेरूचें झाड होतें, त्याला माळयानें त्यांचा घोडा बांधून ठेवला.

स्मितपूर्वक केशवरावांनीं विचारलें "काय रे माळी! बरा आहेसना?"

"आहें आपल्या कृपेनें."

"धनीसाहेबांनीं कांहीं हुकूमबिकूम पाठवला आहे का?"

" जी साहेब-धनीसाहेबांकडून एक शिपाई आला• होता अन् ' सोनगांवच्या कचेरीला थोडेसे फळझाडाचे रोपे पाठवायचे आहेत,' असें सांगून तो गेला."

"अस्सें-अन् त्यासाठींच मी आलों आहें. चल जरा बागेंत--कांहीं रोपेबिपे पाहून निवडून ठेवतों. ओः ! अजून हें शिंचें ऊन कसें चटचटतें आहे अंगाला ! एक चिलीम तर आण तयार करून तोंपर्यंत--ऊन पडूं दे जरासें !"

माळी चिलीम तयार करावयाला घरांत गेला. इतक्यांत त्याचा मुलगा ' रामदासोग्या ' नाचतनाचत कोठूनसा तेथें येऊन हजर झाला. केशवरावजींनां पहिल्यानें त्यानें कांहीं चटकन् ओळखलें नाहीं. केशवरावांनांहि त्याच्या नांवाची विस्मृति पडली होती. तो जवळ आलेला पहातांच त्यांनीं त्याला हांक मारली ' क्यारे बदमासोग्या ! " तत्क्षणीं केशवरावांची ओळख पटून रामदासोग्यानें त्यांच्याशीं गाढ आत्मीयता प्रकट करावयाला आरंभ केला, व आपला दोन पैशांचा कर त्यांच्यापासून वसूल करून घेऊन अतिशय खूष होऊन नाचतनाचत तो तेथून निघून गेला.

गुडगुडी तयार करून आणून ती केशवरावजींच्या हातीं देऊन ते तिचा समाचार घेऊं लागले असतां माळी ह्मणाला " माझा पगार वाढविण्याबद्दल धनीसाहेबांजवळ गोष्ट काढली होती का साहेब ?"

" नाहीं माळी. अजून कांहीं ती गोष्ट त्यांच्यापाशीं काढायला योग्य अशी संधिच नाहीं आली पहा ! हा जो सोनगांवला बाग तयार करायचा कारखाना चालवला आहे कीं नाहीं मीं, त्याची संधि साधून काढतों कीं ती गोष्ट. थोडा तसा कांहीं प्रसंग आल्याखेरीज गोष्ट काढायची तरी कशी ? सोनगांवच्या त्या बागेला एका चांगल्या माळ्याची जरूरी आहेच. धनीसाहेबांनां मीं सांगितलें, तरी ते तुला सोडतील, असें का तुला वाटतें माळी ? सोडलें असतें, तर सोनगांवला तुला नेऊन तुला अधिक पगारहि मीं दिला असता-अरे, तें तर सारें आतां माझ्या

हातांत आहे ना! पंण धनीसाहेब तुला सोडतील कीं नाहीं इथून, याबद्दल शंका वाटते."

"हो, कुणीं सांगावें त्याबद्दल साहेब?"

डोकें हलवून केशवराव ह्मणाले "ऊंहूं–नाहीं सोडायचे तुला! तूं गेल्यावर गंगेची खबरदारी रे कोण घेणार? तुझ्यासारखा विश्वासू माणूस दुसरा आणायचा कुठला?"

माळी संदिग्धभावानें केशवरावजींकडे पाहून ह्मणाला "गंगा कोण साहेब?"

गालांत हंसून केशवराव ह्मणाले "वाः! फार उत्तम! याप्रमाणें खूब सावधगिरीच पाहिजे आहे आह्मांला! गंगा कोण, तें अजूनहि मला ठाऊक नाहीं, अशी तुझी कल्पना आहे होय? सोनगांवच्या त्या पांडू गवळ्याची भावजय—तुह्मी जिला 'भौजी' असें ह्मणतां ती–"

माळी अगदीं ओशाळून ह्मणाला "तुह्माला हें सांगितलें तरी कुणीं?"

"अरे आणखी दुसरें कोण सांगणार? अरे, खुद्द यजमानसाहेबांनीं सांगितलें ना! माझ्यापासून ते कोणतीहि गोष्ट गुप्त ठेवतात, असें का तुला वाटतें? अरे, मी अन् अप्पासाहेब हे दिसायला दोन, पण दोघांचा जीव एक –अगदीं हरिहरांप्रमाणें बघ! अरे फार काय सांगूं गड्या, पण एके ठिकाणीं बसून (या वेळीं केशवरावांनीं काल्पनिक ग्लास हातींघेऊन तें तोंडाला लावण्याचा अभिनय केला.) हेंहि चालतें ना आमचें? अरे, आहेस कुठें तूं? नाहीं तर इतकी मंडळी असतांना मलाच त्यांनीं सोनगांवचा कारभारी करून कां पाठविलें? फक्त त्या पांड्याला शासन करण्यासाठींच! हीं सारीं कामें तशाच अगदीं विश्वासाच्या माणसांखेरीज का कुणावर सोंपवितां येतात? कारकूनकुळकर्ण्यांत फक्त मजवर अन् नोकराचाकरांत केवळ एक तुझ्यावर अप्पासाहेबांचा पुरा विश्वास आहे. नाहीं तर पहा धनीसाहेबांची ही नोकरी करायला लागून मला दिवस असे किती झाले? पंधरा रुपये दरमहावर मी लागतों काय, अन् अगदीं थोडें दिसत होत

आहेत, तों तीस रुपये दरमहावर मोठ्या कारभाऱ्याच्या जागेवर माझी नेमणूक होते काय! विश्वास ठेवावा कुणावर, अन् ठेवूं नये कुणावर, याची धनीसाहेबांनां भारी नामी पारख आहे."

दुःखाच्या स्वरानें माळी ह्मणाला "विश्वासू ह्मणून तुमचें तर कोटकल्याण झालें; पण माझें आपलें—"

"होईल--होईल! माळी, तुझेंहि कल्याण होईल! जरा दमानें घे. अप्पा-साहेबांनां सांगून तुझा पगार मी खास वाढवीन! चांगलें मन लावून कामकाज करीत जा-अन् या बाबतींत खूब हुषारी अन् सावधपणा ठेव, समजलास?"

"जी साहेब! हें मला का सांगायला पाहिजे?"

'अच्छा--पण काय रे, गंगेचें अजूनहि रडणेंस्फुंदणें चाललें आहे का?"

"होय साहेब! अजूनहि पहिल्यासारखेंच चाललें आहे."

"तर मग तशी संधि मिळाली, तर ती पळून देखील जाईल ह्मणतोस?"

"हो, पळून देखील जाईल."

"तर मग खूब सावधगिरी ठेव! ती बुढ्ढी तुझी सासू होते ना?"

"होय साहेब!"

"अप्पासाहेब असेंच ह्मणाले होते. तिला नीट बजावून ठेव, ह्मणावें जेव्हां तूं नदीवर पाणी आणायला जाशील, त्या वेळीं पाठीमागच्या दरवाज्याला नीट कडीकुलूप घालून जा. 'ही इथें भदी—झटकन् येईन मी आतां—कडीकुलुपाचा खटाटोप पाहिजे कशाला?' असें ह्मणून तशीच जाऊं नको ह्मणावें कुलूप लावल्यावांचून."

"तसेंच ती करते—धनीसाहेबांचा हुकूमच तसा आहे."

"अरे, तें तर मला ठाऊक आहे—पण उगीच आपला तुला सावध करून ठेवतों. ठाऊक आहे ना तुला 'सावध मनुष्य कधीं नाश पावत नाहीं' अशी ह्मण आहे ती! चावी तुझ्याजवळच ठेवतोस ना? जेव्हां म्हातारीला तिची गरज लागेल, तेव्हांच तिनें ती तुझ्यापासून मागून न्यावी, अन् काम झालें, कीं, फिरून आणून द्यावी. नाहीं तर ती आहे

ह्मातारी; नेहमींच ती सावधगिरी ठेवील, असा कांहीं नियम नाहीं–कुठें एकादवेळीं चावी देईल टाकून कुणाला ठाऊक ?"

"चावी माझ्यापाशींच असते."

"कुठें ठेवतोस तूं ती ? घरांत कुठें तरी आपली फेंकून देत जाऊं नकोस–आपल्या धोतराच्या कनवटीला नीट घट्ट बांधून ठेवीत जा दोरीनें."

"जी साहेब–तशीच तर मी बांधून ठेवतों." असें ह्मणून माळ्यानें कमरेची चावी काढून केशवरावांनां दाखविली.

केशवराव ह्मणाले "चावी कांहीं तशी मजबूत नाहीं दिसत ! पाहूं जरा."

माळ्यानें चावी काढून केशवरावांच्या हातीं दिली. ती इकडून तिकडून नीट पाहून ते ह्मणाले "नाहीं, तसें कांहीं अगदीं खेळणें नव्हे मुलांचें. कांहीं दिवस चालूं दे याच कुलपावर काम. कांहीं दिवसांनीं धनीसाहेबांनां सांगून एक चांगलें मजबूत विलायती कुलूप देतों पाठवून. अन् इतक्यांत जर सावज झालें कबूल, तर मग चावीकुलपाची मुळीं जरूरच नाहीं रहाणार ह्मणा !"

"सावज वठणीला येईल, असें मला तर मुळींच लक्षण दिसत नाहीं. परवां तर तिनें धनीसाहेबांनीं खूब धमकावणी देऊन सांगितलें, कीं, 'तुह्मीं जर मला असें सतावाल, तर मी माडीवरून उडी टाकून जीव देईन एकादिवशीं !'"

"अरे बापरे ! मग कांय घात व्हायचा एकादिवशीं ! धनीसाहेबांचें नांवबीव तिला कळलें आहे का रे ?"

माळी हंसून ह्मणाला "नाहीं साहेब ! पहिल्यापासूनच धनीसाहेबांनीं बुढ्ढीला शिकवून ठेवलें आहे, कीं, जर कधीं गंगेनें 'हा कोण गांव ?' असें विचारलें, तर सांग 'ठाणवाडी' ह्मणून ! अन् 'आपण कोण' ह्मणून विचारलें, तर सांग 'ठाणवाडीचे इनामदार माधवराव' ह्मणून !'"

हें ऐकून केशवराव खो खो हंसूं लागले व ह्मणाले "वाः ! धनीसाहेबांनीं शक्कल तर खूबच लढविली आहे बुवा ही ! ठाणवाडीचे इनामदार !

हाः हाः हाः ! कुठें ठाणवाडी, कुठें बनगांव ! असो—चला, ऊनहि पडलें आहे आतां. चल थोडे रोपेबिपे पाहून ठेवूं."

दोघेहि उठून बागेंत गेले. निरनिराळ्या प्रकारच्या फळझाडांचे रोपे माळ्यानें केशवरावजींना दाखविले व त्यांपैकीं कांहीं त्यांनीं पसंत करून ठेवले. शेवटीं केशवरावजी ह्मणाले "उद्यां देतों बैलगाडी पाठवून इकडे. हे सर्व दे पाठवून सोनगांवला."

सूर्य त्या वेळीं अस्ताला चालला होता. केशवराव ह्मणाले "बरें तर, जातों मी आतां. अंधार पडणार आतां अन् जायचें तर आहे बरेंच दूर मला. आणखी एखाद दिवशीं येऊन थोडेबहुत आणखीहि कांहीं रोपेबिपे पाहून ठेवूं."

"आपण फिरून कधीं याल साहेब ?"

"येईन आतां या अमावास्येला. त्या दिवशीं कचेरीला सुटी असेल आमच्या. नाहीं तर जर साधलें, तर आदल्याच दिवशीं येईन—हो, तसेंच नरकचतुर्दशीच्याच दिवशीं खास येतों मी इकडे."

असें ह्मणून केशवरावजी घोड्यावर चढले व टांच मारून त्यांनीं घोड्याला चालावयाला इशारा केला. परंतु पांचसात पावलें ते गेले नाहींत, तों घोडा थांबवून माळ्याला जवळ बोलावून खालच्या स्वरांत ते त्याला ह्मणाले "अरे माळी, एक काम करशील का ?"

" काय साहेब ?"

" मी चतुर्दशीला इकडे येईन ह्मणून सांगितलें, त्या दिवशीं थोडी चैन करावी, असें माझ्या मनांत आहे. अरे, तूं मी एका धन्याचे विश्वासू नोकर—आपली दोघांची पुरी दोस्ती. तुझ्यापाशीं चोरून कशाला ठेवूं ? कां, काय ह्मणतों मी ?"

हात जोडून संदिग्धपणें केशवरावांकडे पाहून माळी ह्मणाला "होय, साहेब. गरीबाला इतकी योग्यता आपण देतां, हे मोठे उपकार आहेत साहेब आपले !"

केशवराव हंसून ह्मणाले "अरे, कसले उपकार अन् बिपकार घेऊन बसला आहेस! एकदां ज्याला आपला असा ह्मटला, त्याच्यासाठीं प्रसंगीं प्राणहि द्यायचा, असा आहे माझा स्वभाव! पण तें असो ह्मणा—मी येणार आहें, त्या दिवशीं आपण जरा खाण्यापिण्याची चैन करूं या—मी सांगतों तें आणून ठेवशील?"

"काय साहेब?"

केशवराव स्मितपूर्वक ह्मणाले "अरे, एवढा नाहीं होत तुला तर्क? दारू--दारू—स्पष्टच सांगतों तुला! एक चांगली मजेदार बाटली आण—रुपयावाली. एक ती बाटली आण, अन् दोन आण आठआठ आणेवाल्या, समजलास? अन् सागोतीबिगोतीहि जर त्या वेळीं ठेवशील आणून कुठून तर फार मजा उडणार आहे बघ!"

माळी आश्चर्यानें टवकारून आपणाकडे पहात आहे, असें पाहून केशवराव खो खो हंसून ह्मणाले "भोळा रे भोळा! मला सोंवळ्या ब्राह्मणाला हें सारें कसें चालेल, अशी शंका आली तुला होय? अरे गुपचूप केलें ह्मणजे कशांत कांहीं पाप नाहीं—समजलास? मग करशील ना ही सारी व्यवस्था?"

माळी कबूल झाला. त्याच्या हातावर चार रुपये ठेवून केशवराव तेथून

---

## प्रकरण विसावें.

## यस्मिन्देशे यदाचारः!

कृष्णचतुर्दशीच्या दिवशीं सायंकाळीं केशवरावजींची स्वारी पायांनींच चालत येऊन मोतीबागेंत हजर झाली. त्यांच्या हातांत एक मध्यम आकारची कॅनव्हासची बॅग होती. माळी त्या वेळीं आपल्या झोंपडी-समोरच्या अंगणांत बसून गुडगुडींतून फुरुक्फुरुक् आवाज काढीत होता. केशवरावांनां आलेले पहातांच गुडगुडी चटकन् दूर करून तो उठला आणि त्यांनां सलाम करून ह्मणाला "या साहेब—"

" दमलों बुवा अगदीं–तंबाखू तरी आण भरून ! " असें ह्मणून हातांतील बॅग खाटेवर ठेवून केशवराव तीवर बसले.

" तमाखू तयारच आहे साहेब ! आणूं एक कमळाची देंठी तोडून ? "

" नको, माझी चिलीम आहे बरोबर आज. " असें ह्मणून केशवरावांनीं बॅगमधून आपली चिलीम बाहेर काढली व तींत थोडा तमाखू भरून माळ्याच्या गुडगुडींतले दोन निखारे त्यावर ठेवून त्यांनीं पहिल्यानें दोनचार सडकून दम मारले.

नंतर त्यांनीं विचारलें " अरे माळी, सखाराम कुडव नांवाचा कुणी इसम तुझ्या माहितीचा आहे का ? "

क्षणभर विचार करून माळी ह्मणाला " सखाराम कुडव ? नाहीं बुवा, हें नांवसुद्धां नाहीं आपणाला स्मरत. कां साहेब ? "

"मी हा आतां बागेकडे येत होतों, तेव्हां पहातों तों आमराईंत एक माणूस उभा असून बागेंतल्या बंगल्याकडे सारखी टक लावून पहातो आहे, असें माझ्या दृष्टीला पडलें. त्याच्या अंगांत पिवळया रंगाचा कोट, डोकीला हिरवें पागोटें असून गळयाला लोकरी रुमाल लपेटलेला होता. हा माणूस असावा तरी कोण, असा विचार करीत मी त्याच्याजवळ येऊन ठेपलों, तरी त्या बेट्याला त्याची दादहि नाहीं, त्याच्या अगदीं समोर मी आलों अन् त्याची माझी नजरानजर झाली, तेव्हां मीं त्याला विचारलें 'कोण हो तुह्मी ?' तो चमकून जरा ओशाळल्यासाखा होऊन मला ह्मणाला ' माझें नांव सखाराम कुडव.' मीं पुढें विचारलें ' इथें उभे राहून काय करीत होतां तुम्ही ?' तों 'कांहीं नाहीं; उगाच होतों उभा.' असें म्हणून स्वारीनें लगेच झटकन् काढता पाय घेतलाहि ! "

माळी चिंतेच्या स्वरानें ह्मणाला "कुणाला ठाऊक कोण तो, साहेब ! आजपर्यंत तर कुणाला अशी टेहळणी करतांना मीं पाहिलें नाहीं. कोणत्या मतलबानें तो आला होता, कुणाला ठाऊक ? "

केशवराव गंभीरपणानें ह्मणाले " मला तर बुवा भारी शंका बाटायला लागली आहे. घाईच्या भरांत तितक्यांत माझ्याकडून एक चूकहि झाली.

तो कुठला, तें मीं त्याला विचारायचें अजिबातच विसरलों. माळी, आसपासच्या कुठल्या एकाद्या गांवांत सखाराम कुडव म्हणून कुणी माणूस आहे कीं काय, याबद्दल चौकशी कर हां. ”

“ जी साहेब. मी तर करतोंच त्याबद्दल चौकशी; पण यांविषयीं धनीसाहेबांनांहि खबर दिली पाहिजे. ”

“हो, दिलीहि पाहिजेच. पण मी तर कांहीं धनीसाहेबांनां उद्यां भेटणार नाहीं आहें. आज मी आलों आहें आपल्या स्वतःच्या कांहीं कामाला. उद्यां पहांटेला उठून सोनगांवाला जाणार आहें. जरा चोरूनच आलों आहें म्हणेनास ! त्यापेक्षां तूं असें करीनास माळी! उद्यां तूंच सकाळीं बनगांवला जाऊन धनीसाहेबांनां हें सांग. माझें नांव काढायची कांहीं जरूरी नाहीं. सखारामाला खुद्द आपण स्वतः पाहिलें, असें सांग झालें तूं बेलाशक. म्हणजे तुझी हुषारिहि धनीसाहेबांच्या नजरेला येऊन तेहि तुझ्यावर खूष होतील. म्हणावें, आमराईतून मी–म्हणजे तूं हो माळी–सारें आपण पाहिलें, समजलास? मीं जें जें पाहिलें, तें सारें आपण पाहिलें, असें सांग धनीसाहेबांनां. ”

केशवरावांचें बोलणें माळ्याला पूर्णपणें पटलें होतें. तो म्हणाला “सांगेन. नांव विचारतांच तो म्हणाला ‘माझें नांव सखाराम कुडव.’ आणखीं काय सांगूं–अंगांत हिरवा कोट—”

“अरे तसें नव्हे रे–सांग अंगांत पिवळा छोटा कोट, डोकीला हिरवें पागोटें, गळ्याला लोंकरीचा रुमाल, असा त्याचा पोषाक होता. पन्नास एक वर्षांचें त्याचें वय असावें. नांव सखाराम कुडव. राहील ना हें सारें लक्ष्यांत ?”

“हो राहील–राहील.

केशवरावांनीं माळ्याला आणखीहि यासंबंधाची उत्तम रीतीनें तालीम दिली. साक्षीदारांनां तालीम द्यावयाची त्यांनां चांगलीच सवय होती.

शेवटीं केशवराव म्हणाले “ हो, पण बरी आठवण झाली. आणायला सांगितलें होतें तें आणलेंस का ?”

माळी थोडें तोंड वाईट करून ह्मणाला "एक आणलें—पण एकाची नाहीं तजवीज झाली?"

"कसली? मटनाची? अच्छा–नाहीं तर नाहीं–करायचें काय त्याला? बरें दुसरें तरी?"

"या आणल्या आहेत." असें ह्मणून माळ्यानें तीन बाटल्या त्यांच्यासमोर आणून ठेवल्या.

"यांपैकीं एक रुपयावाली कोणती?"

"जिच्यावर लाखेची शीलमोहर आहे ती रुपयावाली, अन् नुसत्या कागदांत गुंडाळलेल्या या दोन आठआठ आणेवाल्या."

केशवरावजींनीं शीलमोहोरेची बाटली उचलून आपल्या बॅगेंत टाकली व ह्मणाले "दुसरेंतिसरें कांहीं मिळाले नाहीं ह्मणतोस, तेव्हां आतां इथें नाहीं याचा उपयोग करीत. या ठेव तूं–"

अगदीं कल्पनासुद्धां नसलेलें हें बक्षीस मिळतांच माळीबुवा गार झाले! दंतप्रदर्शन करून त्यांनीं विचारलें "दोन्ही घेऊं मी?"

"हो, दोन्ही बाटल्या तुझ्याचसाठीं आणविल्या मीं. तुझी बायको आहे–सासू आहे; त्यांनांहि नको का कांहीं खायलाप्यायला? अरे, यांत लाजतोस काय बेट्या? तुमच्या त्या तिकडच्या देशांत हें सारें असें चालतें, हें का मला माहित नाहीं? अरे, तूं तर माळीच आहेस बोलूनचालून! पण तुमच्या तिकडे अगदीं मोठे घरंदाजें अन् वरच्या दर्ज्याचे लोक देखील घरांत तसाच कांहीं सणावाराचा दिवस असला, ह्मणजे पुरुष अन् बायकाहि हें घेतात!"

माळी महाराष्ट्रांत येऊन बरींच वर्षें राहिल्यामुळें त्याचे संस्कार थोडेसे उन्नत होऊन, अगदीं उघडपणें स्त्रियांनींहि मद्यसेवन करावें, असें त्याला आतां वाटत नव्हतें. लज्जेनें अधोवदन होऊन तो ह्मणाला "होय साहेब! आमच्याकडे अशी चाल आहे खरी. उगीच नाकबूल कशाला जाऊं?"

सध्याकाळ होत आला. शेवटची एक चिलीम सज्ज करण्याकरतां माळी आंत गेला. जातांना त्यानें त्या दोन्ही बाटल्याहि आंत नेल्या.

बसल्याबसल्याच केशवरावांनां आंत चाललेला संवाद ऐकूं आला. संवाद अर्थात्च हिंदुस्तानी भाषेत चालला होता. बुड्ढी ह्मणाली "हां, तुह्मीं दोन बाटल्या एकट्यानें उडविणार ? तें नाहीं कांहीं चालायचें. तुह्मी एक बाटली घ्या—आह्मी मायलेकी मिळून एक बाटली घेणार."

"बरें, तसें करा—भांडूं नका!"

माळ्यानें सज्ज करून आणलेल्या चिलमीचे चारदोन झुरके मारून केशवरावजी जावयाला उठले. माळ्यानें विचारलें "उद्यां तर मग आपण केव्हां याल साहेब ?"

"आज रात्रीं तर मी बनगांवलाच रहाणार ह्मणा. मात्र उद्यां पहांटे उठतांच केला पाहिजे पोबारा. उद्यां तीनएकशें रुपये वसूली व्हायची आहे सोनगांवला. ती वसूली झाली, ह्मणजे हिशेबठिशेब पुरे करून दुपारीं एकदोन वाजायच्या सुमाराला मी घोड्यावर बसून बनगांवला वाड्यांत जाणार. उद्यां मोठा अन्नकूटाचा समारंभ असतो ना वाड्यांत दिवाळी ह्मणून ? उद्यांचा जंगी प्रसाद सोडतांच कामा नये आपणाला!"

"मीहि जाणार आहें. दरवर्षी जातोंच मी. मात्र उद्यां सकाळींच निघेन ह्मणजे झालें. सखारामाची हकीगत घालायची आहे ना धनीसाहेबांच्या कानांवर ? नंतर प्रसादबिसाद घेऊन येईन मी घरीं परत."

"जा जा—जरूर जा, अन् जातांना रामदासोब्यालाहि घेऊन जा. बेट्याला मोठी मौज वाटेल तिकडे. गोडधोड तोंडहि होईल पोराचें—सखारामाबद्दल कसें काय सांगायचें तें राहील ना नीट ध्यानांत ?"

"राहील राहील—तें मी विसरतों कीं काय?"

नंतर पुनः एकवार चिलिमीचा समाचार घेऊन केशवराव तेथून निघाले.

---

## प्रकरण एकविसावें.

## जादूची पेटी

कुनगांवला आपल्या झोंपडींत जाऊन केशवरावजींनीं पहिल्यानें दिवा लावला. नंतर पुष्करिणीकडे जाऊन हातपायतोंड धुऊन एक कळशी-भर पाणी नेऊन त्यांनीं विस्तव पेटवला आणि त्यावर आपला स्वयंपाक चढविला. स्वयंपाक कांहीं फार नव्हता–नुसता भात आणि पिठलें! आज रात्रीं केशवरावांनां कितीतरी कामें–आणि तींहि अत्यंत धाडसाचीं उरकावयाचीं होतीं.

रात्रीं नऊएक वाजण्याच्या सुमाराला नर्मदा केशवरावजींच्या झोंपडींत आली. अत्यंत आनंदाचा आविर्भाव दाखवून केशवराव ह्मणाले " आलीस नर्मदे?–वाः, मोठ्या संतोषाची आहे गोष्ट. मला वाटलें होतें, कीं, तुला स्मरण तरी रहातें कीं नाहीं कोणाला माहीत!"

नर्मदा फणकाऱ्यानें ह्मणाली "मी कांहीं इतकी हलक्या आठवणीची नाहीं हो!"

" बस—बस आतां. वाड्यांतली सगळी मंडळी खुशाल ना? अप्पा-साहेब, बाबुराव वगैरे सारी मंडळी बरी आहेत ना?"

" हो, सारींजणं खुशाल आहेत. बाबूराव मात्र इथें नाहींत. आज कुठंसे गेले बाई–"

" कुठें ग गेले?"

" घरांत कुणालाहि कांहीं सांगितलं नाहीं त्यांनीं. एकाद वेळेला असंच कांहीं तरी मेलं चमत्कारिकच करतात ते. आज संध्याकाळीं बाईसाहेब अन् अप्पासाहेब यांच्यामधें याबद्दलच निघाल्या होत्या गोष्टी."

केशवरावांनीं उत्सुकतेनें विचारलें " काय चालल्या होत्या ग गोष्टी?"

"अप्पासाहेब ह्मणत होते 'काय भाऊ हा! बिछाना, ट्रंक घेऊन एकदम कुठें निघून गेला; पण एका शब्दानं तरी विचारायचं होतं मला–निदान कुठं जायचं, येणार किती दिवसांनीं, हें तरी नको होतं सांगायला?'"

केशवराव आपणाशींच बोलल्याप्रमाणें ह्मणाले " असें ! एकून अजू-नहि भावाभावांतला पीळ कायमचं आहे तर ! "

नर्मदा हंसून म्हणाली "तर मग तुमच्या मतानं दोरीलाच तेवढा पीळ असावा!"

"भोळ्या लोकांना सर्व कांहीं शोभतें. तुझ्यामाझ्यासारख्या एखाद्या गरिबाच्या घरीं असें जर कांहीं असतें, तर लोकांनीं आमची निंदा कर-करून तोंड देखील नसतें काढूं दिलें वर !" असें म्हणून केशवरावजी भाताच्या तपेलींत पळीनें ढवळूं लागले.

नर्मदेनें उत्तरादाखल मृदु हास्य मात्र केलें. कांहीं वेळ दोघेंहि स्तब्ध होतीं. नंतर नर्मदेनें विचारलें "त्या दिवशीं म्हणालां होतां, तें आज व्हायचं आहे का मग ?"

"वा: ! होणार म्हणजे ! मग सोनगांवाहून इतक्या लांब तंगड्या तोडीत जो मी आलों, तो कशाकरतां ?"

"त्याला तुम्ही किती वेळ लावणार आहां? मला कांहीं बाई भारी मात्र करून चालायचं नाहीं."

"छे छे, त्याला कसला आला आहे आतां वेळ ? पण तूं एवढें एक काम कर ना ग नर्मदे ! तो ओटा आहे पलीकडे हा, तो चांगला धुऊन काढ अगोदर. तें तिकडे एक दर्भासन आहे, तें त्यावर पसर. त्या पली-कडल्या पेटींत एक धुपाटणें आहे तें काढून जरा धुऊन आण, म्हणजे त्यांत निखारे घालतों. त्या निजायच्या खोलींत एका कोनाड्यांत एक जस्ती डबा आहे, त्यांत थोडा धूप आहे, तोहि त्या आसनाजवळ आणून ठेव. तोंपर्यंत मी या भाताची पेजबीज काढून निखाऱ्यावर टाकतों. हो, पण सगळेंच मुसळ केरांत--दाराला आंतून कडी लावली आहेस ना पण ! नाहीं तर एखादा कुणीं तरी भलताच माणूस आपला दत्त म्हणून येऊन उभा रहायचा अवचित पुढें !"

"मीं घातली कडी आहे केव्हांच !"असें म्हणून नर्मदा केशवरावजींनीं सांगितलेलीं कामें करूं लागली.

इतक्यांत भाताची पेज काढून टाकून केशवरावांनीं चुलींतले निखारे पसरून त्यांवर भांडें टाकलें. थोड्याच वेळांत सर्व तयारी ठीकठाक करून नर्मदाहि आली.

"काय–झालें सारें ?"

"झालं—पण तुमच्या मनाला येईल तेव्हां खरं!"

"त्यांत काय यायचें आहे मनाला ? बरें, पण नेसलेलें लुगडें सोडून तें धोतर तूं नेस."

दोन मिनिटांच्या आंत नर्मदा त्याप्रमाणें वस्त्र पालटून आली. मग केशवरावांनींहि उठून एक लालभडक रंगाचें वस्त्र परिधान केलें. एका कळशींतून 'गंगोदक' घेऊन त्यापैकीं थोडेंसें त्यांनीं आपल्या व नर्मदेच्या अंगावर सिंचन केलें. शेवटीं ते ह्मणाले "हं–झाली सारी अगोदरची तयारी. आतां निंबिणीच्या झाडाचें एक मूळ उपटून आणायला हवें."

असें ह्मणून केशवरावांनीं दिवा हातांत घेतला व झोंपडीबाहेर पडून जवळच्या त्या कोंपऱ्याकडे जाऊन दोघेंजणें उभीं राहिलीं. नंतर केंस मोकळे सोडून नर्मदा तेथें उपडी पडली व आपल्या वस्त्राचा पदर एका झाडाला लपटून त्यासह तें झुडूप दांतांत धरून तिनें तें खसकन् वर ओढलें. झाड मुळासकटच निघालें, हें पाहून त्या दोघांनां भारी आनंद झाला. केशवराव अर्धस्फुट स्वरांत जणूं काय आपणाशींच ह्मणाले "जय आई सिद्धेश्वरी ! तुझी कृपा असूं दे–आह्मांला यश दे!"

नर्मदा वर उठून उभी राहिली व एका हातीं तें उपटलेलें झाड घेऊन दुसऱ्या हातानें पदरानें तिनें आपल्या तोंडावरची व वस्त्रावरची माती झाडून टाकली. कांहींहि न बोलतां तीं दोघें पुनः झोंपडींत आलीं. केशवरावांनीं एक लहानशी लांकडी देवदारी पेटी बाहेर आणली व कोठूनसें एक पितळेचें लहानसें टाळेंहि शोधून आणलें. नंतर आपली 'ट्रेझरी' उघडून एक रुपयांनीं भरलेलें ताह्मन त्यांनीं जवळ आणून ठेवलें व एक लाल सुताची गुंडीहि आणली.

नंतर केशवरावजींची स्वारी दर्भासनावर येऊन बसली, व धुपाटण्यांतील मंद झालेल्या निखाऱ्यांवर थोडासा धूप टाकून, निखारे फुंकूनफुंकून त्यांनीं झोंपडीभर जिकडेतिकडे धूरचधूर करून टाकला. नंतर त्यांनीं आपले डोळे मिटले व वर नजर लावून, छातीवर स्वस्तिकाकार हात ठेवून ते तोंडानें कांहीं 'मंत्र' पुटपुटूं लागले.

कांहीं वेळ याप्रमाणें केल्यावर, केशवरावांनीं पेटीचें झांकण उघडून ती आपणासमोर ठेविली. नंतर तीवर त्यांनीं गंगाजल शिंपडलें, आणि ताम्हनांतील रुपयांच्या वीसवीसांच्या अशा तीन राशी त्यांनीं मांडल्या.

कांहीं वेळानें ते म्हणाले " पाहिलेंस नर्मदे ? मी मोठ्या पंचायतींत पडलों आहें ! "

" कसली पंचाईत बाई ? "

" हे तर साठ रुपये आहेत. हे साठहि पेटींत घालूं, कीं, थोडेसे बाहेर ठेवूं, याबद्दल मी विचार करतों आहें. "

" त्यांत विचार तो कसला करायचा आहे मेला ? जितके अधिक रुपये तुम्ही पेटींत घालाल, तितके रुपये तुम्हाला आधिक मिळतील !"

केशवराव गंभीरपणानें म्हणाले " तुला समजत नाहीं तें नर्मदे ! अग, हा पडला बोलूनचालून जादूटोणा, अन् भूतपिशाचांशीं पडला सारा कारभार ! समज, आपले सारे रुपये गेले उडून किंवा झाली त्याची राखरांगोळी, तर ग काय डोकींत ती राख घालून दुःखानें छाती पिटीत बसूं ? त्यापेक्षां पन्नास रुपये घालतों पेटींत अन् दहा ठेवतों मागें. त्या बैरागीबुवानें सांगितलेलें जर खरें झालें, तर या माझ्या पन्नास रुपयांचे दोनशें रुपये होतीलच. नंतर पुनः दहा रुपये पेटींत घालून त्यांचेहि चाळीस करून घेतले म्हणजे झालें ! अं ? काय म्हणतेस तूं ?"

"बरं—पण कायहो, ते दोनशें रुपये पुनः घातले पेटींत, तर त्यांचे आठशें होतील का ? "

केशवराव हंसून म्हणाले "ते कसे होतील वेडे ! त्या रुपयांवर एकदां जादूचा प्रभाव होऊन चुकलेला असणार. त्यांवर पुनः नाहीं कांहीं जादू चालायची. प्रत्येक वेळेला नवीननवीन रुपये घातले पाहिजेत पेटींत. "

"तर मग तसंच करा. दहा रुपये ठेवा बाहेरच."

केशवरावांनीं त्या राशींतले दहा रुपये निराळे ठेवून पुनः रुपये मोजून ते पन्नास रुपये पेटींत ठेवले व ते आतां पेटी बंद करणार, इतक्यांत नर्मदा त्यांना म्हणाली "हां--जरा थांबा!"

केशवराव वर डोळे करून, विस्मयाचा आविर्भाव दाखवून म्हणाले "कां, कां ग नर्मदे?"

आपल्या पदराची गांठ सोडून त्यांतून दोन रुपये बाहेर काढून नर्मदा म्हणाली "माझे हे दोन रुपयेहि त्यांत असूं द्या. माझे आठ रुपये होतील ना हो?"

केशवराव गंभीरपणानें म्हणाले "तें मी कसें बरें सांगूं नर्मदे? माझे जर झाले, तर तुझेहि होतील; अन् माझे रुपये जर उडून गेले, तर तुझेहि जातील. मग देशील मला दोष--सांगून ठेवतों तुला अगोदर. त्यापेक्षां तूं आपले नकोच टाकूं आंत रुपये."

"नाहीं देणार दोष--मग तर झालें?" असें म्हणून नर्मदेनें दोन रुपये केशवरावांच्या हातांत दिले.

तेहि दोन रुपये पेटींत ठेवून केशवराव पेटीचें झांकण बंद करून त्याला कुलूप लावणार, इतक्यांत नर्मदा म्हणाली "मीं एक चांगलं मजबूत कुलूप आणलं आहे--तें लावा पेटीला."

क्षणमात्र केशवरावजी गोंधळांत पडून त्यांचें तोंड खरकन् उतरलें. परंतु तत्क्षणीं आत्मसंयमन करून ते म्हणाले "ठीक आहे, तुझें कुलूप दे. तें लावतों."

केशवरावांनीं तें कुलूप लावून त्याची चावी नर्मदेला दिली. तिनें ती आपल्या पदराच्या टोंकाला बांधली. नंतर लाल सुतानें निंबिणीचें मूळ पेटीशीं बांधून, डोळे वर करून हात जोडून केशवराव म्हणाले "जय माते सिद्धेश्वरी! माझ्याकडे प्रसन्न दृष्टीनें पहा. मला यश देऊन माझा हेतु सिद्धीला ने आई!"

नर्मदेनें पुनः आपलें वस्त्र परिधान केलें व ती ह्मणाली "भारी रात्र झाली. आतां गेलंच पाहिजे मला."

"बरें ये. रात्रींदुपारीं मिळून पेटीवर एकशेंआठ वेळ मंत्राचा जप करायला हवा. एक महिन्यानें चतुर्दशीच्या रात्रीं मी इथें येईन. मग पेटी उघडून पाहीन सिद्धेश्वरी मातेनें काय केलें आहे तें. पण तूं मात्र यायला विसरूं नको हो नर्मदे!"

"नाहीं ग बाई! मी कशी विसरेन!" असें ह्मणून नर्मदा निघाली. दरवाज्यापर्यंत येऊन केशवराव म्हणाले "आज नरकचतुर्दशीची रात्र. भुतें, पिशाचें, डाकिनी, शाकिणी यांची आज रात्र! ह्मणून तर हिला नरकचतुर्दशी असें ह्मणतात. आज रात्रीं तीं सारीं बाहेर पडायचीं. संभाळून जा रस्त्यानें."

नर्मदा निघून गेल्यावर दरवाज्याला कडी लावून केशवरावजी पुनः आपल्या जागेवर येऊन बसले. नंतर बॅगमधून आणलेल्या बाटलींतलें थोडें अमृत त्यांनीं एका पेल्यांत ओतलें व त्यांत थोडें पाणी घालून तें चटकन् गट्ट करून टाकलें. नंतर आपणाशींच ते ह्मणाले "काय तरी सटवीची सावधगिरी! आपलें कुलूप ती घेऊन आली. जणूं काय तें कुलूप लावल्यावर मला पेटी उघडतांच नाहीं यायची! पण माझ्यापाशीं शंभर चाव्यांचा जुडगा आहे, हें कुठें ठाऊक आहे तिला! त्यांतली एक ना एक तरी चावी लागेलच त्या कुलपाला!"

केशवरावांचें आणखीहि दोनएक प्याले अमृताचे पान होतें आहे, तों दहाएक वाजले. नंतर केशवरावांनीं आपलें पान वाढून घेतलें आणि ते जेवावयाला बसले.

जेऊन उठल्यावर चिलमीचें सेवन करीत असतां केशवरावांच्या मनांत नानाविध विचारतरंग उसळूं लागले. हळुहळू रात्रीचें स्वरूप गंभीर दिसूं लागलें. नंतर केशवराव उठले व नेसलेलें तांबडें वस्त्र ते लुगड्याप्रमाणें पुनः नेसले. नंतर आपल्या पेटींतून लांबलचक अशा जटांचा टोप बाहेर काढून तो त्यांनीं डोकीवर चढविला. नंतर एक त्रिशूळ बाहेर काढून त्याच्या टोंकाला व आपल्या कपाळाला त्यांनीं तेल शेंदूर चोपडला आणि

एक आरसा समोर धरून आपल्या छद्मवेषाचें ते बारकाईनें निरीक्षण करूं लागले. आणखींहि एक प्याला मद्य गट्ट करून तो शंभर चाव्यांचा जुडगा कमरेला बांधून केशवरावजी घराबाहेर पडले.

दरवाज्याला कुलूप लावीत असतां केशवराव आपल्याशींच हंसून ह्मणाले "नर्मदेला मघाशीं मीं बात मारली, कीं, आज नरकचतुर्दशी --शेंकडों भुतेंखेतें, डाकिणीशाकिणी या रात्रभर बाहेर फिरत असतील. शेंकडों बाहेर न पडूं देत--पण एक डाकीण तर पडली बाहेर! बिचारा माळी दारूच्या नशेनें सहकुटुंब सहपरिवार हातपाय ताणून पडला असेल. मी डाकीण तर बनलों! आतां नदीकांठच्या स्मशानांत जाऊन एकादें प्रेतबीत खायला मिळतें कीं नाहीं तें पहातों." असें हंसत हंसत ह्मणून केशवरावजी त्वरेनें अंधकारांत नाहींसे झाले!

---

## प्रकरण बाविसावें.

## गंगेची सुटका.

केशवरावांची स्वारी निघून गेल्यावर, रात्र पडली आहे असें पाहून आपल्या झोंपडीसमोरच्या अंगणांतील खाटेवर बसून माळ्यानें केशवरावांनीं दिलेल्या बाटलीचें बूच खोललें. त्याच्या बायकोनें एका पितळेच्या थाळींत मांसाचे कांहीं पदार्थ घालून ती त्याच्यासमोर आणून ठेविली. त्या पदार्थांबरोबर माळीबुवांनीं बसल्या बसल्या बाटलींतील अमृताचें सेवन करावयाला सुरुवात केली.

माळ्याची सासू त्याच रस्त्यानें कोठें चालली होती. तिला पाहून जांवईबुवांनीं विचारलें "माई, आंतली सारी व्यवस्था आटोपून आली आहेस ना?"

"नाहीं बेटा, पाणीबिणी आलें आहें भरून. पण चुलींत विस्तव-विस्तव पेटवून सैंपाकाची तयारी करून द्यायची राहिली आहे अजून."

"तर मग फार वेळ नको काढूं आतां. सारें काम चटकन् आटोपून [illegible] जरा सवकर दे अणून."

बुट्टी हळुहळू बंगल्याच्या मागच्या भागीं गेली आणि पूर्वी एका प्रकरणांत उल्लेख केलेल्या दाराचें कुलूप तिनें उघडलें. दार उघडून आंत प्रवेश करून तिनें दार लावून घेतलें, व तेंच टाळें तिनें आंतून दाराला लावलें. तेथें काळोख अगदीं मिट्ट पडला होता. भिंतीला चांचपडत म्हातारीनें तेथल्या एका कोनाड्यांतून आगपेटी बाहेर काढून तेथला दिवा पेटविला. त्या दिव्याच्या प्रकाशांत, ती एक अगदींच लहान खोली आहे, असें दिसलें. तेथें एका बाजूला वर जाण्याकारितां एक जिना होता. दिवा हातीं घेऊन त्या जिन्यानें म्हातारी हळुहळू वर गेली.

वरच्या मजल्यावर एक भली चांगली लांब, परंतु अरुंद अशी ग्यालरी असून तिच्या एका बाजूला लोखंडी सुंदर कठडा मारलेला होता. कठड्याला हिरव्या रंगाचें ऑईलपेंट केलेलें असून ग्यालरी चांगली साफसूफ केलेली होती. ग्यालरीच्या दुसऱ्या बाजूला एक दार असून त्यालाहि कडी लाविलेली होतीच. ती कडी काढून म्हातारी हळूच आंत शिरली.

तें ठिकाण म्हणजे एका तऱ्हेनें आवरणशून्य गच्चीच होती, असें म्हटलें तरी चालेल. त्या जागेभोंवतीं उंच अशा भिंती होत्या. इकडेतिकडे दोनतीन खोल्यांचीं दारें दिसत होतीं. त्यांपैकीं एक त्या वेळीं उघडें असून त्यांतून थोडासा प्रकाशहि बाहेर येत होता. म्हातारी त्या दारानें आंत शिरली.

ती खोली फारच मनोहर तऱ्हेनें शृंगारलेली होती. टेबल, खुर्च्या, नाना प्रकारच्या देशी व परदेशी चित्रकलांचे नमुने, कांचेच्या लहानमोठ्या बाहुल्या व कांचेचे इतर पदार्थ यांनीं खोलीची मूळची शोभा कितीतरी वृद्धिंगत झाली होती. खोलीच्या एका भिंतीशीं एक पितळेचा भला मोठा व अतिशय सुंदर असा पलंग असून तो उंची कापडाच्या मच्छरदाणीनें आवृत होता. पलंगावर पांचसात गाद्या टाकलेल्या असून त्यांवरून एक पांढरी स्वच्छ चादर पसरलेली होती.

पलंग व बिछाना यांची जरी तेथें चांगली व्यवस्था होती, तरी एक नाजुक सडपातळ बांध्याची तरुण स्त्री त्यांचा बिलकूल उपयोग न करतां

खालींच जमिनीवर एक चिरगूट टाकून त्यावर पडली होती. पलंगाजवळच्या एका अष्टकोनी संगमरवरी टेबलावर बहुमूल्य फ्रेमींत बसविलेला फिरता आरसा असून त्याच्या शेजारींच उंची सुवासिक तेलानें वरपर्यंत भरलेली एक बाटली होती, परंतु या प्रसाधनसाधनांचा कांहीं उपयोग होत असल्याचें दिसत नव्हतें. कारण, त्या स्त्रीचे केश रुक्ष व मोकळेच दिसत होते. आपल्या डाव्या हाताची उशी करून ती स्त्री—ती स्त्री गंगा असावी, असा वाचकांनीं तर्क केलाच असेल—मनानें नसली, तरी शरीरानें स्वस्थ पडली होती.

कोणी तरी दार उघडून आंत येत आहे असें पाहून गंगा झटकन् चमकून उठली व जवळच असलेल्या कांचेच्या सुंदर दिव्याची वात तिनें मोठी केली. त्या प्रकाशांत, ती अभागिनी स्त्री निरतिशय सुंदर असल्याचें स्पष्ट दिसत होतें. ती अगदीं तारुण्याच्या ऐन भरांत असून तिचें वय विसांपेक्षां कांहीं अधिक नव्हतें. तिचे डोळे मोठे व पाणीदार असून त्यांत कोमलता मूर्तिमंत अवतरली होती. तिचा चेहरा मूळचा अत्यंत सुंदर व तेजःपुंज होता; परंतु तिच्यावर सांप्रत आलेल्या संकटामुळें तो या वेळीं निस्तेज व मलिन दिसत होता.

म्हातारी आंत आलेली पाहून गंगेनें तिला मृदस्वरानें विचारलें "काय माई, आज भारी उशीरसा केलात ?"

"उद्यां आमचा 'परब' कीं नाहीं, तेव्हां थोडीं पक्वान्नंबिक्वान्नं करायचीं होतीं म्हणून लागला थोडा वेळ."

"परब ? परब तें काय माई ?"

"परब म्हणजे तेहेवार हो !"

क्षीणपणें हंसून गंगेनें पुनः विचारलें "पण तेहेवार म्हणजे तरी काय माई ?"

"म्हणजे दिवाळी-बेटा तुमची !"

"अस्सें ! या परबांत काय काय करतात तुमच्या तिकडे ?"

" खाण्यापिण्याची चंगळ करतात–रात्रीं घरोघरीं दिवे लावतात–घरच्या देवदेवींची–विशेषतः देवींची पूजा करतात–कालीमाईची मोठ्या थाटानें पूजा होते–"

" अस्सें–उद्यां कोण तीथ माई ?"

" अमावास्या बेटा."

" अँ ! तर मग आजपासूनच आमची दिवाळी. आज नरकचतुर्दशी–तरीच हा इतका अंधार!" असें ह्मणून गंगेनें एक दीर्घ निःश्वास सोडला. या वेळीं तिच्या हृदयांत दुःखातिशयानें काहूर करून सोडलें होतें. !

हळुहळू गंगा स्फुंदूं लागली. 'माई'नें चारदोन वेळ तिचें सांत्वन करावयाचा प्रयत्न केला; परंतु तिच्याकडे लक्ष्य न देतां गंगा सारखी स्फुंदतच होती. तिचा हा नित्यक्रम अंगवळणींच पडल्यामुळें ह्मातारीहि तिला गप्प करावयाच्या फारशी भरीला पडली नाहीं.

सुमारें वीसपंचवीस मिनिटें दोघीहि गप्प होत्या. या अवधींत गंगेच्या शोकाचा आवेग कांहींसा ओसरला होता. तिनें कांहींशा रुद्ध स्वरानें विचारलें "माई, या ठाणवाडीपासून आमचा सोनगांव किती लांब आहे?"

"बराच लांब आहे–सातआठ कोस असेल."

"सोनगांवचे इनामदारसाहेब आणखी किती दिवस मला अटकेंत ठेवणार आहेत ?•मला आतां सोडून द्या ना म्हणावं ?"

म्हातारी किंचित् हंसून म्हणाली "समज–दिलं त्यांनीं तुला सोडून, तर तूं जाशील कुठं ?"

"कां बरं ? माझं सासर आहे–माझं माहेर आहे. यांपैकीं कुठल्या तरी एका ठिकाणीं जाऊन राहीन मी."

म्हातारी आतां हेटाळणीनें हंसली व म्हणाली " तूं जाशील, पण ते तुला आतां घेतील का घरांत बेटा ?".

म्हातारीच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच गंगेच्या हृदयांत चर्र झालें ! कांहीं वेळ ती अगदीं स्तब्ध बसली होती. तिच्या डोळ्यांत पुनः अश्रु उभे राहिले. जरी पळून जाऊन आपली मुक्तता करून घ्यावयाची तिला

फारशी आशा नव्हती, तरी मधुनमधून तिच्या मनांत असा विचार येई, कीं, जर परमेश्वराच्या कृपेनें पळून जायची आपणाला कधीं संधि सांपडलीच, तर आपण जावयाचें तरी कोठें ? आपणासारख्या अभागिनीला आश्रय कोण देणार ? आपण आजपर्यंत अगदीं निष्कलंक आहों खऱ्या, परंतु तसा आपला भरंवसा कोणाला वाटणार? आज म्हातारीच्या तोंडूनहि याच आपल्या विचाराशीं साम्य असणारे शब्द निघालेले ऐकून बिचाऱ्या गंगेची अगदीं पुरी निराशा झाली.

कांहीं वेळानें म्हातारी म्हणाली "भारी रात्र झाला बेटा. ये, आपलं सामानबिमान घे बघून सैंपाकाचं—काढून देतें तुला. विस्तवहि घालून देतें तुला चुलींत."

गंगेनें एक मोठा सुस्कारा सोडला व ती म्हणाली "नको माई, असूंद्या तें सामान. अन् आतां विस्तवहि नका घालूं चुलींत."

"म्हणजे ? आज जेवायचं नाहीं तुला बेटा ?" म्हातारीनें आश्चर्यानें विचारलें.

"नाहीं. आज कसं माझं पोट अगदीं भरून आलं आहे."

"असं कांय बरं बेटा ? थोडं खा—असं करून कसं चालेल ?"

"आहेत दोनं पेरू--तेच खाईन झालं."

म्हातारीनेंहि तिला फारसा पुढें आग्रह केला नाहीं. गंगेनें स्वयंपाक केला नाहीं, म्हणजे तिचीहि बरीच मेहनत वांचणार होती. तिनें जो पहिल्यानें गंगेला आग्रह केला, तो अर्थात्‌च अगदीं वरवरचा होता. स्वयंपाक न करण्याच्या तिच्या निश्चयानें म्हातारी उलट कांहींशी खूषच झाली. झोपडींत जी '**अनास्वादितरसा**' अशी केशवरावजींनीं दिलेली एक बाटली होती, तिच्याशीं तिचें मन केव्हांपासून जणूं काय चिकटून राहिलें होतें !

"बरं तर, मी जातें आतां बेटा !"

"बसा ना हो माई, जाल आतां. इतकी कसली मेली घाई लागून राहिली आहे तुम्हाला ? मी सैंपाक केला असता, म्हणजे तरी मोडलाच

असता कीं नाहीं इथं कांहीं तरी वेळ तुमचा ? तुमची गुडगुडी आणा अन् बसा थोडा वेळ गोष्टी सांगत माझ्याशी. "

म्हातारीचा नाइलाज झाला. ती म्हणाली " अच्छा, एकदां भरतें मी गुडगुडी. ती आटून खलास होईपर्यंत तूं आपल्या सासरची गोष्ट सांग मला बेटा !" असें म्हणून म्हातारी आपल्या धूम्रपानाची तयारी करूं लागली.

गंगा खिन्नपणें किंचित् हंसून म्हणाली " कोणती सांगूं माई, तुम्हाला मी माझ्या सासरची गोष्ट ? "

" तुझ्या सासरीं माणसं कोणकोण आहेत ? "

गंगेनें एक दीर्घ निश्वास टाकून म्हटलें "माझा दीर आहे, जाऊ आहे, सोन्यासारखे दोन माझे पुतणे आहेत माई ! "

" पुतणे किती मोठे आहेत ? "

" मोठा आहे दहा वर्षांचा–अन् दुसरा आहे सारा चार वर्षांचा. माझ्या दुर्दैवानं माझ्यावर हें असं आकाश कोसळलं--देवानं माझ्या नशिबीं कांहीं मुलंबाळं लिहिलीं नाहीत–"

फुरुक् फुरुक् करीत म्हातारी म्हणाली " असं कां म्हणतस बेटा ? देवाच्या दयेनं तुलाहि मुलं होतील, सारं कांहीं ठीक होईल—"

" असं म्हणूं नका माई--आमच्या जातींत विधवांचे पाट लागायला कांहीं हरकत नाहीं, हें खरं; पण तो कांहीं बायकांचा खरा धर्म नव्हे, असं आपलं मला वाटतं--अन् प्राण गेला तरी माझ्या हातून कांहीं असलं विपरीत आचरण व्हायचंहि नाहीं--"

"असं म्हणूं नको बेटा ! तुझं हें तरुण वय; हा असा खुपसुरत चेहरा. कितीतरी लोक तुझ्याशीं शादी करायला पागल होऊन जातील बघ—"

गंगा आतां बरीच रागावली. ती किंचित् कर्कश स्वरानें म्हणाली "माई, असल्या गोष्टी जर तुम्हाला काढायच्या असतील, तर तुम्ही आपल्या जा कशा—"

म्हातारी कांहींशी ओशाळून म्हणाली "बरं, राहूं दे तें--पण तूं काय सांगत होतीस ?"

गंगा शांत होऊन पुढें बोलूं लागली "हं--माझ्या नशीबीं मूलबाळ नाहीं, म्हणून माझ्या धाकट्या पुतण्यालाच माझ्या पोटचा मुलगा असं समजून मी त्याच्यावर प्रेम करूं लागलें. तो आपला नेहमीं माझ्याजवळ असायचा, माझ्याजवळ झोंपायचा, फार काय--मलाच तो 'आई' म्हणून हांक मारी ! " बोलतांबोलतां गंगेचा गळा दाटून आला. डोळ्यांतून सळकन् दोन अश्रुबिंदु गालांवरून खालीं पडले.

विषय बदलण्याच्या हेतूनें म्हातारीनें विचारलें "बरं, ठाणवाडीच्या इनामदारांनीं तुला कसं धरून आणलं बेटा ?"

गंगेनें एक थोरला उसासा टाकून म्हटलें "माझ्या पायावर मींच धोंडा पाडून घेतला, म्हणून असं झालं! माझ्या लहान पुतण्यावर माझं आई--प्रमाणं प्रेम जडलं. तो नेहमीं मजजवळ असायचा, मला आई म्हणायचा, हें कांहीं माझ्या जावेला चांगलं पहावेना. ती पहिल्यापासूनच माझा द्वेष करी--त्यांत आणखी ही एक भर पडली. माझा दीरहि आपल्या बायकोच्या तंत्रानं चाले--मला नेहमीं शिवीगाळ करायचा. कुठल्याहि एकाद्या कामांत माझा तिळाएवढा दोष दिसला, कीं, माझा दीर अन् जाऊ माझ्यावर कातावून जणूं काय सारं घरच डोकीवर घ्यायचीं. अशा प्रकारच्या हालअपेष्टा मीं पुष्कळ दिवस मुकाट्यानं सोसल्या. मी झालें तरीं एक माणूसच ना? मलाहि पुढंपुढं अगदींच त्या दोघांचा वीट येऊन तें घरहि मला अगदीं नकोसं झालं. एके दिवशीं मीं त्या दोघांनां सांगितलं, कीं, असे जर तुम्ही माझे हाल कराल, तर मी आपली माहेरीं जाऊन राहीन, हें घर कांहीं मला नको.' हें ऐकून तीं दोघें माझ्यावर अधिकच रागावलीं अन् त्यांनीं माझे अधिकच हाल सुरू केले--हाणामारीपर्यंतहि मजल आणली. शेवटीं हें सारं जेव्हां मला अगदींच सहन होईनासं झालं, तेव्हां सासर सोडून माहेरींच जाऊन कायम रहायचा मी निश्चय केला. पण मला पोंचवणार कोण ? मला बरं पहाणारा स्नेहीसोबती मला कुणीच नव्हता. शेजारींच

थोड्या अंतरावर एक विधवा बाई होती, ती नेहमीं माझी विचारपूस करायची, मला भारी माया दाखवायची. तिच्याशीं हळूच मीं यासंबंधानं गोष्ट काढली, अन् तेव्हांपासून आम्हां दोघींचीं याबद्दल खलबतं सुरू झालीं. सर्व ठीकठाक होऊन एके दिवशीं संध्याकाळीं तिच्याबरोबर मी गांवाबाहेर पडलें, अन् तिनं माझा पुरा विश्वासघात करून मला इथं आणून सोडलं! ही म्हातारी जातीनं ब्राह्मणाची बरं माई! ज्या हाल-अपेष्टांतून मुक्त व्हायच्या आशेनं मीं स्वतःच्या मालकीचं घर सोडलं, त्याच्या दसपट हालांत मी येऊन पडलें. मात्र भगवंतानं या हालांतहि माझ्या पातिव्रत्याचं अजून रक्षण केलं आहे—आतां इथून केव्हां अन् कशी माझी सुटका होते आहे, हें त्या आई जोगेश्वरीला ठाऊक!"

असें म्हणून रुद्ध कंठानें गंगेनें आपली करुण कर्मकहाणी संपविली. या वेळीं तिच्या डोळ्यांतून झरझरां अश्रुप्रवाह सुरू झाला होता. तें पाहून म्हातारी म्हणाली "बेटा, अशी रडूं नकोस. नेहमींनेहमीं डोळ्यांतून पाणी काढणं बरं का? कालीमाई तुझं बरं करील बरं बेटा!" असें म्हणून तिनें मुकाट्यानें आपलें धूम्रपान संपविलें व "जातें आतां मी," असें सांगून ती खोलीबाहेर पडली. बाहेरच्या दाराला कडीकुलूप लावून तिनें तें तीनचार वेळ जोरानें ओढूनहि पाहिलें. झोंपडींत जाऊन तिनें चावी जांवयांजवळ दिली व आपल्या पुतणीला ती स्वयंपाकांत मदत करण्यास गढून गेली.

म्हातारी निघून गेल्यानंतर किती वेळ तरी गंगा बसल्या जागींच हातावर गाल ठेवून बसून राहिली होती. 'कालीमाई तुझं बरं करील बेटा!' हे म्हातारीचे शेवटचे शब्द तिच्या कानांत सारखे घुमून राहिले होते. म्हातारीची ही कालीमाई म्हणजे आपली आई जोगेश्वरीच!

गंगेनें उठून एक खिडकी उघडली. बाहेर निबिड अंधकार पसरला होता. बाहेरच्या जंगलांत रातकिड्यांचा किर्र शब्द सारखा सुरू होता. मधुनमधून इतरहि वन्य पशुपक्ष्यांचे शब्द ऐकूं येत होते. भाराक्रान्त हृदयानें गंगा त्या खिडकीजवळ किती तरी वेळ उभी होती. उभ्या-

उभ्यानींच त्या अगाध अंधकारसमुद्रांत आपल्या सजल नेत्रयुग्माला निमज्जित करून अर्धस्फुट स्वरानें गंगा बोलूं लागली "आई जोगेश्वरी ! मी अगदीं लहान अजाण पोर होतें तेव्हांपासून तुजवर निष्ठा ठेवून तुझी भक्ति करीत आलें आहें. तुझ्या या अनाथ मुलीच्या अशा हाल-अपेष्टा चाललेल्या पाहून तुला तिची दया आली, अन् म्हणूनच असा अंधकाराचा वेष घेऊन तूं माझें सांत्वन करण्याकरितां आली आहेस. आई, माझ्या हातून कांहींहि पातक घडलं नाहीं; तर मग माझ्या या अशा हालअपेष्टा कां चालल्या आहेत ? अगदीं अवेळीं माझ्या पतिरत्नाला तूं या अभागिनीपासून हिरावून नेलंस; जिथं जिवाला कांहींतरी सुख लागेल या आशेनं मीं आश्रय घेतला, तिथूनहि मला तूं घालवून देऊन मला निराश्रित करून टाकलंस. आई जोगेश्वरी ! माझ्या हातून कळून अथवा अजाणतां एकादं पातक घडलं असेल, तर त्याची मला क्षमा करून या संकटांतून माझा उद्धार कर. ज्यानं माझ्या धर्माचं–माझ्या पातिव्रत्याचं रक्षण होईल, असं कर. पातिव्रत्याच्या रक्षणाशिवाय मला दुसरं कांहीं नको. पण माझ्या नशीबीं जर पातिव्रत्यरक्षण लिहिलेलंच नसेल, तर आपल्या एकाद्या शाकिणीडाकिणीला पाठवून तिला इथल्या इथं मला ठार मारून टाकायची आज्ञा कर. पातिव्रत्य हेंच माझं सर्वस्व आहे, तेंच जर माझं नाहींसं व्हायचं असेल, तर वाटेल त्या उपायानं मला मृत्यु देऊन आपल्या पायांशीं घेऊन जा. आई, माझं, माझ्या धर्माचं, माझ्या पातिव्रत्याचं रक्षण कर–रक्षण कर आई ! "

हृदयांतील अत्यंत खोल भागापासून निघालेल्या या शब्दांनीं गंगेने आपल्या कुलदेवतेची प्रार्थना केल्यावर तिचें हृदय बरेंच हलकें झालें. क्षणभरानें खिडकी बंद करून पसरलेल्या चिरगुटावर येऊन ती पडली. खोलींतला दिवा मिणमिण जळत होता. खोलीचें दार म्हातारीनें उघडेंच टाकलें होतें. डोळे झांकून गंगा मनांतच म्हणाली " आई जोगेश्वरी, माझं रक्षण कर--रक्षण कर माते ! " गंगेच्या प्रार्थनामय अशा मानासिक स्थितींत

निद्रा देवीनें तिच्या सर्वांगावरून आपला कमलकोमल हात ममतेनें फिरविला व तिची जागृतिचेतना नाहींशी करून टाकली.

* * *

रात्र बरीच होऊन तिचें स्वरूप अधिकच गंभीर झालें. गंगा अजून तशीच निजली होती. इतक्यांत एकाएकीं आपल्या मस्तकाला कांहीं तरी कठिण पदार्थाचा स्पर्श झाल्यासारखा तिला वाटला आणि क्षणार्धात तिचा निद्राभंग होऊन ती चमकून उठली. डोळे उघडून तिनें पाहिलें, तों जवळचा दिवा खूब उज्ज्वल झाला आहे; आपल्या जवळच रक्तवस्त्र परिधान केलेली, कपाळाला शेंदुराचा मळवट भरलेली एक काळाकभिन्न स्त्री उभी असून तिच्या हातांतील त्रिशूळ मृदुमंदपणें हलत आहे! त्या त्रिशूलाचा अग्रभाग जणूं काय रक्तानेंच माखलेला आहे! त्या स्त्रीचेहि डोळे तसेच लालभडक आहेत!

क्षणभर हा विलक्षण देखावा पाहून गंगेनें पुनःआपले डोळे घट्ट मिटले. भयानें तिच्या शरीरांतील रक्ताचा कण ना कण अगदीं गोठून गेल्यासारखा झाला होता. आपण जागृत आहों, किंवा आपणाला स्वप्नांत हा भयंकर देखावा दिसत आहे, याचा बिचारीला कांहीं केल्या निर्णय करतां येईना!

एक मिनीटभरानें अस्वाभाविक अशा विकृत स्वरानें कोणीं म्हटलें " बेटा, बिलकूल भिऊं नकोस! "

हे आश्वासनपर शब्द ऐकतांच गंगेनें पुनःडोळे उघडले. छद्मवेषी केशवरावजी डोकें हलवीतहलवीत हलुहलू बोलूं लागले "भिऊं नकोस बेटा, बिलकूल भिऊं नकोस. देवीची मी एक डाकीण आहें--भिऊं नकोस!"

निजण्यापूर्वी केलेल्या प्रार्थनेचें गंगेला तत्क्षणीं स्मरण झालें. "माझा उद्धार कर, नाहीं तर आपल्या एकाद्या शाकिणीडाकिणीला पाठवून मला तिला ठार करावयाला सांग" असे जे शब्द ती बोलली होती, ते तिला आतां स्पष्ट आठवूं लागले. गंगा कांपतकांपत बसली व हात जोडून कंपित स्वरानें म्हणाली " आई, मला नको ग ठार मारूं!

हे शब्द ऐकतांच डाकिनी फिदीफिदी हंसू लागली व म्हणाली " भिऊं नकोस बेटा--भिऊं नकोस! मी कांहीं तुला मारीत नाहीं, आईची मी एक डाकीण आहें—"

जरा धीर येऊन गंगेनें विचारलें "कोणाची? वज्रेश्वरीची?"

"हो वज्रेश्वरीची ! आज नरकचतुर्दशी ना ! आज साऱ्या देवता, उपदेवतांचा दिवस. आम्ही सर्वजणी मौज करायला पृथ्वीवर आलों होतों. आई वज्रेश्वरीनं मला तुला विचारायला पाठवलं आहे, कीं, तूं रडतेस कां म्हणून? तुझ्या रडण्यानं आईचं सिंहासन डळमळायला लागलं ना ! सांग बेटा, तूं रडतेस कां नेहमीं ?"

हात जोडलेले तसेच ठेवून गंगा डाकिणीकडे पहाण्याचें धाडस करून म्हणाली "आई, एका घरंदाज कुळांतली मी एक विधवा बायको आहें. मला यांनीं पकडून आणून जबरदस्तीनं इथं कोंडून ठेवलं आहे."

" कुणीं ठेवलं आहे कोंडून?"

" ठाणवाडीच्या इनामदारांनीं !"

"ठाणवाडीचे इनामदार आई वज्रेश्वरीचे मोठे भक्त आहेत. दरवर्षी नवरात्रांत ते आईचा मोठा उत्सव करतात. गंगाबाई, मी तुझी इथून मुक्तता करीन. पण तुला एक गोष्ट करायची शपथ घेतली पाहिजे!"

मुक्ततेच्या आश्वासनानें गंगेचें सारें भय आतां नाहींसें झालें होतें हात जोडून तिनें विचारलें "कसली शपथ आई?"

"तूं जोंपर्यंत जिवंत आहेस, तोंपर्यंत ठाणवाडीच्या इनामदारांचं नांव कुणाजवळहि कधीं काढायचं नाहीं."

"त्यांचं नांव कुणाजवळहि कधीं काढणार नाहीं. अशी मी शपथ घेतें."

"जर कधीं कुणाला त्यांचं नांव सांगितलंस, तर मी येऊन हा माझा त्रिशूळ तुझ्या उरांत असा खुपशीन !"

"नाहीं आई—माझ्या जिवांत जीव आहे, तोंपर्यंत कुणापाशींहि इनामदारांच्या नांवाचा मी उच्चारहि करणार नाहीं. माझी या संकटांतून मुक्तता कर !"

"तर मग ये माझ्या मागून." असें म्हणून केशवरावजी त्या खोलींतून निघाले. कांपणाऱ्या पावलांनीं गंगाहि त्यांच्यामागून जाऊं लागली.

बाहेरच्या ग्यालरींत येतांच केशवराव ह्मणाले "जरा उभी रहा इथं. आंत जाऊन मी दिवा घेऊन येतें." असें ह्मणून ते आंत गेले, व दिवा हातीं घेऊन, बनगांवच्या वाड्याजवळील केराच्या राशींत सांपडलेलें मनोहरपंतांचा नांवपत्ता असलेलें पोस्टकार्ड आपल्या वस्त्रांतून बाहेर काढून त्यांनीं गंगेच्या चिरगुटावर ठेवून दिलें.

बंगल्यांतून बाहेर पडतांच केशवरावांनीं दिवा फेंकून दिला आणि त्रिशूळाचा मागचा भाग गंगेच्या हातीं देऊन ते ह्मणाले " नीट मजबूत धर हां बेटा! माझ्या मागोमाग मुकाट्यानं चल."

थोड्याच वेळांत सूचिभेद्य अंधकारांत दोघेंहि नाहींशीं होऊन गेलीं.

बाहेरच्या मोकळ्या हवेंत येतांच गंगेला जणूं काय नवा जन्मच मिळाल्याप्रमाणें वाटलें! तिच्या रोमरोमांत जणूं काय नवीन शक्तीचाच संचार झाला! त्रिशूळ मुठींत घट्ट धरून त्वरेनें पावलें टाकीत केशवरावांच्या मागून तिनें किती तरी रस्ता तोडला. चालण्याच्या श्रमांमुळें त्या कोमलांग तरुणीच्या सर्वांगांतून दरदरां घाम थबकूं लागला--परंतु मनाच्या अपूर्व उत्साहामुळें तिला लवमात्र क्लान्ति वाटली नाहीं.

. याप्रमाणें तीं दोघेंजणें जवळजवळ दोन तासपर्यंत सारखीं चाललीं होतीं. इतक्यांत रस्त्याच्या बाजूला एक देऊळ दिसूं लागलें. केशवरावांनीं विचारलें " हें घंटेश्वराचं देऊळ--ओळखलंस?"

गंगेनें विचारलें " डोंगरपुरचा घंटेश्वर?"

" होय. डोंगरपुर गांव थोडें दूर आहे इथून. या अंधारांत तें दिसत नाहीं. या देवळांत तूं कधीं आली होतीस का पूर्वी?"

" हो, पुष्कळ वेळ आलें आहें मी शिवरात्रीच्या उत्सवाला घंटेश्वराच्या. डोंगरपुरापासून आमचा गांव सारा दोन कोस आहे."

" बरें गंग! मला तर आतां कांहीं रहातां येत नाहीं. आतां रात्र कांहीं फारशी नाहीं राहिली. पहांटेच्या सुमाराला आह्मांला आपापल्या

ठिकाणीं गेलंच पाहिजे. तिथं जाऊन आई वज्रेश्वरीचे दागदागि काढून तिच्या झोंपेची तजवीज केली पाहिजे. आईला सारी रात्र अ जागरण झालं आहे ना! बरं तर--मी जातें आतां. हा सरळ रस्ता धर तूं सारखी चालूं लाग. दोन कोसांवर सोनगांव लागेल तुला. उजाड उजाडतां तूं घरीं जाऊन पोहोंचशील बेटा!"

गंगेनें तेथल्या तेथें खालीं बसून केशवरावांच्या पायांवर लो० घेतली व अत्यंत करुणाजनक वाणीनें म्हटलें " अन् आई, मला त्यां घरांत नाहीं घेतलं, तर काय करूं मी?"

"तूं आपल्या माहेरीं बापाकडे गेली आहेस, असंच ती मंड सा-या लोकांनां सांगत आहे. तुला कसलाहि काळिमा लागण्याचं भ नाहीं बेटा! अन् इतकंहि असून नाहींच तुझ्या दीरजावेनं तुला घर घेतलं, तर मग तूं त्यांनां बेलाशक सांग, कीं, म्हणावं 'जमिनजुमल पैकीं माझ्या नव-याच्या हक्काचा अर्धा भाग मला द्या--मी जाउ नाशिकत्रिंबकाला, नाहींतर गाणगापुरला रहातें कायमची!"

" अन् आई, इतकंहि सांगून त्यांनीं नाहींच ऐकलं तर? मला घर नाहींच घेतलं तर?"

" जर असं झालं, तर तुमच्या सोनगांवाला नवीन कारभारी आ आहे, त्याच्याकडे जाऊन तूं बेलाशक तक्रार कर. हा नवीन कारभा केशवराव कुळकर्णी मोठा धार्मिक अन् सज्जन गृहस्थ आहे. आपल वज्रेश्वरीचा तो मोठा भक्त आहे. तुझ्या दिराला बोलावून आणून त्या जोड्यांनीं मारल्याशिवाय तो कधींहि रहाणार नाहीं. केशवराव तुझ रहाण्याची वगैरे सारी व्यवस्था अगदीं चोख करून देईल."

डाकिणीला भक्तिपूर्वक नमस्कार करून गंगा सोनगांवाकडे चा लागली. क्षणभरानें केशवरावहि निघाले. मनांतल्यामनांत ते म्हण "हा कारभार जो मीं केला--तो तर भारी बहारीचा वठला! अहाहा तरुणपणची ताकद जर माझ्या अंगांत असती! रात्र कांहीं फार ना



" आई, मला नकों ग ठार मारूं! " (पृष्ठ २६१.)

राहिला–मला वाटतें तीनएक तरी वाजले असतील. दोन तासांच्या आंत मला आतां बनगांवला पोंचलें पाहिजे. सकाळीं उजाडतांच गांवचे लोक बाहेर पडतात, तों ही डाकिणीची मूर्ति दिसून ते भयानें मूर्च्छित न पडोत म्हणजे झालें! सपाटून पाय उचलला तर अंधार असतां-असतांच मी घरीं पोंचेन बहुतकरून." असें म्हणून केवशरावजी त्वरेनें चालूं लागले.

---

## प्रकरण तेत्तिसावें.

## रावसाहेबांची घाबरगुंडी !

चतुर्दशीची रात्र सरून प्रभातकाल आला. गेल्या रात्रीच्या 'खाण्या-पिण्या'च्या प्रभावामुळें माळयाच्या कुंटुंबापैकीं अद्यापि कोणाच्याहि निद्रेची तंद्रा उतरली नव्हती. फक्त एक रामदासोट्याची स्वारी मात्र उठून हातीं एक लांबशी बांबूची काठी घेऊन बागेंत भटकत असून आपल्या सकाळच्या 'बाळभाटी'ला उपयोगीं पडतील अशा कांहीं फळांच्या शोधांत होती.

हलुहळू सूर्य उगवून बराच वर आला. चहूंकडे लखख ऊन पडलें. त्या वेळीं माळयाच्यां झोंपडींतील प्रौढ मंडळींचा कंठस्वर थोडथोडा कोठें ऐकूं येऊं लागून, तीं सारीं शाबूत असावीं असें चिन्ह दिसूं लागलें. सर्वजणें आपापल्या अंथरुणांवर उठून बसलीं होतीं. परंतु उठून उभें रहावेना कोणालाच! शेवटीं, माळयाच्या बायकोनें उठण्याचा प्रयत्न केला आणि तो यशस्वीहि झाला. तिनें उठून तमाखूच्या दोन चिलमी भरून आणून एक आपल्या पतिराजांना व दुसरी आपल्या 'मा'ला दिली. म्हातारीनें आपल्या चटईवर बसल्याबसल्याच एकदोन जांभया दिल्या व एकदोन वेळ हातानें डोळे दाबून ते किंचित् किलकिले केले आणि ती चिलमीचा समाचार घेऊं-लागली.

धूम्रपान करतांकरतां माळी म्हणाला " माई, आज धनीसाहेबांच्या वाड्यांत मोठा उत्सव. थोड्या वेळानें बागेला पाणीबिणी पाजून आंघोळ करून मला तिकडे गेलें पाहिजे."

पेरू चावीतचावीत तेथें येऊन रामदासोग्या म्हणाला "मीहि येणार बाबा—"

"तूं येणार, पण तुला कडेवर घेऊन इतक्या लांब जाणार कोण बुवा?"

म्हातारी जांभई देऊन टिचकी वाजवीत म्हणाली " जा जा घेऊन –लहान पोर तें–पाहील मजा घटकाभर–तोंड गोडधोडहि करील—"

"तर मग तूंहि चल मजबरोबर माई! रामदासोग्याला कडेवर घेऊन तूं चल वाड्याकडे."

"वाः, भारीच चांगलं बेटा! आपण दोघंजणंहि जर गेलों, तर 'तिची' खबरदारी रे कोण घेणार? धनीसाहेब रागावतील ना आपण दोघंहि गेलों तर!"

"हो, तेंहि खरेंच!" असें म्हणून माळी मुकाट्यानें धूम्रपान करूं लागला. शेवटीं असें ठरलें, कीं, पहिल्यानें रामदासोग्याला कडेवर घेऊन 'माई'नें बनगांवला जावें, व तेथील अन्नकूटोत्सव पाहून व प्रसाद वगैरे घेऊन ती परत आल्यावर दुपारीं माळ्यानें जावें.

धनीसाहेबांच्या वाड्यांत मुलगा जावयाचा, म्हणून रामदसोग्याच्या आईनें त्याच्या 'शृंगारा'ची तयारी चालविली. त्याच्या अंगांतील बंडी काढून एक छटाक खोबरेल तेल तिनें त्याच्या केशपूर्ण मस्तकावर घालून दोन्ही हातांनीं जोरजोरानें ती तें चोळूं लागली. येथपर्यंत कांहीं रामदाससोग्यानें विशेष हरकत केली नाहीं. झोंपडीच्या जोत्यावर एक थंड पाण्याची कळशी भरून ठेवलेली होती. 'ज्ञानोदय' झाल्यानंतर स्नान करण्याचे प्रसंग रामदासोग्याला पांचसातांपेक्षां कांहीं अधिक आले नव्हते. तेल चोळून झाल्यानंतर रामदासोग्याच्या आईनें त्याचा हात धरून जेव्हां त्याला त्या कळशीकडे खसाखस ओढून न्यावयाला प्रारंभ केला, त्या वेळीं त्यानें सप्तमांत सूर काढावयाला सुरुवात केली.

" धनीसाहेबांकडे जायला आपणाला बिलकूल उत्सुकता नाहीं. याच संकटांतून आपली सुटका झाली ह्मणजे बस्स आहे !' असेंच जणूं काय तो आपल्या अश्रुपूर्ण नेत्रांनीं मान लवून सुचवीत होता; परंतु त्याच्या या ' संगीत ॲक्टिंग'ला एका धबक्याशिवाय कांहींच बक्षिस मिळालें नाहीं. थंड पाण्याचे तांब्यांचे तांबे त्याच्या मस्तकावर रिकामे होऊं लागले. स्नान आटोपल्यावर त्याच्या आईनें त्याचे केंस पुसून विंचरले, एक हळदीचे डाग पडलेलें छोटें धोतर त्याला नेसविलें, डोळ्यांत काजळ घालून एक नवीन कुडतें त्याच्या अंगांत चढविलें. या वेळीं कोठें रामदासोब्याच्या तोंडावर पुनरपि हंसें फुटलें. आनंदानें नाचतबागडत तो पुनरपि उन्हांत खेळूं लागला.

इकडे ' माई 'नेंहि तोंड धुऊन पहिल्यानें आदल्या दिवसच्या पक्वान्नां-वर थोडासा ताव मारला व ती ह्मणाली "चला, तिकडे पाणीबिणी भरून विस्तव चुलींत पेटवून येतें अन् तशीच रामाला घेऊन निघतें."

असें ह्मणून ह्मातारीनें जांवईबोवांकडून चावी मागून घेऊन ती हळुहळू बंगल्याच्या मागें गेली. पहाते, तों दरवाजा नेहमींप्रमाणें बंद नाहीं. एकदम सताड उघडा ! हा विलक्षण देखावा पाहून तिचें मस्तक फिरूं लागलें—हातांपायांला थरथरां कंप सुटला. 'अगबाई, काय हें ! हा दर-वाजा उघडा कसा ! गंगा आहे ना आंत ?' अशा प्रश्नांनीं तिच्या डोक्यांत काहूर उठलें.

होती तितकी ताकद एकत्र करून ह्मातारी धांवतधांवतच वर गेली. पहाते, तों कोणीच कोठें नाहीं !

माडीवरील प्रत्येक खोली ह्मातारीनें दोनदोनदां तीनतीनदां शोधून पाहिली—परंतु जिकडेतिकडे अगदीं शुक्र ! 'गंगा—बेटा गंगा !' ह्मणून तिनें कितीतरी हांका मारल्या; परंतु बिचारीला कोणींच उत्तर दिलें नाहीं.

तेव्हां अगदीं हताश होऊन ह्मातारीनें रडतरडत येऊन जांवईबोवांना सारी हकीगत सांगितली.

ती ऐकतांच जणूं काय आपणावर वज्राघातच झाला, असें माळ्याला वाटलें. त्याची कंबर खचून तो खालीं बसला. त्याच्या डोळ्यांसमोर काजवे चमकूं लागले. कंठस्वर जड व विकृत झाला. कंपित स्वरानें तो म्हणाला "चल—पाहूं या जाऊन."

सासू आणि जांवई दोघेंजणें हळुहळू बंगल्याच्या मागें येऊन उभीं राहिलीं. माळी दरवाज्याशीं उभा असतां एकाएकीं त्याचा चेहरा बदलूं लागला. त्याचे दोन्ही डोळे जास्वंदीच्या फुलाप्रमाणें लालबुंद होऊन गेले. दांतांवर दांतांचें घर्षण होऊं लागलें. जोरानें सासूबाईचे पक्क केश ओढून तो ओरडला "हरामजादी, तुझ्या चुकीमुळें हा सत्यानाश झाला!"

या आकस्मिक अपमानामुळें म्हातारीच्याहि अंगाची आगीआग झाली. शक्य तितक्या जोरानें ओरडून तीहि म्हणाली "काय रे पाजी हरामखोरा, माझी काय चुकी झाली? सोड माझे केंस."

"तुझी चुकी नाहीं, तर चुकी कुणाची? अलबत तुझीच! काल शराबाच्या नशेंत तूं होतीस; तूं नीट टाळें लावलें नाहींस. हें पहा एकाच दारांच्या कोयंड्यांत टाळें लावलें आहेस! दार उघडें आहे, असें पाहून पांखरूं पळालें!"

म्हातारीनें पाहिलें, तों खरेंच! कोयंड्याला कडी नसून त्याला कुलूप तेवढें लटकतें आहे! परंतु ती जोरानें म्हणाली. "कधीं नाहीं—काल मीं दाराला कडी नीट लावून मगच कुलूप लावलं होतं! अरे, त्या वेळीं तर मीं शराबाच्या एका थेंबालादिखील स्पर्श केला नव्हता ना! अपराध तर तुझाच आहे. शराबाच्या नशेंत तूंच लोळत पडला होतास; गैरशुद्धींत तूं चावी कुठंतरी टाकलीस, ती घेऊन कुणीं तरी कुलप उघडलं!"

माळ्यानें म्हातारीचे केंस सोडले. नंतर तीं उभयतां वरतीं गेलीं. गंगेच्या निजण्याच्या खोलींत जाऊन माळी बारकाईनें पहातो, तों एका पसरलेल्या चिरगुटावर एक पोस्टकार्ड पडलें आहे. तें उचलून घेऊन तो आश्चर्यानें म्हणाला "हें काय बुवा? हें पत्र इथें कसें आलें? हें तर डाकेंतून आलेलें पत्र दिसतें आहे."

म्हातारी म्हणाली " तें मला काय बाई ठाऊक ? हें पत्र कांहीं मीं एक दिवससुद्धां इथं पाहिलं नव्हतं. "

" हें पत्र गंगेलाच कुणींतरी लिहिलें असावें, असें दिसतें. हें कोणाकडून तरी वाचविलें, म्हणजे तिला कोण घेऊन गेले, याचा होईल आपोआप उलगडा ! "

" चल, तूं अगदीं खुळा आहेस. गंगेला कोण पत्र आणून देणार आहे ? जे तिला घेऊन जायला आले होते, त्यांचंच चुकून हें इथं राहिलं असावं, असं मला वाटतं. "

माळ्यानें तें पोस्टकार्ड मोठ्या काळजीनें आपल्या वस्त्रांत बांधून ठेवलें. नंतर तो म्हणाला "माई, गंगा कशीहि जावो, कुणीहि तिला नेवो, पण आपला मात्र त्यामुळें अगदीं सर्वनाश झाला, यांत मुळींच संशय नाहीं. इतके दिवस इथें नोकरी करून कशीतरी पोटाची भर करीत होतों–ती नोकरीहि गेली आतां. आतां काय धनीसाहेब मला नोकरीवर ठेवतील ? आतांच्या आतां लाथ मारून हांकलून लावतील. आतां मी म्हातारपणीं, दोन कच्चींबच्चीं पदरांत घेऊन जायचें तरी कुठें ?"

मोठे उसासे टाकून दोघेंजणें थोडा वेळ मुकाट्यानें उभीं होतीं. शेवटीं म्हातारी म्हणाली " ती हरामजादी जरी पळून गेली, तरी ती कांहीं अजून फार दूर नसेल गेली. जवळपास कुठं तरी लपून बसली असेल, असं मला खात्रीनं वाटतं. एकवार पहा तर खरं शोधून!"

नंतर दोघेंहि बंगल्याबाहेर आलीं. टाळें लावून विषण्ण मुखानें माळी म्हणाला " जातों तर मग–पहातों शोध करून. "

माळी जवळजवळ दोनप्रहरपर्यंत आसपास फिरत होता; परंतु त्याला गंगेचा पत्ता कोठेंच लागला नाहीं. शेवटीं तो घरीं परत येऊन म्हणाला " छेः, कुठेंहि नाहीं त्या चांडाळणीचा पत्ता लागत. आतां मी वाड्याकडेच जातों अन् धनीसाहेबांनां बातमी देतों. "

बुढ्ढीनें विचारलें " अन् काय सांगणार त्यांनां? "

"सांगेन, कीं, कुणीं तरी पाजी हरामखोर दुष्ट माणसानें कुलपाला दुसरी चावी लागू करून गंगेला पळवून नेलें."

म्हातारी तिरस्कारानें म्हणाली " अहाहा! काय पण अक्कल तुझी! असं तूं सांगितलंस, म्हणजे धनीसाहेबांनां तें खरं वाटेल असं का वाटतं तुला? ते तर असं साफ म्हणतील, कीं, तुम्हीच कुलूप घालायला विसरलांत, अन् आतां हें कांहीं तरी रचून सांगतां आहां. "

" मर मग काय सांगूं म्हणतेस ? "

"कांहींतरी आणून तें कुलूप अगोदर फोडून टाक, अन् तें फुटलेलं कुलूप हातांत घेऊन वाड्याकडे जा अन् सांग धनीसाहेबांनां, म्हणावं ' काल रात्रीं कुलूप फोडून कुणीं गंगेला पळवून नेलं.' "

माळी मान हलवून म्हणाला "वाः–हीच युक्ति मोठी नामी आहे!" नंतर आपल्या झोंपडीमधून एक हातोडी शोधून आणून तिच्या साहाय्यानें एक घंटा मेहनत करून मोठ्या कष्टानें माळ्यानें तें कुलूप तर फोडलें. नंतर जेवण वगैरे कसें तरी आटोपून चारएक वाजावयाच्या सुमाराला चेहरा अगदीं रडवा करून माळी वाड्यांत जाऊन हजर झाला.

इनामदारांच्या वाड्यांत दिवाळीचा अन्नकूटसमारंभ मोठ्या थाटाचा होत असे. शेंकडों पान त्या दिवशीं जेवून उठे. माळी गेला, त्या वेळीं ब्राह्मणभोजन समाप्त झालें होतें. गांवच्या गरीबगुरिबांच्या पंक्ति जेवावयाला बसल्या होत्या. कारकून वगैरे मंडळी त्यांनां वाढावयाला लागली होती. कमरेला मुगटा कसून केशवरावजींची स्वारी मारे हुकमावर हुकूम फर्मावीत होती. केशवराव जरा एका बाजूलाच उभे होते. माळी त्यांच्याजवळ जाऊन उभा राहिला.

माळ्याला पहातांच केशवराव म्हणाले "काय रे माळी ? तुला आतां यायला फावतें आहे वाटतें ? अरे, घरचा ना रे माणूस तूं ?"

केशवरावांनां एकीकडे बोलावून नेऊन माळी हुळूच रडव्या स्वरानें सांगूं लागला " काय सांगूं साहेब ? सर्वनाश झाला आमचा ! "

माळ्याच्या या शब्दांनीं आपणाला कमालीचें आश्चर्य वाटल्याचा आविर्भाव दाखवून केशवराव मानभावीपणानें ह्मणाले " काय झालें रे? रामदासोच्या तर बरा आहे ना ?

" तो आहे बरा साहेब—पण गंगा गेली पळून !"

" आं ? ह्मणतोस तरी काय माळी ? गंगा पळाली ? कशी ? केव्हां ? कुणाबरोबर ?"

" काल रात्रीं कोणीतरी दुष्ट माणसानें टाळें फोडून तिला पळवून नेलें साहेब !"

मोठा सुस्कारा सोडून केशवराव हताशभावानें ह्मणाले "अरेरे ! अगदीं घात झाला ! आतां याला उपाय काय करायचा ? हें काम केलें तरी कुणीं बुवा ?"

"कोण जाणे साहेब ! तें जर मला कळतें, तर आणखी काय पाहिजे होतें ? तरी पण गंगेच्या खोलींत हें पत्र सांपडलें आहे मला !" असें ह्मणून माळ्यानें तें कार्ड केशवरावजींच्या हातीं दिलें. केशवरावांनीं तें उलटूनपालटून एकदोन वेळां पाहिलें व ते ह्मणाले "माझा चष्मा नाहीं बरोबर; ह्मणून मला हें वाचतां नाहीं येत. पण हें काम कुणाचें, तें विचार करूनहि नाहीं बुवा आपल्या ध्यानांत येत. हो; ठीक ठीक ! अरे तो माणूस—काय त्याचें नांव पहा—सखाराम कुडव—तो बंगल्याकडे सारखी टक लावून पहात होता, तो ? त्याचें तर नसेल हें काम ?"

" तें कसें सांगावें साहेब ? आतां धनीसाहेबांना याची खबर तरी दिली पाहिजे तावडतोब ?"

"हो हो—त्यांनां कळवायला हें हवेंच. इकडे पहा माळी, धनीसाहेबांनीं जर तुला विचारलें, कीं, तुझा कुणावर वहीमाबिहीम आहे का ह्मणून, तर तूं आपला साफ सांग, कीं, 'काल संध्याकाळीं पन्नासएक वर्षांचा माणूस आमराईंत उभा राहून बागेंतल्या बंगल्याकडे एकसारखी टक लावून पहात होता. त्याच्या अंगांत पिवळ्या रंगाचा छोटा कोट, डोकीला हिरवें पागोटें, अन् गळ्याला लोंकरीचा रुमाल असा त्याचा पोषाक

होता. त्याचें नांव मीं विचारलें, तेव्हां त्यानें 'सखाराम कुडव' असें आपलें नांव सांगितलें. या इसमावर माझा वहिम आहे.' असें जर तूं धनीसाहेबांनां सांगितलेंस नाहीं, तर तूंच कुणाकडून तरी पैसे खाऊन गंगेला सोडून दिलेंस, असें ते मनांत समजतील पहा."

माळी ह्मणाला "मीं जर तिला सोडलें असेल, तर मला टाळें फोडायचें कारण काय ? कुलपाची चावी तर मजपाशींच होती." असें ह्मणून माळ्यानें तें मोडकें कुलूप केशवरावांनां दाखविलें.

माळ्याचा हा कावेबाजपणा पाहून केशवराव मनांतल्यामनांत हंसले. ते ह्मणाले "ठीक आहे तर. मी अगोदर पाहून येतों धनीसाहेब कुठें आहेत, काय करताहेत तें. नंतर मी तुला त्यांच्याकडे घेऊन जाईन. अगदीं एकान्त मिळाल्याशिवाय तर नाहीं ही गोष्ट त्यांच्याजवळ काढतां येत ? तूं जरा इथेंच रहा उभा."

माळी रडवें तोंड करून ह्मणाला "साहेब, गरीबाची नोकरी तरी राहील ना ?"

जरा विचार केल्यासारखें करून केशवराव ह्मणाले "नोकरी ह्मणतोस ? अशा स्थितींत नोकरी रहाणें जरा मुष्किलीचेंच दिसतें खरें. पण मी तुझ्या वतीनें धनीसाहेबांजवळ दोन शब्द बोलून पहातों—तुझ्यासाठीं जर आपलें वजन खर्च करायचें नाहीं, तर करायचें तरी कुणासाठीं ? तूं इथें उभा रहा—मी धनीसाहेबांची गांठ घेऊन आतां येतों."

कांहीं वेळानें केशवराव परत येऊन ह्मणाले "हं, चल ये; पण हें ठेव हो नीटपणें ध्यानांत—नांव सखाराम कुडव, पन्नासएक वर्षांचे वय, अंगांत पिवळा छोटा कोट, डोकीला हिरवें पागोटें, गळ्याला लॉकरीचा रुमाल. तो कुठला हें विचारायला विसरलों ह्मणावें. तें फुटकें कुलूप अन् तें पत्रहि धनीसाहेबांनां देऊन ये, समजलास ना ?"

बैठकखान्याजवळ एका लहानशा शयनगृहांत रावसाहेबांची स्वारी यावेळीं बसली होती. माळ्याला बरोबर घेऊन केशवरावजी त्या खोलींत गेले व क्षणभरानें खोलीच्या बाहेर येऊन बसले.

सुमारें दहा मिनिटांनीं माळी खोलींतून बाहेर आला. केशवरावांनीं त्याला विचारलें "काय रे ? काय झालें ?"

"सर्व हकीगत सांगितली धनीसाहेबांनां."

"धनीसाहेब भारी रागावले कारे तुझ्यावर ?"

"नाहीं साहेब ! 'तूं बेट्या भारी गैरसावध-अच्छा-तूं जा आतां. काय करायचें तें मागाहून पाहूं,' एवढेंच ते मला ह्मणाले."

"बरें, तूं जा आतां. प्रसाद मात्र घेऊन जा हं ! तुझी नोकरी कायम राहील, अशीच खटपट धनीसाहेबांची समजूत घालून मी करीन-जा-"

माळी सलाम करून निघून गेला. नंतर केशवराव रावसाहेबांच्या खोलींत जाऊन खालीं मान घालून उभे राहिले. त्यांच्याकडे दृष्टि जातांच रावसाहेब ह्मणाले "केशवराव, जरा दार बंद करा पाहूं."

हुकुमाप्रमाणें केशवरावांनीं दार बंद केलें. या वेळीं रावसाहेबांची अगदीं घाबरगुंडी उडून गेली असून भयानें त्यांचा चेहरा पांढरा फटफटीत होऊन गेला आहे, असें त्यांनां आढळून आलें.

रावसाहेब जड स्वरानें केशवरावांनां ह्मणाले "तुमच्या सांगण्याप्रमाणें माळ्यासमोर मीं कोणत्याहि तऱ्हेचें भय किंवा उत्कंठा दाखविली नाहीं; पण माझ्या मनाची काय स्थिति झाली आहे, ती माझी मला ठाऊक ! केशवराव, या प्रसंगीं मी काय करूं ?"

अंग थरारल्यासारखें करून केशवराव ह्मणाले "जरा घाबरून जाण्यासारखाच घडला आहे हा सारा प्रकार ! जर ती ठाण्याबिण्यावर गेली, तर एकदम भयंकर स्वरूप येण्याचा संभव आहे या खटल्याला ! एकंदर मजल मग कोठवर जाईल, याची कल्पनाहि नाहीं करतां येत !"

केशवरावांनीं पाहिलें, रावसाहेबांचा चेहरा भयानें अधिकच फटफटीत झाला आहे ! क्षणभरानें रावसाहेबांनीं विचारलें "ती ठाण्यावर जाईल ह्मणतां ?"

केशवराव गंभीरपणानें ह्मणाले "यांत कोणकोण आहेत, तिला कुणीं पळविलें, हें सारें कळल्याशिवाय हें सांगणें मुष्किलीचें आहे हुजूर !"

"यांत कोण आहेत, तें मला चांगलें ठाऊक आहे."

" कोण?"

" सख्या कुडव अन् आमचे बंधुराज !"

"काय? आपले बंधु? दादासाहेब? छेः, असें होणें संभवनीय तरी आहे?"

" नुसता संभव नव्हे, त्याबद्दल खात्री आहे माझी! गंगेच्या खोलींत बाबूच्या नांवचें हें कार्ड माळ्याला शोधतांशोधतां सांपडलें. अन् काल संध्याकाळीं आमराईत उभा राहून सखाराम कुडव गंगेच्या खोलीकडे सारखी टक लावून पहात होता, हेंहि माळ्यानें प्रत्यक्ष पाहिलें !" असें ह्मणून रावसाहेबांनीं पोस्टकार्ड केशवरावांच्या हातीं दिलें.

केशवरावांनीं एकदोन वेळां तें नीट निरखून पाहिलें व रावसाहेबांच्या हातीं तें परत देऊन गंभीरपणानें ह्मटलें "अस्सें! तरीच! याच कामासाठीं सखाराम दादासाहेबांकडे इतका वारंवार येत होता अलीकडे तो! आतां सारा संबंध जुळला नीट!"

"त्यांत आतां शंका कसली राहिली आहे केशवराव? अन् काल बिछाना, ट्रंक बांधून आमच्या बंधुराजांची स्वारीहि कोठें निघून गेली, अन् कुठें जातों. हेंसुद्धां त्यानें घरांत कुणालाहि सांगितलें नाहीं."

कांहीं वेळ स्तब्ध राहून लंबोत्तर मुद्रा करून केशवराव ह्मणाले "काय आश्चर्य आहे! पाठचा भाऊ पित्यासमान अशा थोरल्या भावाच्या गळ्यावर सुरी ठेवतो-अं? धाकटा भाऊ थोरल्या भावाला तुरुंगांत डांबणार! अन् वरून धर्माचरण तरी किती कडकडीत चाललेलें असतें! हेंच काय योगवासिष्ठांत लिहिलें आहे? या इंग्रजी शिकलेल्या लोकांचा मला तर आतां विश्वासच उरला नाहीं! कलियुग-कलियुग हें, दुसरें काय?" असें ह्मणून केशवरावजींनीं उद्वेगानें दीर्घ निःश्वास टाकला.

रावसाहेब त्वेषानें ह्मणाले "तुह्मी त्या लुच्याला बरोबर ओळखीत नाहीं केशवराव! महापाजी आहे बेटा-मुकाट्यानें कुणाच्या घराला कशी आग लावील, याचा कांहीं नेम नाहीं. त्यानें असें केलें, तर त्यांत कांहीं आश्चर्य

नाहीं. बाबूनें जरी ठाण्यांवर खबर नाहीं दिली, तरी गंगेची आप्तमंडळी तरी देणारच ! केशवराव, या वेळीं मी काय करूं, तें मला सांगा!"

केशवराव विषण्ण मुखानें विचार करीत स्तब्ध राहिले. कांहीं वेळानें ते ह्मणाले " आज त्यांनीं खबर दिली असेल, असें नाहीं वाटत. दिली असती, तर इतक्यांत ठाण्यावरचे पोलिस इथें आले असतेहि. किंवा असेंहि झालें असेल कदाचित्--नाईकसाहेब नसतील ठाण्यावर, त्यांच्या हाताखालच्या एकाद्या शिपायानें घेतली असेल फिर्याद लिहून, अन् ते आल्यावर चौकशीला सुरुवात व्हायची असेल—"

"पण आतां याला उपाय काय केशवराव ?"

केशवराव पुनः विचार करूं लागले. कांहीं वेळानें ते ह्मणाले "या बंद्याला जर उपाय विचारला हुजुरांनीं, तर माझ्या अल्पबुद्धीला या प्रसंगीं योग्य वाटेल, तें मी सांगतों. आज रात्रींच्या रात्रीं बनगांव सोडून आपणाला कुठें तरी निघून गेलें पाहिजे. फार काय, उद्यां सकाळीं नाईकसाहेब आपले शिपाई वगैरे घेऊन इथें येऊन हजर होतील. आपण पडलां मोठे वडे लोक—आपली मानइज्जत मोठी—ते एकादा शब्द कांहीं तसाच बोलले, तर हुजुरांच्या मर्मावर बरोबर अगदीं डागच बसायचा ! माझी सल्ला ऐकायची असेल, तर श्रीमंतांनीं आज रात्रींच्या रात्रीं इथून कूच करावें. मजपाशीं थोडाबहुत हुजुरांनीं पैसा देऊन ठेवावा—ह्मणजे पुढें-पर्यंत—अगदीं हायकोर्टापर्यंत देखील वकीलाविकिलांची खटपट करायला बरें पडेल. आपण इथें बातमी द्यावी पसरून, कीं, आपण मुंबईला चाललों आहों ह्मणून—स्टेशनावर जाऊन मुंबईचें एक सेकन्डक्लास तिकीट काढावें, अन् मध्येंच कल्याणबिल्याणला उतरून करावा कुठें तरी उत्तरहिंदुस्तान-कडे पोबारा! पहिल्याच गाडीनें निघावें कल्याणला. खूब लांबचें तिकीट काढावें जबलपूर किंवा प्रयागचें ! परंतु रस्त्यांत मध्येंच कुठें तरी उतरून व्हावें पसार! मात्र तिकीट स्टेशनावर न द्यायची काळजी घ्यावी हुजु-रांनीं—ह्मणावें, 'मी इथें ब्रेकजर्नी करतों आहें.' ह्मणजे आपलें लवमात्र चिन्ह नाहीं मागें कुणाला मिळायचें ! इकडे गंगेच्या आप्तेष्टांची कांहीं

समजूतबिमजूत करून किंवा अन्य कांहीं रीतीनें स्थिरस्थावर झालें सारें कांहीं दिवसांनीं, ह्मणजे मग यावें खुशाल हुजुरांनीं. इथें जीं कांहीं हुजुरांचीं कामें असतील, तीं सारीं मी करतों—त्याबद्दल श्रीमंतांनीं अगदीं निश्चित रहावें."

रावसाहेब कांहीं वेळ विचार करीत होते. नंतर ते ह्मणाले "पण हें पहा केशवराव, ठाणवाडीच्या इनामदारांनीं आपणाला ठाणवाडींत बंदी करून ठेवलें होतें, अशीच गंगेची समजूत आहे. मग भय कसलें?"

"जी, तें खरें; परंतु सखाराम कुडव अन् आपले दादासाहेब—"

"हो, ठीक सांगितलेंत. हें तर माझ्या लक्ष्यांतून अजिबातच गेलें होतें कीं! माझी तर अक्कल अन् बुद्धि नाहींशींच होऊन गेलीं आहेत. आज तुह्मीं जसें मला सुचवलेंत, तसेंच मी करतों. आज रात्रींच निघतों इथून. आतां किती पैसे देऊन जाऊं तुह्माला?"

"खटल्याचें स्वरूप भयंकर आहे. आरोपी बडे लोक-सर्वच खर्च आधिक येणार. वकील, बॅरिस्टर नुसती सल्ला द्यायलाच अडवून बसतील. तरी तूर्त द्यावे पांचएकशें रुपये."

त्याच खोलींत इनामदारसाहेबांची लोखंडी सेफ भिंतींत बसविलेली होती. रावसाहेब उठले व सेफ उघडून त्यांतून नोटांचें एक बंडल त्यांनीं काढून आणलें. दहादहांच्या शंभर नोटा मोजून त्यांनीं त्या केशवरावजींच्या हातीं दिल्या आणि ह्मटलें "हे तूर्त हजार रुपये असूंद्यात तुमच्याजवळ. लागेल तसा पैसा खर्च करा-पण मला या संकटांतून वांचवा. केशवराव, तुह्मी माझे नोकर नाहीं-तुह्मी माझे सख्खे वडील बंधु आहां या वेळीं."

केशवराव नम्रपणें ह्मणाले "श्रीमंतांचा मी दासानुदास! हुजुरांच्या अन्नावर हा देह पोसला आहे. जीवांत जीव आहे तों मजकडून निमकहरामी व्हायची नाहीं!" असें ह्मणून केशवरावजींनीं रावसाहेबांचे दोन्ही

पाय धरले

त्या वेळीं सूर्य अस्ताला जात होता. रावसाहेबांनीं केशवरावांनां उठवून म्हटलें "मी जिथें राहीन, तिथून तुह्माला पत्र पाठवीनच. जर कांहीं अधिक पैशांची गरज लागली तुह्माला तर मला लिहां, मी त्याची लगेच व्यवस्था करीन. जर या संकटांतून मी वांचलों, तर तुमचे उपकार मी विसरणार नाहीं. तुह्माला योग्य बक्षीस मिळेल केशवराव!"

केशवराव नम्रपणें ह्मणाले "श्रीमंतांची कृपा हेंच माझें बक्षीस! तिच्यापुढें सर्व कांहीं मला तुच्छ आहे!"

नंतर केशवरावांनां निरोप देऊन रावसाहेब आपल्या प्रवासाच्या तयारीला लागले.

---

## प्रकरण चोविसावें.

## पतिपत्नी.

सातान्यापासून पांचसहा कोस अंतरावर फुलवाडी ह्मणून एक टुमदार गांव आहे. मागील एका प्रकरणांत वाचकांशीं परिचित झालेले अच्युतरावजी देशपांडे यांचे वडील रावबहादूर श्रीरामपंत ऊर्फ आबासाहेब हे या गांवचे इनामदार. आबासाहेब हे दोघां बंधूंतले धाकटे. वडील बंधु शंकररावजी उर्फ भाऊसाहेब हे इनामतीचा कारभार पहात. आबासाहेब हे हुजुर डेप्युटी कलेक्टरच्या हुद्दयावर होते. सुमारें वर्ष दीड वर्ष झालें, भाऊसाहेबांनीं अर्धांगाच्या निमित्तानें परलोकीं गमन केलें होतें. भाऊसाहेबांनां दोन मुलगे होते; पण ते अगदींच लहान. अशा स्थितींत इनामदारीचा कारभार पहाणार कोण, ही मोठी पंचाईत येऊन पडली. या कारणामुळें नोकरीचीं तीस वर्षें भरण्यापूर्वीच आबासाहेबांनां पेन्शन घेणें भाग पडलें. त्याप्रमाणें डॉक्टरचें सर्टिफिकीट हजर करून पेन्शन घेऊन आबासाहेब फुलवाडीला येऊन बसले व इनामतीचा कारभार पाहूं लागले.

आबासाहेबांनां दोन मुलगे व एक मुलगी. अच्युतराव हे त्यांचे वडील चिरंजीव. धाकट्या चिरंजीवांचें नांव मधुकर—हा सारा बारा वर्षांचा होता.

आबासाहेबांची कन्या कमला ही मधुकरापेक्षां दीडदोन वर्षांनीं वडील होती. हिच्या विवाहासाठीं आबासाहेबांना भारीच काळजी लागून राहिलं होती. कमलेचें अस्सल नांव घरांत फारसें ऐकूं येत नसे. घरची बहुतेक सारी मंडळी तिला 'ताई' याच नांवानें संबोधित असत. पण आमच्या नर्मप्रिय अच्युतरावजींनीं मात्र आपल्या भगिनीचें दुसरेंच एक नांव ठेवलें होतें. ते तिला कधीं 'कांबळी' तर कधीं 'घोंगडी' ह्मणूनहि हांक मारीत. परंतु त्यांनीं ठेवलेलें हें नांव त्यांच्या इच्छेप्रमाणें सार्वत्रिक झालें नाहीं !

आबासाहेब अगदीं तरुण असतां प्रार्थनासमाजांत जातयेत असत व समाजाची दीक्षा घ्यावयाचें त्यांचें एकदां एका प्रकारानें ठरलेंहि होतें, असें ह्मटलें असतां चालेल; परंतु 'समाजिस्ट झालास, तर तुझ्या वडिलांनीं स्वतः मिळविलेल्या बऱ्याचशा इस्टेटीला तुला मुकावें लागेल,' अशी तरुण आबाला त्याच्या कांहीं हितचिंतकांनीं जबरदस्त भीति घातली. या कारणामुळें त्यानें उघडपणें 'समाजिस्ट' व्हावयाचें धाडस केलें नाहीं. परंतु त्याची त्या पंथाकडे पूर्ण सहानुभूति मात्र होती. आबासाहेब त्या वेळीं ह्मणजे अस्सलांतील अस्सल सुधारक. घरांत मिशनरी मडम येऊन त्यांच्या पत्नीला लिहिणेंवाचणें, शिवणेंटिपणें शिकवीत असे. कांहीं वर्षें याप्रमाणें गेलीं. परंतु पुढें आबासाहेबांच्या स्वभावमतांत पूर्वींपेक्षां बराच फरक पडूं लागला. हळुहळू सनातन धर्माकडे त्यांचीं मतें ओढ घेऊं लागलीं. हल्लीं त्यांच्या कपाळावर चंदनाचा त्रिपुंड्र झळकत असे; कांदेलसूण तर त्यांनीं कधींच सोडलीं होतीं ! गीता, योगवासिष्ठ इत्यादि ग्रंथांचें नेहमीं अध्ययन सुरू असे. कमलेला त्यांनीं शाळेंत घातली नव्हती. तरी ती आईपाशीं लिहिणेंवाचणें व दादापाशीं हार्मोनियमवादन शिकत होती. तिच्या या शिक्षणाला आबासाहेबांनीं फारसें उत्तेजनहि कधीं दिलें नाहीं, किंवा त्याला हरकतहि कधीं घेतली नाहीं.

अच्युतरावांच्या पत्नीचें नांव सुशीला. सुशीलेचे आईबाप हीं अस्सल सुधारकवर्गांत मोडणारीं होतीं. ब्राह्मणज्ञातीला जरा धाडसाचेंच

समजल्या जाणाऱ्या वयापर्यंत त्यांनीं आपल्या मुलीला अविवाहित ठेविलें होतें. आणि जरी त्यांनीं तिला शाळेंत पाठविलें नव्हतें, तरी घरच्याघरीं त्यांनीं तिच्याकडून मॅट्रिक्युलेशनपर्यंत अभ्यास करवून घेतला होता. सुशीला रूपानें अगदीं रंभाउर्वशी नसली, तरी ती पांचशें बायकांत बायको होती. तिला या वेळीं अठरावें वर्ष चालू होतें.

अच्युतराव ज्या दिवशीं बनगांवाहून फुलवाडीला परत आले, त्या दिवशीं संध्याकाळीं सुशीलेनें पतीची मुद्दाम एकीकडे भेट घेऊन हंसतहंसत विचारलें "काय झालं ? इकडे जायचं होतं त्या मोहिमेचं काय झालं !"

अच्युतरावांनींहि हंसतच प्रश्न केला "व्हायचें आहे काय ?"

"आपल्या मित्रवर्यांची खबरबखर कशी काय आहे ?"

"फार उत्तम आहे राणीसाहेब !"

"लग्नाबद्दल निघाल्या होत्या का कांहीं गोष्टी ?"

"नाहीं बुवा !"

"ह्मणजे ?"

"ह्मणजे काय ? लग्नाबद्दल मीं कांहीं गोष्ट काढली नाहीं त्याच्याजवळ."

"मग इतक्या तांतडीनं परस्पर मुंबईहून जें तिकडे जायचं, तें कशाकरतां ? मित्राकडल्या नुसत्या मेजवान्याच झोडायला ?" असें ह्मणून सुशीलाबाईनीं पतीकडे पाहून मृदु हास्य केलें.

अच्युतराव हंसून ह्मणाले "नुसती तोंडाची तृप्ति जर मला साधायची असती, तर मी इथेंच आलों असतों !"

"तर मग तिकडे जायचा आपला हेतु काय होता ?"

"दुसरा कांहीं नाहीं. मनोहराचा या बाबतींत विचार तरी काय आहे, तें समजून घेण्याकरतांच मी बनगांवला गेलों होतों."

"मग लागला का कांहीं पत्ता ?"

"साधारण कळून आलें त्याचें मन काय आहे तें या बाबतींत."

"काय ?"

" लग्नाकडे त्याची प्रवृत्ति दिसत नाहीं."

" म्हणजे ? म्हणायचं तरी काय हें बाई ? मुळीं लग्नच नाहीं करायचं ? जन्मभर असेच कुंवार रहाणार ते ?"

" हो, असा एकंदर त्याच्या मनाचा कल दिसतो खरा. "

" त्यांचं म्हणणं तरी काय ?"

" तो म्हणतो, कीं, 'आपली जर आध्यात्मिक उन्नति करून घ्यायची असली माणसाला, तर संसाराच्या पाशांत राहून ती त्याला कधींहि करून घेतां यायची नाहीं.' "

" मग काय करायला हवं असं त्यांचं म्हणणं ? "

" वैराग्य अर्थात् संन्यास घ्यायला हवा!"

पतीच्या तोंडचे हे शब्द ऐकून सुशीला जणूं काय आपणाशींच बोलूं लागली " आपली जर आध्यात्मिक उन्नति करून घ्यायची असली माणसाला, तर संसाराच्या पाशांत राहून ती त्याला कधींहि करून घेतां यायची नाहीं—त्याला वैराग्य अर्थात् संन्यास घ्यायला हवा. बरं, आध्यात्मिक उन्नति म्हणजे काय ?"

अच्युतराव हंसून म्हणाले " वाः! मी तुझी डिक्शनरीबिक्शनरी आहें वाटतें ? जा, जा पहा तो शब्द कोशांत!"

सुशीला म्हणाली " 'आध्यात्मिक' या शब्दाचा अर्थ मला माहीत नाहीं, असं का वाटतं आपणाला ? त्या शब्दाचा अर्थ मला ठाऊक आहे. मला फक्त समजून घ्यायचं आहे तें हें, कीं, 'आध्यात्मिक उन्नति' हें काय प्रकरण आहे ? ज्याप्रमाणं ' शारीरिक उन्नति ' म्हटली म्हणजे त्या माणसाच्या अंगांत खूब शक्ति आहे, तो खूब कुस्ती लढूं शकतो, इत्यादि कल्पना मनांत येतात; ' मानसिक उन्नति ' म्हटली म्हणजे त्या माणसाची बुद्धि अत्यंत तीव्र आहे, पांचपांच दहादहा आंकड्यांचे मनांतल्यामनांत तो गुणाकार करूं शकतो, मोठमोठ्या गहन विषयावरचीं पुस्तकें एकदां वाचूनहि त्याला सहज समजतात, चांगलीं चांगलीं पुस्तकें तो लिहूं शकतो, अशी कल्पना मनांत उभी रहाते; ' नैतिक उन्नति ' म्हटली

'म्हणजे तो मनुष्य नेहमीं खरं बोलतो, कुणाचंहि अनिष्ट करीत नाहीं-पापी विचारांनां मनांत तिळमात्रहि जागा देत नाहीं, अशी कल्पना होते; त्याप्रमाणं मला सांगावं 'आध्यात्मिक उन्नति' म्हटली म्हणजे काय कल्पना मनासमोर उभ्या राहिल्या पाहिजेत ? "

पत्नीचा हा प्रश्न ऐकून अच्युतरावजी थोडेसे घोंटाळ्यांतच पडले. जरा डोकें खाजवून ते म्हणाले "तें काय तें नाहीं ठाऊक तुला ! आहे काय त्यांत ? आध्यात्मिक उन्नति म्हणजे-म्हणजे-काय बरें ? हो-समज आपले प्राचीन कालचे ऋषिमुनि जी आपली उन्नति करून घेत—तीच 'आध्यात्मिक उन्नति.' "

सुशीलेनें हंसून खोडसाळपणानें प्रश्न केला " नारदऋषि वीणा वाजवीतवाजवीत आकाशांतून उडत जात असत; त्याप्रमाणं मनोहरपंतांनां हार्मोनियम वाजवीतवाजवीत आपणाला आकाशांतून उडतां यावं, असं का वाटतं ? "

अच्युतराव खूब हंसून म्हणाले " नारदाला नुसतें आकाशांतून उडतां येत होतें, असें नाहीं. ईश्वराचा साक्षात्कारहि त्याला होत असे-त्याच्यासारखे ईश्वरभक्त अगदींच थोडे—"

"तर मग, लग्न केलं असतां ईश्वराची भक्ति चांगली करतां येत नाहीं, असंच कीं नाहीं मनोहरपंतांचं म्हणणं ?"

"हो असेंच. सर्वसंगपरित्याग करून, संसारापासून अगदीं दूर जाऊन जर राहिलें नाहीं, तर मनाची एकाग्रता होणार नाहीं, अर्थात् भक्तिहि तितकी लंगडीच पडणार !"

सुशीला गालांतल्यागालांत हंसून म्हणाली "हें कशासारखं आहे, आहे माहीत ?"

"कशासारखें ?"

"पुस्तक न वाचतां त्यावर टीका करण्यासारखं !"

विस्मयाकुल दृष्टीनें अच्युतरावजी पत्नीच्या प्रफुल्ल मुखकमलाकडे पाहूं लागले. नंतर ते म्हणाले "तुझें म्हणणें मला नाहीं बुवा कांहीं समजलें !"

या वेळीं सुशीला अत्यंत गंभीरपणानें ह्मणाली "परमेश्वराची भक्ति करणं याचा अर्थ असा तर नाहीं, कीं, रोज एकशें आठ वेळ, किंवा हजार वेळ किंवा लक्ष वेळ त्याच्या नांवाचा जप करायला हवा? किंवा धूपदीप जाळून त्यांत पिठाबिठाचे लाडू अन् तुपाच्या पळयाच्यापळया ओतायला हव्यात?"

अच्युतरावांनीं मान हलवून कबूल केलें "हो, तसें कांहीं नाहीं."

"परमेश्वर आपणांवर प्रेम करतो, करुणेचा वर्षाव करतो, आमचं कल्याण होईल असंच करतो; त्याच्या केवळ आशीर्वादानंच अशी त्याच्याकडून आह्मांला नेहमीं जी सर्व सुखसामग्री प्राप्त होते, त्या सर्वांबद्दल परमेश्वराविषयीं आपण कृतज्ञताबुद्धि बाळगणं, त्याची प्रत्येक कृति परम मंगलमय आहे, आपलं कल्याण करणारीच आहे, असा दृढभाव मनांत ठेवणं, याचंच नांव भक्ति ना?"

अच्युतराव पत्नीच्या मुखकमलाकडे पहात ह्मणाले "हो, भक्तीची माझी तरी कल्पना ही अशी आहे."

"तर मग असं पहा, तुह्मी जर लग्न करीत नाहीं, पत्नीचं प्रेम, मुलाबाळांचा स्नेह, ही सारी सुंदर उपहारसामग्री हातीं घेऊन दयामय परमेश्वर तुमच्याजवळ येऊन उभा राहिला आहे, अन् तुह्मी तर ती ग्रहण करीत नाहीं, तिला विमुख होऊन अरण्यांत जाऊं इच्छितां अन् तिथं जाऊन तुह्मी त्याची भक्ति करणार! ह्मणजे हें पुस्तक न वाचतां त्यावर टीका करणं किंवा सैंपाक न चाखतां त्याची प्रशंसा करणं अशासारखंच नाहीं का होत?"

पत्नीच्या तोंडचीं हीं भाषणें ऐकून अच्युतरावजींचे डोळे आनंदातिशयानें उज्ज्वल दिसूं लागले. निरतिशय संतोषानें पत्नीकडे पाहून ते ह्मणाले "वाः भारीच सुंदर उपमा तूं दिलीस ही सुशीले! मी इतकें शिकलों, माझें वाचन अजूनहि चालू आहे, या साऱ्या गोष्टींचें चिंतनहि मी करतों, पण अशा तऱ्हेचा सुंदर कोटिक्रम माझ्या डोक्यांत कधींच आला नाहीं—"

आपलें क्षणिक गांभीर्य टाकून देऊन चपलतेनें हंसून सुशीला ह्मणाली "येणार कसा ह्मणतें मी ? कितीं झालं, तरी पुरुषांचंच डोकं कीं नाहीं तें !"

अच्युतराव हंसून ह्मणाले "हो, खरें तें. मीं मनोहराशीं जेव्हां युक्तिवाद चालविला होता, त्या वेळीं ही उपमा जर मला ठाऊक असती, तर एका क्षणांत मीं त्याला निरुत्तर करून टाकलें असतें ! असो–तो येणारच आहे इकडे, तेव्हां पुनः आमचे वाद हे व्हायचेच !"

"काय ! मनोहरपंत यायचे आहेत इकडे ?"

"हो."

"कधीं ! कधीं येणार ते ?"

"तीनचार दिवसांच्या आंतच."

एक मिनिटभर सुशीला विचार करीत स्तब्ध राहिली होती. नंतर तिच्या अधरावर थोडथोडी हास्यरेषा विलसूं लागली. ती आनंदानें ह्मणाली "वाः! फार चांगलं होतं आहे."

आपल्या राणीसाहेबांची अच्युतरावजींनां चांगलीच माहिती होती. त्यांनीं हंसून विचारलें "कां ग ? काय आली आहे कल्पना तुझ्या मनांत ?"

"आली आहे–पण आतां नाहीं सांगणार जा !"

"नाहीं–सांग–सांग ना आतांच !"

"छेः–नाहींच सांगायची आतां ! मला आतां एक पुस्तक शोधून कांढलं पाहिजे."

"कसलें पुस्तक ?"

"Lamb's Tales from Shakespeare."

"एकदम त्या बिचाऱ्या शेक्स्पियरवरशी वळली आपली संक्रांत ?"

"त्यांतली एक गोष्ट मला वाचली पाहिजे नीट पुनः !"

"कोणती गोष्ट ?"

"Much Ado About Nothing." असें ह्मणून सुशीला हंसतहंसत त्वरेनें तेथून निघून गेली.

---

## प्रकरण पंचविसावें.

## मनोहरपंतांचें आगमन.

दुपारची वेळ. आबासाहेब आपल्या दिवाणखान्यांत एका झुलत्या खुर्चीवर बसले असून तीवर झोके घेतघेत एक इंग्रजी पुस्तक वाचण्यांत निमग्न होऊन गेले होते. त्यांच्या डोळ्यांवर सोन्याच्या फ्रेमीचा चष्मा होता. दिवाणखान्यांत त्या वेळीं त्यांच्याशिवाय कोणीच नव्हतें.

आबासाहेबांचें वय पन्नासांपेक्षां थोडें अधिकच होतें. त्यांचा वर्ण गोरा असून तेजःपुंज होता. त्यांच्या तरुणपणीं त्यांची सुंदर पुरुषांत गणना होत असे. अलीकडे त्यांचें अंग जरा सुटलें होतें; परंतु त्यांची प्रकृति एकंदरीनें निकोप, असें ह्मणावयाला हरकत नाहीं. मस्तकाच्या पुढील भागाला साफ टक्कल पडलें असून त्यांच्या शेंडीचे बहुतेक केश शुभ्र झाले होते. आबासाहेबांचे डोळे चांगले मोठे, आणि तेजःपुंज असून त्यांत हास्याचें पाणी खेळत असे. त्यांच्या पाणीदार दिसणाऱ्या मुखमंडलावर सहृदयतेची व सहानुभूतीची प्रफुल्लता स्पष्टपणें दृग्गोचर होत असे. त्यांच्या अंगांत या वेळीं पांढऱ्या फ्लॅनेलची बाराबंदी असून ते एक पांढरें शुभ्र धोतर नेसले होते. आबासाहेब धूम्रपानाचे मात्र अत्यंत शोकी असून त्यांच्या तलफेला चिरूटच आधिक मानवत असत. या वेळीं त्यांच्या शेजारच्या टेबलावर अर्धवट ओढलेला एक जळता चिरूट असून वाचनापुढें आबासाहेबांनां त्याचें स्मरणहि नसावेंसें दिसलें. बिचारा चिरूट आपल्या या अवहेलनेमुळेंच कीं काय कोण जाणे, रागानें आंतल्या आंत जळत होता! आबासाहेब वाचण्यांत निमग्न होऊन गेलेले असले, ह्मणजेच विशेषतः ते धूम्रपान करीत, व असा देखावा अशा वेळीं पुष्कळदां पहावयाला मिळत असे. पुस्तकांतील एकादा भाग वाचून संपला, ह्मणजे क्षणभर पुस्तक मिटून आबासाहेब मिनीटभर धूम्रपान करूं लागत. परंतु चिरुटाच्या नशीबीं पुनः लवकरच ती अवहेलना येई. एकाद्या वेळेला चिरुटाचा बराचसा भाग न ओढतांच जळून जाई, व तो [illegible] असें पाहून आबासाहेब नोकराला दुसरा चिरूट आणून द्यावयाला

हुकूम करीत. असे भारी किंमतीचे चिरूट फुकट जळून जातात, असें पाहून घरच्या नोकरांनां भारीच वाईट वाटत असे.

दिवाणखान्यासमोर विस्तीर्ण अंगण होतें. पुढील ग्यालरीच्या खालीं मधुनमधून शंभरएक गुलाबाचीं झाडें असून त्यांवर पांढरी, पिंवळीं आणि लाल रंगांचीं निरनिराळ्या जातींचीं गुलाबाचीं फुलें फुलून राहिलीं होतीं. हलुहळू चार वाजले. इतक्यांत हूं हूं हूं हूं असा मेण्याच्या भोयांचा शब्द ऐकूं येऊं लागला, व थोड्याच क्षणांनीं एक मेणा येऊन अंगणांत उभाहि राहिला.

आबासाहेबांनीं बसल्याबसल्याच बाहेर दृष्टि फेंकून पाहिलें, तों एक अपरिचित तरुण पुरुष मेण्यांतून उतरत आहे, असें त्यांच्या दृष्टीला पडलें. इतक्यांत दिवाणखान्याच्या दुसऱ्या एका बाजूनें अच्युतराव जोडे फटफट करीत त्वरेनें आले व त्यांनीं त्या तरुणाचा हात आपल्या हातीं घेऊन हास्यमुखानें त्याचें स्वागत केलें. मेण्यांतील बिछाना व चामड्याची ट्रंक एका नोकराला घेऊन यावयाला सांगून आपल्या मित्राला घेऊन अच्युतराव आपल्या वडिलांसमोर जाऊन उभे राहिले.

अच्युतरावांनीं "बाबा, हे माझे स्नेही मनोहरपंत आले आहेत," असें ह्मणून त्यांचा वडिलांशीं परिचय करून दिला. मनोहरपंतांनींहि नम्रपणें त्यांनां अभिवादन केलें.

"या मनोहरपंत! काय खुशाल ना?" असें ह्मणून आबासाहेब उठून उभे राहिले व डोळ्यांवरून चष्मा काढून त्यांनीं तो पुस्तकांत खूण ह्मणून ठेवून दिला.

"होय, खुशाल आहें. आपलीहि तब्बेत ठीक आहे ना?" असें विचारून मनोहरपंत खालीं मान घालून उभे राहिले.

"होय, बरी आहे. या, बसा असे." असें ह्मणून आबासाहेब दिवाणखान्याच्या मध्यभागीं सभोंवतीं सुंदर खुर्च्या असलेल्या संगमरवरी टेबलाकडे गेले. ते बसल्यावर मनोहरपंत व अच्युतरावहि बसले.

मनोहरपंतांकडे प्रेमानंदप्रफुल्ल दृष्टीनें पहात आबासाहेबांनीं विचारलें "घराहून कधीं निघालांत तुम्ही ?"

" तीस तारखेला–म्हणजे चतुर्दशीला निघालों मी. मध्यें सातारला राहिलों होतों.

अच्युतराव ह्मणाले "सातारला वैद्युतिक हिंदुसभेचा वार्षिकोत्सव होता, त्याचें मनोहरपंतांनां निमंत्रण होतें."

आबासाहेब कांहीं आठवल्यासारखें करून ह्मणाले " हां हां–त्या वैद्युतिक हिंदुसभेकडून मलाहि निमंत्रणपत्रिका आली होती खरी. सभेचें नांव ऐकून मी जरा बुचकळ्यांतच पडलों. मनोहरपंत, हें वैद्युतिक प्रकरण आहे तरी काय ?"

मनोहरपंत किंचित् हंसून ह्मणाले "त्या सभेचीं मतेंबितें जरा विलक्षणच आहेत. विद्युत् हीच आध्यात्मिक जगताची केवल शक्ति होय, असा त्यांचा मुख्य सिद्धान्त आहे."

विस्मयानें आबासाहेब ह्मणाले " विद्युत् ! इलेक्ट्रिसिटी ! विद्युत् ही आध्यात्मिक जगताची केवल शक्ति ?"

"होय. त्यांचें आणखी असेंहि म्हणणें आहे, कीं, मनुष्याचा आत्मा म्हणजे विद्युत्च आहे–दुसरें कांहींहि नाहीं. पूजाअर्चा, होमहवन, जपजाप्य, तपस्या इत्यादि करायचीं कां ? तर विद्युत्च्या परिमाणाची वृद्धि व्हावी ह्मणून !"

हें ऐकून आबासाहेब हंसूं लागले. क्षणभरानें त्यांनीं विचारलें "त्या सभासदांच्या डोक्यांत कांहीं गडबडसडबड नाहीं ना ? या सभेचे चालक तरी कोण आहेत ?"

मनोहरपंत म्हणाले "साताऱ्यांतली कांहीं रिकामटेंकडी तरुण मंडळी."

" ओः ! असें का आहे ? मला वाटलें होते, कीं, या भानगडी कांहीं वयस्क मंडळी करीत असतील. गद्धेपंचविशींतल्या मंडळीखेरीज असे चाळे कोण करणार ?"

अच्युतराव जरा जोरानेंच म्हणाले "असें कसें म्हणतां बाबा? कांहीं कांहीं वयस्क मंडळी अशाच कांहीं तरी वेडगळ मतांचा प्रचार करण्यांत गुंग झालेली नाहीं का? हिंदुधर्मांतील बऱ्याचशा क्रियाकांडांचें ते अशाच कांहीं तरी वैज्ञानिक तत्त्वांवर समर्थन करतात."

मनोहरपंत झणाले "या कालांत धर्माबरोबर भौतिक विज्ञानाचें घोर युद्ध सुरू आहे. अर्थात् अशा वेळीं एकाददुसऱ्या धर्मप्रचारकानें मध्यें-मध्यें धर्माची जडविज्ञानाशीं सांगड घालून देण्याचा प्रयत्न केला, तर त्यांत मोठें कांहीं नवल नाहीं."

आबासाहेब झणाले "तुझी झणतां, हें मला नाहीं बरोबर वाटत. धर्माशीं जडविज्ञानाचा कांहीं विरोध नाहीं—विरोध असणेंहि शक्य नाहीं. मी खऱ्या प्रकृत धर्माविषयीं बोलतों आहें. धर्माच्या डॉगम्यांविषयीं बोलत नाहीं."

अच्युतराव झणाले "परंतु सगळे प्रचलित धर्म तर डॉगम्यांनीं परिपूर्ण आहेत. हिंदुधर्म, महंमदीधर्म, ख्रिस्तीधर्म—"

आबासाहेब मध्येंच झणाले "हिंदुधर्म सर्वांपेक्षां या बाबतींत निष्कंटक आहे, असें मला वाटतें. जेव्हां पिथागोरास अन् कोपर्निकस यांनीं सूर्य स्थिर असून पृथ्वीच त्याच्याभोंवतीं फिरत आहे, या सिद्धान्ताचा प्रचार करण्याचा प्रयत्न केला, तेव्हां यूरोपामध्यें ख्रिश्चन राष्ट्रांत त्या वेळीं केवढा हलकल्लोळ माजून राहिला! ख्रिश्चन धर्माधिकाऱ्यांनीं तर हें मत 'entirely opposed to Holy Writ' (बायबलाच्या विरुद्ध आहे,) अशी ओरड केली. पोप पांचवा पॉल यानें तर हुकूम केला, कीं, 'in order that this opinion may not further spread, to the damage of Catholic Truth (या मताचा प्रसार होऊन त्यामुळें 'सार्वजनीन सत्या'चा विनाश होऊं नये म्हणून) यासंबंधाचीं सर्व पुस्तकें वगैरे 'suspended, forbidden and condemned' व्हावीं! परंतु दुर्ज्योतिष्यांनीं जेव्हां या तत्त्वाचें आविष्करण केलें, त्या वेळीं हिंदुधर्मानें बिलकूल हाहाकार केला नाहीं!"

अच्युतराव ह्मणाले "आपण उच्च दर्ज्याच्या हिंदुधर्माविषयीं हें बोलतां आहां. परंतु प्रचलित हिंदुधर्म–क्रियाकांडमूलक जो हिंदुधर्म–त्याला सर्व बाबतींत विज्ञानाची संमति आहे काय ? उदाहरणार्थ मूर्तिपूजाच घ्या."

कांहीं वेळ स्तब्ध राहून आबासाहेब ह्मणाले "मनुष्याच्या अंतःकरणांत जी एक भक्तिवृत्ति आहे, तिचें समाधान करण्यासाठीं त्यानें मूर्ति तयार करून जर ईश्वराचें पूजन केलें, तर त्यांत बिघडलें कुठें, हें मला समजत नाहीं !"

अच्युतराव जोरानें ह्मणाले " मूर्तीत ईश्वर आहे किंवा नाहीं, ही गोष्ट तर दूरच राहिली; परंतु खुद्द ईश्वर तरी आहे कीं नाहीं, या प्रश्नाचें उत्तर विज्ञानाला आजपर्यंत देतां आलें नाहीं. अर्थात् विज्ञानाशीं धर्माचा विरोध नाहीं, हा आपला सिद्धान्त मान्य कसा करतां येईल ? "

आबासाहेब थोडे हंसून ह्मणाले " अच्युत, हें तूं काय ह्मणतोस ? ईश्वर नाहीं, असें तर विज्ञान एका शब्दानेंहि कधीं सांगत नाहीं. 'आपणाला माहीत नाहीं,' एवढेंच काय तें विज्ञान सांगतें आहे. तूं महाभारत, रामायण, पुराणें हीं बारकाईनें शोधून पहा; सर्व ठिकाणीं असेंच त्यांत ह्मटलेलें तुला आढळून येईल, कीं, तो अचिंत्य आहे. मोठमोठ्या ऋषिमुनींनां तो ध्यानांतहि सांपडत नाहीं ! अशी स्थिति असल्यामुळेंच तर तुमच्या स्पेन्सरच्या 'Unknowable–अज्ञेया'चा उगम झाला आहे. ईश्वर आहे कीं नाहीं, याविषयींचा तर्कवाद संपूर्णपणें निष्फळ आहे. मनुष्याच्या अन्तःकरणांत ईश्वराविषयीं एक प्रबळ आकांक्षा आहे कीं नाहीं, हाच काय तो मुख्य प्रश्न आहे. या बाबतींत धर्म अन् विज्ञान या दोघांचेंहि अगदीं एकमत आहे. या आकांक्षेच्या परितृप्तीसाठीं कोणी चर्चमध्यें जाऊन उपासना करतात, कोणी मशिदींत जाऊन करतात, कोणी समाजादिकांत जातात, तर हिंदु मातीची किंवा दगडाची मूर्ति बनवून तिची पूजा करतात. ख्रिश्चन, मुसलमान किंवा समाजिस्ट हिंदु यांपैकीं कोणाला तरी निश्चयपूर्वक असें सांगतां येईल का, कीं, त्यांच्या अन्तःकरणांत ईश्वराविषयीं जी धारणा आहे, तिच्या बरहुकू-

मच ईश्वराचें स्वरूप आहे ह्मणून ? कोणीहि बुद्धिमान् माणूस असें ह्मणं शकणार नाहीं. उलट जे खरे भक्त आहेत, ते–मग ते ख्रिश्चन असोत, मुसलमान असोत, किंवा समाजिस्ट असोत–असेंच ह्मणणार, कीं, पर्वताशीं जो वालुकाकणाचा परिमाणभेद, त्यापेक्षांहि ईश्वराच्या स्वरूपाशीं त्याविषयीं जी आमच्या क्षुद्रबुद्धीची धारणा असते, तिचा अधिकच प्रभेद आहे ! आपण जिची पूजा करतों, ती केवळ मातीची मूर्ति आहे, हें का हिंदु लोकांनां समजत नाहीं ? हें त्यांनां अगदीं पूर्णपणें समजतें. परंतु अस्सल देवाचा लाभ कसा होणार ? इकडे अन्तःकरणांतील भक्तिवृत्तीच्या परितृप्तीची तर अत्यंत आवश्यकता असते. ह्मणून त्या मातीदगडाच्या मूर्तिलाच देव समजून हिंदु लोक मनाच्या या आकांक्षेचें समाधान करतात. लहानलहान मुली खेळांतला संसार मांडून बसतात; धूळ किंवा रेती बोळक्यांत घालून त्यांची भातभाजी करतात; बाहुल्यांनां मुलें कल्पून त्यांनां जेऊंखाऊं घालतात; त्या मुलींनां काय समजत नाहीं, कीं, हें घर नाहीं, हा भातहि नाहीं, हीं मुलेंहि नव्हत ह्मणून ? त्यांनां त्याची चांगली कल्पना असते. कोणीकोणी ह्मणतात, कीं, ही केवळ त्यांची अनुकरणप्रवृत्ति होय. आईबापांचा संसार पहातात, तसा त्याहि करूं लागतात. पण हें असें बिलकूल नाहीं. बीजांत ज्याप्रमाणें एक वृक्ष असतो, त्याप्रमाणेंच मुलींत एक आईहि असते. तिच्या अन्तःकरणांत संसार थाटण्याची, संतानपालनाची एक आकांक्षा असते. त्या तिच्या वयांत तिला घरसंसार कोठचा मिळणार ? मुलें कोठून मिळणार ? ह्मणून ती खेळांतलें घरकूल करून, बाहुलीला मूल कल्पून आपल्या आकांक्षेची परितृप्ति करून घेते."

मनोहरपंत ह्मणाले "एकादी पतिपरायण पत्नी ज्याप्रमाणें प्रवासांत असलेल्या आपल्या पतीचा फोटोग्राफ पाहून मनाचें सांत्वन करून घेते, त्याप्रमाणेंच थोडेंसें हें दिसतें."

अच्युतराव ह्मणाले "वा ! असें कसें ह्मणतां ? अस्सलाशीं नकलेचें कांहींतरी सादृश्य असतें. फोटोग्राफ मूळ माणसाचें स्मरण करून देतो.

परंतु मूर्तीशीं देवतेचें सादृश्य लवमात्र तरी आहे का? देवतेशीं तुलना केली असतां मूर्ति ह्मणजे कांहींसुद्धां नाहीं. मूर्तीला देवता कल्पिल्यानें देवतेचा अपमान केल्यासारखें नाहीं का होत? यानें देवता संतुष्ट होते का?"

आबासाहेब ह्मणाले "अच्छा! अच्युत, एक उदाहरण देऊन तुझ्या या प्रश्नाचें मी उत्तर देतों. अशी कल्पना कर, कीं, एक माणूस परदेशांत नोकरीकरतां गेला असून तो किती तरी वर्षांत घरीं आलेला नाहीं. जेव्हां तो परदेशीं गेला, त्या वेळीं त्याच्या मुलाचें चारपांच वर्षांचें वय होतें. हा मुलगा हळुहळू मोठा झाला. 'सर्व मुलें आपल्या बापाजवळ असतात, मी मात्र आपल्या बापाच्या सहवासाला मुकलों आहें,' अशी टोंचणी त्या मुलाच्या अन्तःकरणाला लागून राहिली होती. क्रमाक्रमानें तो ऐनतारुण्यांत आला. त्याचे मित्रसेही आपापल्या वडिलांच्या सेवा-शुश्रूषेंत निमग्न असत, हें पाहून 'मला मात्र माझ्या बापाची सेवाशुश्रूषा करतां येत नाहीं,' अशी त्याला हुरहूर लागून राहिली. त्याला चित्रकलेचें सामान्य ज्ञान होतें. आपण आपल्या वडिलांचें एक चित्र काढावें, अशी त्याला इच्छा झाली. तो केवळ पांच वर्षांचा असतां त्यानें आपल्या बापाला पाहिलें होतें—बापाच्या रूपाची केवळ एक अंधुक बाह्यरेषा त्याला स्मरत होती. त्या अंधुक स्मृतीच्या अनुसरणानें, आपल्या सामान्य चित्रकला-ज्ञानाच्या साहाय्यानें त्यानें आपल्या बापाचें एक चित्र काढलें. परंतु खऱ्या बापाशीं त्या चित्राचें बिलकूल साम्य नव्हतें, हें उघड आहे. तें चित्र पुढें ठेवून तो तरुण त्याला रोज भक्तिपूर्वक प्रणाम करी, त्याची पूजा करी. याप्रमाणें कांहीं दिवस गेले. एके दिवशीं त्या चित्राची तो पूजा करीत असतां एकाएकीं त्याचा बाप तेथें येऊन त्याची ही पूजा पाहूं लागला. अच्युत! आतां तूंच सांग, तो बाप त्या वेळीं काय करील? पायांतला जोडा काढून 'पाजी बेटा, अशा प्रकारचें माझें कांहीं तरी चित्र काढून माझा अपमान करतोस काय?' असें ह्मणून त्याला तडाके लगावील, कीं, आनंदातिशयानें त्याचें अन्तःकरण भरून येऊन तो मुलाला आपल्या हृदयाशीं घट्ट आंवळून धरील?"

आबासाहेबांनीं दिलेलें हें उत्तर ऐकून अच्युतराव व मनोहरपंत दोघेहि निरुत्तर होऊन गेले. त्यांच्या उदाहरणाच्या सुंदरपणानें तर मनोहरपंतांचें हृदय अगदीं काबीजच करून टाकलें.

ते दोघे तरुण निरुत्तर झालेले पाहून आबासाहेब ह्मणाले "अच्युत, हे वाटेच्या श्रमानें अगदीं थकून गेले असतील, यांनां घेऊन जा आंत. जा मनोहरपंत, हातपायतोंड धुऊन, देवमंदिरांतल्या कृष्णराधेच्या मूर्तीला नमस्कार करून थोडा फराळ करा—चला."

मनोहरपंतांनां घेऊन अच्युतराव आंत जावयाला निघाले. जातांजातां मनोहरपंत ह्मणाले "मूर्तिपूजेच्या बाजूनें पुष्कळ कोटिक्रम मीं ऐकले आहेत; परंतु तुमच्या वडिलांनीं गोष्टीच्या रूपानें जी कोटि लढवली, ती तर अत्यंत सुंदर होती, यांत तिळप्राय संशय नाहीं."

अच्युतराव हंसून ह्मणाले "बाबांनां इतक्या कांहीं गोष्टी ठाऊक आहेत, कीं, त्यांनां मितीच नाहीं! आम्हीं त्यांनां '**कथासरित्सागर**' अशी पदवी दिली आहे—पण अर्थात्च ती कांहीं त्यांनां ठाऊक नाहीं!"

---

## प्रकरण सत्विसावें.

## कमला.

दिवाणखान्याच्या मागच्या भागांतील एक उत्कृष्ट रीतीनें शृंगारलेली खोली मनोहरपंतांच्या दिमतीला देण्यांत आली होती. या खोलीशेजारीं स्नानगृह वगैरे सोईहि होत्या. पहिल्यानें अच्युतरावांनीं या खोलींत मनोहरपंतांनां नेलें. तेथील सर्व व्यवस्था त्यांनां दाखवून "येतों हं आतां मी," असें सांगून ते तेथून निघून गेले.

कांहीं वेळानें अच्युतराव फिरून तेथें येऊन पहातात, तों मनोहरपंत थंड पाण्यानें स्नान करून वस्त्रपरिवर्तन करून तयार होऊन बसले आहेत, असें त्यांनां आढळून आलें. कपाटांतलें एक पुस्तक काढून, खिडकीजवळ खुर्ची ओढून घेऊन मनोहरपंत तें वाचीत बसले होते.

अच्युतरावांनीं विचारलें "काय चाललें आहे?"

"पहातों आहें पानें उलटून थोडीं या पुस्तकाचीं."

"कसलें पुस्तक?"

"'हक्स्लेची निबंधमाला.'"

"हां हां-मनोहरपंत, तें पुस्तक वाचूं नका-वाचूं नका—"

"कां बुवा?"

"अहो, त्याच्या वाचनानें नास्तिक बनाल ना तुह्मी?"

पुस्तक मिटून मनोहरपंत हंसून ह्मणाले "ती भीति नको तुह्माला अच्युतराव! माझी आस्तिकता इतकी कांहीं क्षणभंगुर नाहीं!"

अच्युतराव ह्मणाले "स्नान देखील झालें वाटतें! अन् थंड पाण्यानेंच?"

"हो-गार पाण्याच्या स्नानानें बरें वाटेल ह्मणून केलें झालें."

"बरें तर जरा आंत जाऊं या-देवाला अन् आईला नमस्कार करून या."

मनोहरपंत उठून अच्युतरावांच्या मागोमाग आंत जाऊं लागले. वाड्याचा मागचा भागहि चांगला मजबूत आणि सुंदर होता. आंतल्या मोठ्या दालनाच्या पायऱ्यांवर बसून एक सात वर्षांचा मुलगा केळ्यांचा सप्पा उडवीत होता. नोकर व मोलकरणी आपापलीं कामें करीत होतीं.

त्या मुलाला अच्युतरावांनीं विचारलें "अरे, आई कुठें आहे रे?"

पाहुण्यांकडे संदिग्धभावानें दृष्टि लावून मुलगा म्हणाला "वर—"

तेव्हां मनोहरपंतांनां बरोबर घेऊन अच्युतराव देवमंदिरांत गेले. देवमंदिरांत शांति व पवित्रपणा यांचें मूर्तिमान वास्तव्य दृग्गोचर होत होतें. खोलीच्या मध्यभागीं एका मोठ्या रुप्याच्या देव्हाऱ्यांत कृष्णराधेच्या सुंदर रौप्यमूर्ति होत्या. मनोहरपंत मूर्तीच्या अगदीं जवळ गेले व त्यांच्याकडे अर्धमिनिट स्थिर दृष्टीनें पाहून त्यांनीं त्यांनां सांष्टांग प्रणिपात केला.

नंतर शेजारच्या एका खोलींत मनोहरपंतांनां बसवून अच्युतराव आपल्या [illegible] [illegible] गेले. खोलींतील सामानसमान सारें इंग्रजी थाटाचें

असून तेथील सारी व्यवस्थाच पाश्चात्य पद्धतीची दिसली. खोलीच्या मध्यभागीं एक गोल टेबल असून त्याच्यासभोंवतीं तीनचार सुंदर गादीच्या खुर्च्या होत्या. खोलीच्या चारहि भिंतींना लागून चार मखमालीचीं बहुमूल्य कोचें होतीं. टेबलावर एक मध्यमाकृति पंखा लावला असून तो या वेळीं झुलत होता. एका कोचावर बसून मनोहरपंत अच्युतरावांची वाट पाहूं लागले.

कांहीं वेळानें मातेला बरोबर घेऊन अच्युतराव तेथें आले. आबासाहेबांच्या पोषाकावरून त्यांच्या अर्धांगीचा पोषाक जुन्या तऱ्हेचा असेल, अशी मनोहरपंतांची कल्पना झाली होती, ती चुकीची ठरली. अच्युतरावांच्या मातेचा पोषाक सुधारकी थाटाचा होता—पायांत बूटस्टॉकिंग नव्हते, इतकेंच काय तें.

मनोहरपंतांकडे बोट दाखवून अच्युतराव ह्मणाले " आई, हे माझे कॉलेजांतील मित्र मनोहरपंत."

मनोहरपंतांनीं उठून माईसाहेबांना—अच्युतरावांच्या मातेला माईसाहेब ह्मणत असत—नमस्कार केला. माईसाहेब ह्मणाल्या " तुह्मी आलां त्यानं मला किती आनंद झाला आहे सांगूं! उठा-शतायुषी व्हा, संसाराचीं सारीं सुखं पूर्णपणं भोगा—"

अच्युतराव हंसून ह्मणाले " छे आई, तें होणें शक्यच नाहीं मुळीं! आमचे मनोहरपंत आहेत भावी संन्यासी!"

माईसाहेब जरा रागानेंच ह्मणाल्या "चल, चावट कुठला! कांहीं तरी बोलावं झालं. संन्यासी कां ह्मणून? संन्यास घ्यायचं का वय आहे हें यांचं?"

अच्युतराव हंसून ह्मणाले "आमचे मनोहरपंत आहेत आपले तरुण संन्यासी!"

मातापुत्रांत असें विनोदपर संभाषण चाललें आहे, तों चौदापंधरा वर्षांची एक बालिका येऊन माईसाहेबांपाशीं उभी राहिली.

बालिकेचा पोषाकहि तिच्या आईच्याप्रमाणेंच अस्सल सुधारकी थाटाचा होता. ती अत्यंत सुंदर असून तिची मुखश्री अवर्णनीय होती. लडिवाळपणा, प्रेमळता व सारल्य यांची ती प्रत्यक्ष मूर्तिच दिसत होती. तिचा वर्ण अत्यंत उज्ज्वल व लिंबासारखा होता. तिच्या केसांची वेणीहि घातली नव्हती, किंवा बुचडाहि बांधलेला नव्हता. ते तिच्या पाठीवर मोकळेच रुळत होते. या वयाच्या इंग्रज कुमारिकांचेहि असेच मोकळे केस असतात. तिच्या विस्तीर्ण ललाटावरील कुंकवाच्या एका मध्यमशा टिकलीचें अस्तित्व व पायांत बूटमोजांचा अभाव हींच काय तीं तिच्यामध्यें जुन्या हिंदुत्वाचीं लक्षणें होतीं.

अच्युतरावांनीं बालिकेला विचारलें "हे कोण तें आहे ठाऊक तुला?"

बालिकेनें कांहीं न बोलतां नकारार्थी मान हालविली.

"माझे स्नेही मनोहरपंत देशमुख. आह्मी दोघे मुंबईला एका वर्गांत होतों."

हा परिचय होतांच बालिकेनें मनोहरपंतांनां चटकन् नमस्कार केला. मनोहरपंतांकडे वळून अच्युतराव ह्मणाले "ही माझी बहीण 'घोंगडी'!"

एक वेळ रागानें दादाकडे व एक वेळ आईकडे पाहून बालिका ह्मणाली "दादा, माझ्या नांवाची उगीच भलतीनूसलती अशी थट्टा करूं नको–"

"कां ? तुझें नांव 'घोंगडी' नाहीं ?"

"नाहीं."

"तर मग काय–'कांबळी' ?

बालिकेनें जोरानें मान हलवून ह्मटलें "नाहीं—"

"तर मग काय घाबळी ?"

भृकुटिभंग करून बालिका चिडून ह्मणाली "काय रे हें दादा ? आई, बघ ग—"

मुलीच्या केसांवरून प्रेमभरानें हात फिरवून ते नीट करीत माईसाहेब ह्मणाल्या "अग, तो ह्मणतो, तें का खरं ताई ? अन् घोंगडी, कांबळी ह्मटल्यानं जर पोरीला राग येतो, तर तूं तरी तिला तसं ह्मणून कां रे

चिडवतोस अच्युत? जेव्हां ही लहान होती, तेव्हां कमल, कांबळी, घोंगडी कांहीं ह्मटलंस हिला तरी चालण्यासारखं होतं. लहानपणीं नांव ठेवलं, तें का थोरपणीं दिखील चालवावं?" असें ह्मणून कमलेला घेऊन माईसाहेब शेजारच्या कोचावर बसल्या. मनोहरपंत व अच्युतराव टेबलाजवळ खुर्च्यांवर बसले.

अच्युतराव हंसत ह्मणाले "ओहोहोहो! आतां आमच्या ताईसाहेब केवढ्या थोरल्या आजीबाई झाल्या पण! मोठ्या विदुषीहि झाल्या हो! अगदीं चाळशी आली का? चष्मा विकत घेऊन द्यायला हवाच ना?"

माईसाहेबांचा एक हात आपल्या दोन्ही हातांत घेऊन कमला लडिवाळपणें ह्मणाली "दादा आपला मला नेहमीं विचारतो, चष्मा विकत घेऊन देऊं का ह्मणून! चष्मा द्यायला अगदीं एका पायावर तयार झाला आहे नेहमीं. पण भाऊबिजेला एक वस्तु विकत आणून मला ओंवाळणी घाल ह्मणून याच्या पाठीं किती दिवस लागलें होतें, तेवढ्याचं मात्र नांव दिखील नाहीं!"

माईसाहेबांनीं हंसून विचारलें "कसली लावली आहेस त्याच्यामागं भुणभुण?"

"दादालाच विचारीनास?"

अच्युतराव गंभीरतेनें ह्मणाले "एक पांढरें पातळ अन् गोपीचंदन-"

कमला म्हणाली "हात्तिच्या-विसरलास इतक्यांत?"

"रुद्राक्षांची माळा अन् स्मरणी-"

कमला लडिवाळपणें म्हणाली "तुला चांगली आहे आठवण. मला असं कांहीं तरी बोलून राग आणायला बघतो आहेस-नाहीं आई, इश्श, हें सारं मी कशाला मागेन?"

माईसाहेब म्हणाल्या "तर मग सांगेनास तूंच काय तें?"

कमलेनें माईसाहेबांच्या कानांत सांगितलें "ग्रॅमोफोन!"

किंचित् हंसून माईसाहेब ह्मणल्या "ग्रॅमोफोन? नकोग बाई! कांहीं नको आपल्याला तो! कान किटवायचा धंदा! आह्मी जेव्हां मुंबईला

होतों, तेव्हां आमच्या शेजारीं एक होता श्रीमंत गुजराती गृहस्थ. त्याच्या मुलानं एक दिवशीं एक ग्रॅमोफोन आणलान् विकत, अन् झालं बाई–त्या दिवसापासून त्यानं जो त्याचा सपाटा सुरू केलान् आहे–तो रात्र नाहीं दिवस नाहीं–सारखा आपला वाजवीत होता. इतकीं चांगलीं चांगलीं गवयांचीं, कलावंतिणींचीं मंजुळ गाणीं आहेत ना फोनोग्राफांत, पण त्या बेट्यानं जीं शोधून आणलीं, तीं हीं आपलीं भसाड्या गळयाचीं अन् धाबडधिंगयाचीं गाणीं! अन् तींच तीं, तींच तीं गाणीं तो रात्रीं, दुपारीं, सकाळपहांटे सारखा बडवीत बसे. कुणीं घरीं यायचा अवकाश, कीं, झालीं याचीं तीं भसाडीं गाणीं सुरू! आमचं शेजाऱ्यांचं सुदैव म्हणून एक दिवस त्याचं तें यंत्र मोडलं; नाहीं तर आम्हांला दुसरीकडे जागा पहावी लागणार होती! ताई, त्या वेळीं तूं कांहीं लहान नव्हतीस–चांगली दहा वर्षांची होतीस–नाहीं का आठवत तुला हें?"

"हो, न आठवायला ग काय झालं? तें तर एक गाणं मला चांगलं आठवतं आहे–'**रंग भंगका लोटा!**' अन् खो खो खो खो हंशा! ग्रॅमोफोनमधें किती चांगलींचांगलीं गाणीं आहेत–सगळींच कांहीं अशीं धांगडधिंगयाचीं नाहींत."

"असूं देत–ग्रॅमोफोनचीं तीं चांगलीं गाणीं ग्रॅमोफोनमधेंच असूं देत. आमच्या घरांत कुणालाच ती कटकट सहन व्हायची नाहीं. आमचं कीं नाहीं, आतां झालं आहे म्हातारपण–संसार सोडून आम्ही जेव्हां काशीला जाऊन राहूं, तेव्हां तूं, तुझी वहिनी, मधु अन् हा तुझा दादा ग्रॅमोफोन वाजवा, ढोल वाजवा, बँड वाजवा—"

मातेच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच कमलेच्या डोळयांत चटकन् अश्रु उभे राहिले. "बरं–नाहीं देत तर नको देऊं—" असें म्हणून ती तेथून रागानें निघून गेली.

माईसाहेब स्मितपूर्वक म्हणाल्या "पाहिला कसा राग अगदीं पोरीच्या नाकावर आहे तो! आज नाहीं तर उद्यां लगीन होईल, आतां सासरीं नांदायचे दिवस हिचे, तरी अजून समज कशी ती नाहींच! हो बाई,

मनोहरपंत, तुह्मी आलां आहांत लांबून--तुह्माला लागली असेल चरचरून भूक ! मी जातें अन् सारी तयारी झाल्यावर बोलावणं धाडतें हं तुह्माला."

अच्युतराव ह्मणाले "आई, मी घरींच बसून आहें, ह्मणून मला भूकबीक कांहीं लागली नाहीं, असा तुझा समज झालेला दिसतो; पण तुह्मी ती साफ चूक आहे !"

माईसाहेब हंसून ह्मणाल्या "बरं झालं बाबा, माझी चूक वेळेवरच सुधारलीस ती ! नाहीं तर मला वाटतं, तुला आज कांहीं खायला मिळतं ना !" असें हंसतहंसत ह्मणून माईसाहेब तेथून निघून गेल्या.

---

## प्रकरण सत्ताविसावें.

## कथासरित्सागर.

थोडा फराळ वगैरे झाल्यावर मनोहरपंतांनां बरोबर घेऊन अच्युतराव बागेंत हिंडावयाला गेले. अंधार पडावयाच्यापूर्वी मनोहरपंत ह्मणाले "चला अच्युतराव, घरीं जॉऊं--संध्येची वेळ झाली माझ्या."

दोघेजण घरीं यावयाला निघाले. रस्त्यांत मनोहरपंत ह्मणाले "अच्यतराव, विचारूं का एक प्रश्न तुह्माला ? राग तर नाहीं येणार ?'

अच्युतराव हंसून ह्मणाले "खुशाल विचारा—"

"तुम्ही संध्या कां नाहीं करीत ?"

"अच्युतराव हंसून म्हणाले "मुंजीनंतर सरासरी एक वर्षपर्यंत केली मीं संध्याबिंध्या. तूर्त तिचा आमच्या उपाध्याला मक्ता देऊन टाकला आहे ! पुढें केंस पिकले, दांत पडले, म्हणजे पुनः करणार आहें त्या लटपटीला आरंभ !"

"तुमचे वडील तुम्हाला यासंबंधानें कांहीं बोलत नाहींत, अच्युतराव?"

"छे: ! कुणाच्या मताबितांत बाबा कधींहि ढवळाढवळ नाहीं करीत. ते म्हणतात, कीं, ज्याला जेव्हां भूक लागेल, तेव्हां तो आपल्याआपणच खाईल !"

"भूक म्हणजे आध्यात्मिक क्षुधा, होय ना ?"

"अर्थात्!"

मनोहरपंत स्मितपूर्वक ह्मणाले "अच्युतराव, तुमचे वडील इतके निष्ठावंत धार्मिक अन् तुम्ही त्यांचे चिरंजीव असे काळे फत्तर कसे?"

"छे-अगदींच पक्का काळा फत्तर नाहीं मी तसा मनोहरपंत! जेव्हां मी घरीं असतों, तेव्हां रोज संध्याकाळीं बाबा सायंसंध्या आटोपून देवाची पूजा करतात, त्या वेळीं मला देवमंदिरांत हजर असावें लागतें. मलाच काय, पण घरांतील सर्व मंडळीला-अगदीं चाकरानोकरांपर्यंत सर्वांनां तेथें हजर असावें लागतें. पूजेनंतर आरती, मंत्रपुष्प स्तोत्र वगैरे भानगडी बऱ्याच असतात, अन् त्यांनां वेळहि बराच लागतो. आज आरतीच्या वेळीं बाबा तुम्हालाहि बोलावणें पाठविल्याशिवाय रहायचे नाहींत."

मनोहरपंत ह्मणाले "वः-मी अवश्य जाईन! मला त्यांत आनंदच आहे. पण घरांतली सर्व मंडळी तिथें जमायची ह्मणतां, तेव्हां बायकामंडळीहि तिथें येणारच-तेव्हां माझ्यासारख्या परक्या पुरुषानें तिथें कसें यावें?"

"अंः, बाबा जरी जुन्या तऱ्हेचे असले, तरी परकी पुरुषांसमोर बायकांनीं येऊं नये, इतक्या मजलेवर त्यांचा जुनेपणा गेलेला नाहीं! आतां हें खरें, कीं, बायकांनीं घोड्यावर किंवा बायसिकलवर बसून हिंडायला जावें, बॉलमध्यें नाचावें, किंवा परकी पुरुषांसमोर फिदीफिदी हंसावें, खिदळावें हें त्यांनां बिलकूल पसंत पडत नाहीं. आमच्याकडे जुन्यानव्याचें बरेंच मिश्रण तुह्माला आढळून येईल. विशेष घरोब्याच्या पुरुषमंडळीच्या समाजांत बसून गप्पागोष्टी करायलाहि बाबांकडून आमच्या घरच्या बायकांनां मोकळीक आहे. यांत त्यांनां कसलाहि किंतु वाटत नाहीं."

मनोहरपंत ह्मणाले "तें ठीकच आहे ह्मणा; पण माझ्या स्वभावाला अनुसरून परकी बायकामंडळींत जायला मला जरा हें वाटतें—"

बोलतांबोलतां ते दोघे मित्र घरीं येऊन पोहोंचले. आपली सायंसंध्या उरकल्यावर मनोहरपंत खोलींत येऊन बसले. अच्युतराव पुनः येऊन

त्यांच्याशीं गोष्टी बोलूं लागले. सुमारें अर्धाएक तास याप्रमाणें लोटतो आहे, तों आबासाहेबांकडून त्या दोघांनां बोलावणें आलें.

मनोहरपंत देवघरांत जाऊन पहातात, तों आबासाहेब पीतांबर नेसून देव्हाऱ्यासमोर चौरंगावर कुशासन घालून बसले आहेत. पूजा अगोदरच आटोपली होती. आबासाहेबांच्या दोन्ही बाजूंनां दोन धाबळ्या पसरलेल्या होत्या. एकीवर घरांतील बायकामंडळी बसली असून दुसरी पुरुषांसाठीं होती. अच्युतराव व मनोहरपंत जाऊन दुसऱ्या धाबळीवर बसले. दाराशीं घरची स्त्रीपुरुष नोकरमंडळी बसली होती.

पहिल्यानें आबासाहेबांनीं हात जोडून श्रीकृष्णाचें स्तोत्रपाठ गावयाला आरंभ केला. गंभीर कंठानें सुललित संस्कृत श्लोक भक्तिगद्गद चित्तानें ते ह्मणत असतां देवमंदिराचें स्वरूप अत्यंत शांत व गंभीर दिसत होतें. याप्रमाणें कांहीं वेळ स्तोत्रपठन झाल्यावर आबासाहेबांनीं देवाला साष्टांग नमस्कार घातला. तेथें जमलेल्या प्रत्येक स्त्रीपुरुषानें या वेळीं देवाला बसल्याबसल्याच नमस्कार केला. नंतर एका हातांत पंचारती व दुसऱ्या हातांत घंटा घेऊन आबासाहेब आरतीला उभे राहिले. त्याबरोबर सर्व स्त्रीपुरुष मंडळीहि उभी राहिली. गंभीर सुस्वर कंठानें ते हळूहळू आरती ह्मणूं लागले–दोन मुलें झांजा हातीं घेऊन त्यांनां ताळाची साथ करीत होतीं. तीनचार आरत्या ह्मटल्यावर आबासाहेबांनीं देवें ह्मणावयाला सुरुवात केली. त्यानंतर मंत्रपुष्प होऊन सर्वांनीं देवावर पुष्पांजलि वाहिली. मंत्रपुष्प आटोपतांच आबासाहेबांनीं देवाला पुनः साष्टांग नमस्कार घातला. इतर पुरुषमंडळींनीं साष्टांग व बायकांनीं नुसता हातांचा नमस्कार केला. शेवटीं, गंगाजलाच्या झारींत दर्भांचीं अग्रें बुडवून आबासाहेबांनीं सर्वांच्या मस्तकावर जलसिंचन करून '**ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः**' असा उच्चार करून ते खालीं बसले.

नंतर सर्व मंडळी आपापल्या कामाला निघून गेली. मनोहरपंतांचा हात आपल्या हातीं घेऊन आबासाहेब बाहेर आले व पूर्वी वर्णन केलेल्या खोलींत दोघेहि आल्यावर ह्मणाले " जरा बसा हां•इथें मनोहरपंत!

मी ओंवळें नेसून येतों. आतां मला थोडा चहा घेतला पाहिजे. " असें ह्मणून आबासाहेब तेथून निघून गेले.

इतक्यांत अच्युतरावहि तेथें आले आणि मनोहरपंतांशेजारीं बसले. ते ह्मणाले " या वेळीं बाबा इथेंच बसतात–बैठकखान्यांत नाहीं जात. पेन्शन घेऊन बाबा जेव्हां इथें पहिल्यानें आले, तेव्हां संध्या वगैरे आटोपून ते बाहेर दिवाणखान्यांत जाऊन बसत; परंतु गांवची शिष्ट मंडळी गांवकुटाळक्या नाहीं तर सोंगट्या गंजिफा यांतच त्यांचा वेळ घेऊं लागली. त्या वेळीं तिथें या रिकामटेकड्यांचा एक मोठा अड्डाच पडूं लागला. तेव्हां बाबा मुळीं संध्येनंतर बाहेरच येईनातसे झाले. याच खोलींत बसून ते चहा घेतात. आह्मी सारी मंडळी इथें येऊन त्यांच्याशीं आनंदानें दोन गप्पागोष्टी करतों. नंतर रामायण किंवा महाभारताचें थोडें वाचन होतें. एकाद दिवशीं आई वाचते, एकाद दिवशीं आमच्या राणीसाहेब वाचतात, एकाद दिवशीं कमलाहि वाचते. जेवण तयार झाल्याची वर्दी येईपर्यंत हें असेंच चालतें."

इतक्यांत एक नोकर गुडाखूची तयार केलेली गुडगुडी तेथें घेऊन आला व टेबलाजवळच्या एका गोल स्टुलावर ठेवून निघून गेला. अच्युतराव ह्मणाले "बाबा या वेळीं चिरूट नाहींओढीत, गुडाखू ओढतात."

थोड्याच वेळानें आबासाहेब तेथें आले व खुर्चीवर बसून गुडाखुचा नेचा तोंडांत घालून ह्मणाले "मनोहरपंत, तुह्मी केव्हांकेव्हां चहा घेतां? कोणीकोणी संध्याकाळीं चहा घेतात; मी बराबर याच वेळीं चहा घेतों."

मनोहरपंत ह्मणाले "मी मुळींच चहा नाहीं घेत आबासाहेब!"

आबासाहेबांनीं आश्चर्यानें विचारलें "काय! तुह्मी मुळींच नाहीं चहा घेत? ह्मणतां तरी काय!"

"नाहीं घेत."

"काय! अगदीं कधींहि नाहीं घेत?"

"अगदीं तसेंच नाहीं केवळ ह्मणतां यायचें! कधीं एकाद वेळेला घेतों. कांहीं तरी तापबीप किंवा असलेंच दुखणें येतें असें वाटलें, तर घेतों.



"शेवटीं माझ्या मित्राला देखील मटकावून टाकलास ? हे पहा तुझे ओंठ लाललाल दिसताहेत—रक्तंच तें!" ( पृष्ठ ३०७.)

ण तेंसुद्धां अगदींच नाइलाज झाला म्हणजे ! साऱ्या जन्मांत पांच किंवा
हा वेळ मीं चहा घेतला असेल—"

"अस्सें ! वाः–फार उत्तम–फारच उत्तम ! चहाची सवय तुम्हीं ठेवली
ाहीं, हें फारच चांगलें केलें. आमचा तर हा चहाचा रोग इतका बळावला
ाहे, कीं, वेळेवर जर आम्हाला चहा नाहीं मिळाला, तर अगदीं
ुचेनासें होतें—माथें फिरूं लागतें ! ही केवळ माझीच स्थिति झाली आहे,
असें नाहीं; तर आमच्या कुटुंबाची, मुनालेकींची देखील हीच स्थिति
ाहे. आमच्या घरच्या चाकरांनोकरांपर्यंत साऱ्यांनां हा चहाचा रोग
डला आहे पहा ! "

इतक्यांत, एका थाळींत चहाचे तीन पेले घेऊन कमला तेथें आली
आणि तिनें ती आबासाहेबांजवळच्या टेबलावर ठेवली. आबासाहेब
नोहरपंतांकडे वळून म्हणाले "मनोहरपंत, माझी ही जी मुलगी तुमच्या-
मोर उभी आहे, तिच्याशीं आतांपर्यंत तुमची बोलाचाली झाली
ाहे कीं नाहीं, हें मला ठाऊक नाहीं. हिचें नांव कमला; परंतु हिला
आम्ही सारींजणें 'ताई' असेंच म्हणतों. ही चहा तर सर्वोत्कृष्ट तयार
करते पहा. हिच्याशिवाय आणखी कुणाच्याच हातचा चहा मला मुळीं
सतच पडत नाहीं, म्हणाना ! किती कपांनां किती चहा घालायचा,
ाखर किती घालायची, चहा किती वेळ गाळायचा नाहीं, त्याला दूध
किती घालायचें, त्याचें या पोरीनें एक स्वतंत्र शास्त्रच बनविलें आहे !
अन् या शास्त्रांत, हिच्याइतकी कुणाचीच गति नाहीं ! ताई, तीन पेले ग
कशाला चहा घेऊन आलीस ? मनोहरपंत तर चहा घेत नाहींत !"

मनोहरपंतांकडे वळून कमला म्हणाली "काय! आपण चहा नाहीं घेत?"

कमलेच्या कंठस्वरावरून ' कलियुगांत चहा घेत नाहीं, असा माणूस
प्रदर्शनांत पाठवावयालाच योग्य आहे !' असाच तिच्या मनांतील भाव
ध्वनित होत होता !

मनोहरपंत म्हणाले "नाहीं–मी चहा घेत नाहीं."

चहाच्या पेल्यांत चमच्यानें ढवळतांढवळतां आबासाहेब ह्मणाले "पहा पोरी, नीट बघून ठेव हें, अन् तूंहि घे धडा कांहीं तरी याच्यावरून ! सगळ्या जन्मांत यांनीं सारा पांचसहा वेळ चहा घेतला आहे, अन् तो देखील तापाबिपांत ! अन् तुह्मी अलीकडच्या पोरी—आईचें दूध सुटतें न सुटतें तों चहा प्यायला करतां आरंभ ! ताई, तुझ्या वयाचा जेव्हां मी होतों, त्या वेळीं चहा हा पदार्थ आह्मांला औषध ह्मणूनच माहीत होता. पण आतां आपलें मी तुमच्या बाबतींत पहातों, तों तुह्मांला भात नसला तरी चालेल, पण चहा हा आपला तीनचार वेळ हवाच ढोंसायला !" असें ह्मणून आबासाहेबांनीं पेला तोंडाला लावला व चहाचा एक घोंट घेऊन डोळे मिटून ते उद्गारले "आः !"

थाळींतला दुसरा पेला उचलून कमलेनें तो आपल्या बंधुराजांच्या हातीं दिला व उरलेल्या पेल्याकडे व मनोहरपंतांकडे पाहून ती ह्मणाली "आतां याचं काय करायचं बाबा ?"

त्या पेल्याकडे लुब्धपणें पाहून आबासाहेब ह्मणाले "अरे हो–हा एक आणखी पेला आहे नव्हे ? हा फुकट जाणार ह्मणतेस ताई ? त्यापेक्षां मींच तो घेऊन टाकला ह्मणून काय हरकत आहे ? असूं दे, असूं दे तो !"

कमला वडिलांकडे पाहून गालांतल्यागालांत हंसली व पेला टेबलावर ठेवून ती रिकामी थाळी घेऊन आंत गेली.

आपला पहिला पेला पुरा पिऊन, दुसरा हातीं घेऊन आबासाहेब स्मितपूर्वक ह्मणाले "नशा—चहाची झाली तरी एक प्रकारची नशाच आहे, नाहीं तर काय ? दारूबिरूचा धाकटा भाऊच हा चहा ! माणसानें तो जितका अगदीं कमी घेतां येईल, तितका घेतला पाहिजे. एकएकजण कितो ह्मणजे चहा पितात दररोज ! तीन कप–चार कप–पांचपांच सहासहा कप–चाललें आहे आपलें ! मी बुवा आपला सकाळीं एक कप अन् या वेळीं एक कप घेतों. अगदीं शिकस्तच झाली, तर एकाच्या ठिकाणीं एकाद वेळीं दोन पेलेहि होतात, इतकेंच. त्या दिवशीं कुठल्याशा एका मासिक पुस्तकांत वाचलें मीं—

**: संसारिं निःसार कुणि ना कुणाचा !**
**धन चपलपद मान तैसाचि साचा !**
**वांछीं न यश, तेविं धन मी, जरी तो**
**मिळतो प्रभातींच प्याला चहाचा !**

कविता आहे चांगली–पण मला वाटतें, कवीची यांत थोडीशी चूक झाली आहे."

मनोहरपंतांनीं किंचित् हंसून विचारलें "काय ती ?"

"'प्रभातीं'या शब्दाऐवजीं 'सकाळीं अन् संध्याकाळीं' अशा अर्थाचे शब्द पाहिजे होते घालायला या कवितेंत ! कवितेच्या मात्रांबित्रांच्या गानगडींत कवीला कांहीं तींत सकाळसंध्याकाळचा चहा घालतां आला नाहीं ! तरी पण जी मंडळी—"

या वेळीं आबासाहेबांनीं दाराकडे पाहून बायकांपैकीं कोणी येत नाहीं, अशी आपली खात्री करून घेतली व नंतर स्वर खालवून ते पुढें बोलूं लागले " तरी जी मंडळी संध्याकाळीं चहापेक्षांहि तीव्र अशा एकाद्या पेयाचें पान करतात, त्यांनां संध्याकाळीं चहा न मिळाला तरीहि चालतें. '**वांछीं न यश, तेंवि धन मी**' असें म्हणतो कवि ! अहाहा–अगदीं बरोबर–अगदीं बरोबर ! चहापुढें पैशाची अन् कीर्तिबीर्तीची काय परवा आहे ! अहा, यालाच म्हणतात कवीची अन्तर्दृष्टि ! एक छान गोष्ट आठवली आहे मला या वेळीं–सांगतों ऐका—" असें म्हणून आबासाहेबांनीं आपला प्याला रिकामा केला व रुमालानें तोंड पुसून हुक्क्याची नळी तोंडाला लाविली.

इतक्यांत कमलेनें तेथें येऊन विचारलें "बाबा, आईनं विचारलं आहे, आणखी एकादा कप चहा हवा का ?"

आबासाहेब हंसून म्हणाले " आणखी एक पेला चहा ? कशाला तो ? आतांच दोन पेले चहा उडवला ना पोरी ! फार चहा पिणें बरें नाहीं ग ! , काय म्हणत होतों मी ? ती गोष्ट सांगतों—ऐका."

गोष्टीचें नांव ऐकतांच कमला दाराजवळच्या एका कोनावर बसली.

हुक्क्याच्या नळींतून चारपांच वेळ फुरुक् फुरुक् करून आबासाहेब गोष्ट सांगूं लागले:—

"त्या वेळीं मी नाशीक जिल्ह्यांत नोकरीवर होतों. तालुक्यांची पहाणी करण्याकरितां मी बाहेर फिरतीवर निघालों होतों. वैशाख–ज्येष्ठ महिन्याचा सुमार होता. दिवसा तर एकाद्याला 'सनूस्ट्रोक' लागण्याचाहि संभव होता–इतका त्या वर्षी कमालीचा उन्हाळा भासत होता. दिवसा प्रवास करणें अगदींच अशक्य असल्यामुळें आह्मी रात्रींच वाट चालत असूं. एके दिवशीं एका मध्यमशा नदीच्या किनाऱ्यावरून आह्मी चाललों होतों. आह्मांला पलीकडे जायचें असल्यामुळें तेथल्या दोन होड्यांत आह्मी जाऊन बसलों. एकींत मी अन् दुसरींत माझे कारकून, शिपाई वगैरे मंडळी बसली होती. आकाशांत चंद्र तळपत असून लख्ख चांदणें पडलें होतें. फुसफुस फुसफुस वाऱ्याच्या लहरि वहात होत्या. त्या वेळीं मध्यरात्रीचा सुमार झाला होता. पलीकडच्या किनाऱ्याजवळ आह्मी येतों, तों तेथल्या एका मोठ्या थोरल्या वडाच्या झाडाच्या आसपास मनुष्याच्या कण्हण्यासारखा शब्द आह्मांला ऐकूं आला. होडींतून चटकन् उतरून मीं विचारलें 'कोण आहे?' परंतु कोणीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. फक्त अर्धस्फुट स्वरांत 'या अल्ला–जान गया–जान गया!' एवढेच शब्द आह्मांला ऐकूं आले. हें आहे तरी काय, असा आह्मी विचार करूं लागलों. कुणीं कुणाला मारहाण करून किंवा जखमबिखम करून तर इथें टाकून नसेल ना दिलें? किंवा कुणीतरी एकाद्या भयंकर रोगानें बेमार होऊन तर नाहींना पडला इथें? अशा किती तरी शंका आमच्या मनांत उपस्थित झाल्या. आह्मी सर्व मंडळी उतरलों अन् त्या वडाच्या झाडाखालीं पाहूं लागलों. तेथें एक म्हातारासा माणूस असून पडला होता. तो एकवार उठून बसे, एकवार धाडकन् जमिनीवर अंग टाकी अन् मोठमोठ्यानें ओरडे! त्या माणसाच्या अंगावर मुसलमान फकीराच्या

वेष होता. तें एक ओसाड मैदान होतें. जवळपास मनुष्यप्राण्याचा वासवाराहि नव्हता. रातकिड्यांचा किर्रकिर्र शब्द चहूंकडे सारखा चालला होता. मीं त्या फकिराला विचारलें 'अरे बाबा, तुला झालें आहे तरी काय? तूं हें असें कां करतो आहेस?' मीं विचारलें–कारकूनशिपायांनीं विचारून पाहिलें–परंतु त्यानें उत्तर ह्मणून कांहीं दिलें नाहीं. फक्त 'या अल्ला–या अल्ला!' एवढेंच तो ओरडे अन् विव्हळे! कॉलरा अथवा देवी वगैरे एकाद्या रोगाचें चिन्हहि त्याच्या ठिकाणीं आह्मांला दिसलें नाहीं. त्याच्या अंगाला हात लावून पाहिला, तर तेंहि थंड लागलें–ताप-बीप कांहींसुद्धां नव्हता. शिपायाला मीं सांगितलें 'याला थोडें पाणी आणून दे पाहूं–पाहूं पाणीबिणी पितो काय!' शिपायानें पाणी आणून दिलें–परंतु फकीरानें त्याच्या हातांतला पेला तस्सा उडवून दिला. आमच्या बरोबरच्या आर्डलींपैकीं एकजण अफीणबाज होता, तो मला ह्मणाला '.हा अफिण्या दिसतो आहे हुजूर! अफीण न मिळाल्यामुळें याची ही अशी भयंकर दशा झाली आहे.' असें ह्मणून आपल्या खिशांतून त्यानें अफिणीची डबी बाहेर काढली व तींतून थोडीशी अफीण घेऊन ती त्या फकीराच्या तोंडांत घातली. अफिणीचा स्वाद त्याच्या तोंडाला लागला मात्र, त्यानें दोन्ही हातांनीं आमच्या त्या आर्डलींचा हात घट्ट आंवळून धरला व आपल्या तोंडांत घातलेलीं अफिणीचा वास लागलेलीं त्याचीं तीं दोन बोटें तो प्राणांपलीकडच्या जोरानें चोखूं लागला. चोखूनचोखून अफीण नाहींशी करून टाकल्यावर तो एक मिनिटभर स्तब्ध बसून राहिला होता. आतां त्याची ती ओरड अन् विव्हळणें साफ बंद झालीं होतीं. नंतर तो उर्दूत ह्मणाला 'बाबा–जीते रहो! आज तूं मला जो आनंद अर्पण केलास, त्याला दुनियेंत तुलना नाहीं! आज जर मला कुणीं दिल्लीचें तक्त दिलें, तर या ब्रह्मानंदापुढें तें तुच्छ समजून मी तें नको ह्मणेन!' आह्मी आश्चर्यचकित होऊन उभे राहिलों होतों. नंतर तो फकीर उठला अन् आह्मांला सलाम करून हलुहलू तेथून निघून गेला. व्यसनाची लज्जत ह्मणजे ही अशी आहे!

'**वांछीं न यश तेविं घन मी!**' खरें आहे! त्या फकिराला दिल्लीचें तक्तहि नकोसें झालें!"

गोष्ट ऐकून मनोहरपंत आणि अच्युतराव हंसूं लागले. आबासाहेबांनीं इकडेतिकडे पाहून विचारलें "ताई–ताई कुठें गेली इतक्यांत?"

कमला गोष्ट ऐकावयाला बसली होती खरी; पण तिनें जेव्हां पाहिलें, कीं, गोष्ट जुनीच आहे, तेव्हां ती आंत निघून गेली होती. आबासाहेबांची हांक ऐकून तिनें येऊन विचारलें "काय बाबा?"

आबासाहेबांनीं हंसून विचारलें "हां, तूं काय विचारीत होतीस ताई?"

"कधीं?"

"अग आतांच. थोड्या वेळापूर्वी इथें येऊन मला तूं काय विचारलेंस? मला चहा पाहिजे कीं काय, ह्मणून तूं चौकशी केलीस नव्हे? तर मग चहा शिल्लक असला, तर घेऊन येना एक पेलाभर. पण फारसा 'टंग' नको हो!"

कमला हंसतहंसत तेथून निघून गेली.

मनोहरपंतांकडे वळून आबासाहेब ह्मणाले "मीं जें आतां ताईला ह्मटलें, कीं, फारसा 'टंग' करूं नकोस ह्मणून, त्याचा अर्थ कळला तुह्माला?"

"नाहीं—"

"आमचा एक होता नोकर–तो रोज चहा करीत असे. चहा भारी कडू झाला, ह्मणजे तो ह्मणायचा 'आज चहा भारी टंग झाला आहे!' 'टंग' ह्मणजे 'स्ट्रॉंग!' त्याची थट्टा करतांकरतां आह्मीहि टंग ह्मणायला लागलों, अन् सवईमुळें तोच शब्द आमच्या तोंडीं बसला!"

कमलेनें एक प्याला चहा आणून दिला. आबासाहेब तिला ह्मणाले "आज भारत वाचायची पाळी तुझी ताई!"

नंतर कमलेनें जवळच्या कपाटांतून महाभारत काढून आणलें व बापाजवळ बसून तिनें त्यांतलें एक पर्व वाचावयाला सुरुवात केली.



## प्रकरण अठ्ठाविसावें.

## आधुनिक शेक्स्पियर!

त्या रात्रीं पत्नीची एकीकडे गांठ पडतांच अच्युतरावांनीं तिला विचारलें "मनोहर कसा काय वाटला तुला?"

"जरा आंबटच वाटले मला ते!" सुशीला गंभीरपणानें ह्मणाली.

एकाएकीं चेहऱ्यावर संशयाचा आविर्भाव आणून सुशीलेची हनुवटी धरून अच्युतराव तिच्या ओंठाकडे लक्ष्यपूर्वक पाहूं लागले.

सुशीलेनें विचारलें "काय पहाणं चाललं आहे?"

पत्नीच्या हनुवटीवरून हात काढून जरा मागें सरून विषण्णभावानें डोकें हलवीत अच्युतराव गंभीरतेनें ह्मणाले "खाऊन टाकलास? दिवाळी-निमित्त इतकीं पक्वान्नें घरांत केलीं आहेत—जिलब्या, घिवर, लाडू, करंज्या, अनरसे—! पण तीं खाऊन कांहीं तुझी तृप्ति झाली नाहीं ना? शेवटीं माझ्या मित्राला देखील मटकावून टाकलास! हे पहा तुझे ओंठ लाललाल दिसताहेत—रक्तच तें! हाय हाय! काय केलेंस तूं हें?"

पतीच्या तोंडचें हे शब्द ऐकून सुशीला हंसतांहंसतां घुटमळली! शेवटीं तिच्यानें उभें रहावेना, ह्मणून ती पलंगावर बसली आणि कृत्रिम कोपानें ह्मणाली "अस्सं काय? मला राक्षसीण ठरवायचं का? मी माणूस खातें, नाहीं का?"

"माणूस जर नाहीं खात, तर माझा मित्र गोड कीं आंबट, तें कसें कळलें तुला?"

"आंबट ह्मटलं, कीं, तें लिंबाचंच आंबट समजायचं वाटतं? मग कमलासारखं तोंड ह्मटलं, कीं, इकडे तोंडाच्या पाकळ्या शोधायला लागणं होईल ह्मणायचं! वाः--कोण जाणे बाई मोठ्या हुद्दयाची नोकरी संभाळायची कशी होईल ती!"

जणूं काय मोठें संकट टळलें, असा आविर्भाव दाखवून, मुक्ततेचा एक मोठा उसासा टाकून गंभीर स्वरांत अच्युतराव ह्मणाले " आः—

निभावलों ह्मणायचा मी ! तर मग मनोहर अजून जीवंत आहे ! लिंबाचें जर आंबट नाहीं, तर कोणत्या अर्थानें आंबट हा शब्द योजलास तूं?"

" आपले मित्र बहुधा प्रत्येक बाबतींत गंभीर अन् आंतल्या गांठीचे दिसतात–अगदीं '**शुष्कं काष्ठम्**'! हें मीं रूपक केलं आहे, नीट 'नोट' करून ठेवायचं हो !"

क्षणभर विचार करून अच्युतराव ह्मणाले " मनोहराचें हृदय अरसिक किंवा शुष्क आहे, असें निदान मी तरी ह्मणणार नाहीं. पण तो बराच चिंतनशील अन् गंभीरभावनामय आहे, हें खरें आहे. परंतु त्याची ही भावना केवळ आध्यात्मिक विषयांपुरतीच आहे–फक्त धर्मसंबंधापुरतीच आहे. मनोहराचें हृदय कठिण नाहीं–तरी बळकट आहे. आपलें अमुक एक कर्तव्य आहे असें एकदां त्याच्या मनानें घेतलें, ह्मणजे तो त्यापासून काय वाटेल तें झालें तरी तिळभरहि विचलित व्हायचा नाहीं."

सुशीलेनें विचारलें "लग्न करून संसारांत पडणं हें मोठं अन्यायाचं पापकृत्य आहे, अशीच त्यांची कल्पना आहे वाटतं?"

"हो, अशीच खरी जवळजवळ !"

"पण समजा, एकाद्या मुलीच्या रूपानं अन् गुणांनीं त्यांना मोहिनी घातली तर ?"

" अगोदर त्याचा स्वभावच असा आहे, कीं, कुणा एकाद्या मुलीला पाहून तिच्यावर त्याचें प्रेम जडेल, ही गोष्टच जवळजवळ अशक्य आहे, असें मला वाटतं. पुनः जरी त्याच्या मनांत त्या कुमारिकेबद्दल प्रेमभाव उत्पन्न झाला, तरी तो प्रेमभाव ह्मणजे आपल्या मनाची अगदीं अक्षम्य अशी दुर्बलता आहे असें तो समजेल, अन् मोठा निकराचा प्रयत्न करून त्या प्रेमभावनेला मनांतून हुसकावून लावल्याशिवाय तो कधींहि रहाणार नाहीं."

" पण त्यांत त्यांनां नाहीं यश आलं तर ?"

" जर त्या प्रयत्नांत त्याला यश आलें नाहीं, तर तो आपण स्वतः दूर निघून जाईल."

सुशीला किंचित् हंसून ह्मणाली " ह्मणजे '**स्थानत्यागेन दुर्जनः**' होय ना?"

" माझी अशी पक्की खात्री आहे, मनोहर अगदीं असा वागेल!"

सुशीला आपल्या मनाशींच हंसूं लागली. शेवटीं मस्तक हलवून स्मितपूर्वक ती ह्मणाली "ऊं हूं—"

प्रेमपूर्ण दृष्टीनें पत्नीकडे पहात अच्युतराव ह्मणाले " नुसता एक 'ऊं हूं—' एवढाच उद्गार काढून माझ्या एवढ्या थोरल्या 'आर्ग्युमेंट' चा तूं धुव्वा उडवून द्यायला पहातेस, होय? माझ्या मित्रासंबंधानें जें मत मीं तुला सांगितलें, तें तुला चुकीचें वाटतें?"

" होय–मला असं वाटतं खरं."

" काय वाटतें?"

" आपली अशी कल्पना आहे, कीं, 'प्रेम' नामक व्याधीपासून आपणाला अगदीं अलग ठेवून मनोहरपंत आपलं आयुष्य घालवूं शकतील. ते असं करूं शकणार नाहींत, अशी माझी खात्री आहे."

" प्रेमापासून मनोहर दूर राहूं शकणार नाहीं, अशी पक्की खात्री आहे तुझी?"

"हो आहे. फार लांब कशाला? वन्संचीच बाबत घ्यावी. रूपानं तर त्या अप्रतिम आहेत–स्वभाव दिखील कसा कोमल अन् गोड आहे. वन्संवर प्रेम जडल्याशिवाय मनोहरपंतांची सुटका आहे, अशी का कल्पना आहे आपली?"

हें ऐकून अच्युतराव मोठमोठ्यानें हंसूंच लागले! ते ह्मणाले "अगदीं अशक्य–अगदीं असंभवनीय! तुमच्या 'वन्सं' तुह्माला कितीहि सुंदर अन् गोड वाटोत, पण मनोहराला तशा त्या वाटायच्या नाहींत."

" बरं, मी तशा त्यांनां वाटायला लावल्या तर?"

" वेडी आहेस तूं झालें! तूं कशी त्याला वाटायला लावणार?"

आपले उज्ज्वल व मोठे डोळे पतीकडे लावून सुशीला गंभीरतेनें ह्मणाली " लावीन-वन्संवर त्यांनां मी प्रेम करायला लावीनच-ती विद्या आहे माझ्या हातांत !"

" तूं काय जादुगारीण आहेस ?"

" मी जादुगारीण आहें का नाहीं, हें अजूनहि आपणाला नाहीं ना कळलं ?"

पत्नीचा हात प्रेमभरानें आपल्या हातीं घेऊन अच्युतराव ह्मणाले "होय-निःसंशय तूं बडी जादुगारीण आहेस ! पण मनोहरावर तुझ्या जादूचा कांहींहि प्रभाव चालायचा नाहीं, अशी माझी खात्री आहे. मनोहर 'जादू-प्रूफ' आहे !"

" ते 'जादू-प्रूफ' आहेत कीं नाहीं, तें पाहीन मी ह्मणा. पण त्यांनां मीं प्रेम करायला लावलं तर ?"

" तें बिलकूल अशक्य आहे. पश्चिमेला सूर्याला उगवायला लावशील तूं ?"

" बरं तर पहावाच माझा पराक्रम गडे ! वन्संच्या प्रेमसागरांत आपल्या मित्राला जर मीं गटंकळ्या खायला लावल्या नाहींत, तर मी नांवाची सुशीलाच नव्हे ! पण ते इथं कांहीं दिवस तरी राहिले पाहिजेत, हें उघड आहे."

" छट्-तुला तें शक्य नाहीं."

" बरं-मारावी पैज याबद्दल !"

" चल, पैज ! "

" मीं जर माझ्या ह्मणण्याप्रमाणं करून दाखवलं, तर मला एक उंची फ्रेंच हारमोनियम विकत घेऊन द्यायला होईल ? "

" देईन ! अन् नाहीं तुला तसें करतां आलें, तर तूं मला काय देशील ?"

सुशीला हंसतहंसत ह्मणाली " तर मग मी आपणाला एक रेशमी रुमाल देईन. "

अच्युतरावहि खूब हंसून म्हणाले "अहाहा ! काय मोठी दाती पण ! घ्यायच्या वेळीं मोठ्या किंमतीचा हारमोनियम अन् द्यायच्या वेळीं आठ-बारा आण्यांचा भिकारडा रुमाल ! अच्छा–त्या रुमालांत आपलें सर्व प्रेम जर मला बांधून देशील, तर तो रुमालहि कबूल आहे मला !"

"ठीक आहे–तसं करीन ! पण माझ्या जादुविद्येच्या या प्रयोगांत आपण मला मदत केली पाहिजे—"

"मीं ? मी ती काय मदत करणार बुवा तुला ?"

"दुसरं कांहीं नको साहाय्य मला आपलं. ज्या वेळीं जें मी सांगेन, त्या वेळीं तें आपलं मुकाट्यानं करायचं–इतकंच !"

"सुशीले, या तुझ्या अटीनें तूं नवीन असा काय लाभ करून घेणार ? अग, आपलें लग्न झाल्यापासून तर तुझ्या हुकुमानेंच मीं बसतोंउठतों आहें !"

"या वेळीं नुसत्या उठाबशा काढून नाहीं भागायचं ! वक्तृत्वहि करावं लागेल—"

"वक्तृत्व ? भाषण करायचें म्हणतेस ? हें जर मला साध्य असतें, तर मी काउन्सिलचा मेंबर होऊन नामदार नसतों का झालों ?"

"हें राजनीतीचं वक्तृत्व नाहीं–प्रेमनीतीचं वक्तृत्व ! त्यानं 'ऑनरेबल' व्हायची कांहीं भीति नको हो बाळगायला ! या बाबतींत मीं जो एक 'प्लॉट' रचला आहे, तो भारी अद्भुत आहे. तो ऐकून 'आधुनिक शेक्स्पियर' अशी पदवी द्यावी लागेल मला इकडून–असायचं कुठं ?"

"ऐकूं द्या तर खरा 'आधुनिक शेक्स्पियर' मडमसाहेबांचा प्लॉट ?"

"मी निरनिराळ्या युक्त्यांनीं मनोहरपंतांच्या मनांत असं भरवून देणार, कीं, वन्सचं मनांतून गुप्तपणं त्यांच्यावर अतोनात प्रेम जडलं आहे. माझ्या युक्तीमुळं खरोखरच असं होईल, कीं, मनोहरपंत अंतःकरणापासून वन्संवर प्रेम करायला लागतील. लोहचुंबकच केवळ लोखंडाला ओढतो असं नाहीं, तर लोखंडहि लोहचुंबकाला ओढीत असतं !"

हें ऐकून अच्युतरावांनां अतोनात कुतूहल वाटूं लागलें. त्यांनीं विचारलें " तूं तें कसें काय करणार आहेस बुवा ?"

" उद्यां आपण मनोहरपंतांनां बोलतांबोलतां सहज सांगावं, कीं, ' चहा म्हणजे कमलेचा अगदीं जीव कीं प्राण, पण कालपासून काय झालं कोण जाणे, ' आपण कांहीं चहाला शिवणार दिखील नाहीं ! ' अशी ती प्रतिज्ञा करून बसली आहे.' "

अंगावर कांटा आल्यासारखें करून अच्युतराव म्हणाले, " छेः--तूं माझ्याकडून खोटें सांगविणार त्याला ? हें कांहीं प्रेमनैतिक वक्तृत्व नव्हे, हें सर्वस्वी दुर्नैतिक वक्तृत्व आहे !"

" छे ग बाई ! खोटी गोष्ट आपणाला मुळींच बोलायला नको. मामंजींच्या आजच्या लेक्चरमुळं वन्सं भारी अभिमान धरून बसल्या आहेत. 'साऱ्या जल्मांत चहाला शिवणार नाहीं,' अशी त्यांनीं खरोखरच प्रतिज्ञा केली आहे. पण हा आपल्याच उदाहरणाचा परिणाम कमलेच्या मनावर झाला असला पाहिजे, असाच मनोहरपंतांचा समज होईल !"

अच्युतराव हंसून म्हणाले " मनोहराच्या अनुकरणीय उदाहरणामुळं कांबळी पाण्यांतला चहा सोडो, दूध-चहा सोडो, हळुहळू चहादाणी, कपबशा यांनां स्पर्शहि न करो; पण मग बिचाऱ्या चहाची वाट तरी काय होणार, याची मला काळजी पडली आहे. बरं, तें असो--आणखी कायकाय योजल्या आहेस युक्त्या, त्या तर ऐकूं दे !"

" दोनएक दिवसांनीं मनोहरपंतांनां आपण सांगावं, कीं, 'कमलेला अलीकडे काय झालं आहे कळत नाहीं, रात्रंदिवस नेहमीं विचारांत-विचारांत दिसते ! ' "

" ही तर अजिबात खोटी गोष्ट सांगावी लागणार ! कांबळीला काव्य-रोग इतका लवकर पछाडील, अशी कांहीं बिलकूल लक्षणें दिसत नाहींत बुवा !"

" खोटं बोलावं लागणार नाहीं आपणाला. तें खरं करून देईन मी. एक खूब कठीण असं कोडं वन्संनां घालून मी सांगेन त्यांनां, कीं, ' एकी

दिवसाच्या अंत जर मला तुह्मी याचं उत्तर द्याल, तर तुह्माला मी एक शिवणकामाची पेटी देईन मुंबईहून आणवून !' आपणाला कांहींसुद्धां खोटं सांगावं लागणार नाहीं आहे—त्याबद्दल धर्ममहाराजांनीं मुळींसुद्धां भिऊं नये !"

अच्युतराव हंसून ह्मणाले " ओः ! काय स्त्रीजातीचें हें चातुर्य! स्त्रिया जन्मतःच पंडित असतात, अन् त्यांत आपली स्वारी शिकलेली ! बरें, इतकेंच, का आणखीहि कांहीं आहे ? "

" दुसऱ्या दिवशीं आपण अगदीं सरळपणानं मनोहरपंतांनां बोलतां-बोलतां ह्मणावं, कीं, ' मी काल सहज ह्मणून गच्चीवर गेलों होतों, अन् पहातों, तों कमला पाय सोडून बसली असून तिच्या मांडीवर लाल रंगाच्या चामड्यानं मढवलेली एक चोपडी आहे, अन् त्यावर ती पेन्सलीनं कविता लिहिते आहे. कविता करण्यांत ती इतकी गढून गेली होती, कीं, माझ्या पायांची चाहूलहि तिला लागली नाहीं. माझ्या येण्यानं तिच्या काव्यविचारांत व्यत्यय येईल, या शंकेनं मी हळूच पाय न वाजवतां खालीं आलों.' "

" अन् हें खरें करण्याकरतां, मला वाटतें, कांबळीला तूं इसापनीतींतील बगळा आणि लांडगा ही गोष्ट कवितेंत लिहायला सांगणार ? होय ना ? "

" काय तरी आपली कल्पना ! बगळा अन् लांडगा यांच्या गोष्टीनं का हें काम भागणार आहे ? छट् ! मी वन्संनां ह्मणेन, कीं, 'महाश्वेतेला जर कविता करतां येती, तर पुंडरीकाची वनांत पहिल्यानं भेट होऊन ती घरीं आल्यानंतर आपल्या महालाला कडी लावून तिनं काय लिहिलं असतं, सांगा पाहूं ? नुसते तिच्या मनांतले विचार लिहा—माणसांचीं नांवं, ठिकाण किंवा प्रत्यक्ष घडलेली गोष्ट यांचा कांहीं कवितेंत उल्लेख नाहीं करायचा. अशी जर एक पानभर कविता लिहाल तुह्मी वन्सं, तर मी तुह्माला एक ग्रॅमोफोन आणून देईन.' अशा तऱ्हेनं नाटकं, कादंबऱ्या

अन् पुराणांतल्या गोष्टी, यांतल्या नायिकांचा वन्संकडून एकामागून एक खून करवीन. अन् मधुनमधून वन्संची ती चोपडी ‘केवळ चुकून’ मनोहरपंतांच्या हातीं जाणारच नाहीं, अशी कांहीं मी हमी घ्यायची नाहीं. पण लाल चामड्यानं मढवलेली चोपडी अन् पेन्सलीनं लिहिलेल्या कविता यांची मनोहरपंतांजवळ गोष्ट काढायला मात्र बिलकूल विसरायचं नाहीं बरं का ? माझ्याजवळ अशी एक कोरी चोपडी आहे, तीच मी वन्संनां देणार आहे. अशानं या हकीगतींतल्या अगदीं बारीकसारीक गोष्टींबद्दलहि मनोहरपंतांनां तिळमात्र संशय नाहीं यायचा.”

अच्युतराव कांहीं वेळ विचार करीत स्तब्ध बसले होते. नंतर त्यांनीं विचारलें “ झालें का ? कीं आणखीहि कांहीं युक्त्या आहेत तुझ्या ?”

अच्युतरावांच्या आतांच्या कठंस्वरानें सुशीलेच्या उत्साहांत जरा विरजण पडल्यासारखें झालें. तरीहि धीर न सोडतां तिनें म्हटलें “प्रसंग येतील तसतशा आणखीहि कांहीं युक्त्या मीं योजीन. एक युक्ति मीं योजून ठेविली आहे, पण तिचा उपयोग करायचा कीं नाहीं, हें कांहीं अजून ठरविलं नाहीं. कविताबिविता मनोहरपंतांच्या नजरेला घातल्या, म्हणजे वन्संच्या कानांतल्या कानांत हळूच असं सांगावं म्हणतें मी, कीं, ‘मनोहरपंतांशीं तुमच्या लग्नाचं ठरलं दिखील, हो, वन्सं !’ याचा असा परिणाम होईल, कीं, मनोहरपंत दृष्टीस पडतांच वन्संचे डोळे आपोआप खालीं जातील अन् गालांवर झटकन् लज्जेची लाली चढेल, अन् कमलेचं आपणावर खरोखरच प्रेम जडलं आहे, असं त्यांनां खरोखरच पूर्णपणं वाटूं लागेल. आपलं काय म्हणणं आहे ? ”

अच्युतराव दृढ, पण मृदुस्वरानें म्हणाले “छट्, आपणाला नाहीं बुवा हें पसंत!”

“अगोदर मीं ज्या साऱ्या युक्त्या आपणाला सांगितल्या, तेवढ्याच पुरेशा आहेत, असं म्हणणं आपलं ?”

अच्युतराव पूर्वीप्रमाणेंच म्हणाले “ नाहीं. ”

"तर मग ?"

अच्युतराव कांहीं बोलले नाहींत. आपला हा सारा कौशल्यप्रयोग आपल्या पतिराजांनां पसंत पडत नाहीं, अशी सुशीलेची खात्री झाली. तरीहि थट्टेनें तिनें ह्मटलें "बोलत कां नाहीं ? टीकाकारसाहेबांनां माझा हॉ प्लॉट पसंत नाहीं वाटतं ?"

अच्युतरावजींच्या मुखमंडलावरील खिन्नतेचा अंधकार हलुहलु नाहींसा झाला. प्रेमभरानें पत्नीचे दोन्ही हात आपल्या हातीं घेऊन ते ह्मणाले "छट्! सुशील! हा सारा बेत तूं सोडून दे कसा!"

कांहीं न बोलतां विषण्णतेनें सुशीलेनें आपली नजर जमिनीकडे लाविली.

अच्युतराव ह्मणाले "मला तुझा हा बेत पसंत पडत नाहीं, ह्मणून तुला वाईट का वाटलें? पण तूंच विचार कर जरा–तुझी ही विचित्र युक्ति खरोखरच अमलांत आणणें बरें दिसेल का ? माझी सुंदर अन् सद्गुणी एकुलती एक बहीण आह्मीं का कोंडा देऊन विकत घेतलेली आहे, ह्मणून, तिला कसा तरी नवरा मिळवून देण्यासाठीं अशा हीन युक्तीचें आह्मीं अवलंबन करावें? सरळ मार्ग सोडून प्रवंचनेचा मार्ग आपण कां स्वीकारावा?"

सुशीला कांहींशी गंभीरपणानें ह्मणाली "वन्संनां नवरा मिळत नाहीं ह्मणून कसा तरी त्यांनां तो मिळवून द्यायच्या हेतूनं कांहीं मीं या युक्तीच्या घाटाची योजना केली, असं नव्हे. फक्त कांहीं तरी एक कौशल्याचा खेळ, एवढाच त्याला मी किंमत देत होतें. आतां इकडे माझा हा बेत पसंत पडत नाहीं ह्मणायचं, तेव्हां मलाहि वाटतं, कीं, हा खेळ खरोखरी खेळणं कांहीं बरं नाहीं."

पत्नीकडे प्रेमकौतुकपूर्ण दृष्टीनें पहात अच्युतराव ह्मणाले "कौशल्याचा खेळ खेळावा ह्मणून का शेक्स्पियरच्या नाटकाची गोष्ट वाचून त्यांतील युक्ति खरोखरच्या सांसारिक घटनेंत योजून तिची परीक्षा पहाण्याच्या उद्देशानें हा घाट तूं योजिला होतास ?"

सुशीला खालीं मान घालून हंसत म्हणाली "तसंहि म्हणतां येईल हवं तर."

"ओः! स्त्रीशिक्षणाचा काय हा भयंकर परिणाम!" असें म्हणून अच्युतराव मोठमोठ्यानें हंसूं लागले.

पतीबरोबर सुशीलाहि हंसूं लागली आणि म्हणाली "जा गडे! स्त्रीशिक्षणाची अशी निंदा करायला नको कांहीं. माझ्या अशा मजेदार खेळाची अशी मातीमाती करून टाकायला कांहीं तरी वाटलं का इकडच्या मनाला? खरोखरच्या या जगांत कादंबरींतील घटना घडून आलेली पहावी, असा माझा हेतु होता; पण इकडच्या हट्टीपणामुळं माझा तो हेतु कांहीं सिद्धीला गेला नाहीं. अशा 'अन्‌रोमांटिक' थंड प्रकृतीच्या पतीबरोबर संसार करणं एकाद्या काव्यमय प्रकृतीच्या स्त्रीला भारी कष्टाचंच व्हायचं!" असें म्हणून सुशीलेनें हंसतहंसत पतीच्या वक्षःप्रदेशांत आपलें मुख लपविलें.

अच्युतराव म्हणाले "कदाचित् वंचनेचें अवलंबन न करतांहि आपणाला कादंबरींतील घटना पहायचा योग येईलहि. परंतु ती आशा कांहीं फारशी नाहीं. वस्तुतः कमलेला पाहून मनोहराचें मन जर प्रेमानें आकृष्ट झालें, तर कदाचित् लग्नाला तो कबूल होईलहि. पण मुख्य एक शंका अशी आहे—मीं अगोदर ती सांगितलीच आहे तुला,—कीं, मनाला अशी चंचलता आली आहे, असें त्याला वाटूं लागतांच तो एकदम पळूनच जाईल!"

सुशीला दृढ स्वरानें म्हणाली "पण पळून पळणार कुठं? या बंधनांत मनुष्य एकवार सांपडला, म्हणजे पळून का त्याची सुटका होते? पुनः येऊन त्या बंधनांत स्वेच्छेनंच त्याला पडावं लागतं. मी आपल्या मित्राला आशीर्वाद देतें, कीं, अशी पळून जाण्याजोगीच त्यांची स्थिति खात्रीनं होईल!"

## प्रकरण एकोणतिसावें.

## ' वन्सं कुणालाहि नाहीं भ्यायच्या ! '

दुसऱ्या दिवशीं सकाळीं अच्युतरावांकडून मनोहरपंतांनां कळलें, कीं, उद्यां आबासाहेबांचा जन्मदिवस आहे. दरवर्षी त्या कुटुंबांतील मंडळीकडून हा दिवस मोठ्या आनंदानें पाळला जात असे.

आबासाहेबांचा हा वाढदिवस त्यांच्या कुटुंबांतील सर्व मंडळीनें हंसूनखेळून आमोदप्रमोदांत घालवावा, अशी व्यवस्था चालली होती. फुलवाडीपासून दोन कोस अंतरावर नदीच्या तीरावरच एक रमणीय, स्वच्छ आणि सोईचा असा एक जंगलाचा भाग होता. तेथें जाऊन तो दिवस वनभोजनादि गमतींत घालवावा, असें ठरलें होतें. त्या प्रसंगीं मनोहरपंतांनींहि आपल्याबरोबर तिकडे यावें, असा आबासाहेबांचा त्यांनां फार आग्रह चालला होता.एवढ्या थोर गृहस्थाचा आग्रहाचा शब्द मोडावा कसा, असा विचार करून ते त्यांच्या ह्मणण्याला कबूल झाले. परंतु हा एकंदर प्रकार त्यांनां मनापासून आवडत नव्हता. ' हें सारें प्रकरण ह्मणजे इंग्लिश फॅशनचें अनुकरण होय,' असें त्यांनां वाटत होतें.

आठएक वाजण्याच्या सुमाराला तंबूचें सामान, कांहीं खुर्च्या, टेबलें, कोचें वगैरे भरून बैलांचे दोन खटारे तिकडे रवाना झाले. सामान तेथें पोहोंचतांच नोकर मंडळी तंबू वगैरे मारून सर्व तयारी लख्ख करून येणार होती. तंबू शृंगारण्यासाठीं निरनिराळ्या रंगांच्या व आकारांच्या ध्वजा, पताका व बँटिंग्स, व लहानमोठ्या जाडीच्या सुतळीच्या गुंड्या वगैरे सामानानें भरलेली एक पेटी गाडींतून अगोदरच तिकडे रवाना झाली होती. झाडेंझुडपें, वेली, केळी, नारळीच्या सावळा वगैरे शृंगाराचें सामान त्या ठिकाणीं वाटेल तितकें मिळण्यासारखें होतें. या वर्षी अच्युतराव आयतेच घरीं असल्यामुळें तंबूच्या शृंगाराचें काम त्यांनीं आपल्या अंगावर घेतलें होतें.

उभयतां मित्रांची एकीकडे गांठ पडल्यावर मनोहरपंत हंसून ह्मणाले " काय हो अच्युतराव ! हा सर्व प्रकार इंग्रजी थाटाचा दिसतो आहे मला ! "

अच्युतराव ह्मणाले "होय, हें थोडेंसें इंग्रजी पद्धतीचें अनुकरण आहे खरें; पण त्या मंडळीच्या ज्या बऱ्याचशा कृति मला पसंत वाटतात, त्यांपैकींच हीहि एक आहे. जगांत हंसूनखेळून स्वकर्तव्य बजावीत दिवस कसे आनंदानें कंठावे, हें त्याच लोकांना कळतें. विशेषतः त्यांच्या जन्म-दिवसाचा उत्सव करायची चाल मला तर फारच सुंदर वाटते."

मनोहरपंतांनीं गंभीरतेनें विचारलें " आमोदप्रमोद, मजा, चैन यांशिवाय अशासारख्या उत्सवांची कांहीं सार्थकता आहे का ?"

अच्युतराव जोरानें ह्मणाले "आहे—अलबत् आहे !"

"कोणती ?"

"प्रेमाचा विनिमय ! अन् जरी नुसत्या आमोदप्रमोदाचाहि लाभ झाला, तरीहि तो कांहीं कमी लाभ नाहीं."

अच्युतरावांच्या या सिद्धान्ताचा मनोहरपंतांनीं मनांतल्यामनांत प्रतिवाद केला—परंतु उघडपणें ते कांहीं बोलले नाहींत. ते मनांत ह्मणाले "हें अत्यंत महत्त्वाचें, महामूल्य मानवजीवन क्षुल्लक चैन अन् मजा यांत घालविणें हा त्या जीवनाचा अपव्यय नाहीं का ?"

मनोहरपंत कांहीं बोलत नाहींत, असें पाहून अच्युतराव पुढें ह्मणाले "मनोहरपंत, प्रेमाच्या या विनिमयाची कल्पना तुह्माला अत्यंत सुंदर अन् गोड नाहीं का वाटत ?"

मनोहरपंतांनीं विचारलें "अशा उत्सवांशिवाय प्रेमाचा विनिमय होणें संभवनीयच नाहीं का ?"

अच्युतराव ह्मणाले " तुह्मी मजवर प्रेम करतां, मी तुमच्यावर प्रेम करतों; ही अनुभूति—ही धारणाच कांहीं मनुष्याला पुरेशी होत नाहीं. मनुष्याच्या मनाला केवळ एवढ्यानेंच संतोष होत नाहीं. मधुनमधून तें असे प्रसंग शोधीत असतें, कीं, ज्या प्रसंगीं या आन्तर प्रेमाला कांहीं तरी साकारस्वरूप देतां येईल ! अशा प्रकारचे सर्व उत्सव ह्मणजे प्रेमाच्या साकारपूजाच होत !"

मनोहरपंत हंसले व म्हणाले "वाः, फार उत्तम! मी कांहीं साकार-पूजेच्या विरुद्ध नाहीं!"

उत्सवासंबंधाच्या दुसऱ्याहि बाबतींची व्यवस्था करतांकरतां स्नान-भोजनाची वेळ आली. भोजनोत्तर कांहीं वेळ विश्रांति घेऊन अच्युतराव घोड्यावरून त्या ठिकाणाकडे निघून गेले. तंबू मारणें आणि तो सजविणें हीं कृत्यें संध्याकाळापूर्वीच आटोपणें अवश्य होतें. कारण, दुसऱ्या दिवशीं पहांटेलाच चहापान करून ही मंडळी गाड्यांनीं निघून तेथें जाणार होती. हीं कामें आटोपून रात्र पडल्यावर अच्युतराव घरीं परत येणार होते.

दुपारच्या वेळीं कमला आणि तिचा धाकटा भाऊ मधुकर अशीं दोघें वर माडीवर बसून कात्रीनें रंगीत कागद कापून त्यांच्या राशीच्याराशी पाडीत होतीं. तांबडा, पिंवळा, हिरवा, जांभळा इत्यादि रंगांचे तक-तकीत कागद कापून तीं दोघें बहीणभांवडें त्यांच्या लहानलहान वाटोळ्या चकत्या तयार करीत होतीं. त्या चकत्यांतहि तीं नकशी कापीत होतीं. त्या नकशीदार चकत्या एकत्र गुंफून त्यांच्या माळाच्या माळा तंबूच्या आंत, दाराशीं व बाहेरहि टांगावयाच्या होत्या. सुशीला तेथेंच बसून त्या चकत्यांच्या माळा तयार करीत होती.

कागद कापून पुरे झाल्यावर कात्री बोटाभोवतीं फिरवीत फिरवीत कमला म्हणाली "वहिनी, एक नवीनच जम्मत मला करावीशी वाटते आहे!"

सुशीलेनें वर मान करून विचारिलें "कसली जम्मत?"

"एका लांबशा तांबड्या किंवा हिरव्या रंगाच्या कापडावर फुलांच्या माळा शिवून त्यांनीं 'Many Happy Returns Of The Day' अशीं अक्षरें तयार केलीं, तर तें कसं दिसेल वहिनी? अन् तें कापड तंबूच्या दरवाज्यावर झुलतं लावावं, काय ग?"

मान हलवून सुशीला म्हणाली "वाः! तें तर भारीच मजेदार दिसेल, वन्सं! तांबड्या कापडावर पांढरीं फुलं भारीच सुंदर अन् गोड दिसतील हो! वाः—वन्सं, तुमच्या डोक्यांत भारी नामी युक्ति ही आली पहा!"

वहिनीच्या या स्तुतीनें वन्संना अर्थात्च उत्तेजन आलें. कमला ह्मणाली " कसल्या फुलांच्या माळा गुंफाव्या वहिनी ? "

" जाईच्या कळ्यांच्या माळा शिवून तशीं अक्षरं तयार केलीं, तर तीं भारी नामी दिसतील, अन् कापड जर आज ओलं ठेवलं, तर रात्रीं त्या कळ्या उमलतीलहि. पण बाई, यांत एक मोठी अडचण आहे! उद्यां दुपारीं मात्र तीं फुलं कांहीं जीवंत नाहीं रहायचीं, अन् त्यांच्या पाकळ्याहि हळुहळू गळून पडतील ! "

कमला विचारांत पडली. क्षणभरानें तिनें विचारलें " मग आतां करायचं काय वहिनी ? "

" त्यापेक्षां असं करा ना वन्सं—"

" काय करूं ह्मणतेस ? "

" मामंजीनीं तें बागेंत देवदारूचं झाड मुद्दाम आणून लावलं आहे तें, त्याचीं कच्चीं पानं आणून तीं कापडावर शिवून त्याचीं करावीं अक्षरं तयार. लाल कापडावर तीं दिसतीलहि बरीं—अन् त्याला मेहनतहि कमी पडेल आपणाला—शिवाय उद्यां सारा दिवस तीं ताजीं रहातील. "

" तर मग तसंच करायचं वहिनी ! पण कापड कुठं आहे ? "

" माझ्यापाशीं लाल अलवानाचा एक तुकडा आहे तो आणतें हं मी जाऊन, जरा थांबा, " असें ह्मणून सुशीला तेथून निघून गेली.

कांहीं वेळानें हातांत तें अलवान घेऊन सुशीला आली व ह्मणाली " चांगला लांबलचक आहे तुकडा—छान काम होईल आपलं. याच्यावर पेन्सिलीनं पहिल्यानं अक्षरं लिहून काढा. तोंपर्यंत बागेंत कुणाला तरी पाठवून तीं पानं मी आणवतें. "

मान हलवून कमला ह्मणाली " मीच आणवतें तीं पानं बागेंतून. तूं अक्षरं लिहिण्याचं काम कर. मीं लिहिलेलीं अक्षरं कांहीं चांगलीं नाहीं दिसायचीं, अन् ओळ येईल अगदीं वांकडी. "

वहिनी हंसून ह्मणाली " वाः, वन्सं ! तुमचीं अक्षरं वांकडीं येतील अन् माझीं काय मोठीं सरळ यायचीं आहेत ! तह्मीच लिहा वन्सं—मी पानं आणवतें. "

कमला आग्रहच धरून बसली. "नाहीं वहिनी, तूंच काढ गडे अक्षरं! तुझी ओळ सरळ येईल–अन् तुला लिहितांहि चांगलं येईल. तें कांहीं नाहीं वहिनी, तुलाच लिहायला हवं."

"छे हो वन्सं! त्यानं सारी घाण होऊन जाईल पहा. माझीं अक्षरं पाहून लोकं हंसतील मात्र! त्यापेक्षां यायला होऊं द्या घरीं, म्हणजे मग तिकडूनच घ्या लिहून!"

"छट्! दादा कधीं येणार घरीं कुणाला ठाऊक! संध्याकाळीं येऊन तो जेऊनखाऊन अक्षरं काढून देणार–म्हणजे कितीतरी रात्र होईल पहा! दादानं लिहून दिल्यावर मी पानं भरूं तरी कधीं वहिनी? याशिवाय किती तरी कामं व्हायचीं आहेत अजून!"

कांहीं वेळ विचार करून सुशीला म्हणाली "तर मग हा बेतच सोडून दिला पाहिजे आपणांला! हो, करायचं तर नीट केलं पाहिजे, नाहीं तर काय उपयोग? हां–फार उत्तम–एक आहे उपाय–पण तो काय तुमच्या हातून व्हायचा आहे? तुम्हाला भय वाटेल बाई—"

"कोणता उपाय वहिनी?"

सुशीला मस्तक हलवीत म्हणाली "छट्–तुमच्या हातून कांहीं तें काम व्हायचं नाहीं! तुमच्या अंगांत तें धाडसच नाहीं वन्सं!"

"कां नाहीं व्हायचं माझ्या हातून? पण अगोदर काय तें सांगशील तर खरं–मग पाहूं माझ्या हातून तें होतं कीं नाहीं तें!"

"मनोहरपंत तर घरींच आहेत. त्यांनां जाऊन जर सांगितलंत तुम्ही, तर ते खात्रीनं लिहून देतील; पण तुम्ही पडलांत मुलखाच्या भित्र्या!"

ईर्षेनें गाल फुगवून कमला म्हणाली "हात्तिच्या–इतकंच ना? अग, मघांशींच कां नाहीं तूं मला सांगितलंस हें? ही अश्शी जाऊन त्यांच्याकडून मी आणतें लिहून–मी कांहीं कुणाला भ्यायची नाहीं हो वहिनी!"

असें म्हणून ती ईर्षेनें उठून उभी राहिली व हातीं अलवानाचा तुकडा घेऊन भावाला म्हणाली "चल, येतोस मधु?"

सुशीलेनें सुचविलें "त्यापेक्षां अगोदर भाऊजींना पाहून येऊं द्या, ते कुठं आहेत, काय करताहेत तें?"

वहिनीच्या सूचनेप्रमाणें मधुकर गेला व कांहीं वेळानें परत येऊन ह्मणाला "मनोहरपंत लायब्ररीच्या मागच्या ग्यालरींत बसून कललेंसें संस्कृत पुस्तक वाचताहेत."

सुशीलेनें विचारलें "आणखी आहे का कुणी तिथं, भाऊजी?"

"छट्–आणखी नाहीं कुणी!"

"तर मग जा तुह्मी."

मधुकराला बरोबर घेऊन कमला स्वतःला नकळतच कलियुगांतील त्या महादेवाचा व्रतभंग करावयाला निघून गेली.

मनोहरपंत ज्या ग्यालरींत बसून पुस्तक वाचीत होते, त्याच्याखालीं कांहीं अंतरावरून कलकल शब्द करीत नदी वहात जात होता. तिच्या पाण्यावरून कांहीं पक्षी उडत होते. अशा निस्तब्धतेमध्यें तेथें बसून मनोहरपंत निर्णयसागर छापखान्याचें ब्रह्मसूत्रभाष्य वाचीत होते.

कमला आणि मधुकर ग्यालरींत जाऊन उभीं राहिलीं, तरी मनोहरपंतांचा वाचनांत इतका लय लागून राहिला होता, कीं, त्यांचा पदशब्दहि त्यांनां ऐकूं आला नाहीं! मनोहरपंतांचे ते चष्म्यानें युक्त असे खालीं लागलेले नेत्र व शांत गंभीर भाव पाहून कमलेला थोडथोडें भय वाटूं लागलें. आपल्या दादाच्या व यांच्या स्वभावांत निसर्गतःच पुष्कळ अंतर आहे, अशी तिची कल्पना झाली. आपल्या दादाचा स्वभाव नेहमीं हास्यविनोदप्रिय, चिरानंदमय; त्याच्या अगदीं उलट स्वभाव या गृहस्थांचा! आपला प्रस्ताव ऐकून 'काय पोरकट आहे ही!' असें मनांत ह्मणून आपणाला हे खात्रीनें धुडकावून लावतील! मग काय करावयाचें? मोठी फुशारकी मारून तर आपण आलों; आतां अशाच हात हालवीत जर आपण परत गेलों, तर वहिनी आपली हंसून टर केल्याखेरीज कधींहि रहाणार नाहीं! ती ह्मणेल 'मीं अगोदरच हें भविष्य केलं होतं!' मग 'मुलुखाची भित्री' अशी आपली कायमची कीर्ति

होईल ! असा विचार करून सर्व धीर गोळा करून कंपित स्वरानें कमलेनें हांक मारली " मनोहरपंत—"

कमलेच्या हांकेनें एकदम चमकून मनोहरपंतांनीं पुस्तकावरून दृष्टि काढून तिच्याकडे पाहिलें.

चकित हरिणीप्रमाणें मनोहरपंतांकडे दृष्टि लावून कमला जड स्वरानें ह्मणाली " मनोहरपंत ! दादा घरीं नाहीं, ह्मणून आपणाला थोडेसे श्रम द्यायला मी आलें आहे."

पुस्तक बंद करून मनोहरपंत ह्मणाले " कसले श्रम ? "

आपल्या कांपणाऱ्या हातांनीं अलवानाचा तुकडा वर करून कमला ह्मणाली " हें कापड मीं आणलं आहे, यावर Many Happy Returns Of The Day' असं आपण लिहून द्या आह्मांला."

ब्राह्मणाच्या चौदापंधरा वर्षांच्या मुलीच्या तोंडून शुद्धपणें उच्चारलेलें इंग्रजी वाक्य मनोहरपंतांनीं आजच पहिल्यानें ऐकलें ! तें ऐकून त्यांच्या आश्चर्यचकित हृदयांत आनंद नृत्य करूं लागला; परंतु कमला आपणाला काय करावयाला सांगत आहे, हें स्पष्टपणें न समजल्यामुळें ते तिला ह्मणाले "त्यांत कसले आहेत श्रम ? मी काय करूं तें सांगा. "

मनोहरपंतांचा स्वर शाळेंतल्या एकाद्या हेडमास्तराच्याप्रमाणें गंभीर व कठोर नाहीं; आपल्या दादाच्याप्रमाणेंच त्यांचा स्वरहि स्नेह-प्रेम-पूर्ण असाच आहे, असें कमलेला आढळून आलें. तेव्हां तिच्या मनांतील साऱ्या आशंका दूर झाल्या. धीर येऊन ती ह्मणाली "उद्यां बाबांचा वाढदिवस आहे ना ? म्हणून आम्ही सारींजणं त्यांनां घेऊन इथून जवळच एका जागीं वनभोजनाला जाणार आहों. तिथं यासाठीं तंबू ठोकला आहे. या कापडावर देवदारूचीं हिरवीं पानं शिवून 'Many 'Happy Returns Of The Day'असं लिहून हें कापड आम्ही तंबूच्या दरवाज्यावर टांगणार आहों. पेन्सिलीनं अगोदर जर अक्षरं लिहून काढलीं, तर पानं शिवायला तेवढं बरं पडेल. अक्षरं काढून द्यायला मीं वहिनीला

सांगितलं--पण ती म्हणते, कीं, आपली ओळ सरळ नाहीं यायची म्हणून. त्यासाठीं आपणाकडे आलें आहें."

मनोहरपंतांनीं कमलेच्या हातांतून तें अलवान घेतलें, आणि तें नीट पाहून ते म्हणाले "बरें आहे. मी देतों लिहून तुम्ही म्हणतां तसें; पण आंखायला रूळ मिळेल तर बरें होईल. आहे का?"

"हो, आहे—हा आत्तां देतें आणून!" असें म्हणून कमला झटकन् निघून गेली.

रूळ व पेन्सिल आणून कमलेनें मनोहरपंतांच्या हातीं दिलीं. नंतर तीं तिघेंजणें लायब्ररीच्या दिवाणखान्यांत आलीं. अलवानाचा तुकडा तेथील टेबलावर पसरून मनोहरपंत म्हणाले "पिन्स आहेत का तुमच्याकडे? पिन्सनीं कापडाचा तुकडा टेबलावर ताणून धरला म्हणजे बरें होईल."

"आहेत पिन्स--देतें आणून!" असें म्हणून कमलेनें वडिलांचें टेबल उघडून त्यांतून पिनची डबी काढून मनोहरपंतांनां आणून दिली.

टेबलावर कापड ताणून बसवितांना मनोहरपंत ह्मणालें "तुमच्या ह्मणण्याप्रमाणं मी अक्षरें देतों काढून; पण माझ्या मनांत एक विचार आला आहे. इंग्रजींत लिहिलें नाहीं, तर नाहींका चालायचें?"

"तर मग मराठींत?"

"हो, तें बरें नाहीं का? मातापित्याचें कुशल चिंतायचें, तें आपल्या मातृभाषेंत चिंतणें बरें नव्हे का?"

"बरं तर–मराठींतच लिहूं या. तर मग याचं मराठी भाषान्तर काय बरं? सांगा पाहूं. 'या दिवसाचं पुष्कळ पुष्कळ सुखी परतणं'–छे, छे ग बाई! हें बाई भारीच ओंगळ!"

मनोहरपंत हंसले व विचार करून ह्मणाले "शब्दशः भाषांतर केलें, ह्मणजे, हें असेंच कांहींतरी व्हायचें! मुळांतला फक्त भाव उतरला भाषान्तरांत ह्मणजे झालें. 'ईश्वर करो'–ईश्वराचें नांव हें हवेंच अगोदर! तुह्माला काय वाटतें?"

कमला उत्साहानें ह्मणाली "हो हवंच तें! पण नुसतं असंच लिहिण्यापेक्षां जरा कवितेसारखं लिहिलं तर बरं दिसेल नाहीं?"

"हो, गद्यापेक्षां कविताच बरी दिसेल, हें उघड आहे."

"मग काय बरं लिहावं?" असें म्हणून कमला विचार करूं लागली.

" '**करो देव कृपा थोर**' असा जर पहिला चरण घातला, तर याच्याशीं काय जुळतें बरें?"

कमला अत्यंत उल्लसित हृदयानें म्हणाली "वा–वा! फारच चांगलं '**करो देव कृपा थोर**-वा–याच्याशीं '**येउ दिन हा वारंवार!**' हें चांगलं जुळेल!

## करो देव कृपा थोर,
## येउ दिन हा वारंवार!

वा–अगदीं किती नामी जुळलं पण! मनोहरपंत, आपण कवि आहांत का?"

मनोहरपंत हंसून म्हणाले "वा! मी कवि, का तुम्ही कवि? मला कांहीं यमक जुळवितां आलें नाहीं. तें जुळविलेंत तुम्हीं! अर्थात् कवियशाचा वांटा तुम्हाच मिळाला पाहिजे!

कमला हंसतहंसत म्हणाली "छे छे–असं कसं म्हणतां आपण? पहिला चरण तर आपला ना? अर्थात् साऱ्या कवितेवरहि आपलाच हक्क! पहिल्या चरणावरनंच ना मला दुसरा सुचला?"

"बरें, तसें का होईना!" असें ह्मणून रूळ व पेन्सिलीच्या साहाय्यानें मनोहरपंतांनीं कापडावर अक्षरें काढावयाला प्रारंभ केला.

कमला ह्मणाली "आपण अक्षरं काढतां आहां, तोंपर्यंत ती कुणाला तरी पाठवून बागेंतनं हिरवीं पानं आणवतें." असें ह्मणून ती निघून गेली; परंतु कांहीं वेळानें परत येऊन ह्मणाली "मनोहरपंत, जर दादा एकदम आला इथं, तर हें आपण लपवून ठेवा बरं का? त्याला दाखवूं नका!"

" कां बरं ? "

" उद्यां मी दादाला आश्चर्यानं थक्क करून टाकणार आहे अगदीं ! दादा तंबू शृंगारायला गेला आहे ना ? त्याला कांहीं आमचा इकडला हा बेत नाहीं ठाऊक ! त्याला हें कांहीं सांगूं नको, म्हणून वहिनीला मी सांगून ठेवणार आहें. उद्यां सकाळीं आम्ही जाणार आहों त्या वेळीं मी बसेन पुढच्या गाडींत, अन् गाडी थांबतांच पटकन् उतरून तंबूच्या दरवाज्यावर हें देईन टांगून ! आपण अन् बाबा यांच्याबरोबर जों दादा हळुहळू येतो आहे, तों हें दरवाज्यावर पाहून तो आश्चर्यानं थक्कच जाईल होऊन ! 'अरेच्या ! हा काय चमत्कार ! तंबूंतली सारी व्यवस्था ठीकठाक करून मी संध्याकाळीं गेलों, त्या वेळीं इथं कांहीं नव्हतं, अन् एकाएकीं हें कुठून आलं इथं ? एकाद्या वनदेवीनं येऊन तर हें इथं टांगलं नसेल?' असंच दादाला वाटेल ! " असें म्हणून कमला हंसतहंसत पुनः निघून केली.

मनोहरपंतांनां भेटून त्यांच्याकडून अक्षरें काढून घ्यावयाच्या कामीं आपणाला कसें यश आलें, हें जेव्हां कमलेनें सुशीलेला सांगितलें, तेव्हां ती हंसून आपणाशींच म्हणाली " खरंच बाई ! वन्सं आमच्या कुणालाहि नाहीं भ्यायच्या ! "

* * *

दुसऱ्या दिवशीं अगदीं पहांटेलाच घरांतील सारी मंडळी जागी झाली. अंधार असतांनाच आबासाहेबांनीं कोमट पाण्यानें चटकन् स्नान करून घेतलें. स्नानानंतर पीतांबर नेसून संध्या, ब्रह्मयज्ञ वगैरे उरकून ते देवांची पूजा करावयाला बसले. आज आपल्या जन्मदिवशीं प्रथम भगवंताचा आशीर्वाद मागितल्याशिवाय आपल्या आप्तेष्टांच्या अभिनंदनाचा स्वीकार करणें त्यांनां योग्य वाटलें नाहीं.

आबासाहेबांची पूजा व स्तोत्रपाठ बराच वेळ चालू होता. घरची मंडळी बाहेर बसून त्यांची वाट पहात होती. इतक्यांत अच्युतरावांनीं जाऊन मनोहरपंतांनां बोलावून आणलें. तेहि प्रातःकृत्यें आटोपून

निघण्याला तयार होऊन बसले होते. परंतु अच्युतरावांबरोबर ते आले ते जरासे खिन्नपणानेंच आले. 'आज आबासाहेबांचा वाढदिवस--इंग्रजी शिष्टसांप्रदाया–एटिकेट–प्रमाणें ' Many Happy Returns Of The Day' असें ह्मणून त्यांचें करमर्दन (शेकहँड) करावयाचा तर नाहीं ना प्रसंग येणार आपल्यावर? आणि तसें करणें ह्मणजे आपल्या मनाला भारीच चमत्कारिक वाटणार! बरें, न करावें, तर आपण पडलों घरचे पाहुणे–आपल्या अशा वर्तनानें आपल्या ठिकाणीं सौजन्याचा अभाव मात्र दिसून यावयाचा!' अशा तऱ्हेचे विचार मनोहरपंतांच्या मनाचा गोंधळ उडवीत होते. ते मोठ्या पंचायतींत पडले!

परंतु थोड्याच वेळांत मनोहरपंतांनां जो देखावा दृष्टीला पडला, त्यानें त्यांच्या मनाची ही विरक्ति संपूर्णपणें नाहींशी होऊन गेली. त्यांचें हृदय आनंदातिशयानें पुलकित होऊन गेलें.

पूजा समाप्त झाल्यावर आबासाहेबांनीं सर्वांनां हांक मारून ह्मटलें "तुह्मी सारी मंडळी आंत या बरें."

सर्व मंडळी देवघरांत आली. आबासाहेबांनीं सर्वांनां सांगितलें "तुह्मी पहिल्यानें श्रीकृष्णांला वंदन करा व मी ह्मणतों तें म्हणूं लागा." असें म्हणून ते गंभीरवाणीनें सांगूं लागले:—

**"नमो ब्रह्मण्यदेवाय गोब्राह्मणहिताय च।**
**जगद्धिताय कृष्णाय गोविन्दाय नमो नमः!"**

सर्वांनीं आबासाहेबांबरोबर गंभीर स्वरानें हा श्लोक म्हणून भगवंताला नमस्कार केला.

यानंतर आबासाहेबांच्या अभिनंदनाची पाळी आली. पहिल्यानें माई-साहेबांनीं त्यांच्या पायांवर मस्तक ठेवून त्यांनां प्रणिपात केला. "असूं दे, असूं दे," असें गद्गद कंठानें म्हणून त्यांचा हात धरून त्यांनीं त्यांनां वर उठविलें. त्या उभयतां पतिपत्नींत कांहींहि भाषण झालें नाहीं; परंतु एकमेकांच्या डोळ्यांची भाषा एकमेकांनां पुरी कळली. त्यानंतर अच्युत-राव, सुशीला, कमला आणि मधुकर या सर्वांनीं क्रमानें भक्तिभावपूर्वक

आबासाहेबांच्या चरणांना वंदन केलें. दोघांहि पुत्रांना मुकाट्यानें उठवून त्यांनीं क्षणभर आपल्या हृदयाशीं घट्ट धरलें. सूनबाई आणि मुलगी यांच्या मस्तकावर हात ठेवून आबासाहेबांनीं मनांतल्यामनांत त्यांना आशीर्वाद दिले.

सर्वांच्या शेवटीं मनोहरपंतांनीं जाऊन आबासाहेबांच्या चरणांवर मस्तक ठेविलें. त्यांना झटकन् उठवून हृदयाशीं धरून आबासाहेब गद्गद-कंठानें ह्मणाले " शतायु व्हा मनोहरपंत–सर्व सुखें भोगा !"

हें सर्व आटोपतें आहे, तों सूर्योदय झाला. सर्व मंडळी त्या पूर्ववर्णित खोलींत जाऊन बसली. सुशीला व कमला यांनीं स्वयंपाकघरांत जाऊन, दोन थाळ्यांत चहाच्या कपबशा, व शिऱ्याच्या बशा भरून त्या बाहेर आणल्या. प्रत्येकाला चहा व शिरा देऊन मनोहरपंतांजवळ येऊन सुशीला स्मितपूर्वक ह्मणाली "आजच्या दिवशीं तरी आपण नाहीं का चहा घेणार ?"

सुशीलेच्या कंठस्वरांत इतकें पावित्र्य, इतकी गंभीरता, इतकी स्नेहशीलता भरून राहिली होती, कीं, मनोहरपंतांचेंहि कठोर मन त्यामुळें अगदीं गळून गेलें ! ते ह्मणाले " बरें, द्या एक पेलाभर."

हा प्रकार पाहून अच्युतराव मनोहरपंतांकडे पाहून किंचित् मोठ्यानेंच हंसले व आपल्या मनाशीं ह्मणाले " खरेंच, सुशीला मोठी जादुगारीण आहे, यांत संशय नाहीं !"

हा 'असामान्य' देखावा पाहून कमलेलाहि आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं. तिच्या स्वभावाला आतां गप्प रहाणेंच शक्य नव्हतें. तिनें हंसून विचारलें " चहा कसा काय झाला आहे मनोहरपंत ?"

कमलेची ही खोंच मनोहरपंतांच्या ताबडतोब लक्ष्यांत आली. ते मोठ्यानें हंसून ह्मणाले " फार उत्तम झाला आहे !"

चहापान झाल्यानंतर मधुकरानें आणि कमलेनें सर्वांना अत्तर--गुलाब वांटून प्रत्येकाच्या हातीं एकएक पुष्पगुच्छ दिला.

बाहेर अंगणांत गाड्या तयारच होत्या. सर्वजणें त्यांत बसून वनभोजनाला जावयाला निघालीं. पुढील गाडींत बसावयाला कमला मात्र विसरली नाहीं.

---

## प्रकरण तिसावें.

## रावसाहेबांचा पोबारा !

संध्याकाळ होऊन रात्रहि पडली. देवमंदिरांत देवांच्या पूजेची तयारी होऊन उपाध्येबुवांनीं पूजेला उठण्याविषयीं यजमानसाहेबांनां बोलावणें पाठविलें; परंतु 'मला बरें वाटत नाहीं–पूजाआरती तुह्मीच घ्या आज उरकून ' असा जरा चमत्कारिक तऱ्हेचा उलट निरोप रावसाहेबांकडून उपाध्येबुवांनां आला. बनगांवच्या इनामदारांच्या वाड्यांत दिवाळीच्या चार दिवसांत अन्नकूटाचा महोत्सव होत असे, आणि त्यांत अमावास्येचा दिवस विशेष महत्त्वाचा समजला जाऊन अन्नदान, ब्राह्मणभोजन वगैरे त्या दिवशीं मुक्तहस्तानें होत असे. या चारहि दिवशीं देवांची पूजाआरती स्वतः यजमानांनीं करावयाची वहिवाट आज अनेक वर्षांपासून चालत आलेली होती. यामुळेंच आज रावसाहेबांकडून असा निरोप आल्यामुळें सर्वांनां जरा आश्चर्य वाटत होतें.

ज्या वेळीं देवमंदिरांत तास, झांजा, टाळ, यांच्या मिश्रध्वनींत मोठ्या थाटानें आरती चालली होती, त्या वेळीं रावसाहेबांची स्वारी आपल्या खोलींत बसून कर–कर विचार करीत होती. आरतीचा पवित्र मंगल ध्वनि ऐकून एकवार तिकडे जाऊन देवांनां चटकन् वंदन करून यावें, असा विचार त्यांच्या मनांत कितो वेळ तरी आला असेल; परंतु तेथें जमलेल्या लोकसमुदायापुढें जावयाचें धैर्य कांहीं केल्या त्यांनां आज होईना ! तसें करावयाला त्यांच्या मनांत अत्यंत संकोच वाटूं लागला. ' जावें हें बरें; गेलें हें पाहिजेच ! ' असें त्यांच्या मनाला वाटे मात्र; परंतु तिकडे जावयाला कांहीं केल्या त्यांचें पाऊल मात्र उचलत नव्हतें. आपल्या निर्जन अशा

खोलींत रावसाहेब बसले असतां त्यांच्या मस्तकाच्या दारुण विचारांनीं चिंधड्याचिंधड्या उडण्याची वेळ आली !

आरती, मंत्रपुष्प होऊन सर्व गडबड शांत झाल्यावर सुमारें दहापंधरा मिनिटांनीं रावसाहेबांनीं आपल्या कारभाऱ्यांनां बोलावणें पाठविलें.

कारभारी आल्यावर ते म्हणाले "त्रिंबकराव, कांहीं अतिशय जरूरीच्या कामाकरतां आज रात्रींच्या रात्रीं मला मुंबईला जायला निघालेंच पाहिजे!"

हें ऐकून कारभाऱ्यांनां भारी आश्चर्य वाटून ते ह्मणाले "आज रात्रीं ! आजच रात्रीं गेलें पाहिजे श्रीमंतांनां ?"

खालीं मान घालून रावसाहेब ह्मणाले "हो, आजच–आतांच निघालें पाहिजे मला. मेणा तयार ठेवायला सांगा."

कारभारी होते वृद्ध–अर्थात् जुन्या रीतीभातीचे. अमावास्येच्या दिवशीं इनामदारसाहेब घरांतून प्रवासाला बाहेर पडणार, हें ऐकून त्यांनां आश्चर्य तर वाटलेंच; पण वाईटहि वाटल्यावांचून राहिलें नाहीं. कांहीं वेळ स्तब्ध राहून ते ह्मणाले "आजची रात्र इथेंच काढून उद्यां सकाळीं गेलें तर नाहीं का चालायचें ? आज अमावास्या ह्मणून —"

रावसाहेब वर मान करून म्हणाले "अमावास्या असली म्हणून काय झालें ? आज योगबीग सगळे चांगले आहेत. उत्तमांपैकीं आजचा दिवस आहे. मघाशींच मीं पंचांग पाहिलें. शिवाय, माझ्याजवळ 'मुहूर्तदर्पण' ह्मणून एक शिळाछापावरचें पुस्तक आहे जुनें–त्यांतहि मीं पाहिलें. त्यावरून अमावास्या असली, तरी आजचा दिवस प्रवासाला शुभ आहे, असेंच ठरतें. तें असो म्हणा. भारी जरूरीचें काम आहे. तेव्हां मला गेलें हें पाहिजेच. मुहूर्ताबिहूर्ताकडे थोडेंसें दुर्लक्ष्यच केलें पाहिजे. मुंबईजवळ माझ्या एका स्नेह्याची मोठी थोरली वाडी आहे. तिची किंमत आहे दहाएक हजार रुपये. पण त्याला पैशांची अतिशय जरूर असल्यामुळें तो ती कशी तरी काढून टाकतो आहे–अगदीं निवळ पाण्याच्या भावानें म्हणाना ! दोनएक हजारांनां ती वाडी आपल्या हातीं पडण्याचा संभव आहे. मुंबईला आम्हाला कामाकाजासाठीं म्हणा,

चैनीनें म्हणा वारंवार जावेंयावें हें लागतेंच. तिथें जायचें म्हणजे उगीच दुसरीकडे उतरावें लागतें. म्हणून मुंबईला जवळपास आपल्या सत्तेचें एकादें लहानसें घर असावें, असा आज पुष्कळ दिवसांचा माझा हेतु आहे–म्हणजे वाटेल तेव्हां उतरायसवरायला बरें पडेल. अन् माझा तो हेतु पुरा व्हायचा सुयोग हा आज आयता चालून आला आहे. म्हणून म्हणतों, घ्यावी ही संधि साधून--पुनः कांहीं असा लग्गा नाहीं साधायचा. वसुलाच्या पैशांतून दोन हजार रुपये मला आतांच्या आतां आणून द्या–दहादहा रुपयांच्या नोटा असतील, तर बरें होईल."

त्र्यंबकराव ह्मणाले " ठीक आहे हुजूर! नोटाच देतों आणून. तिथें बरेच दिवस लागतील वाटतें?"

" छे छे–कांहीं फार नाहीं लागायचे."

" उतरणार कुठें मुंबईला? सरदारगृहांतच ना नेहमींप्रमाणें?"

" तें कांहीं आतांच नाहीं मला सांगतां येत. तुह्मी नोटा बांधून तयार करून ठेवा. हा मी निघालोंच ह्मणाना. मी जातों आहें मुंबईला–बाबूहि घरीं नाहीं आहे–नीट संभाळा. उत्सवबित्सव नेहमींप्रमाणें नीट यथास्थित होऊं द्या. माझ्या जागीं तुह्मीच आहां असें समजा. सगळी व्यवस्था मी तुमच्यावर सोंपवून जातों."

" जशी हुजुरांची आज्ञा." असें ह्मणून त्र्यंबकराव निघून गेले.

रात्र होत चालली होती. रावसाहेब आंत जेवावयालाहि गेले नाहींत. ' दुपारच्या जडान्नामुळें आपणाला जेवायचें नाहीं; थोडें फराळाचें पाठवून द्या इथेंच ह्मणजे झालें,' असा त्यांनीं आतेबाईंना निरोप पाठविला. घरांत जावयाला रावसाहेब भीत होते. एकदां रमाबाईंची गांठ पडली, म्हणजे ' कुठं जायचं? कां जायचं?' अशी त्यांची आपणामागें भुणभुण लागणार, आणि ती कांहीं या वेळीं आपणाला सहन नाहीं होणार, असें रावसाहेबांना वाटत होतें. फराळाचें घेऊन तरी आपल्या पत्नीसाहेबच येतात कीं काय कोण जाणे, अशीहि त्यांना आशंकाच होती; परंतु एका

शागीर्दानें तें आणलेलें पाहून रावसाहेबांचें मन त्यांतल्यात्यांत थोडें स्वस्थ झालें.

फराळ झाल्यावर रावसाहेब प्रवासाच्या तयारीला लागले. इतर प्रसंगीं मुंबईला जातांना ज्या नोकराला ते नेहमीं बरोबर घेत असत, तोहि आपली जावयाची तयारी करूं लागला होता; परंतु रावसाहेब त्याला म्हणाले " अरे, आज तूं नको येऊं माझ्याबरोबर. "

हें ऐकून तो बिचारा आंबट तोंड करून स्वस्थ बसून राहिला.

बनगांवापासून रेल्वेस्टेशन तीनसाडेतीन कोस होतें. सहा भोई व दोन मशालजी अमावास्येच्या अंधकारांतून रावसाहेबांचा मेणा घेऊन रेल्वे-स्टेशनकडे चालले होते. सवातासाच्या आंत त्यांनीं इनादारसाहेबांनां स्टेशनावर आणून सोडलें.

मेणा खालीं उतरल्यानंतर सुमारें पांचसात मिनिटें रावसाहेबांनां कांहीं मेण्यांतून बाहेर पडण्याचा धीर झाला नाहीं. 'असेंहि होण्याचा संभव आहे, कीं, कदाचित् संध्याकाळींच पोलीस आपणांला गिरफदार करण्याकरतां बनगांवला आले असतील, आणि इनामदार मुंबईला चालले आहेत, असें त्यांनीं तेथें ऐकलें असेल. वाड्यांत लोकबीक जमलेले पाहून येथें पकडून सर्वांचा घोंटाळा उडविण्यापेक्षां आरोपीला आयता स्टेशन-वरच पकडावा, असा विचार करून ते येथें आले असतील,' अशी कल्पना रावसाहेबांच्या मनांत धाकधूक करीत असल्यामुळें ते एकदम मेण्या-बाहेर पडले नाहींत. अशा प्रकारच्या दारुण चिंतेनें रावसाहेबांचें हृदय सारखें धडधडत होतें.

शेवटीं, मेण्याच्या बाहेर तर ते पडले. कोणी कोठेंच नाहीं! गाडीला अजून अर्धा तास अवकाश आहे, असें त्यांनां आढळून आलें. त्यांच्या बरोबर फक्त एक पोर्टमँटो होता. एका भोयानें तो हातीं घेतला. जवळ-जवळ अंधकारमय अशा प्लॅटफॉर्मवर जाऊन रावसाहेब एका बांकावर बसले.

परंतु कांहीं केल्या त्यांच्या हृदयांतून भयाची धडकी ह्मणून जाईना! जर पोलीस धरावयाला आले, तर काय करावयाचें, या एका विचारानें त्यांच्या मनाची अवर्णनीय स्थिति होऊन गेली. पोलीस आपणाला धरून नेत आहेत, स्टेशनवरील मंडळी व उतारू आपल्याभोंवतीं जमून आपल्याकडे पाहून हंसत आहेत, अशा तऱ्हेचा भेसूर देखावा त्यांच्या डोळ्यांसमोरून हलेना! कोठें खुट्ट झालें, कीं, ते चमकून उठत. शेवटीं, असल्या भयप्रद विचारांतून मनाची सुटका करण्याकरितां त्यांनीं बॅग-मधून चिरूट काढून तो शिलगावला व ओढावयाला आरंभ केला.

इतक्यांत तिकिटाची घंटा वाजली. रावसाहेब उठून तिकीटऑफिसा-जवळ गेले. तिकीटमास्तर ओळखीचा न निघेल तर बरें, असें त्यांनां वाटूं लागलें. ऑफिसांत शिरून ते पहातात, तों मास्तर पंचवीसएक वर्षांचा तरुण गृहस्थ असून त्यानें अंगांत एक जुना आल्पाकचा कोट घातला आहे. डोकीला केंस ठेवले आहेत. ऐटीनें सिगारेट ओढीत तो तिकीटविक्री करीत होता. त्याचा चेहरा पाहून हा आपल्या ओळखीचा असावा, असें कांहीं रावसाहेबांनां वाटलें नाहीं. जवळ जाऊन ते ह्मणाले "मला एक फर्स्ट क्लास तिकीट द्या मुंबईचें."

मास्तर चटकन फिरून, रावसाहेबांकडे पाहून दंतप्रदर्शन करून ह्मणाले "ओहो, कोण? आपासाहेब! ठीक आहे ना? गुडनाईट!" असें म्हणून त्यांनीं मान वांकवून नमस्कार केला.

हें पाहून रावसाहेबांची नखशिखान्त आगीआग होऊं लागली; परंतु मनांतला राग मनांतच दाबून ते म्हणाले "ठीक आहे-आपण खुशालना?"

"आहे, खुशाल आहे आपल्या कृपेनें. आपण मला 'आपण' म्हणून म्हणतां आहां! मला वाटतें मला अजून ओळखलें नसावें."

"हो-नाहीं ओळखलें अजून."

"जी-माझें नांव राजाबापू-राजाराम जोशी. लहाणपणीं आपले धाकटे बंधु बाबूराव यांच्याबरोबर मी शाळेंत शिकत होतों. बाबु-

रावांबरोबर आपल्या वाड्यांत मी किती तरी वेळ गेलों आहें, खाल्लोंप्यालों आहें." असें म्हणून मास्तरसाहेबांनीं पुनः दंतविकास केला.

" हो-असेल तसें. पुष्कळ वर्षें झालीं कीं नाहीं या गोष्टींना, म्हणून नाहीं आठवत."

" माझें घर तिरवडीला—ठाणवाडीजवळ. आपल्या बनगांवपासून कांहीं फार दूर नाहीं. माझें मोठें दैव, म्हणूनच आज आपली पुष्कळ वर्षांनीं गांठ पडली आहे ही. अगदीं लहाणपणीं आपणाला पाहिलें होतें मीं. त्यानंतर किती वर्षांत दर्शन नाहीं आपलें. तीन महिने झाले इथें माझी बदली झाल्याला. खरेंच सांगतों आपासाहेब आपणाला— या रेल्वेच्या नोकरींत कांहीं तिळभर देखील सुख नाहीं पहा–नुसती हमालगिरी आहे ही. एक पाय ऑफिसांत अन् एक पाय तुरुंगांत– कुठें कधीं ' कोलिझन ' होईल याचा कांहीं नेम नाहीं, अन् मग चला दगड फोडायला ! बरं पगार तरी एक बुवा मोठा असता–तर तुपासाठीं तरी उष्टें खातों, असें म्हणून मनाचें समाधान केलें असतें. हीं पांच वर्षं मी हमालगिरी करितों आहें–पण पगार सारा पंचवीस रुपड्या! 'प्रमोशन' द्यायचें म्हणजे अगदीं जिवावर येतें यांच्या! अहो, रात्रंदिवस, जागजागून हाडाचीं काडें करतों आहें–रक्त देखील जळून गेलें—"

इतका वेळ अतिशय धीर धरून उतारूमंडळी रुपये, खुर्दा मुठींत घेऊन बाहेर तिकीटाच्या खिडकीशीं उभी होती. त्यांनीं आतां गडबड करावयाला आरंभ केला ' मास्तर, तिकीट द्या ना ? किती वेळ आम्हीं इथें उभें रहायचें ? ' ' मास्तर, द्या की आतां तिकटी-ह्यो गाडीचा वखत् झाला ना अगदीं ! ' असें म्हणत लोक आरडाओरड करूं लागले. " आः ! ओरडून शिंच्यांनीं डोकें पिकवायची वेळ आणली आहे पहा– अरे होहो–सबूर–जरा दम धरा. देतों तिकिटा." असें म्हणून राजाबापूंनीं पुढें आपली कहाणी सांगायला आरंभ केला "हां–काय बरें सांगत होतों मी आपणाला अप्पासाहेब ? हं–पगार तर हा असा, अन् कामांत कुठें एवढीशी चूक सांपडली कीं खाडकन् रुपयाभर दंडाची दक्षणा ! गेल्या

महिन्यांत मला सणसणीत तीन रुपये भूदंड पडला हो !–झालें काय—आहे ठाऊक !—"

आतां उतारूमंडळीचा सारा धीर जाऊन ते पंचमांत ओरडूं लागले. इकडे बाहेरहि ठणठण अशी घंटा वाजूं लागली. सिग्नलमन् दाराशीं उभा राहून विचारूं लागला " मास्तर, गाडी डाउन मागते आहे. "

" ओः–ट्रेन आली वाटतें !—दे, डाउन दे–आपणाला काय मुंबईचें एक फर्स्टक्लास ? सिंगल का रिटर्न ? सिंगल–अच्छा ! " असें म्हणून राजाबापूंनीं रावसाहेबांनां तिकिट दिलें व दुसऱ्या मंडळीकडे ते आतां लक्ष्य देऊं लागले; परंतु सगळ्यांनां तिकिटें मिळण्यापूर्वीं भपभप करीत गाडी स्टेशनांत येऊन दाखल झालीहि ! तेव्हां मास्तरसाहेबांनां उतारूमंडळी पुष्कळ आणाशपथा घालीत असतांहि 'नहीं अबी !' असें अर्धस्फुट स्वरांत म्हणून जोरानें झटकन् दार बंद करून, टोपी डोकीवर चढवून हातांत कंदिल घेऊन ते झटकन् ऑफिसांतून बाहेर पडले.

रावसाहेब गाडींत चढले. आपल्या डब्यांत कोणीच नाहीं, असें त्यांच्या दृष्टीला पडल्यामुळें त्यांनां अतिशय बरें वाटलें. आपण बहुतेक आतां ' अकुतोभय ' आहों, अशी त्यांची खात्री झाली.

बाहेर अमावास्येचा सूचिभेद्य अंधकार. आकाशांत तारे मिटमिट करीत आपणाकडून प्रकाश पाडण्याचा विफल प्रयत्न करीत होते. कंपार्टमेंटच्या उघड्या खिडक्यांतून थंडगार वारा वेगानें आंत येऊं लागला. दिव्यावर आवरणवस्त्र चढवून, बांकावर हातपाय मोकळे सोडून, छातीवर हात एकमेकांत गुंतवून ठेवून रावसाहेब बाहेर पहात राहिले. हळूहळू त्यांच्या छातींतील धडधडणें कमी होऊन त्याला स्वाभाविकता प्राप्त झाली. कपाळावर उठलेले घर्मबिंदु हळुहळू सुकून गेले. शांतपणानें विचार करावयाला त्यांनां आतां यथेच्छ अवकाश मिळाला.

रावसाहेब विचार करूं लागले " आज बाळ्या, सख्या किंवा कुणीच ठाण्यावर गेले नाहींत, असें स्पष्ट दिसतें. कदाचित् आज ते आपापसांत पुढें काय करावें, कोणते उपाय योजावे, याबद्दल खल. करीत असतील.

बहुतकरून उद्यां सकाळीं ते ठाण्यावर जातील; पण तोंपर्यंत आमचे केशवरावहि तेथें जाऊन पोंचतीलच कीं! काय वाटेल तें करून सर्वांची समजूतबिमजूत घालून ते चहूंकडे स्थिरस्थावर करायचा प्रयत्न करतील, यांत कांहीं संशय नाहीं. केशवराव भारी हुषार अन् धोरणी माणूस आहे. कुठें, काय, कसें वागावें, हें त्याच्यासारखें जाणणारा माणूस विरळा! पण समजा, नाहींच त्यांनां कुठें यश आलें, तर ती मंडळी माझ्याविरुद्ध खात्रीनें फिर्याद दाखल करणार. बनगांवला ते आले, म्हणजे मी मुंबईला निघून गेलों, असें त्यांनां कळून येईल. माझा मुंबईचा पत्ता कांहीं त्यांनां खास मिळत नाहीं. मी मुंबईला गेलों, कीं, नेहमीं कुठें उतरतों हें कांहीं त्रिंबकराव किंवा कुणीच पोलिसांनां सांगणार नाहीं. पण एक गोष्ट मी अजीबातच लक्ष्यांत नाहीं घेत आहें. बाबूनें माझा पत्ता त्यांनां सांगितला तर? तो खात्रीनें त्यांनां देणार सांगून सरदारगृहाचा माझा नेहमींचा पत्ता. मग बहुधा उद्यां संध्याकाळच्या गाडीनें पोलीस मला धरण्यासाठीं मुंबईला निघणार. पण ते जों मुंबईला जाऊन पोंचताहेत, तों मी कुठेंच्या कुठें!"

याप्रमाणें विचार करतांकरतां गाडीचें आंदोलन व शीतल वायुलहरि यांच्या प्रभावानें रावसाहेबांनां झोंप येऊं लागली. तेव्हां पोर्टमँटो उशाला घेऊन ते झोंपीं गेले.

---

## प्रकरण एकतिसावें.

## 'जायचें कुठें? अन् करायचें काय?'

रावसाहेबांनां ताबडतोब झोंप लागली; परंतु ती चांगली गाढ लागली नाहीं: त्यांनां लवकरच एक स्वप्न पडूं लागलें:—

जणूं काय रावसाहेब मुंबईंत कोटांतल्या हॉर्नबी रस्त्यावर आळसानें इकडूनतिकडे येरझारा घालीत होते. तेथल्या मोटमोठ्या भपकेदार इंग्रजी कंपन्यांच्या दुकानांतील असंख्य तऱ्हेच्या सुंदर सुंदर वस्तु पाहून त्या



"पण नुसतं असंच लिहिण्यापेक्षां जरा कवितेसारखं लिहिलं तर बरं दिसेल नाहीं ?"

(पृष्ठ ३२५.)

विकत घेण्याला मनाची प्रवृत्ति अत्यंत प्रबल होत असे. एका रत्नविक्रे-त्याच्या दुकानाच्या विस्तीर्ण बहिर्भागाला मोठ्या थोरल्या कांचा लावल्या असून आंत नानाप्रकारचीं सुंदर सुंदर रत्नजडित सोन्यारुप्याचीं घड्याळें, छेडे, आंगठ्या, ब्रोच, कंठहार वगैरे अलंकार अत्यंत हृदयहारि रीतीनें मांडून ठेविले होते. मध्येंमध्यें एकएक विद्युद्दीप तेवत होता. त्या अलं-कारांची व पदार्थांची घडण आणि त्यांचें पॉलिश पाहून नजर अगदीं खिळून जाई! रावसाहेब त्या दुकानापाशीं उभे राहून लुब्ध दृष्टीनें आंतले जिन्नस पाहूं लागले. याप्रमाणें एकदोन मिनिटें ते तेथें उभे आहेत, इतक्यांत आपल्या खिशांत कोणाचा तरी हात गेला आहे, असा त्यांनां भास झाला. क्षणार्धांत त्यांनां आढळून आलें, कीं, एक भामटा आपलें पैशांचें पाकीट लांबवून सारखा धूम पळत सुटला आहे. रावसाहेब 'चोर चोर!' असें ओरडत त्याच्या पाठोपाठ धांवण्याचा प्रयत्न करीत होते; परंतु कांहीं केल्या त्यांनां धांवतांच येईना! त्यांचे पायच मुळीं उचलेनात! कोटांतल्या फूटपाथवर जणूं काय कोणीं भिजविलेल्या डिंकाच्या राशीच्याराशी आणून ओतल्या आहेत! धांवूं लागावें, तों पायच जमिनीला चिकटल्यासारखा होई! इतक्यांत एकाएकीं दोन्ही दिशांकडून दोन पोलिस कॉन्स्टेबलनीं येऊन आपणाला धरलें, असें रावसाहेबांनां आढळून आलें. ते अगदीं गयावयां करून ह्मणाले "अहो, असे मला कां धरतां? तो चोर माझें पाकीट चोरून पळून चालला आहे, त्याला धरा जाऊन अगोदर!" हें ऐकून त्या कॉन्स्टेबलपैकीं एकजण त्यांनां दरडावून म्हणाला "चोर कोण, अन् साव कोण, तें कळेल तुला आतां लवकरच—तूं अगोदर पोलिसचौकीवर चल!" असें ह्मणून रावसाहे-बांच्या हातीं हातकड्या अडकवून त्यांनां ओढीतओढीत त्यांनीं पोलिस-स्टेशनवर नेलें आणि त्यांनां आपल्या मुख्य साहेबासमोर उभें केलें. साहेब त्या वेळीं नुकतेच झोंपेंतून उठले होते. डोळे मिटून त्यांनीं एक दोन वेळ जांभया दिल्या व तीनचार वेळ चुटक्या वाजवून ते ह्मणाले

"मला नाहीं आतां वेळ; हा आपला गुन्हा कबूल करीपर्यंत याला त्या खोलींत कोंडून ठेव." स्टेशनमध्येंच आडवे रेजे मारलेल्या लहानलहान खिडक्या असलेली एक खोली होती, आणि मोठें आश्चर्य हें, कीं, ती खोली सारखी हलत असून जणूं काय पुढेंपुढें धांवतच होती ! या खोलींत हिंदु, मुसलमान, पार्शी, साहेब वगैरे सर्व जातींचे स्त्रीपुरुष बसले होते. ज्यांनां जागा मिळाली होती, ते खुशाल तण्णावून पडले होते; ज्यांनां बसावयापुरतीच जागा मिळाली होती, ते बसल्याबसल्याच डुकल्या घेत होते. कांहीं मंडळीला तर नुसती उभें रहाण्यापुरतीच जागा मिळाली होती ! रावसाहेबांनां त्या खोलीच्या ज्या एका डुलत्या भागांत जागा देण्यांत आली होती, तेथें यथेष्ट जागा असून तेथें मऊमऊ गाद्याहि पसरल्या होत्या. त्यांनीं त्यांपैकीं एका गादीवर सपाटून तण्णावून दिली ! त्यांनां थोडीबहुत कोठें झोंप लागते न लागते, तों ती चालती खोली एकाएकीं थांबली, व त्याबरोबर जो हादरा बसला, त्यानें त्यांची झोंप उडाली.

आणि खरोखरच रावसाहेब या वेळीं जागे झाले आणि कान देऊन ऐकतात, तों बाहेर पोर्टर 'पुणें–पुणें' ह्मणून ओरडत आहेत ! रावसाहेबांनां चांगली सडकूनच झोंप लागली होती !

रावसाहेब ताडकन् उठून बसले. पुढें मुंबईकडे न जातां येथेंच उतरावें कीं काय, याबद्दल त्यांनीं विचार केला, परंतु पुण्याला उतरण्यांत फायदा काय, हें त्यांच्या लक्ष्यांत येईना ! पुढें मुंबईकडे जावें, व तेथून कोठें दडी द्यावी, हें तेथेंच ठरवावें, असा त्यांनीं विचार केला

मुंबईकडे जाणारी पूनामेल स्टेशनमध्यें उभीच होती. तिच्या फर्स्ट क्लासमध्यें रावसाहेब जाऊन बसले. या वेळीं फक्त एक मुसलमान गृहस्थच त्यांच्या कंपार्टमेंटमध्यें होते. परंतु त्यांचा स्वभाव बराच कुढा दिसला. ते रावसाहेबांशीं बोलण्याला बिलकूल उत्सुक दिसले नाहींत; पण हें एका अर्थी त्यांच्या पथ्यावरच पडलें.

रावसाहेबांची झोंप आतां चांगलीच उडाली होती. परंतु कांहीं केल्या रात्रीं पडलेलें तें ढळढळीत स्वप्न त्यांच्या डोळ्यांसमोरून हलेना. पहिल्यानें त्यानें त्यांनां वाटलें, कीं, या दुःस्वप्नाचा उगम भयापासून असावा. 'पोलिस पोलिस' असा सारखा विचार करीत असतां आपणाला झोंप लागली, तेव्हां निद्रावस्थेंतहि पोलिसांनीं आपणाला धरल्याबद्दलचें स्वप्न आपणाला पडलें. एका सुप्रसिद्ध ग्रंथकर्त्याचें वाक्य त्यांनां आठवलें:–स्वप्न ही केवळ एक भ्रान्त कल्पना आहे. आपण जागेपणीं ज्या गोष्टींचें चिंतन करीत असतों, त्याच गोष्टी त्या रात्रीं आपणाला स्वप्नांत दिसतात!–त्यांनीं आपली बॅग उघडून एक चिरूट काढून तो शिलगावला व त्याचे फूत्कार सोडीत ते स्वस्थ बसले.

जोरानें शीळ फुंकून गाडी चालूं लागली. रावसाहेबांचें मन त्यांतल्यात्यांत कांहींसें स्वस्थ झालें होतें. स्टेशनामागें स्टेशनें जाऊं लागलीं. खंडाळ्याच्या स्टेशनवर रावसाहेबांचे 'सहप्रवासी' उतरून त्यांनां अगदीं पूर्ण एकान्त मिळाला. पुनः त्यांच्या विचारांनीं जोरानें उचल खाल्ली. त्यांनां पुनः वाटूं लागलें, त्या ग्रंथकाराचा सिद्धान्त खरोखरच सत्य असेल का? स्वप्नदेवतेनें आपणाला सावध करण्याचा प्रयत्न केला असेल–असेंहि होणें शक्य आहे! कदाचित् त्या पोलिसनें मुंबईच्या पोलिसला आपणाला पकडण्याविषयीं तार केली असेल–मुंबईला पोहोंचतांच आपल्या हातांत कड्या पडतील! कदाचित् कल्याणला आपणासाठीं मुंबईपोलिस येऊन बसलें असेल. मग तसें असेल तर सर्वनाश! हाय, आपण पुण्यालाच कां नाहीं उतरलों? कर्जतला उतरावें काय? –छेः नको! धीर करून कल्याणपर्यंत तर जावेंच. मग पुढचेंपुढें पहातां येईल. कल्याणला पोलिस जर कदाचित् येऊन बसलें असेल, तर तें आपणाला ओळखणार कशावरून? आपल्या तिकीटावरूनच ना? मग काय करावें? तिकीट द्यावें का फेंकून? सांगावें विचारलें तर तळेगांवाहून आलों म्हणून! किंवा कर्जतला चढलों म्हणून! आपलें तिकीट हरवलें! पुण्याहून डबल चार्ज घेतील—घेवोत! असा विचार मनांत येतांच

रावसाहेबांनीं खिशांतून तिकीट बाहेर काढलें व खिडकींतून हात बाहेर काढून तें हातांतून सोडून दिलें. परंतु त्याच वेळीं वाऱ्याचा जबरदस्त झोत लागून तें तिकीट पुनः आंत रावसाहेबांच्या पायांशीं येऊन पडलें!

हें पहातांच रावसाहेबांच्या मनाला अतोनात धीर आला. ते विचार करूं लागले, आलें आतां लक्ष्यांत! पोलिस कांहीं अजून स्टेशनावर येऊन पोहोंचलें नाहीं. हरवलेल्या तिकिटाबद्दल दुप्पट भाडें घेण्याचा जो गोंधळ उडाला असता, त्या गोंधळांत पोलिस येऊनहि ठेपलें असतें. देवानेंच तिकीट परत पाठवून आपलें रक्षण केलें असावें. तिकिटकलेक्टर तिकिटें गोळा करील आणि सारें काम गुपचुप पार होईल! परमेश्वरानें ज्याअर्थी आपणाला आश्वासन दिलें आहे, त्याअर्थी बिलकूल न भितां आपण मुंबईला तर जावेंच आणि तेथून रेल्वेनें कोठें तरी जाण्यापेक्षां शेजारीं कोंकणांतच कोठें तरी दडी द्यावी पनवेलबिनवेलकडे! आपण रेल्वेनेंच कोठें तरी जाऊं, अशीच सर्वांची कल्पना असेल; आणि त्याच दिशेनें आपला शोध चालेल. तेव्हां मुंबईहून कोंकणांतच शिरणें श्रेयस्कर आहे! तिकडे आपला शोध लागणें बिलकूल असंभवनीय आहे! मात्र बोटीनें न जातां गाडीनेंच जावें, असा त्यांनीं विचार केला.

पहातांपहातां मेल कल्याण स्टेशनमध्यें शिरली. भयविव्हल हृदयानें रावसाहेबांनीं खिडकींतून हळूच बाहेर मान काढून पाहिलें—परंतु पोलिसची गडबड वगैरे कोठेंच दिसेना! हळुहळू मिनिट गेलें, दीड मिनिट झालें, गाडीनें शिटीहि दिली. तरी भयाचें चिन्ह कोठेंच कांहीं नाहीं! हें पाहून रावसाहेबांना आपल्या छातीवरील एक प्रचंड बोजा उतरल्यासारखें वाटलें.

तासाभरानें मेल बोरीबंदरवर येऊन पोहोंचली. तेथेंहि रावसाहेबांना पोलिसची गडबड दिसली नाहीं. पोर्टमँटो हातीं घेऊन ते प्लॅटफॉर्मवर उतरले. एका व्हिक्टोरियावाल्यानें त्यांना गांठून विचारलें "कुठें जायचें रावसाब?"

रावसाहेबांनीं एकदम उत्तर दिलें "पनवेल."

व्हिक्टोरियावाला जरा गोंधळांत पडला; परंतु तो चटकन् ह्मणाला "चला या साहेब--बारा आणे. गाडी फस्ट कलास आहे साहेब—"

रावसाहेब आपल्याच विचारांत चूर असल्यामुळें कांहींच बोलले नाहींत. इतक्यांत आणखीहि दोनतीन गाडीवाल्यांनीं त्यांना घेरलें व "कुठें जायचें? कुठें जायचें रावसाब?—" असा त्यांच्यावर प्रश्नांचा सारखा मारा सुरू केला.

परंतु पहिल्या गाडीवाल्यानें "अर, चला तुह्मी ल्येको!" असें ह्मणून सर्वांना धुडकावून लावून तो रावसाहेबांना ह्मणाला "आतां दहा आणे द्यायच हैती काय रावसाब? त्याच्यापेक्षां कांहीं या वेळीं कमती नाहीं यायचा कुणी—"

असें ह्मणून त्या गाडीवाल्यानें रावसाहेबांच्या हातांतला पोर्टमँटो आपल्या हातीं घेतलाच. रावसाहेबहि त्याच्या मागोमाग गाडींत जाऊन बसले. गाडी चालूं लागली.

सुमारें वीसएक मिनिटांत गाडी भाऊच्या धक्क्यावर येऊन थांबली. रावसाहेब आपल्याच विचारांत अगदीं गुंग होऊन गेले असल्यामुळें आपण कोणीकडे चाललों आहों, हें त्यांच्या लक्ष्यांत नव्हतें. गाडी थांबतांच ते चटकन् शुद्धीवर येऊन ह्मणाले "अरे, हें रे काय? इकडे कुठें आणलेंस मला तूं?"

"हा भाऊचा धक्का नव्ह का रावसाब?"

"भाऊचा धक्का! पण इकडे कशाला मला आणलेंस?"

"इथूनच बोट सुटते नव्ह का रावसाब?"

"बोट सुटते? कसली बोट?"

"बोट–आगिनबोट–इष्टीमर?"

"आगिनबोट सुटत असली तर मला काय त्याचें? मी तुला पनवेलला न्यायला सांगितलें होतें!"

"मग इथूनच पनवेलला जातात्यी! आतां इतक्यांत सुटल बोट—"

"अरे, मी पायरस्त्यानें जाणार होतों पनवेलला!"

म्हणवीत असत, तरी त्यांच्या या कर्मठपणांत आणि 'जुन्या'च्या अभिमानांत गोवानीजच्या हातच्या चहाच्या पानाचीहि गणना होत असे!

तासांमागून तास जाऊं लागले. पद्मावती बोट पहिलें बंदर जयगड हें घेणार होती. नेहमींप्रमाणें म्हटलें म्हणजे रात्रीं अकराबारांच्या सुमाराला बोट जयगडला लागावयाची; परंतु संध्याकाळीं बोट हर्णैच्या सुमारानें आली आणि तिचें एंजिन जें बिघडलें, तें कांहीं केल्या दुरुस्तच होईना! बोटीच्या एंजिनियरनें, कप्तानसाहेबांनीं आणि इतर कामगारांनीं बोट चालू होण्याविषयीं आपणांकडून शिकस्त करून पाहिली—परंतु रामाचें नांव! कांहीं केल्या एंजिन रुसलें आहे कोठें, याचा त्यांनां पत्ताच लागेना.

अशा स्थितींत एक तास गेला, दोन तास गेले—तरी बोट जागच्या-जागींच उभी! उतारूमंडळीच्या धैर्यधारणेची आतां कमाल होऊन ते आतां उघडउघड कामगारमंडळीला, आगबोट कंपनीला—आरंभीं हळुहळू आपसांत आणि नंतर मोठ्यानें—अपशब्दांची लाखोली वाहूं लागले! मुंबईहून दुसरी बोट येऊन पद्मावतीला परत मागें न्यावी लागेल, अशीहि खलाशांत आणि उतारूमंडळींत चर्चा सुरू झाली. बिचाऱ्या रावसाहेबांनां तर आपल्या दुर्दैवामुळेंच हा प्रसंग बोटीवर व सर्व उतारूंवर आला, असें वाटूं लागलें!

परंतु पांचएक तासांनीं एंजिन थोडेंसें दुरुस्त होऊन बोट पुढें चालू होणार अशी बातमी आली व पंधरावीस मिनिटांनीं त्याप्रमाणें बोट चालूहि झाली. तथापि मधल्या नादुरुस्तीमुळें तिचा वेग बराच कमी झाला होता.

अशा स्थितींत चालतांचालतां सकाळीं साडेसहांच्या सुमाराला बोट जयगडबंदरांत शिरली. रावसाहेब या प्रवासाला अगदींच कंटाळून गेले असल्यामुळें याच बंदरीं उतरावें, असें त्यांनां वाटूं लागलें; परंतु एका अर्थी रत्नागिरीलाच उतरणें बरें, तें जिल्ह्याचें ठिकाण असल्यामुळें तार, पोस्ट, दवाखाना वगैरे सोयी तेथें अधिक असतील, आणि आपणासारख्या गुप्तपणें प्रवास करणारालासुद्धां त्यांची अत्यंत आवश्यकता आहे, असा

विचार करून रावसाहेबांनीं रत्नागिरीपर्यंत प्रवास झेंपावयाचाच, असा शेवटीं निश्चय केला.

बोट थांबल्यावर फर्स्टक्लासच्या रेलिंगला धरून रावसाहेब उतारूंची चढउतर व जायें पाहूं लागले. बोटीवरून उतरणारेच उतारू फार असून चढणारे अगदींच कमी होते. चढणाऱ्या उतारूंत एक बैरागी चढत आहे, असें रावसाहेबांच्या दृष्टीला पडलें. त्याच्या मस्तकावर लांबलचक पिंगट जटा असून त्यानें त्यांची आपल्या मस्तकावर मुकुटाकृति तयार केली होती. सारें तोंड भल्या थोरल्या दाढीमिशांच्या जंगलांनीं अगदीं झांकून टाकलें होतें. जो कांहीं तोंडाचा थोडासा भाग दिसत होता, त्यावर भस्म ऊर्फ राख यथास्थित चोपडलेली होती. छाती, बाहु आणि पाठ यांच्यावरहि भस्माची बरीच मोठी रास फस्त झाली असावी! डाव्या खांद्यावर एक भगव्या रंगाची झोळी असून उजव्या हातांत एक तांब्याचा कमंडलू होता. अशा थाटांत डेकवर येऊन गोसावीबुवांनीं दर्शन दिलें.

गोसावीबुवांनीं प्रथमच चहूंकडे दृष्टिपात करून उतारू लोकांचा झटकन् दृष्टिपरिचय करून घेतला. नंतर पूर्वेकडे तोंड करून उभें राहून, सप्तकानुक्रमानें स्वर चढवीत वर तोंड करून बुवाजी ह्मणाले "जय शंकर! शंकर–शंकर!" परंतु त्यांच्या स्वरांत क्रोध भरला होता! तो ऐकतांच श्रोत्याला असा भास होण्याचा संभव होता, कीं, जणूं काय शंकरांनीं गोसावीबुवांचा कांहीं तरी मोठाच अपराध केला असून बिचाऱ्या त्या देवाला कांहीं लवकर क्षमा मिळण्यासारखी नव्हती!

डेकवरील सर्व उतारू मंडळी बैरागीबुवांचा हा क्रोधाविर्भाव पाहून आश्चर्यानें थक्क होऊन त्यांच्याकडे पहातच राहिली! मात्र एका बाजूला बिछाने पसरून बसलेले दोघेतिघे 'यंग इंडिया' समूहांतील सुधारक तरुण हें पाहून आपसांतल्या आपसांत नेत्रसंकेत करून गालांतल्या गालांत हंसत होते. बैरागीबुवांनीं वक्रदृष्टीनें एकवार त्यांच्याकडे पाहिलें व त्यांच्यापासून थोड्याच अंतरावर आपलें व्याघ्रांबर पसरून त्यावर ते बसले. उतारूंपैकीं बरीचशी भाविक मंडळी बुवांजवळ येऊन 'नमस्कार बुवाजी!'

असें ह्मणून त्यांच्या चरणांवर डोकें ठेवीत व बुवाहि 'जीते रहो!' असें ह्मणून त्यांनां आशीर्वाद देत. बुवा 'जीते रहो' असा आशीर्वाद देत खरा, परंतु त्यांचा कंठस्वर व नेत्रकटाक्ष अशा प्रकारचे होते, कीं, त्यांवरून त्यांच्या अन्तःकरणांत त्या शब्दांचा अर्थ 'भस्म हो जा' असाच होत असल्याचें दिसत होतें!

कांहीं वेळ इकडेतिकडे पाहून बुवांजींनीं आपल्या झोळींतून थोडासा गांजा व मातीची एक मध्यमशी चिलीम बाहेर काढली. डाव्या हातावर गांजा ठेवून उजव्या हाताच्या आंगठ्यानें ते तो खूब जोरानें मळूं लागले. सर्व उतारू बैरागीबुवांकडे चकित भयाकुल दृष्टीनें पहात राहिले होते. इतक्यांत त्या सुधारक तरुणांपैकीं दोघेजण आपल्या जागेवरून सरून बुवांच्या आसनाच्या अगदींच जवळ येऊन बसले.

त्यांपैकीं एकजण ह्मणाला " बुवाजी, आपण गांजा कां बरें ओढतां?"

पहिल्यानें बुवांच्या वर्तनावरून आसपासच्या लोकांनां असें वाटलें, कीं, त्या तरुणाचा हा प्रश्न त्यांनां मुळीं ऐकूंच गेला नसावा! कारण त्यांनीं त्या पृच्छकाकडे ढुंकूनहि पाहिलें नाहीं; आपणाशींच दंग होऊन ते मारे गांजा मळीत होते! हें पाहून इतर सर्व मंडळी त्या तरुणाकडे निर्भर्त्सनायुक्त नजरेनें पाहूं लागली.

परंतु जवळजवळ अर्ध्या मिनिटानें त्या प्रश्न करणाऱ्या तरुणाकडे आपले लालबुंद डोळे लावून बुवाजींनीं गंभीर आणि जड स्वरानें विचारलें "काय विचारलेंत?"

बुवाजींचा हा अभिनय पाहून त्या तरुणाच्या मनांतहि थोडी शंका उत्पन्न झाली. किंचित् संकुचित हृदयानें त्यानें पुनः प्रश्न केला "आपण गांजा कां पितां? त्यांत विशेष असा कांहीं गुण आहे का?"

तरुणाच्या या उडालेल्या धांदलीनें बुवाजींचा राग आणि खिन्नपणा हीं बरींच कमी झालीं. पूर्वींप्रमाणेंच खर्जाच्या स्वरांत ते त्याला ह्मणाले "मन स्थिर होतें त्यानें!" असें ह्मणून मळलेला गांजा चिलमींत घालून त्यावर,

पेटविलेली काथ्याची गुंडी ठेवून ते ती ओढूं लागले. पांचसात भले खासे जंगी दम घेऊन त्यांनीं शेवटचा दम इतक्या जोरानें मारला, कीं, त्या भरांत ते दोन हात वर उठले! शेवटीं मुखगव्हरांतून अजस्र धूर सोडून चिलीम खालीं ठेवून बुवाजींनीं विचारलें " कोई प्रसाद पावे?"

आमच्या 'जुन्या' रावसाहेबांनां हा अभ्यास होताच; परंतु अत्यंत गुप्तपणानें हें व्यसन त्यांनीं चालू ठेविलें होतें. गोसावीबुवांचा 'प्रसाद' मिळविण्याची इच्छा या वेळीं त्यांच्या मनांत अत्यंत प्रबल झाली; परंतु चटकन् त्यांच्या मनांत असा विचार आला, कीं, इतक्या लोकांच्या समोर अशा उघड्या सार्वजनिक ठिकाणीं आपण गांजा कसा ओढावा? परंतु तत्क्षणीं त्यांनीं मनाला ह्मटलें ' वारे वा! तूं तरी मोठें चमत्कारिकच आहेस. अरे, इथें मला ओळखतो आहे कोण? मी एक मोठ्या दर्ज्याचा माणूस-इनामदार आहें, हें इथें कुणाला माहीत आहे?' शेवटीं, याच युक्तिवादाचा जय होऊन रावसाहेब उठले आणि बुवाजींच्या पदतलाशीं बसून त्यांनीं ती गांजाची चिलीम हातीं घेतली.

रावसाहेब दमांवर दम मारून 'प्रसाद पावूं' लागले. त्यांची ही कृति सुरू असतां बुवाजी त्यांच्याकडे सारखी टक लावून पहात राहिले होते. कांहीं दम मारून रावसाहेबांनीं चिलीम बुवांच्या हातीं परत देतांच ते गंभीरपणानें त्यांना ह्मणाले "तुझ्या कपाळीं राजदंड दिसतो आहे बेटा!"

बुवाजींच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच रावसाहेबांची छाती धडाडून त्यांच्या अंगावर शहारेच उठले. त्यांनीं विचारलें "आपण ह्मणतां याचा अर्थ काय बुवासाहेब?"

बुवाजी गंभीरपणें ह्मणाले "ज्या माणसाच्या कपाळीं राजदंडाचें चिन्ह असतें, तो एक तुरुंगांत तरी जातो, किंवा राजासारखी वैभवसंपत्ति तरी त्याला मिळते. तुझा हात जरा पाहूं बेटा!"

आपला हात बुवाजींनां दाखवावा कीं नाहीं, याबद्दल रावसाहेबांनां जरा विचार पडला; परंतु दाखवावा असाच विचार करून त्यांनीं तो बुवाजींच्या पुढें केला. बुवाजी किती वेळ तरी तो एकाग्र मनानें

वरून खालून पहात होते. तें सूक्ष्म निरीक्षण संपल्यावर ते ह्मणाले "तुझ्या मनाला हल्लीं भारीच कष्ट होत आहेत-होय ना ?"

रावसाहेबांनीं खालीं मान घालून उत्तर दिलें "होय बुवासाहेब !" इतरया लोकांपुढें बुवाजी आपणाविषयीं आणखी कांहीं भलतेंसलतेंच बोलून जातात कीं काय कोण जाणे, अशी रावसाहेबांना भीति वाटूं लागली. नंतर बुवांनां उद्देशून ते ह्मणाले "आपण जें कांहीं माझ्याविषयीं सांगितलें, तें अगदीं यथार्थ आहे." असें ह्मणून त्यांनीं हात मागें घेऊन दुसराच विषय काढला.

"आपण कुठून आलांत बुवासाहेब ?"

"परशुरामला-परशुरामाचें दर्शन घ्यायला गेलों होतों."

"आतां जायचें कुठें ?"

"रत्नागिरीला. तिथें माझा एक भक्तिमान् शिष्य आहे. त्याला एकदां दर्शन देऊन तीर्थयात्रा करणार आहें."

"कुठेंकुठें जाणार आहां आपण ?"

"पहिल्यानें पुळें, धोपेश्वर, महाकाली, कनकादित्य* इत्यादि कोंकणपट्टीचीं लहानमोठीं देवस्थानें पहातपहात खालीं रामेश्वरापर्यंत जायचा विचार आहे माझा. तूं कुठें चालला आहेस बेटा ?"

"मी देखील तीर्थयात्रेलाच चाललों आहें."

"पूर्वीं कधीं तूं कोंकणांत आला होतास का ?"

"नाहीं बुवासाहेब !"

बुवाजींनीं झोळींतून थोडा गांजा बाहेर काढला व तो रावसाहेबांच्या हातीं देऊन ते ह्मणाले "कर तयार बेटा !"

रावसाहेबांच्या हृदयांत या वेळीं गोसावीबुवांबद्दलची भक्ति तुफान उसळूं लागली होती. त्यांच्या या आदेशानें आपणाला मनांत अत्यंत दैववान् व कृतार्थ समजून गांजा घेऊन ते तो जोरजोरानें मळूं लागले.

बुवाजी ह्मणाले "पूर्वीं कधीं तूं कोंकणांत आला नव्हतास ना ?"

"नाहीं बुवासाहेब !"

"तर मग माझ्याबरोबरच कां नाहीं येत तीर्थयात्रेला ? जाऊं हळू-हळू मजेनें."

"बुवासाहेबांची जर अशी कृपा माझ्यावर होईल, तर मी आपणाला भाग्यवान् समजेन !"

"रत्नागिरीहून तूं निघणार कधीं ?"

रावसाहेबांनीं आतां रत्नागिरीला अधिक राहूंच नये असा विचार केला व ते बुवाजींनां म्हणाले " आज रात्रींच निघणार मी तिथून !"

गांजाची चिलीम हातीं घेऊन बुवांनीं विचारलें " काय आजच ?"

"होय बुवासाहेब, आज मला निघालेंच पाहिजे !"

बुवाजींनीं गांजाच्या माथ्यावर विस्तव ठेवला व दोनचार दम मारून ते ह्मणाले "असें ह्मणतोस ? पण आजच्याआज मला निघतां येईल, असें कांहीं वाटत नाहीं. माझा तो चेला घरीं आहे कीं नाहीं, हेंहि मला ठाऊक नाहीं. तीर्थयात्रेला जायचें ह्मणजे नुसतें रिकाम्या हातानें तर नाहीं जातां येत ?"

रावसाहेबांनां तीर्थयात्रेचा बेत अतिशयच पसंत पडला होता. ते ह्मणाले "हीच जर सारी हरकत असल, तर आपणाला कांहीं त्यासाठीं विलंब व्हायला नको आहे." असें ह्मणून खिशांतून एक मूठभर रुपये बाहेर काढून, ते बुवासाहेबांच्या पायांशीं ठेवून रावसाहेबांनीं त्यांनां नमस्कार केला.

चटकन् रुपये हातांत घेऊन बुवासाहेबांनीं अस्फुट स्वरानें रावसाहेबांनां आशीर्वाद दिला. गांजाची चिलीम विझली होती, ती पुनः प्रज्व-लित करून, दोनचार दम मारून त्यांनीं रावसाहेबांनां 'प्रसाद' दिला,

रावसाहेबांसारख्या बड्या गृहस्थाची बुवाजींवर बसलेली श्रद्धा आणि त्यांनीं त्यांनां दिलेली मूठभर रुपयांची दक्षणा पाहून बोटींतील इतर उतारू मंडळी चकित होऊन गेली. रत्नागिरीला थोडा अवकाश आहे, असें पाहून सर्वजणांनीं बुवासाहेबांनां आपापले हात दाखविण्याकरितां घेरून सोडलें !

---

## प्रकरण तेहतिसावें.

## बुद्धि असली कीं पैसा अलोट!

रावसाहेबांनीं दिलेल्या नोटा आपल्या उपरण्यांत घट्ट बांधून केशवरावजींची स्वारी तत्क्षणीं घोड्यावर स्वार होऊन सोनगांवकडे निघाली. रात्र पडण्यापूर्वीच ते तेथें पोहोंचले. तत्क्षणीं त्यांनीं पहिल्यानें पांडूला बोलावणें धाडलें.

ज्या वेळीं पांडू आला, त्या वेळीं कचेरीच्या इमारतीच्या पडवींत बसून केशवराव डोळे मिटून, हातीं माळ घेऊन रामनामाचा जप करण्यांत अगदीं निमग्न होऊन गेले होते. जणूं काय या वेळीं जगाच्या बाह्यउपाधींचा त्या महात्म्याला तिळभरसुद्धां उपसर्ग पोहोंचत नव्हता! पांडू आल्यानंतर कांहीं क्षणांनीं फक्त एकवार डोळे किलकिले करून त्यांनीं पांडूला खालीं बसावयाला खुणेनें सुचविलें, आणि पुनः डोळे मिटून त्यांनीं माळेचे मणी ओढीत आणि ओंठ हलवीत जपाचा सपाटा चालविला. थोडीथोडकी नाहीं, जवळजवळ एक तासपर्यंत याप्रमाणें दांभिकपणानें बतावणी केल्यावर, माळेसह दोन्ही हात जोडून केशवरावांनीं खालीं वांकून कोणालासा नमस्कार केला! नंतर ते ह्मणाले "जयराम श्रीराम सीताराम! रामनाम मात्र सत्य आहे–त्रिवार सत्य आहे–बाकी सर्व असत्य, नसती भ्रान्ति. हो, पांडू, काय काम आहे?"

पांडू ह्मणाला "जी, हुजुरांनीं बोलावणें धाडलें असें ऐकलें, ह्मणून इकडे आलों आहें."

"रामनाम सत्य–रामनाम सत्य! ओहो–खरें आहे तें–मला आठवणच नव्हती पहा. तुला मीं बोलावणें धाडलें, अन् इकडे मी जप करायला बसलों, तों त्या नादांत--नामरसाच्या गोडींत सारें विसरूनच गेलों पहा! संसार मिथ्या–संसार असार आहे! हां, काय ह्मणत होतों मी? तुझ्या घराजवळ ती थोडीशी पडीत जमीन आहे ना?"

"जी हुजर! त्या जमिनींत काळोजी नांवाचें एक कुळ रहात असे. तो मग गेला गांव सोडून. त्याला कोण वारस नसल्यामुळें ती जमीन पडीतच आहे हुजूर आज दोन वर्षे."

"मीं तें ऐकलें आहे. हा काळोजी कसा काय माणूस होता? तर मग खरी गोष्ट काय आहे, तेंच मी तुला सांगतों ह्मणजे झालें. त्या पडीत जागेवर फळझाडफुलझाडांची एक सुंदर बाग उठवावी, असा माझा विचार आहे. देवांवर दररोज फुलांची आपल्या हातून लाखोली वाहिली जावी, अशी माझ्या मनाला भारी हौस. देवावर रगडूनशीं फुलें घालून केलेल्या पूजेनें मनाला जें समाधान वाटतें, तें या शुष्क जपमाळेचे मणि ओढल्यानें कांहीं होत नाहीं. ह्मणूनच मी तुझ्याजवळ चौकशी केली, कीं, हा काळोबा कसा काय माणूस होता? पापी, दुष्ट, नष्ट माणसाच्या जागेवर फुलझाडें लावून त्यांच्यावर जीं फुलें येतील, त्या फुलांनीं माझ्या रामाची पूजा करणें माझ्या मनाला अगदी सहन नाहीं व्हायचें. आपण तें एक मोठें पापच करीत आहों, असें मला वाटेल. त्या अपवित्र फुलांनीं पवित्रांतला पवित्र जो माझा राम त्याची पूजा मी कशी करूं? पण हा काळोबा चांगला धार्मिक होता, देव, साधु, ब्राह्मण यांच्यांवर त्याची श्रद्धा होती, असें जर मला कळून आलें, तर माझ्या आनंदाला पारावार नाहीं रहाणार बघ! त्या शुद्ध माणसाच्या जागेंतलीं फुलें शुद्धच निघून त्यांनीं माझ्या रामाला अत्यंत समाधान वाटेल. यासाठीं तुला मीं बोलावणें धाडलें तें. तूं तर काळोबाचा शेजारी. त्याच्या हद्दीला हद्द तुझी लागून राहिलेली. तुमचे बरेच दिवस एकमेकांच्या सहवासांत गेलेले. त्यामुळें त्याची तुला पुरी माहिती असणार, अशी कल्पना करून मीं तुला बोलावणें धाडलें. बरें, सांग मला—हा काळोबा कसा माणूस होता रे?"

कांहीं वेळ विचार करून पांडू ह्मणाला "जी हुजूर! काळोबा तर फार चांगला माणूस होता हुजूर! कुणाचें देखील त्यानें कधीं वाईट नाहीं केलें पहा. तरी पण एकदां माझी एक गाय चुकून त्याच्या शेतांत

गेली होती, ती त्यानें नेऊन बेलाशक कोंडवाड्यांत घातली, अन् सहा आण्यांचा दंड भरून मला ती सोडवून आणावी लागली!"

"गांव सोडून काळोजी पळून कां रे गेला? त्याच्या नांवानें कधीं वारिणफारिण निघालें होतें का?"

"नाहीं हुजूर! काळोजीचा सासरा खाऊनपिऊन बरा होता. अन् त्याला आप्त असा काळोजीशिवाय कोणी नव्हता. त्याचा तो सासरा मेल्यामुळें त्याचा सारा पैसाअडका अन् जमीनजुमला त्याला मिळाला, म्हणून तो सोनगांवांतून उठून गेला. इथें त्याचें जें कांहीं गुरूंवासरूं, दाणागोटा होता, तें चटसारें विकून थोडासा पैसा उभा करून इथून आपल्या सासऱ्याच्या गांवाला तो निघून गेला. त्याच्यावर वारिणफारिण कांहीं निघालें नव्हतें कधीं हुजूर!"

संतोषानें मान हालवून केशवराव म्हणाले "तर मग हा काळोजी एकंदरीनें बरा होता म्हणतोस? बरें, दुसरें एक तुला विचारतों. इथल्या पोलिसठाण्यावर अंमलदार कोण आहे?"

"जी हुजूर. इथून पोलिसठाणें तीनचार कोस दूर आहे. माझें कांहीं तिकडे कधीं जाणेंयेणें तर नाहीं सरकार. अंमलदारसाहेब कोण आहेत, तें नाहीं मला ठाऊक. पण मराठा जातीचे आहेत कुणी, असें मीं ऐकलें आहे."

"अस्सें! मराठे आहेत का ते? एके दिवशीं जायला हवें ठाण्यावर त्यांनां सहज भेटायला म्हणून. इनामदारीचा व्यवहार पहायचा म्हणजे या अंमलदारांशीं ओळखपाळख चांगली असावी लागते. कधीं काय कसला प्रसंग येईल, याचा कांहीं नियम आहे? उद्यांच जावें झालें त्यांनां भेटायला. उद्यां दिवसहि बरा आहे. त्यांनां भेटायचें म्हणजे रिकाम्या हातानें जाऊन उपयोग नाहीं. राजा अन् वैद्य यांची रिकाम्या हातानें कधीं भेट घेऊं नये म्हणतात ना? हे अंमलदार म्हणजे राजेसाहेबांचेच प्रतिनिधि म्हणायचे आमच्यापुरते. मुर्गी, अंडीं असली भानगड कांहीं आमच्या ब्राह्मणांच्या नाहीं उपयोगी बुवा! त्यापेक्षां एका मोठ्याशा

कासंडींतून पांचएक शेर तूप न्यावें त्यांना भेट झणून झणजे बरें. तूं तर गवळीच बोलूनचालून–तुपाची तुला चांगलीच परीक्षा असणार–दे पाहूं उद्यां सकाळीं पांचएक शेर अगदीं उत्तमपैकीं असें तूप मिळवून मला. त्याची जी योग्य किंमत असेल, ती मी तुला खुषीनें देतों. इनामदारांचा मी कारभारी झणून जोरजबरदस्ती करून अर्धी किंवा पाव किंमत अंगावर फेंकून तूप विकत घेईन–अशा प्रकारच्या प्राण्यांपैकीं हा केशवराव नाहीं, समजलास ना? माझ्या मनाला बुवा असला अधर्म बिलकूल नाहीं मानवायचा. गरीबांवर जुलूमजबरदस्ती, अत्याचार करण्यासारखें दुसरें मोठें पाप कोणतेंच नाहीं! मग काय झणतोस पांडू, देतोस का पांचएक शेर चांगल्यापैकीं तूप मिळवून मला?"

"हो, सरकार! त्यांत काय मोठें कठिण आहे? कधीं पाहिजे?"

"उद्यां सकाळीं स्नानसंध्या आटोपून, जेवूनखाऊन निघणार मी ठाण्यावर जायला. त्याच्या आंत मिळालें झणजे झालें."

"ठीक आहे–मिळेल. आणून देईन मी उद्यां सकाळीं."

"फार उत्तम! पैसे जातोस का आतांच घेऊन?"

"उद्यांच नेईन. पैसे का कुठें जातात पळून? पाहूं काय दरानें तूप मिळतें तें अगोदर."

"बरें तर, उद्यांच जा घेऊन पैसे. बरें, आणखी एक काम करशील?"

"हुकूम व्हावा हुजूर!"

"तूंहि ये ना माझ्याबरोबर? मी जाईन मेण्यांतून. तूं घोड्यावरून ये–येतें ना तुला घोड्यावर बसायला? अरे, इतकें लाजायला नको कांहीं–मला नाहीं कांहीं वाटत त्यांत! आपण मोठे झणून आपल्याबरोबर लोकांनां पाय फासटीत तीनचार कोस न्यायचें, हा कुठला न्याय?"

पांडू बिचारा अगदीं चीतच होऊन गेला! क्षणभर विचार करून हंसून तो झणाला "ठीक आहे–हुजुरांच्या मर्जीबाहेर मी नाहीं!"

कांहीं वेळ गप्प राहून केशवराव झणाले "पण तुझ्या कामकाजाची कोणत्याहि प्रकारची गैरसोय होत नसली तर हो! आपल्या राजीखुषीनें,

सुखानें येत असलास माझ्याबरोबर तर चल. नाहीतर मी इनामदाराचा कारभारी अन् तूं आमचें एक क्षुल्लक कुळ, म्हणून मी तुझ्यावर अशी हुकमत चालवितों, असें मात्र नको समजूं. मी कांहीं त्या प्रकारच्या माणसांतला नाहीं आहें! तुला बरोबर घेऊन जायचें मला दुसरें कांहीं देखील कारण नाहीं. मी आलों आहें इकडे नवीनच, अन् त्या बाजूला तर मी कधींच गेलों नाहीं, अद्यापि कुणाची माझी ओळखदेख नाहीं, म्हणून तुला ये म्हणतों आहें बरोबर. अन् बरोबर कुणी तरी सोबतीला माणूस असलें, म्हणजे त्याच्याशीं बोलतचालत जातां येऊन वाटेचे कष्ट देखील मनाला कांहीं वाटत नाहींत. इतक्या साऱ्या गोष्टींचा विचार करून तुला मी बोलावतों आहें; मर्जी असली तुझी, तरच ये."

पांडू म्हणाला "जी हुजूर! मी आपल्या राजीखुषीनें येतों आपल्या-बरोबर. आपल्यासारख्या धन्याबरोबर जर जायचें नाहीं, तर जायचें तरी कुणाबरोबर?"

केशवराव स्मितपूर्वक म्हणाले "हेः हेः! कसले धनी अन कसले नोकर! तरी तुझी ही नम्रता पाहून मी फार खूष झालों. तूं तर भारीच चांगला माणूस आहेस, असें मला आढळून आलें. वाः! फार उत्तम! तुम्ही भाऊ किती रे?"

"जी, आम्ही दोघे भाऊ होतों. पण माझा धाकटा भाऊ नारायण—नरू म्हणत त्याला—वारला सरकार!"

"वारला? अरे अरे! भारीच वाईट गोष्ट झाली म्हणायाची! एकाद्याचें पाठबळ ऐन उमेदींत नाहींसें होणें म्हणजे मोठेंच दुर्दैव! मुलेंबाळें तरी आहेत का त्याला कांहीं?"

"कांहीं नाहीं हुजूर! मागें त्याची बायकोच काय ती आहे."

"अस्सें! भावाच्या मृत्यूनंतर भावजयेला तूं तिच्या माहेरीं पाठ-विलीस, का तुझ्याच घरसंसारांत ती असते?"

कांहीं वेळ जरा अळंटळं करून शेवटीं पांडू म्हणाला "जी—हल्लीं कांहीं महिने ती आपल्या बापाकडे माहेरींच जाऊन राहिली आहे."

ही गोष्ट ऐकून केशवरावजींना भारी आश्चर्य वाटलें. त्यांना मोठा विचार पडला. आपल्या सांगण्याप्रमाणें गंगा आपल्या घरीं गेली नाहीं काय ? तर मग ती गेली कोठें ? झालें तरी काय? ती आपण होऊनच तर ठाण्यावर नाहीं ना गेली ? परंतु या विचारांचें प्रतिबिंब चेहऱ्यावर लवमात्रहि न दाखवितां ते ह्मणाले "तिचें माहेर कोणत्या गांवीं रे ?"

"इथून तें दोन दिवसांच्या वाटेवर आहे."

"काय गांवाचें नांव ?"

गांवाचें नांव सांगावयाची पांडूला मुळींच इच्छा नव्हती. पण करतो काय बिचारा ? आंवडा गिळून तो ह्मणाला "भडगांव."

"अच्छा! तर मग उद्यां दहा वाजायच्या आंत जेवणखाण आटोपून तूप घेऊन तूं जरूर ये बरें का विसरल्याशिवाय इथें!" असें ह्मणून केशवरावांनीं पांडूला निरोप दिला.

नंतर तेथून उठून केशवराव आपल्या निजावयाच्या खोलींत गेले, व बनगांवाहून येतांना आणलेल्या कॅन्व्हासच्या बॅगमधून दारूची बाटली बाहेर काढून त्यापैकीं थोडीशी त्यांनीं पाणी वगैरे घातल्याशिवाय तशीच गट्ट केली. नंतर चिलीम सज्ज करून तिचा आस्वाद घेत, धुरानें सारी खोली भरीत जाजमावर पडल्यापडल्याच ते आपणाशींच विचार करूं लागले.

"ही शिंची गंगा तर मग गेली तरी कुठें ? घंटेश्वराच्या देवळाजवळ ज्या ठिकाणीं मीं तिला सोडली, त्या ठिकाणापासून हा गांव अगदीं फार–फार तर दीड पावणेदोन कोस असेल. रस्ताहि सरळ आहे. रस्ता चुकून भलतीकडेच कुठें ती जाऊन पडली असावी असें ह्मटलें, तर तेंहि नाहीं संभवनीय दिसत. तिला मीं असें कांहीं विलक्षण भय दाखविलें आहे, कीं, ती भोळसट साधी पोर आपण होऊन ठाण्यावर जाऊन फिर्याद देईल, ही गोष्ट केवळ अशक्य आहे! अन् कांहींहि असलें, तरी उद्यां ठाण्यावर गेलें, कीं, कळेलच आपोआप तिनें फिर्यादबिर्याद खरोखरच कांहीं केली आहे कीं काय तें! वाटलें होतें, कीं, पदरांत पडलेले

हे हजार रुपये आपल्या साफ पचनीं पडतील. त्यांतून एक फुटकी पैहि नाहीं घालवायची, असा तर माझा निश्चय आहे. पाहूं आतां तो कसा काय पार पडतो तें ! अच्छा, पण असें तर नसेल कदाचित् झालें ? या शिंच्या पांड्यानें तर गंगेला आपल्या घरांत लपवून नसेल ना ठेवलें ? ती येऊन पोंचली असेल पहांटेपहांटेलाच घरीं–लोकनिंदेच्या भयानें या चोरांनीं दिली असेल बातमी पसरून, कीं, गंगा गेली आहे आपल्या बापाच्या घरीं. 'तूं इतके दिवस होतीस कुठें, काय करीत होतीस ?' असें त्यांनीं गंगेला खात्रीनें विचारलेंच असेल. गंगेनें तर नांवगांव कुणाचेंच सांगणें शक्य नाहीं. त्यामुळें त्यांचा संशय अधिकच वाढला असेल. या बाबतीसंबंधानें काय तो निकाल पुरा होईपर्यंत या मंडळींनें गंगेला घरांत कोंडून ठेवायचा विचार केला असेल. या गोष्टीचा आपणाला पुरता पिच्छाच पुरवला पाहिजे. तर मग पहिल्यानें, आतां हेंच काम. आणखी घंटा दोन घंटे रात्र झाली तरी करकत नाहीं. तुपाचे पैसे द्यायचें निमित्त पुढें करून जातों त्या पांड्याच्या अगदीं घरांत. जर गंगा तिथें असेल, तर कांहीं ना कांहीं तरी तिचा पत्ता मला लागल्याखेरीज कांहीं रहात नाहीं, हें खास !"

अशा प्रकारचा मनांत निश्चय करून केशवरावजींनीं आणखी एक तासभर वाट पाहिली. नंतर पांचसहा रुपये खिशांत टाकून स्वारी तशा अंधकारांत बाहेर पडली. डोकीला उपरण्याची टापशी, अंगांत खादीची बाराबंडी, हातांत बांबूचा एक सोंटा, पायांत करकरणाऱ्या वहाणा, अशा थाटानें केशवरावांची स्वारी नक्षत्रांच्या अंधुक प्रकाशांत त्या निर्जन गांवरस्त्यानें हळुहळू चालली होती. पांड्याच्या घराच्या बाहेरच्या दरवाज्याजवळ येतांच, त्यावर एकदम थाप न मारतां दाराशीं कान लावून आंत कांहीं कोणीं बोलत वगैरे आहे कीं काय, याबद्दल मुकाट्यानें ते शोध घेऊं लागले. दोघातिघांचे शब्द त्यांनां ऐकूं आले–परंतु तीं माणसें काय बोलत होतीं, हें मात्र त्यांनां स्पष्ट ऐकूं येईना. परंतु त्यांच्यांत कांहीं तरी भांडण आणि रडारड चालली होती, हें खास ! केशव-

रावांनीं तेव्हां हळूच, शब्द न करतां दार लोटून पाहिलें, आणि त्यांच्या सुदैवानें तें उघडलेंहि. अंगणांत अंधकार होता–केशवराव आंत शिरून तेथें जाऊन उभे राहिले. कांहीं अंतरावर एका उंच जागीं बसून तीन व्यक्ति कांहीं बोलत आहेत, असें त्यांच्या दृष्टीला पडलें. घरांत दिवा मिणमिण करीत होता; परंतु त्याच्या अंधुक प्रकाशांत तीं माणसें कोण असावींत, हें केशवरावांनां ओळखतां आलें नाहीं.

केशवरावांनां आतां आपल्या कानांवरच भिस्त ठेवावी लागली. कोणी पुरुष बोलत होता " जर खरोखरच तुझा कांहीं दोष नाहीं, तर मग आह्मांला स्पष्ट सांग कुणीं तुला धरून ठेवलें होतें तें इतके दिवस ?"

केशवरावांनीं हा पांडूचा कंठस्वर असें चटकन् ओळखलें.

गंगा ह्मणाली " तें मला नाहीं सांगतां येत. "

कोणी स्त्री ह्मणाली " कां नाहीं सांगतां येत तुला कवटाळणी? अग, कसं सांगतां येईल? तूं जर बोलूनचालून पापांत पडली आहेस, तर तुला कसं सांगतां येणार तें? अहो, तुह्मी काय या हलकट बयेचं बोलणं मनावर घेतां अन् त्याच्यावर विश्वास ठेवतां? ही टवळी सांगते, यांतलं एक अक्षर दिखील खरं नाहीं बघा! खरं सांग अवदसे, नाहीं तर तुझे पांच पाट काढून, गाढवावर बसवून गांवभर धिंड काढून तुला गांवांतून हांकून देऊं—"

ही बोलणारी बाई, पांडूची बायको असावी, असा केशवरावांनीं सहजच तर्क केला.

गंगा रडतरडत ह्मणाली "मला कांहीं सांगायला हरकत का होती? पण आई वज्रेश्वरीनं सांगितलं आहे, कीं, 'एका शब्दानंहि कुणाजवळ तूं हें सांगूं नकोस' ह्मणून. तर मी तरी तें तुह्मांला सांगूं कसं?"

पांडू ह्मणाला "अहाहाहा! मोठी तूं धर्माचा अवतारच पडलीस कीं नाहीं, ह्मणून आई वज्रेश्वरीनें तुला येऊन दर्शन दिलें! सांग–चांडाळणी, खरें सांग काय तें! नाहीं तर बघ तुझी पाठ पायपोसांनीं फोडून टाकून तुला आतांच्या आतां घरांतून हांकलून देईन."

गंगा आतां रागाच्या कंपित स्वरानें ह्मणाली "मला कां ह्मणून घरांतून हांकलून देणार भाऊजी? या घरावर माझा कांहींच का हक्क नाहीं? तुमचं एकट्याचंच वाटतं हें?"

पांडूची बायको गंगेवर कडकन् बोटें मोडून ह्मणाली "मर जा तूं एकदांची अवदसे! थोरल्या दिराच्या तोंडावर जबाब देतेस? तुझ्या जिभेला कांहीं हाड आहे का नाहीं?"

पांडूहि खूब रागावून ह्मणाला "अस्सें काय? लहान तोंडीं न माईल इतका मोठा घांस घेतेस काय? मला कायदा दाखवतेस काय? चलचालती हो या घटकेला माझ्या घरांतून–ऊठ जा–हो घरांतून बाहेर! नाहींतर अस्से केंस धरून पायतणांनीं पाठ फोडीत तुला घरांतून बाहेर काढीन!"

गंगाहि नागिणीसारखी फुस् करून ह्मणाली "खबरदार माझ्या अंगावर हात उचलाल तर आतां. त्याचा परिणाम कांहीं चांगला व्हायचा नाहीं, सांगून ठेवतें आहें! आतांच्या आतां मी कारभारीसाहेबांकडे जाऊन तुमच्यावर फिर्याद करीन–पक्कं समजून रहा."

पांडू तिला वेडावून ह्मणाला "कारभारीसाहेबांकडे जाऊन फिर्याद करीन तुमच्यावर! कारभारी जसा कांहीं मला फांशीच देईल! कारभारी मोठा जज--माजिष्टरच कीं नाहीं पडला! जा, तुझ्या त्या बाबाकड–आजोबाकडे–कारभाऱ्याकडे जाऊन काय वाटेल तें कर जा!"

इतक्यांत खांकरून केशवरावांनीं हांक मारली "पांडू–"

केशवरावांच्या हांकेबरोबर पांडू एकदम चमकला! चकित दृष्टीनें दरवाज्याकडे पाहून त्यानें विचारलें "कोण आहे?"

"मी—"

या 'मी'च्या कंठस्वरावरून पांडूला कांहीं शंका येऊन त्याची छाती धडाडली।

इतक्यांत केशवराव रागानें ओरडून ह्मणाले "पांडू, तूं एक चांगला सच्चा माणूस आहेस, अशी माझी कल्पना झाली होती, अन् मघांशीं मीं तुला तसें ह्मटलेंहि होतें."

बोलणारी व्यक्ति कोण आहे, तें आतां पांडूनें चांगलें ओळखलें होतें–परंतु संशयाला थारा राहूं नये ह्मणून दिवा हातीं घेऊन तो उंबरठ्याकडे गेला. तेथें केशवरावजींनां पहातांच त्याची बोबडी वळावयाचीच वेळ आली. केशवराव आंत येऊन ह्मणाले “ पांडू, तूं सच्चा माणूस असशील, असें मला वाटलें होतें; परंतु तूं तर मह्रा हरामखोर पाजी बदमाष आहेस! ”

पांडू कांपतकांपत ह्मणाला “ कोण ? कारभारीसाहेब ? रामराम—”

केशवराव त्याच्या अंगावर ओढून ह्मणाले “पुरे कर तुझें हें सोंग पाजी माणसा! चोर हरामखोर कुठचा! आतां दोन घटकांपूर्वीं ना रे तूं मला सांगून आलास, कीं, आपली विधवा भावजय आपल्या माहेरीं जाऊन राहिली आहे ह्मणून ? ”

पांडू खालीं मान घालून ह्मणाला “ जी, आजवर ती माहेरींच होती. आजच ती इथें आली हुजूर! ”

“ अस्सें काय ? कुणाला शिकवितोस या गोष्टी तूं पांड्या ? ”

पांडू काय बोलणार बिचारा! खालीं मान घालून उभा राहिला.

“ अन् हिला मोठमोठ्यानें धमकावीत रे कां होतां तुह्मी दोघेंजणें ?”

“ ना—ना—हीं बुवा—आह्मी कांहीं नाहीं बुवा तिला चुकून देखील बोललों! ”

“ नाहीं बोललास हरामजाद्या ? मुली, जरा इकडे ये हो तूं—”

गंगा आंत जाऊन कांपतकांपत चाललेला प्रकार आश्चर्यानें पहात होती, ती बाहेर केशवरावांसमोर येऊन खालीं मान घालून उभी राहिली.

कोमल स्वरानें केशवराव तिला ह्मणाले “ झालें तें सारें सांगतेस का मुली ? ”

मनाला अत्यंत आश्वासन येऊन गंगा सांगूं लागली “ माझं हें असं कपाळ फुटल्यापासून माझे हे दीर अन् ही जाऊबाई माझा रात्रंदिवस सारखा छळ करताहेत. फार काय, माझ्या पोटाला दिखील धडपणं इथं मिळत नाहीं. नासकंकुजकं, शिळपाकं अन्न, अन् तेंहि थोडं—माझ्या वांटणीला आलं तर येतं. आज तर आतां हीं दोघं मला घरांतून घालवून देत

होतीं. कारभारीसाहेब! तुह्मीच सांगा, या घरांतून मला घालवून देणार हीं दोघंजणं कोण? घर काय फक्त यांचंच–माझा कांहींच का हक्क नाहीं इथं? कारभारीसाहेब, मीं तुमचं अनाथ लेंकरूं आहें. तुह्मीच माझा न्याय करा," असें ह्मणून गंगा स्फुंदूं लागली.

" उगी बेटा उगी–रडूं नकोस! पांड्या, मी जज्ज नाहीं, किंवा मॅजिस्टरहि नाहीं! पण तुमचे धनी जे इनामदार, त्यांचा मी प्रतिनिधि आहें, समजलास? हिच्या तक्रारींचा मी अवश्य बंदोबस्त करीन. या अनाथ स्त्रीचा न्याय मी करणार नाहीं, तर कोण करील? मीच बारकाईनें तुमचा न्याय करतों. कायरे पांड्या, तुह्मी दोघे भाऊ, असें सांगितलेंसना तूं मघाशीं?"

" होय हुजूर! "

" तर मग तुझें हें घर, त्याप्रमाणेंच तुमचा जो कांहीं जमीनजुमला, दाणागोटा, गुरूंवासरूं वगैरे मिळकत असेल, तिचा आठ आणे हिस्सा तुझ्या या भावजयीचा. हिंदुधर्माचा कायदा असा आहे. सापकरांच्या रोजनिशींत असें लिहिलें आहे—"

जरा तक्रारीच्या स्वरानें पांड्या ह्मणाला " अन् मी एकटा इनामदारांचा खंड भरतों तो! "

केशवराव ओरडून ह्मणाले " भरलास ह्मणून झालें काय? खंडाचे पैसे तुझ्या बापाच्या घरून आणून भरतोस कीं काय? जमिनीच्या उत्पन्नांतूनच ना भरतोस?"

"अन् मी इतकी मेहनत करतों ती? निढळाच्या घामानें जमीन भिजवतों, तेव्हां ना जमीन उत्पन्नाला येते? "

दांतओंठ चावून केशवराव ह्मणाले " जमिनीवर तूं नाहीं मेहनत करणार, तर काय तुझ्या घरांतल्या बायकांकडून तूं घाम काढविणार होय, हरामखोरा? तूं मोठा कायदेबाज बालिष्टर बनला आहेस तो आहेस ठाऊक पांड्या! मी सांगतों तें मुकाट्यानें ऐकून घे! तुझी ही भावजय जोंपर्यंत जिवंत आहे, तोंपर्यंत जमिनीचें अर्धें उत्पन्न हिचें. तुला जर प्रेमानें, आदरानें, गोडपणानें हिला वागवायचें असेल, तर हिला आप-

ल्या घरीं ठेवून घे. नाहीं तर तसें सांग—म्हणजे ज्यांच्या त्यां जमीन-जुमल्याचे अन् बाकीच्या इस्टेटीचे सारखे दोन भाग करून तुझ्या भावजयीच्या वांट्याचा आठ आणे हिस्सा तिच्या नांवानें रजिस्टर करून घेतों मुळीं. ही आपल्या बापाच्या घरीं जाऊन राहील. हिच्या वांट्याची जमीन मी कुणाला तरी खंडानें देऊन टाकतों. बापाच्या घरीं पायांवर पाय घालून स्वस्थ बसून आपल्या हिश्शाच्या जमिनीचें उत्पन्न ही जिवंत आहे तोंपर्यंत खुश्शाल खाईल. काय म्हणणें आहे तुझें यावर ? "

केशवरावजींनीं दिलेला हा निकाल ऐकून पांडू कांहीं वेळ स्तब्ध उभा होता. नंतर तो म्हणाला "मी तर माझ्या भावजयीला कसल्याहि प्रकारचा त्रास देत नाहीं. तीच सांगेना आम्ही तिचे काय हाल करतों ते?"

गंगा चटकन् म्हणाली "आणखी हाल हाल ते काय करायचे दुसरे ? मला धड पोटभर खायलाहि मिळत नाहीं. उठतांबसतां मला शिव्या देतात—फार काय मारहाण दिखील करतात मला !"

हें ऐकतांच हातांतला सोटा ताडकन् उंबरठ्यावर आपटून केशवराव ओरडले "अरे चांडाळा, पाप्या, हरामजाद्या—पांड्या! बायकांच्या अंगावर हात उचलतोस दुष्टा? अरे, बायका म्हणजे जगाची आद्यशक्ति भगवती, हें मूर्खा तुला माहीत नाहीं ? अरे, तुला नरकांत देखील रे नाहीं जागा मिळायची ! "

पांडू रडव्या स्वरानें म्हणाला " कधीं आम्हीं मारहाण केली हिला ? हिच्या बोलण्यावर बिलकूल भरंवसा ठेवूं नका हुजूर ! "

" हिच्या बोलण्यावर भरंवसा नको ठेवूं ? अरे, आतां या—या कानांनीं मीं ऐकलें तूं हिला काय म्हणालास तें ! 'ऊठ—जा—हो घरांतून बाहेर—नाहीं तर अस्से केंस धरून पायतणांनीं पाठ फोडीत तुला घरांतून बाहेर काढीन !' असें नाहीं तूं म्हणालास आतां हिला, सांग ! अरे राक्षसाच्या अवतारा ! या उंबरठ्याशीं उभा राहून अथपासून इतीपर्यंत सारें ऐकलें आहे मीं, समजलास ? तुला वाटलें असेल, हे कारभारीसाहेब आहेत भारी गोड माणूस, सारा दिवस माळ ओढीत नामस्मरण करीत असतात, कुणाला

एका वांकड्या शब्दानेंहि दुखवीत नाहींत ! तेव्हां आपल्या खुषीला येईल असें नाचावें, नाहीं ? पण गाढवा, हा कारभारी चांगल्यापाशीं तेवढा चांगला–पण तुझ्यासारख्या डांबीसाशीं डांबीस आहे, समजलास? दुष्ट पापी लोकांनां मजपाशीं एक क्षणभर देखील थारा नाहीं ! अजून माझें खरें स्वरूप नाहीं कळलें तुह्मांला, हरामखोरांनों ! तूं सच्चा माणूस आहेस, असें मला वाटलें; ह्मणूनच मीं आपण होऊन तुझ्याकडे आलों. तूं गेल्यावर बसल्याबसल्या माझ्या मनांत असा विचार आला, कीं, 'पांडू कांहीं तुपाचे पैसे घेऊन गेला नाहीं. आपणासाठीं त्या बिचाऱ्याला उगीच कां त्रास ? आपण नेऊन द्यावे त्याला रुपये.' अन् हे रुपये तुला द्यायलाच इथें मी आतां आलों होतों–हे बघ हवे तर." असें ह्मणून केशवरावांनीं खिशांतून रुपये बाहेर काढून दाखविले.

पांडू यावर काय बोलणार ? खालीं मान घालून केशवरावांपुढें दीनासारखा उभा होता.

केशवरावांनीं विचारलें "मग काय तुझा विचार पांडू ? तुमच्या जमीनजुमल्याच्या वांटण्या करूं, कीं, भावजयीला प्रेमानें अन् भलेपणानें घरांत नांदवतोस, बोल ?"

पांडू ह्मणाला " कां नाहीं प्रेमानें नांदवणार ? कां नाहीं तिच्याशीं मी भलेपणानें वागणार ? माझा तो सख्खा भाऊ नाहो ? एका आईच्या पोटांतून आलेले ना आह्मी ? त्याची तर ही बायको मी काय ह्मणून हिची निष्ठुरपणानें हेळसांड करीन ! आज जर माझा भाऊ जिवंत असता--" बोलतांबोलतां पांडू पहिल्यानें स्फुंदूं लागला; नंतर दोन्ही हातांनीं तोंड झांकून मोठमोठ्यानें रडूं लागला " अरे माझ्या पाडसा--नरू–अरे नरू ! कुठें रे गेलास तूं मला टाकून !"

केशवराव ह्मणाले "अरे, थांब–थांब पांडू ! असें रडूनओरडून माझ्या मनावर कांहीं देखील परिणाम व्हायचा नाहीं ! मीं जें ह्मटलें, तस्सें केल्याशिवाय कधींहि रहाणार नाहीं. जर आपल्या या भावजयीचे कोणत्याहि प्रकारानें हाल केलेस, तिला मारहाण केलीसबिलीस, असें मीं कधीं ऐकलें,

तर त्या क्षणीं तुझा अर्धा जमीनजुमला तुझ्यापासून हिसकावून घेऊन या गरीब मुलीला तो देऊन टाकीन–खूब सावध रहा आजपासून! रात्र बरीच झाली. मी जातों आतां. हां–अन् हे पांच रुपये घेऊन ठेव आपणाजवळ; उद्यां सकाळीं पांच रुपयांचें तूप दहा वाजायच्या आंत कचेरीकडे घेऊन ये. पण तूप मात्र अगदीं नामी साजुक पाहिजे हां! मुली, रडूं नकोस आतां. तुला जर यांनीं कधीं त्रास दिला, मारहाण केली, तर तत्क्षणीं मला येऊन कळीव. म्हणजे मी त्याचा काय तो योग्य बंदोबस्त करतों बघ. इनामदारांचा मी प्रतिनिधि–गांवच्या लोकांचा मायबाप आहें; माझ्या चार हद्दींत कोठल्याहि प्रकारचा अधर्म अन् अन्याय होऊं द्यायचा नाहीं मी. जातों तर आतां."

पांडू हात जोडून म्हणाला "हुजूर, गरीबाच्या घरीं पायधूळ झडली आहे आपली--एकवार नुसता तमाखू तरी पिऊन जा—"

"छे–आतां रहायला नाहीं मला वेळ. अजून स्नानसंध्या अन् एक हजार जप करायचा राहिला आहे माझा. हें सारें झाल्याशिवाय कांहीं तोंडांत मी पाणी घालीत नाहीं. मग कुठें झोंप—"असें म्हणून केशवरावांची स्वारी निघून गेली.

जातांच पोटोबाची व्यवस्था लावून खोलीचें दार बंद करून केशवरावांनीं एका पेटींतून रावसाहेबांच्या नोटांचें पुडकें बाहेर काढलें. नंतर डोळ्यांवर चष्मा चढवून सहास्य मुखानें ते त्या मोजूं लागले. कॅन्व्हासच्या बॅगमधून बाटली बाहेर काढून त्यांत थोडेंबहुत जें अमृत बाकी राहिलें होतें, तें त्यांनीं खलास करून टाकलें. त्यानें थोडेंसें उत्तेजन येतांच साऱ्या नोटा सभोंवार पसरून प्रेमगद्गद, पण जड अशा स्वरानें ते आपणाशीं बोलूं लागले "हे हजार रुपये आतां केवळ माझे.! यांतली एक फुटकी पै देखील मी कुणाच्या नाहीं हातीं लागूं देणार–हे हजार रुपये माझे–माझे–माझे! जवळ बुद्धि असली कीं पैसा अलोट!"

## प्रकरण चौतिसावें.

## सुडाची सुरुवात.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं बारा वाजावयाच्या सुमाराला भोजन वगैरे आटोपून केशवरावजींची स्वारी नाईकसाहेबांची भेट घ्यावयाच्या हेतूनें मेण्यांत बसून ठाण्याकडे निघाली. पोटूहि कारभारीसाहेबांच्या मेण्याबरोबर एका तट्टावर स्वार होऊन चालला होता. तुपाची चरवी घेऊन एक शिपाई अगोदरच ठाण्याकडे रवाना झाला होता.

सोनगांवाहून पोलिसठाणें सरासरी तीनसवातीन कोस दूर होतें. दोन वाजावयाच्या सुमाराला केशवरावजींचें लटांबर तेथें जाऊन पोहोंचलें. पोलिसठाण्याची इमारत एका लहानशा तलावाच्या कांठीं होती. समोर दोन मोठीं वडाचीं झाडें होतीं. त्यांपैकीं एका वडाच्या झाडाखालीं केशवरावजींचा मेणा उतरला. केशवराव मेण्यांतून खालीं उतरून पहातात, तों एक तेवीसचोवीस वर्षांचा तरुण पांढरपेशा गृहस्थ पायांतील वहाणा करकरावीत इमारतीच्या पडवींत इकडूनतिकडे येरझारा करीत होता.

केशवराव हळुहळू त्या गृहस्थाजवळ गेले आणि आपला परिचय नम्र शब्दांनीं त्याला देऊन त्याचाहि आपण करून घेतला. तो नाईकसाहेबांच्या हाताखालचा एक साधा शिपाईच असून तो नुकताच नोकरीला लागलेला होता. इतर लोक फार तर त्याला 'शिपाईदादा' एवढेंच संबोधन देत; परंतु केशवराव त्याला नम्रपणें ह्मणाले "ओः! एकूण आपण इथें अंमलदार आहां. छोटे नाईकसाहेबच ह्मणाना! वावा--फार उत्तम आहे! आपल्याशीं दोन शब्द बोलायला मिळाले, हें आमच्यासारख्याचें मोठें नशीबच ह्मणायचें. नाईकसाहेबांचें नांव काय इथल्या ह्मटलंत ?"

'अंमलदारसाहेब' केशवरावांच्या या नम्र भाषणानें त्यांच्यावर अतिशय खुष होऊन गेले. ते ह्मणाले "भवानराव मोरे."

"असें! कुठल्या गांवचे हे ?"

"तिकडचे--रहिमतपुराकडले आहेत."

"आतां कुठें आहे नाईकसाहेबांची स्वारी?"

'अंमलदार' चेहरा जरा रडवा करून ह्मणाले "नाईकसाहेब आहेत आपल्या बिन्हाडीं पलीकडे. आज दोन दिवस झाले, त्यांची बायको विषमाचें निमित्त होऊन इथेंच वारली. नाईकसाहेबांचा तिच्यावर जीव कीं प्राण. सारजाबाई अन् भवानराव यांचें एकमेकांवर विलक्षण प्रेम– एकाच्या पायाला कांटा बोंचला, तर दुसऱ्याला त्याच्या वेदना व्हायच्या. अशी बरोबरची बायको अशा वयांत दगा देऊन गेल्यावर नाईकसाहेबांनी अगदीं हाय खाल्ली, तर त्यांत कांहीं आश्चर्य आहे का कारभारी-साहेब—"

आपण अगदीं कुक्षणीं नाईकसाहेबांच्या भेटीला आलों, असें केशवरावजींनां वाटलें. ते ह्मणाले "अरे अरे! असा प्रसंग शत्रूवर देखील येऊं नये. कांहीं मुलेंबाळें तरी त्यांनां?"

"एक मुलगा अन् एक अंगावरली मुलगी. बायकोच्या मरणानें नाईकसाहेबांची अगदीं कमरच खचून गेल्यासारखी दिसते. परवांपासून ते अगदींच जरूरीच्या कामाशिवाय घरांतून बाहेरच पडले नाहींत. मुलीला घेऊन सारजाबाईच्या बाजेवर मुकाट्यानें डोळ्यांतून पाणी काढीत बसले आहेत. मी अन् मामासाहेबांनीं त्यांची पुष्कळ समजूत करून पाहिली–पण छे:! त्यांच्या शोकाचें आपलें दरक्षणीं पाऊल पुढें–आमचा तर इलाज हरला सारा."

"हे मामासाहेब कोण?"

"सारजाबाईचे भाऊ. सारजाबाईचें त्यांच्यावर प्रेम, ह्मणून नाईकसाहेबांचेंहि त्यांच्यावर अतोनात प्रेम बघा. सारा भरंवसा काय तो त्यांच्यावर. त्यांच्यावांचून नाईकसाहेबांच्या घरांतलें–घरांतलेंच काय, पण नोकरीच्या कारभाराचें पानहि नाहीं हलायचें. मामासाहेब करतील ती पूर्वदिशा! आज वर्षभर मी पहातों आहें ना! नोकरीविकरीच्या कारभारांत सुद्धां मामासाहेबांचें वजन भारीच आहे नाईकसाहेबांवर!"

'अंमलदारसाहेब' बरेच भडभडे आणि बोलभांड दिसले. युक्तियुक्तीनें प्रश्न विचारून केशवरावजींनीं त्यांच्याकडून एवढी माहिती मिळविली, कीं, मामासाहेब ह्मणजे बहुधा प्रत्येक बाबतींत नाईकसाहेबच बनलेले होते. सरकारीरीतीनें ठाण्यावरील पोलिसअधिकारी या नात्यानें त्यांचा लोकांशीं कांहीं संबंध नसला, तरी अप्रत्यक्ष रीतीनें नाईकसाहेबांचे कर्ते मेहुणे या नात्यानें त्यांचा बाहेरच्या लोकांशीं बराच संबंध येत असे. नाईकसाहेब हे भारी करडे, न्यायी, सरळ, पापभीरु अंमलदार होते; पण मामासाहेबांवर त्यांचा प्रेमयुक्त अतोनात विश्वास हा त्यांच्यांत एक लहानसा दोषच होता, असें म्हणावयाला हरकत नाहीं, आणि त्यांच्या या स्वभावदोषाचा मामासाहेब फारच फायदा करून घेत असत. अशा प्रकारचीं कांहीं उदाहरणें 'अंमलदारसाहेबां'नीं केशवरावजींनां बोलण्याच्या भरांत सांगून टाकलीं. त्यांच्या भडभड्या भाषणावरून आमच्या चाणाक्ष केशवरावजींनीं आपल्या मनाशीं पक्का कयास बांधला, कीं, ठाण्यावर नाईकसाहेबांपेक्षां मामासाहेब हेच खरे कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् शक्तीचे—मग सरकारशीं त्यांचा कांहीं का संबंध नसेना—कर्तृत्ववान् पुरुष आहेत.

शेवटीं, केशवरावांनीं उद्वेगानें म्हटलें "अरे अरे, तर मग मी भलत्याच वेळीं आलों म्हणायचा—नाईकसाहेब कांहीं भेटत नाहींत मला—"

"कां बरें? कांहीं मारामारी, खूनबीन कांहीं झालं आहे कीं काय?"

"छे छे--तसें कांहीं नाहीं. मी आलों आहें नवीनच या सोनगांवला कारभारी होऊन. तेव्हां आपला मनाशीं विचार केला, कीं, आपणां सर्वांनां एकदां भेटून जावें म्हणून—याच हेतूनें आलों होतों."

केशवरावांजवळच्या तुपाच्या चरवीकडे दृष्टि जाऊन शिपाईबुवांनीं विचारलें "हें काय आहे?"

जणूंकाय आपणाला कांहींच कळलें नाहीं, असें दाखवून केशवराव म्हणाले "काय?"

अंगुलिनिर्देश करून शिपाईबुवा म्हणाले "या चरवींत काय आहे?"

" चरवींत ! नाईकसाहेबांच्या भेटीला आलों होतों, तेव्हां म्हटलें रिकामें नये जाऊं. थोडेंसें तूप आणलें आहे त्यांच्यासाठीं. आमच्या गांवांतलेंच आहे चांगल्यापैकीं. साजूक आहे."

"तूप-अन् साजूक आहे? अस्सें! अहा! साजूक तूप तर इथें कधीं जन्मांत नाहीं दृष्टि पडत आमच्या. तुपांत चर्बी मिसळतात नव्हे, ह्मणून आमच्या आईनें तर तूपच खायचें सोडलें बघा! ती ह्मणते 'मी आहे बाबा विधवा ह्मातारी–आजपर्यंत कांहीं चर्बीबिर्बीचा संस्कार झाला नाहीं. मग इथेंच असलें तूप खाऊन नरकांत जाऊं? त्यापेक्षां नाहींच खाल्लें तें–असे कितीसे दिवस काढायचे आहेत?' आमच्या ब्राह्मणांच्या खाण्यांत तूपच काय तें थोडेंसें सात्त्विक खाणें–तेंहि नाहींसें झाल्यावर मग काय हो? ह्मातारीची अगदीं दशा झाली आहे पहा. नाईकसाहेब आहेत आपले मराठे–त्यांचें कांहीं तुपावांचूनच नाहीं अडत!"

केशवरावांनां शिपाईबुवांच्या मनांतला भाव समजला. पुढें कदाचित् ते स्पष्टपणेंच तुपाची मागणी आपणापाशीं करतील, या आशंकेनें ते ह्मणाले "अहा, आपण इथें असाल, अशी माझी कल्पनाहि नव्हती. असती, तर आपणासाठींहि एक लहानशी चरवी आणली असती मीं--अरेरे! आपल्या मातुःश्रीचे भारी हाल होतात अं?"

"तें कांहीं विचारूं नका–अच्छा. आपण गेल्यावर एक चरवीभर द्या पाठवून. जातांना मी एक माणूसच देतों आपणाबरोबर. पांचएक शेर असलें ह्मणजे बस्स आहे--फार नको. आपल्या अगोदर ते गोविंदराव होते नव्हे, त्यांची आमच्याशीं भारी मैत्री बघा! तिकडच्या बाजूला आमचें जाणें झालें कुठें, ह्मणजे आमचा अड्डा आपला गोविंदरावांकडे. भाजीबिजी ताजी मिळायची आह्माला–चहाकॉफी बस्स–मजा!"

"बरोबरच आहे–आपणासारख्या बड्या लोकांशीं मैत्री नाहीं करायची, तर करायची कुणाशीं? आपण त्या बाजूला आलांत कधीं कोणत्या निमित्तानें, ह्मणजे गरीबाच्या कचेरींत अवश्य पायधूळ झडली पाहिजे आपली—"

" जरूर- जरूर ! आपणहि गोविंदरावजींप्रमाणें मोठे सज्जन दिसतां --बरें पण तें तूप मात्र विसरूं नका--मी देईन त्याचे पैसे--"

" वा वा--पैसे का घ्यायचे आपणाकडून ? वा वा ! मी देईन पाठवून तूप--त्यासाठीं माणूस नको पाठवायला. मग काय जावेंच ह्मणतां आतां ? नाईकसाहेबांची भेट होती, तर बरें झालें असतें. "

" भेट न व्हायला कांहीं हरकत नाहीं. मी जाऊन वर्दी देऊन येतों हं—"

थोड्याच वेळांत शिपाईबुवा आंत जाऊन आले व त्यांनीं आपल्या-मागून यावयाला केशवरावांनां सांगितलें.

नाईक आपल्या बिऱ्हाडीं बसले होते. त्यांचा चेहरा कमालीचा विषण्ण झालेला दिसत होता. ते मध्यम वयाचे होते. त्यांच्या चेहऱ्यांत मार्दव, सरलता व उदारता दृग्गोचर होत असून कोणाच्याहि मनांत त्यांच्या-बद्दल आदर उत्पन्न होत असे.

" या–बसा. आपण सोनगांवचे कारभारी, होय ना? नवीनच आलांत वाटतें? "

" हो–आपली भेट घ्यावी ह्मणून—"

नाईक खिन्न स्वरानें ह्मणाले " मजवर कोणता प्रसंग गुदरला आहे, हें नारायणानें तुह्मांला सांगितलेंच आहे. काय करूं मी ? आपणाशीं दोन घटका बोलत बसलों असतों मी–पण मनच नाहीं ठिकाणावर. माझ्या जागीं मामांनां समजा, अन् त्यांच्याशीं काय बोलायचें तें बोला–क्षमा करा मला–नारायण, मामाची अन् यांची गांठ घालून दे हां–या आपण आतां !"

आतां येथें रहाणें बरें नाहीं, असा विचार करून केशवराव उठले आणि नारायणाच्या मागून हळुहळू तेथून बाहेर आले.

" बसा जरा--आतां येतील मामासाहेब—"

पांचएक मिनिटें नारायण व केशवराव यांच्यांत गप्पाटप्पा चालल्या आहेत, इतक्यांत मामासाहेबांची स्वारी तेथें आलीच. त्यांचा झोकनोक

साधारणपणें ऐटींतच दिसला. दिवसा झोंपल्यामुळें स्वारीचे डोळे लाल झाले होते. त्यांच्यामागोमाग एक मुलगेलासा नोकर असून त्याच्या हातांत एक मासे धरण्याचा गळ होता. दररोज संध्याकाळीं मामासाहेब तळ्यांत मासे धरण्याचा उद्योग करीत.

मामासाहेब दृष्टीला पडतांच नारायण ह्मणाला "मामासाहेब, नाईक-साहेबांनीं तुमची अन् यांची गांठ घालून द्यायला सांगितलें आहे."

निद्राजडस्वरानें मामासाहेबांनीं विचारलें " कोण हे ? "

" हे सोनगांवाला नवीन कारभारी होऊन आले आहेत, पूर्वी तिथें आपले गोविंदराव बर्वे होते ना ? त्यांच्या जागीं हे अॅक्टिन् करताहेत."

" रावसाहेब देशमुखांचे कारभारी? "

" होय–साहेब !"

" आपलें घर कुठें? "

" कोल्हापुर इलाख्यांत. "

" ओः! कोल्हापुराहून इतक्या लांब आलेत तुह्मी ? "

केशवरावजींनीं डावा हात आपल्या पोटावर दोनतीन वेळ मारून ह्मटलें " यासाठीं आलों ! "

मामासाहेब हंसून ह्मणाले " हो–बरोबर. सर्वेचजण यासाठीं आपला मुलूख सोडून दूर जातात्. आपण नाईकसाहेबांच्या भेटीला कशाला आलां होतां ? "

"विशेष कांहीं नाहीं.नवीनच आलों आहें मी या जागेवर. तेव्हां विचार केला, कीं, नाईकसाहेबांची एकदां भेट घेऊन जावें. आमच्या धनीसाहेबांचा हुकूम आहे मला, कीं, ' नाईकसाहेब हेच आपले जज्ज मॅजिस्टर आहेत--सदासर्वदा त्यांच्याशीं मिळूनमिसळून असावें. त्यांचा असंतोष होईल, असें कांहीं करूं नये ! राजाच्या अन् वैद्याच्या भेटीला रिकाम्या हातानें जाऊं नये ह्मणतात, ह्मणून थोडेंसें हें साजूक तूप आणलें आहे त्यांच्या भेटीला."

मामासाहेब आपणाशींच हंसून ह्मणाले " बरें झालें, माझ्यापाशींच ही गोष्ट बोललास ह्मणून. नाईकसाहेबांपाशीं गोष्ट काढली असतीस, कीं, त्यांनीं तुझी चांगली खरडपट्टी काढून हांकूनच लावला असता. छे बुवा –भारीच सरळ माणूस तो–" नंतर ते केशवरावांनां ह्मणाले "वा वा –तुमचे धनी रावसाहेब मोठे सज्जन माणूस दिसतात. त्यांचा हा व्यवहार पाहून आह्मी–ह्मणजे नाईकसाहेब–भारी खुषी झाले ह्मणावें. त्यांनां आमचे बहुत रामराम कळवा. अरे, कोण आहे रे ? हें तुपाचें भांडें आंत नेऊन ठेव. बरें, काय कारभारीसाहेब ! मासेबिसे धरतां का नाहीं तुह्मी कधीं ? "

केशवराव हंसून म्हणाले " हें: हें: -ब्राम्हणाच्या जन्माला आलों आहें ना! म्हणून उघडपणें तसें नाहीं करवत! अन् आतां वय झालें कीं नाहीं माझें? तेव्हां असल्या दगदगी नाहीं होत आतां हातून—"

मामासाहेब हंसून म्हणाले " छे:--आपलें काय एवढें मोठें वय झालें आहे ? आमच्यापेक्षां आपण आठदहा वर्षांनीं मोठे असाल झालें. चला जरा. मी मासे धरतों, आपण बसून पहा आमचा पराक्रम ! तिथेंच काय तुह्माला बोलायबिलायचें असेल तें बोलूं—"

तळयाच्या पश्चिम तीरावर एका मोठ्या झाडाच्या छायेखालीं एक लहानशी जागा मुद्दाम बसण्यासाठींच तयार केली होती. तेथें घोंगडी पसरून मामासाहेब मासे धरावयाला बसले. नोकरानें सर्व सरंजाम त्यांच्या हातीं देऊन गुडगुडीहि सज्ज करून त्यांनां आणून दिली. गळ टाकून मामासाहेब स्वच्छंदानें धूम्रपान करीत बसले. नोकरानें कमळाची एक देंठी आणून केशवरावांच्या हातीं दिली--तिच्या साहाय्यानें मध्यें-मध्यें तेंहि गुडगुडीचा रसास्वाद घेऊं लागले.

त्या उभयतांत गप्पा सुरू झाल्या. नाईकसाहेबांवर मामासाहेबांचें अतोनात वजन आहे, अशी केशवरावजींची त्यांवरून खात्री झाली. रावसाहेबांच्या इनामदारीसंबंधानेंहि गोष्टी निघाल्या. बोलतांबोलतां मामासाहेब ह्मणाले " आपल्या यजमानसाहेबांनां ह्मणावें, कीं, आपल्या

एकाद्या दांडग्या बेमुर्वतखोर कुळाबिळाला जर शासन करायच असल, तर तें या मामाला कळवा! आह्मी त्याचा हां हां ह्मणतां योग्य बंदोबस्त करून देऊं."

केशवराव ह्मणाले "हो हो--अवश्य सांगेन यजमानसाहेबांनां.आपणासारख्यांवरच तर आमचा सारा भरंवसा. नाईकसाहेबांच्या अन् आपल्या मदतीवांचून आह्मांला एक पाऊल तरी टाकतां येईल का? एका कुळाला ताळ्यावर आणायची भारीच जरूर पडली आहे आह्मांला मामासाहेब! आपण जेव्हां आतां स्वतःच ही गोष्ट काढलीत, तेव्हां आतां सांगायला कांहीं हरकत नाहीं. आमच्या या तालुक्यांत तांबखेड ह्मणून एक गांव आहे. त्या गांवीं सखाराम कुडव ह्मणून आमचें एक बऱ्यापैकीं कुळ आहे. पण काय त्याचा दिमाख आहे ह्मणतां! हलक्या कुळांतल्या मंडळीला दोन अक्षरें कुठें लिहायवाचायला येऊं लागलीं, कीं, बेट्यांनां अस्मान अगदीं ठेंगणें होऊन जातें!"

इतक्यांत मामासाहेबांच्या गळाची दोरी हलूं लागली. त्याबरोबर केशवरावांनां गप्प रहाण्याविषयीं खूण करून त्यांनीं गळाची मूठ हातांत घट्ट धरली व झटकन् गळ वर ओढून घेतला. पण पहातात, तों तो रिकामाच वर आला! "ओः--पळाला वाटतें शिंचा!" असें ह्मणून पुनः गळाला आमिष लावून मामासाहेबांनीं तो पाण्यांत टाकला व नंतर ते ह्मणाले "काय नांव ह्मटलेंत त्याचें?"

"सखाराम कुडव--तांबखेडचा सखाराम कुडव."

"बेटा मोठा पाजी आहे म्हणतां?"

".महा पाजी--मोठा बदमाष आहे तो! कांहीं बायकाबियकांच्या कारभाराबद्दल आमचे धनीसाहेब त्याच्यावर भारीच रागावले आहेत. मला ते ह्मणाले 'कांहीं तरी युक्तीनें बेट्याला चामडीं कुटायला पाठवशील वर्षसहामहिने, तर माझ्या मनाची हुरहूर जाऊन भारी आनंद वाटेल!' मीं त्यांनां ह्मटलें 'त्यांत काय आहे? पाहूं नाईकसाहेबांकडे कांहीं खटपट करून.' मला ह्मणाले 'ठीक--जाऊन ये तर तिकडे एकदां-.

नाईकसाहेबांनीं माझा निरोप सांग, 'जर माझें हें काम तुह्मी करून द्याल, तर पानसुपारीला ह्मणून तुम्हाला दोनशें रुपये देईन, अन् त्यांपैकीं हे शंभर घेऊन जाच !' "

मामासाहेबांचा गळ पुनः हलूं लागला; परंतु तिकडे या वेळीं त्यांचें लक्ष्यहि नव्हतें. ते आपल्या मनाशींच ह्मणाले " बरें झालें, हें कूळ माझ्याकडे आलें ह्मणून ! नाईकसाहेबांजवळ जर अशी कांहीं हा गोष्ट काढता, तर त्यांनीं त्याला जेल दाखवायचीच पाळी आणली असती ! काय होईल तें होवो–नाईकसाहेबांनां एका अक्षरानेंहि कांहीं थांगपत्ता लागूं न देतां मी हा लग्गा तर साधणारच !" नंतर केशवरावांनां त्यांनीं विचारलें " रुपये आणले आहेत का तुह्मीं ?"

"नाहीं, बरोबर नाहीं आणले--कचेरींतच ठेवले आहेत. नाईकसाहेबांचा मला बिलकूल परिचय नव्हता--आपणहि इथें असाल अशी कल्पना नव्हती. अशी कांहीं गोष्ट काढली तर शेवटीं आपणच एकाद वेळीं पेंचांत येऊं, अशी मला भीति वाटत होती. हो--अलीकडचे अधिकारी--पैशांची गोष्ट काढतांच एकदम जेल दाखवायचे! मागच्यासारखा कारभार आतां राहिला नाहीं. आपण होऊन आमचें काम करून द्यायची गोष्ट काढलीत, ह्मणून हें आपणाला सांगायला तरी धीर आला. पैसे काय–उद्यां आणून देखील हजर करीन ! पण काम झालें पाहिजे आमचें !"

"त्याबद्दल नका आपण कांहीं काळजी करूं ! उद्यां पैसे आणलेत तरी चालतील; पण आपल्या धनीसाहेबांनां सांगा, कीं, हें सारें काम कांहीं इतक्या स्वस्त्यांत होण्याजोगें नाहीं ! एका निरपराधी माणसाला तुरुंगांत घालणें या कायद्याच्या राज्यांत भारीच कठिण आहे अन् सर्व साक्षीबिक्षी नीट तयार केले पाहिजेत. मामलेदारांनीं त्याला शिक्षा केली, तरी त्यांच्यावर जज्ज आहेत, अन् त्यांच्यावर हायकोर्ट बसलेंच आहे. एकाद वेळीं नाईकसाहेबांवरच यायची घोरपड उलटी ! कधीं कोणत्या रस्त्यानें काय प्रसंग येईल त्यांच्यावर, याचा कांहीं नेम नाहीं. ह्मणून फक्त दोनशें रुपड्यांकरतां एवढ्या संकटांत उडी टाकणें कांहीं

आमच्यानें नाहीं होणार, असें रावसाहेबांनां स्पष्ट सांगा तुह्मी! जर एक पंचकडी खर्चायची तयारी असेल, तर मग पाहूं प्रयत्न करून !"

केशवराव ह्मणाले " आपण जें ह्मणतां मामासाहेब, त्यांतलें एक अक्षर देखील खोटें नाहीं! दोनशें रुपये ह्मणजे अगदीं क्षुल्लक रकम, यांत कांहीं संशय नाहीं. अन् यजमानसाहेबांनां असें मीं सांगितलें देखील होतें. तेव्हां ते ह्मणाले 'दोनशें रुपयांवर जर काम नसेलच भागत, तर आणखीहि देऊं थोडें-बहुत कांहीं तरी!' मी सांगेन यजमानसाहेबांनां निरोप आपला. आपली रकम वाढवायची मीहि खटपट करून पहातों. आपणाला जितकें अधिक मिळेल, तितका माझा फायदाच आहे! आपल्या इकडे काय रीत आहे कांहीं मला माहीत नाहीं; पण आमच्या तिकडे इनामदारांच्या बाबतींत तरी निदान शंभरांला पंचवीस टक्के तरी आह्मां कारभाऱ्यांनां कमिशन मिळतें—"

मामासाहेब हंसून म्हणाले " जर तुम्ही मला रावसाहेबांकडून पांचशें देववाल, तर त्यांतले शंभर तुमचे समजा ! त्यापेक्षां कमी रकम असली, तर शेंकडा दहाप्रमाणें तुम्हाला कमिशन देऊं. आमच्या या प्रान्ताला कमिशनचा दर हा असा आहे बुवा!"

" माझ्याकडून प्रयत्न व्हायला बिलकूल कसर नाहीं व्हायची! आतां कोणत्या युक्तीनें त्या बेट्याला गोत्यांत आणायचा, तें सांगा पाहूं?"

कांहीं वेळ विचार करून मामासाहेब ह्मणाले "युक्त्या त्याला पुष्कळ आहेत. त्याचें घर पाहिलें आहे तुम्हीं?"

" नाहीं."

"तर मग आधीं त्याचें घर पाहून ठेवणें फार जरूर आहे. योग्य संधि पाहून एकादी जिन्नस त्याच्या घरीं ठेवून, त्याच्या घराची एकदम झडती घ्यायची. चोरीचा माल ह्मणा, एकादी बंदुकतरवार ह्मणा, दारू गाळण्याचें कांहीं सामान ह्मणा, खोटें नाणें पाडण्याचें यंत्रबिंत्र ह्मणा—असा कांहीं तरी जिन्नस पाहिजे त्याच्या घरीं लपवून ठेवायला—किंवा कुणाच्या तरी घराला आग लावून द्यायची, अन् त्याच्यावर तो आरोप येईल असें

करायचें. त्या गांवांत त्याचा एकादा कुणी दुष्मन् आहे कीं काय, याचीहि चौकशी केली पाहिजे. कोणी असा असला, तर त्याला हाताशीं धरला पाहिजे. माझें मत विचाराल, तर त्याच्या घरांत कांहीं तरी चोरीचा जिन्नस ठेवून त्याची झडती घेणें, हाच सर्वांपेक्षां सोपा उपाय आहे."

क्षणभर विचार करून केशवरावजी ह्मणाले "आपण आह्मांला नाईक-साहेबांच्या जामीं आहांत!"

केशवरावांच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच मामासाहेबांचें हृदय थरारलें. नाईकसाहेबांनां यांतलें एक अक्षर कळेल, तर तो न्यायपरायण अंमलदार काय अनर्थ करील, याची त्यांनां चांगली कल्पना होती. परंतु प्रियपत्नीवियोगाच्या दारुण यातना ते भोगीत असतांच आपला कांहीं तरी लग्गा साधून घ्यावयाला ही नामी संधि आहे, असा मामासाहेबांचा कयास होता. ते धीटपणें ह्मणाले "त्याबद्दल नका तुह्मी कांहीं काळजी करूं–"

"आपण जें कांहीं सांगाल, तें करायला आमची तयारी आहे."

"ठीक तर मग. उद्यां ते शंभर रुपये घेऊन या. उद्यां एकीकडे बसून आपण पुढचे बेतबात सारे कायम करून टाकूं."

"बरें तर, उद्यां येईन मी. उद्यां याच वेळीं आलों, तर भेट होईल ना आपली?"

"होईल बहुतकरून. पण नाईकसाहेबांनां कुठें खून झाल्याची वर्दी मिळाली, कुठें चोरी झाली, तर मला ते तिकडे पाठवतील. माझ्यावर काय तो सारा त्यांचा विश्वास. पण उद्यां या वेळेला शेंकडा नव्याणव हिश्शांनीं मी इथेंच आहें."

नंतर केशवराव मामासाहेबांचा निरोप घेऊन तेथून निघून गेले.

---

## प्रकरण पस्तिसावें.

## पेंचांत धरला!

दुसऱ्या दिवशीं ठरल्या वेळीं ठाण्यावर जाऊन केशवरावांनीं मामासाहेबांची भेट घेतली. नाईकसाहेबांची व त्यांची गांठ पडूं नये, अशी मामासाहेबांनीं योग्य व्यवस्था केली होती. एकीकडे गेल्यावर केशव-

रावांनीं शंभर रुपये मामासाहेबांच्या स्वाधीन केले. बराच वेळपर्यंत त्या दोघांत कानगोष्टी चालल्या होत्या. शेवटीं, सखारामाला गोत्यांत आणावयाची एक युक्ति कायम होऊन त्यासंबंधानें सर्व व्यवस्थाहि ठरली.

मामासाहेब ह्मणाले " इकडे तर सारा बंदोबस्त ठीक झाला; पण बाकीच्या रुपयांची व्यवस्था ?"

केशवराव ह्मणाले "आमचे यजमानसाहेब सध्यां घरीं नाहीं आहेत."

" कुठें गेले आहेत ? "

" मुंबईला. ते परत आल्यावर त्यांची व्यवस्था होईल. पांचशें पुरे न मिळोत—पण चारएकशें रुपये तरी देववितों आपणाला—"

" पहा प्रयत्न करून कांहीं वाढवतां येते का रक्कम ! "

" तें कांहीं आतांच नाहीं सांगतां येत. तरी पण प्रयत्नांत कसर नाहीं व्हायची माझ्याकडून. "

" ठीक आहे. मग आज संध्याकाळीं जाऊन सारी व्यवस्था अगदी बरावर करून टाका. बेटा पण कबूल होईल ना ? "

" कबूल होईल ह्मणजे ? तो काय–पण त्याचा बाप, त्याचे बेचाळीस पूर्वजहि होतील चट् कबूल–त्याबद्दल आपण अगदीं निश्चिंत रहा मामासाहेब !"

थोड्याच वेळानें गुडगुडीचे चारदोन दम मारून केशवरावजींची स्वारी आपल्या तट्टावर स्वार होऊन सोनगांवकडे निघाली.

संध्याकाळच्या सुमाराला केशवराव आपल्या कचेरीला पोहोंचले. हातपाय धुऊन आपली रुद्राक्षांची माळ हातीं घेऊन ते जप करीत बसले. गोमुखींत अंगुलींची धांवपळ सारखी सुरू होती. माळेच्या मण्यांचा आवाज होत होता; तोंडानें ' राम राम राम राम ' असा नामध्वनिहि मधुनमधून ऐकूं येत होता; परंतु केशवरावांच्या मनांत मात्र खालीं लिहिल्याप्रमाणें विचारतरंग खेळत होतेः—

" मला असें खूब वाटलें होतें, कीं, अप्पासाहेबांचे ते हजार रुपये आपल्या पचनीं पडले ह्मणून ! पण त्यांतले चारएकशें रुपये आपणाला

ओकायला पाहिजेत, असें दिसतें आहे. एकशें तर आज देऊनहि आलें म्हणा. आणखी तीनशें त्या मामाच्या कपाळावर घातलेच पाहिजेत. त्याशिवाय सुटका नाहीं दिसत. तरी चाळीसएक रुपये त्यांपैकीं कमिशन म्हणून मला परत मिळतील म्हणा. पण तीनशें साठ तर गेलेच कीं नाहीं आपल्या हातांतून कायमचें! परंतु कारणार काय? पैशांचा लोभ धरावा, तर आपल्या शत्रूचा नाश कसा होणार? त्याचा नाश करायचा, तर पैसे पाहिजेत. तरीपण हे पैसेहि आप्पासाहेबांकडून कांहीं तरी युक्ति लढवून काढलेच पाहिजेत आपणाला. यजमानसाहेबांच्या स्वारीनें कुठें पोबारा केला आहे, हें कांहीं अजून कळलें नाहीं. कुठें कां जाईनात ते, मला तिथून पत्र लिहिल्याखेरीज कांहीं खास रहात नाहींत! इकडच्या बातमीसाठीं त्यांच्या मनाला सारखी रुखरुख लागून राहिली असेल. अप्पासाहेबांकडून पत्र आलें, म्हणजे त्यांजकडून कोणत्या युक्तीनें पैसे काढायचे, तें ठरवतां येईल. सखाराम–सखाराम! ज्या दिवशीं नानासाहेब तुला हुकूम करतील, त्या दिवशीं माझ्यावर फिर्याद गुदरायला तूं तयार आहेस–नव्हे काय? तुझी ही फिर्याद मी आतां चांगलीच काढतों बाहेर सख्या! तूं मला तुरुंगांत डांबणार होतास नव्हे? आतां कोण कुणाला तुरुंगांत पोंचवतो, तेंच आपण पाहूं या. पण या गंड्याला फिर्यादी करायचा, म्हणून आम्हीं ठरवलें आहे. तो बेटा कबूल झाला याला, म्हणजे मिळवली! इथें येतांच त्याला बोलावणें पाठवलें–पण अजून कसा आला नाहीं बेटा! तो आला म्हणजे त्याला वाटेल तें भयबीय दाखवून आपल्या म्हणण्याला त्याला कबूल करून घेतलाच पाहिजे. त्याशिवाय गत्यंतरच नाहीं मला!"

केशवरावांचें याप्रमाणें विचारभ्रमण चाललें असतां पांडू तेथें येऊन हजर झाला. नम्रपणें रामराम करून तो म्हणाला "हुजुरांनीं बोलावणें पाठवलें होतें मला?"

केशवरावांनीं त्याला खुणेनें खालीं बसावयाला सांगितलें व गोमुखी छातीजवळ नेऊन, डोळे मिटून ते ध्यानस्थ बसले. जवळजवळ सातआठ

मिनिटें ते याप्रमाणें बसले होते. नंतर गोमुखी कपाळाला लावून, कोणालासा प्रणाम करीत तोंडानें अस्फुट स्वरानें ते कांहीं बडबडूं लागले. शेवटीं पांडूकडे वळून ते ह्मणाले "आज पुनः मी ठाण्यावर गेलों होतों."

"ठाण्यावर ? कशाला ?"

"नाईकसाहेबांकडून बोलावणें आलें होतें."

"कशाला हुजूर ?"

"सांगतों,—तेंच सांगण्यासाठीं तर इथें येतांच तुला तांतडीनें बोलावणें पाठविलें. मोठा अनर्थ झाला आहे पांडू !"

पांडू भयभीत स्वरानें ह्मणाला "कसला अनर्थ ? असें झालें आहे तरी काय ?"

"मोठेंच संकट आलें आहे, अन् त्यांत आपण दोघेहि पुरे सांपडलों आहों ! परमेश्वर त्यांतून आतां आपणांला कसा निभावील तो निभावो !"

पांडू बिचारा अगदींच घाबरून गेला. भयानें त्याचा गळा सुकून गेला. आवंढा गिळून तो ह्मणाला "अरे बापरे ! झालें तरी काय ? सांगा—सांगा हुजूर !"

"आः! केवढ्या मोठ्यानें ओरडतोस उगीच? हळू बोल काय बोलायचें तें!—पण अगोदर पुढ्हा बरें बाहेर कुणी आहे का तें ?"

पांडू उठून बाहेर जाऊन पाहून आला. जवळपास मनुष्याचें चिन्हहि नव्हतें. पांडूला आपल्या अगदीं जवळ बसावयाला सांगून केशवराव त्याला खालच्या स्वरांत ह्मणाले "आज दुपारीं तीनएक वाजायच्या सुमाराला निजून उठून मी चिलीम ओढीत बसलों होतों, इतक्यांत ठाण्यावरून एक शिपाई येऊन मला ह्मणाला 'नाईकसाहेबांनीं आपणाला आतांच्या आतां बोलावलें आहे !' या वेळीं घाईनें नाईकसाहेबांनीं मला बोलावलें कां, हें मला कळेना. निरनिराळे तर्क करीत घोड्यावर चढून तो दामटीत मी ठाण्यावर गेलों. पहातों तों काय, नाईकसाहेब रागानें लाल डोळे करून बसले आहेत ! त्यांच्याजवळच एका चौरंगावर

एक पांढऱ्या सफेत रंगाचें मेलेलें मांजर पडलेलें होतें. मला आलेला पहातांच त्यांनीं शिपायांनां ओरडून हुकूम केला ' बांधा मुसक्या साल्याच्या !' त्याबरोबर दोघां शिपायांनीं माझे हात दोरीनें करकचून आंवळून बांधून टाकले, अन् नाईकसाहेब तर मला वाटेल त्या शिव्या देऊं लागले. मी तर आश्चर्यानें अन् भयानें अगदीं थबकूनच गेलों ! हा एकंदर प्रकार असावा तरी काय, तें माझ्या लक्ष्यांत येईना ! शेवटीं नाईकसाहेब मला ह्मणाले ' तूं बडा पाजी बदमाष आहेस ! देवानेंच खैर केली ह्मणून—नाहीं तर तूं आमचे सर्वांचे आज खून पाडीत होतास!' मीं विचारलें ' झालें तरी काय हुजूर ? आपण हें काय सांगतां आहां ?' नाईक ह्मणाले 'काल जें तूप मला दिलेंस, त्यांत विष होतें विष—जालिम ! अगदीं भयंकर नागाचें विष ! आमच्या मावशीनें त्या तुपांत आज सांजा केला अन् कांहीं जरूरीचें काम तितक्यांत तिचें निघालें, ह्मणून सांजा खालीं उतरून ठेवून ती त्या कामाला गेली. इतक्यांत या मांजरानें येऊन तो सांजा खायला केला आरंभ. लगेच मिनिट दोन मिनिटांत मावशी आली अन् मांजराला हांकूं लागली; पण मांजराला बिलकूल पळतांच येईना. म्यॉंव म्यॉंव असें एकदोनदां ओरडून तें इकडूनतिकडे हेलकावे खाऊं लागलें अन् थोड्याच वेळांत धाडकन् खालीं पडून त्याचा ताबडतोब प्राण गेला ! त्यानंतर तो सांजा कावळ्यांनां खायला घातला, तर ते ताबडतोब मेले ! कुत्र्याला खाऊं घातला, तर तोहि हांहां ह्मणतां मेला ! मुर्गीला दिला, तर तीहि बिचारी तडकाफडकी मेली ! आह्मांला ठार मारण्यासाठींच विष घातलेलें तें तूप तूं आह्मांला दिलेंस ! तीनशें सात कलमाप्रमाणें तुला आतां दहा वर्षांची सक्तमजुरी होणार !' हें ऐकतांच मी मोठमोठ्यानें रडूंच लागलों अन् नाईकांनां म्हणालों ' शपथ आपली हुजूर ! माझा यांत तिळमात्रहि अपराध नाहीं. मीं तर रोख पैसे देऊन तूप विकत आणलें होतें—मला कसें कळणार हुजूर, कीं, त्या तुपांत विष होतें, म्हणून ? नाईकसाहेबांनीं विचारलें 'तूप तुला कुणीं आणून दिलें ?' मीं सांगितलें चटकन् तुझें नांव.—"

केशवराव ही हकीगत सांगत असतां बिचारा पांडू थरथरां कांपत होता. अडखळतअडखळत तो म्हणाला " काय! माझें नांव सांगितलें आपण हुजूर?"

" तर मग काय करूं मी बाबा? काय वाटेल तें करून आपला प्राण वांचवावा, असें शास्त्रच आहे मुळीं! अन् खोटें असें मीं कांहींच नाहीं सांगितलें त्यांत! मीं तुझें नांव सांगितलेलें ऐकतांच नाईकसाहेब म्हणाले 'तर मग तूं अन् पांडू असे दोघेहि आरोपी झालांत. दोघांवरहि आतां खटला करतों!' तेव्हां नाईकसाहेबांच्या मी हातापायां पडून किती तरी रडरडून त्यांची विनवणी केली. मी खराच निरपराधी आहें, असें पाहून शेवटीं ते मला म्हणाले 'ठीक आहे. तुला मी देतों एकवार सोडून—पण त्या पाज्याला बदमाषाला मात्र नाहीं सोडीत!' तेव्हां मी त्यांनां म्हणालों 'अहा! पांडू बिचारा अगदींच गरीब अन् निर्दोष आहे. पांचजणांकडून तूप जमा करून त्यानें आणलें—कुठें कोणत्या गवळ्याकडे तुपाच्या भांड्यांत सापानें तोंड घातलें असेल, हें त्याला बिचाऱ्याला कसें कळावें? त्या गरीबालाहि सोडून द्यावें हुजूर!' पण कांहीं केल्या नाईकसाहेब मुळीं ऐकतंच ना! शेवटीं मला ते म्हणाले 'पांडू जर माझें एक काम करील, तर त्याला करीन माफी!' मीं म्हटलें 'हुजूर जें सांगतील, तें तो कबूल करील, त्याचा बाप करील!' तेव्हां नाईक म्हणाले 'एका गांवांत माझा एक कट्टा दुष्मन् आहे, त्याच्यावर चोरीचा माल ठेवल्याबद्दलचा खोटा खटला मला चालवायचा आहे. पांडू जर फिर्यादी होत असेल, तरच मी त्याला सोडून देतों. नाहीं तर त्याच्यावर चालवतों खटला!' मी म्हणालों 'तो जरूर होईल फिर्यादी. आपण जें सांगाल, तें तो करील.' ते म्हणाले 'अच्छा, ज्या दिवशीं मी सांगेन, त्या दिवशीं रात्रीं गुप्तपणानें पांडूनें थोडीं तांब्यापितळेचीं भांडीं माझ्याकडे आणून द्यावीं, अन् घरीं जाऊन आपल्या घराच्या एका भिंताडाला लहानसें भोंक पाडून ठेवावें, अन् दुसऱ्या दिवशीं सकाळीं इथें येऊन मला त्यानें फिर्याद लिहून द्यावी. हीं भांडीं त्या माझ्या शत्रूच्या घरीं ठेवून त्याच्यावर मी चोरीचा माल घरीं ठेवल्याबद्दल चालून

खटला चालविणार!' मी ह्मणालों 'पांडू हें खात्रीनें करील. यांत मोठें कठिण असें काय आहे?' नाईकसाहेबांनीं तेव्हां माझे हात सोडून मोकळे केले अन् मला ते ह्मणाले 'जा त्याला जाऊन विचार. तो कबूल झाला, तर उत्तमच! नाहीं तर तुला अन् त्याला आरोपी करून चालवतों मुकद्दमा! अन् तो जर कबूल झाला, अन् तूं त्याला कबूल करायला लावलेंस, तर तुह्मां दोघांनांहि मी माफी करीन. पांडू, याप्रमाणें एकंदर स्थिति आहे. आतां काय करायचें, तें तूंच सांग."

पांडूला थोडें आश्वासन येऊन तो ह्मणाला "आपण जें मला करायला सांगाल, तें मी का अमान्य करीन?"

"तर मग मी उद्यां जाऊन नाईकसाहेबांनां सांगूं ना असें?"

"होय हुजूर!"

"हां, आणखी एक गोष्ट नाईकसाहेबांनीं सांगितली आहे--"

"काय ती?"

"तुझ्या घरांत कांहीं मोडकींफुटकीं भांडीं आहेत?"

"आहेत तर काय झालें? एका बाजूचा काना गेलेलें एक घंगाळ आहे अन् एक तळच निखळलेलें पातेलें आहे."

"ठीक आहे. तें घंगाळ अन् पातेलें उद्यांच्या उद्यां तांबटाकडे नेऊन तीं नीट करून घे. उद्यांच्या उद्यां–समजलास? दिरंगाई नको करूं."

"कां हुजूर?"

"आः! अजून नाहीं तुझ्या लक्ष्यांत आलें? फिर्याद लिहून घेतांना नाईक तुला विचारतील 'तुझीं भांडीं ओळखून काढायला कांहीं खुणा-बिणा आहेत का त्यांच्या?' तूं लिहून दे 'जी, आहेत. घंगाळाचा काना अन् पातेल्याचा तळ मीं अमूक कांसाराकडून नुकताच नीट करून घेतला आहे.' नंतर त्या माणसाच्या घरांतून जेव्हां सारीं भांडीं निघतील-तेव्हां याच खुणांवरून तुला आपलीं भांडीं ओळखून काढतां येतील. कोर्टांतहि या खुणा तुला दाखवून देतां येतील. तो तांबटहि येऊन साक्षी देईल, कीं, 'हां–हें घंगाळ अन् हें पातेलें मीं नुकतेंच नीट केलें आहे.

अन् याच्या या खुणा इथें आहेत पहा. एकदोन भांड्यांवर जर अशा कांहीं खुणा नसल्या, तर तीं ओळखायचीं रे कशीं ? एकाच तऱ्हेचीं घंगाळें अन् एकाच तऱ्हेचीं पातेलीं पांचशें असतात! समजलें आतां?"

"जी हुजूर! तर मग उद्यांच तांबटाकडे जाऊन तीं भांडीं मी त्याच्या-कडून नीट करून घेतों. आपण नाईकसाहेबांकडे जाऊन सांगा, कीं, ते जें कांहीं सांगतील, तें करायला हा गुलाम कबूल आहे." असें म्हणून केशवरावजींचे पाय धरून पांडू त्यांवर वारंवार डोकें टेंकूं लागला.

---

प्रकरण छत्तिसावें.

## गुरुजींचा प्रसाद !

मध्यें झालेल्या घोंटाळ्यामुळें पद्मावतीला रत्नागिरीला पोहोंचावयाला चांगले दहा वाजून गेले. इतर उतारूंबरोबर रावसाहेब व बुवाजी हेहि किनाऱ्यावर उतरले.

रावसाहेबांनीं बुवांनां विचारलें "आपण काय आतां त्या शिष्याकडे जाणार वाटतें ? जाणार नसाल, तर आपण आतांच्याआतां इथून पुळ्याला जायला निघूं."

बुवाजी डोळे मिटून म्हणाले "जय शंकर–शंकर–शंकर! इतक्यांत निघणार जायला? इतक्या उशीरां इथें पोंचून आतांच्याआतां कसें जायला होणार आपणांला? अजून देवांची पूजाबीजा देखील व्हायची आहे माझी. पोटापाण्याचीहि सोय केली पाहिजे ना कांहीं तरी? इथें जवळपास कांहीं तशी कुठें सोयीची जागा नाहीं दिसत."

क्षणभर विचार करून रावसाहेब म्हणाले "तर मग आपण आपल्या शिष्याच्या घरींच जाऊन उतरावें, हें बरें. उगीच माझ्यासाठीं आपले हाल कशाला? स्नानसंध्या, देवपूजा वगैरे आटोपून रात्र पडल्यावरच निघावें म्हणजे झालें."

"अन् तूं?"

"मी इथेंच दर्याचें स्नान करून घेतों झटकन्. असा पुण्यस्नानाचा योग आह्माला कुठें येतो आहे वारंवार ? स्नान करून जवळपास कुठें असलें एकादें दुकान ब्राह्मणाचें चहाकॉफीचें, तर तिथें शेरअच्छेर पुऱ्याबिऱ्या खाऊन थोडें पाणी प्यालें, ह्मणजे आटोपलें माझें. मी आतां खानावळीच्या नाहीं भानगडींत पडत. संध्याकाळपर्यंत शहरांत कुठें तरी भटकून आपण सांगाल तिथें येऊन आपली भेट घेईन."

बुवाजी मोठ्या पंचायतींत पडले. रावसाहेबांची व आपली तुटातूट व्हावी, हें कांहीं त्यांनां बरें वाटेना ! हा आपला नवीन मिळालेला शिष्य चांगला श्रीमंत दिसत असल्यामुळें कांहीं झालें तरी त्याचा आपला आतां वियोग व्हावा, असें बुवासाहेबांनां मुळींच वाटेना. रत्नागिरीला त्यांचा जो एक शिष्य होता, तोहि चांगला श्रीमंत होता; परंतु भारी कृपण ! तेथें रुपया दीडरुपयाच्या लोभानें जाऊन अशी हातांत आलेली जंगी शिकार काय तशीच जाऊं द्यावयाची ? असा विचार करून ते ह्मणाले "छे छे–असें कसें होईल ? तूंहि चल तिकडे माझ्याबरोबर ! माझ्याबरोबर तूं माझ्या त्या शिष्याकडे आलास, तर तुझाहि तो चांगला आदरसत्कार करील. तो मोठा सज्जन आहे !"

एकाद्या सभ्यगृहस्थाच्या घरीं अनाहूत रीतीनें जाऊन उतरावें, अशी रावसाहेबांची मुळींच इच्छा नव्हती. तेथें कोण कधीं भेटेल, आपणाला झटकन् कोण केव्हां ओळखील, त्याचा काय नेम ? दुसरी कांहींच सबब आयत्या वेळीं न सुचल्यामुळें रावसाहेब ह्मणाले " बुवाजींनीं ही आज्ञा मला करूं नये. मी परान्न घेत नसतों !"

" त्यांत कसला आला आहे दोष ? ' **प्रवासे नियमं नास्ति** ' अशी शास्त्राची स्पष्ट आज्ञाच आहे मुळीं !"

तरीहि रावसाहेब मान हलवून ह्मणाले " छेः–मी इथेंच कुठें तरी पुऱ्याबिऱ्या खाऊन घेईन, ह्मणजे झालें."

" शिळ्या अन् आंत मातीबिती घातलेल्या पुऱ्या खाऊन उगीच शरीराला कष्ट करून घेण्यांत काय अर्थ ? पुनः हे दिवसहि कांहीं चांगले

नाहींत. ह्मटलंच आहे आर्यभट्टांनीं '**वृद्धां पुरिं च भाजिंच अग्लो-द्वारं च कारयेत्**' !"

परंतु तरीहि रावसाहेब गुरुजींच्या ह्मणण्याला कबूल होईनात. शेवटीं बुवाजी ह्मणाले " तर मग राहूं दे. मी देखील नाहीं जात तिकडे. इथेंच कुठें तरी धर्मशाळाबिळा पाहून सैंपाकाची व्यवस्था केली पाहिजे. स्वतः-नीच एक गोष्ट असती, तर नसतें केलें एकादवेळ जेवण; पण बरोबर देव आहेत ना माझ्या, त्यांनां तर उपाशीं नाहीं ठेवतां येत ? त्यांनां नैवेद्य हा झालाच पाहिजे. पण अशी जागा आतां कुठें मिळते आपणांला ?"

ज्या ठिकाणीं बुवाजी आणि रावसाहेब या उभयतांमध्यें हें संभाषण चाललें होतें, तेथें जवळच एक वृद्ध गृहस्थ नुकतेंच समुद्रस्नान आटोपून ओल्या वस्त्रांनिशीं उभे राहून त्यांचें हें भाषण ऐकत होते. ते आतां पुढें होऊन ह्मणाले " बुवाजी, मी आपणाला नमस्कार करतों. दया करून माझ्या गरीबाच्या झोंपडींत जर आपण पायधूळ झाडाल, तर सैंपाकासाठीं वगैरे आपणाला मी उत्तम जागेची व्यवस्था करून देतों."

वृद्धाकडे प्रसन्न दृष्टीनें पाहून बुवांनीं विचारलें " तुमचें नांव काय ?"

" माझें नांव वामनराव तुळपुळे."

" कुठें रहातां ?"

" अगदीं जवळ. या समुद्राच्या तीरावरच माझें घर आहे. तो हिरवा रंग दिलेला बंगला दिसतो आहे, तो आमचाच."

" काय करतां तुह्मी इथें ?"

"मी इथें पेन्शन घेऊन राहिलों आहें. माझा मोठा मुलगा इथें वकिली करीत असतो."

" अस्सें ! आपला मुलगा एकूण वकील आहे ? वा—फार उत्तम ! मग काय ह्मणतोस बेटा ?" असें विचारून बुवाजींनीं रावसाहेबांकडे पाहिलें.

रावसाहेब क्षणभर विचार करून ह्मणाले " हे जर कृपा करून जागा देताहेत, तर बरेंच झालें."

वामनरावांनीं रावसाहेबांनां विचारलें "आपलें नांव काय ?"

"दिगंबरपंत जोशी."

"एकूण आपण ब्राह्मण?–आपणाला मी नमस्कार करतों. आज आपली भेट झाली, हें मी माझें मोठें भाग्य समजतों. आपण चलावें आतां मजबरोबर."

रावसाहेब ह्मणाले "इथेंच आह्मी स्नान करतों. आपण ओलेत्यांनीं इथें किती वेळ रहाणार आमच्यासाठीं खोळंबून? आपण पुढें जावें. बंगला तर दिसतोच आहे आह्मांला. स्नान वगैरे उरकून आलोंच आह्मी आपल्या मागोमाग. आपण चलावें पुढें."

वामनराव ह्मणाले "ठीक आहे तर. मी पुढें होऊन तिथली सर्व व्यवस्था करून ठेवतों आपणासाठीं." असें ह्मणून त्यांनीं त्या दोघांनांहि हात जोडले व ह्मटलें "जरूर या बरें. नाहींतर आशा लावून निराशा कराल."

बुवाजी ह्मणाले "नाहीं नाहीं–आह्मी हे स्नान करून आलोंच!"

नंतर वामनराव घाईघाईनें घरीं निघून गेले.

रावसाहेब ह्मणाले "बुवासाहेब, आपण करा स्नान अगोदर. तोंपर्यंत मी माझ्या सामानासुमानाची थोडी व्यवस्था करतों."

"बरें तर." असें ह्मणून बुवाजी स्नान करूं लागले.

रावसाहेबांनीं समुद्राकडे पाठ फिरविली. आपला पोर्टमँटो उघडून रुमालांत बांधलेलें नोटांचें पुडकें त्यांनीं बाहेर काढलें, व तें आपल्या नेसलेल्या धोतराच्या निऱ्यांत बांधलें. अंगरख्याच्या खिशांतल्या चवल्यापावल्या, रुपये वगैरे काढून त्यांनीं ते बॅगमध्यें फेंकले आणि एक धोतर बाहेर काढून त्याच्या निऱ्या करून ठेवल्या. बुवाजींनीं रावसाहेबांची यांपैकीं प्रत्येक कृति अगदीं लक्ष्यपूर्वक पाहिली होती.

बुवाजी स्नान उरकून किनाऱ्यावर आले आणि रावसाहेब स्नान करावयाला समुद्रांत शिरले. एकदोन बुड्या मारून त्यांनीं वस्त्रपरिवर्तन केलें व ओल्या धोतरांतून नोटांचें बंडल कौशल्यानें हळूच बाहेर काढून पुनः तें बॅगमध्यें ठेवलें. त्यांची हीहि कृति बुवाजींच्या नजरेंतून चुकली नाहीं!

नंतर ते दोघेहि वामनरावांच्या घराकडे निघाले. वामनराव बंगल्याच्या व्हेरांड्यांत त्यांची वाट पहात उभेच होते. तेथें दोन चौरंग मांडलेले होते. दोघेहि अतिथि येतांच वामनरावांनीं त्यांना त्या चौरंगांवर बसविलें व स्वतः बुवाजींचे पाय धुतले. रावसाहेब नको नको म्हणत असतांहि एका नोकराकडून त्यांनीं त्यांचे पाय धुवविले.

दिवाणखान्याच्या मागच्या पडवींत एक घोंगडी पसरलेली होती. तेथें एका कोनांत विटांची नवीनच एक चूल तयार केली होती. लांकडें, कांहीं नवीन भांडीं, वगैरे सामानहि तेथें जवळच ठेविलेलें होतें. थोड्याच वेळानें घरच्या आचाऱ्यानें दोन थाळ्यांतून शिध्याचें सामान आणून तेथें ठेवलें.

रावसाहेब म्हणाले "याची काय जरूर आहे? बाजार तर जवळ आहे. मी आतां जाऊन सारें सामान विकत—"

वामनराव नम्रपणें म्हणाले "वाः—असें कुठें कधीं झालें आहे का? आपण कृपा करून आमच्या झोंपडींत पायधूळ झाडलीत, मग आपल्या खर्चानें शिधा आणून आपण खाणार? वाः--आम्हांला तें लांछन नाहीं का? मी घरांतच आपली व्यवस्था करणार होतों--पण आपणाला तें चालत नाहीं असें कळलें म्हणून—"

रावसाहेब म्हणाले "आपण जागा देऊन आमच्यावर फार उपकार केले आहेत. आतां आपणाला आणखी कष्ट द्यायला आम्हांला भारी लाज वाटते. आहेत पैसे जवळ--जातों बाजारांत अन् सामासुमान आणून लागतों सैंपाकाला." असें म्हणून त्यांनीं आपली बॅग हातीं घेतली.

वामनराव पुढें सरून त्यांचा हात धरून म्हणाले "छे छे—असें कांहीं करूं नका! आमचें पुण्य मोठें म्हणूनच बुवाजींसारखे एक थोरले साधु अन् आपणासारखे पवित्र ब्राम्हण यांचे पाय आमच्या झोंपडीला लागले. जर आम्हां गरीबांकडून सेवाचाकरी आपण घेणार नाहीं, तर मनाला भारी कष्ट होतील माझ्या!" असें म्हणून वामनरावांनीं हात जोडले.

बुवाजी म्हणाले "अरे दिगंबर! आतां नको उगीच हरकती आणीत बसूं. शास्त्रांत सांगितलें आहे **'मनः क्षुण्णं न कर्तव्यं भक्तेषु सेवकेषु च'** भक्त अन् सेवक यांचें मन कधींहि दुखवूं नये. अन् हे गृहस्थ आपणांला कुठें काय देताहेत? हे देताहेत आमच्या या सांबाला. त्यांनां जो नैवेद्य होईल, त्यांतलाच ना प्रसाद आपण सेवन करणार?"

रावसाहेबांनींहि मग अधिक आढेवेढे घेतले नाहींत. बुवाजींनीं स्वतः स्वयंपाक केला. देवपूजा वगैरे यथासांग आटोपल्यावर दोघांनीं 'प्रसाद' घेतला. दिवाणखान्यांत वामनरावांनीं दोन खाटा टाकवून त्या उभयतां पाहुण्यांची वामकुक्षीची तजवीज करून ठेविली होती. त्यांचें भोजन उरकल्यावर वामनराव त्यांची परवानगी घेऊन भोजन वगैरे करावयाला गेले.

बुवाजी आपल्या खाटेवर बसून ह्मणाले "हा सारा शंकरजींचा अनुग्रह बरें! जिथें मी जातों, तिथें मला कांहीं कष्ट पडतच नाहींत. आज थोडीशी काळजी वाटली होती–मिळतें कीं नाहीं कुठें जेवाबिवायला. पण केली प्रभूंनीं सारी तजवीज. बरें, एक चिलीम कर तयार बेटा!"

रावसाहेबांनीं गांजाची चिलीम सज्ज करून गुरुजींच्या हातीं दिली. त्यांनीं तिचा आस्वाद घेतल्यानंतर आपणहि 'प्रसाद पावून' ते खाटेवर पडले. प्रवासाच्या श्रमानें आणि मनश्चिंतेनें ते अगदीं गळून गेले होते. निद्रेनें त्यांचे डोळे हां हां ह्मणतां मिटूं लागले.

बुवाजी ह्मणाले "जयशंकर–शंकर–शंकर! आज उतरल्याबरोबर जर आह्मी निघतों, तर भारीच हाल झाले असते आमचे. पुळें ह्मणतात भारीच छान जागा आहे. गजानन तेथें दृष्टान्तहि देतात ह्मणे भक्तांनां. तिथें गेल्यावर देवाच्या दारांतून हलूं नयेसें वाटतें आमच्यासारख्यांनां! जयशंकर–शंकर–शंकर! बेटा दिगंबर, आज गाडी करून जर आपण निघालों असतों तर तिथें कधीं पोचतों?"

बुवाजींनां कांहींसुद्धां उत्तर मिळालें नाहीं.

"दिगंबर, ए दिगंबर!"

दिगंबरानें या वेळीं घोरावयालाहि आरंभ केला होता.

बुवाजी कांहीं वेळ त्याच्याकडे शांतपणें पहात राहिले. हळुहळू राव-साहेबांचा नासिकाध्वनि 'गंभीर' होत गेला. जणूं काय एकादें वायुवाद्य सुरावर वाजत आहे !

बुवाजी हळूच उठून बाहेर गेले. जवळपास कोणाहि माणसाचें वास-वारेंहि नव्हतें. घरचे नोकरचाकरहि निजले होते. दिवाणखान्यांतील घड्याळांत ठण् ठण् असे दोन ठोके पडले.

इकडेतिकडे पहात बुवाजींनीं आपल्या झोळींतून एक तीक्ष्ण धारेची सुरी बाहेर काढिली व रावसाहेबांचा पोर्टमँटो या टोंकापासून त्या टोंकापर्यंत एका निमिषार्धांत चिरून टाकला. भिजलेल्या रुमालांत बांधलेलें नोटांचे पुडकें व चवल्या, पावल्या, रुपये वगैरे जें कांहीं नाणें बॅगमध्यें त्यांनां सांपडलें, तें त्यांनीं झटकन् काढून आपल्या झोळींत कोंबलें. नंतर बॅगेची कापलेली बाजू भिंतीच्या बाजूला करून पायांच्या बोटांवर एकएक पाऊल हळूच टाकून बुवाजी तेथून कोठें अदृश्य झाले !

---

## प्रकरण सदतिसावें.

## आतिथ्य–धर्म.

हळुहळू चार वाजले, वकीलसाहेब कोर्टांतून घरीं येऊन पहातात, तों दिवाणखान्यांत दोन खाटा टाकल्या असून एकीवर कोणी अपरिचित गृहस्थ निजून राहिला आहे. वकीलसाहेबांनां हें पाहून थोडें आश्चर्य वाटल्या-वांचून राहिलें नाहीं.

इतक्यांत वामनरावहि वामकुक्षी वगैरे आटोपून तेथें आले. त्यांनां बापूसाहेब–हें वकीलसाहेबांचें नांव–म्हणाले "हे गृहस्थ कोण बाबा ?"

"एक पाहुणे आहेत."

"कुठून आले ?"

"पंढरपुराकडे यांचें घर. हे अन् एक साधुबुवा असे दोघे आजच्या मुंबईच्या बोटीनें उतरले. पण बुवासाहेब कुठें गेले ? कुठें दिसत नाहींत ते इथें ?"

बापलेकांच्या या संभाषणानें रावसाहेबांच्या निद्रेचा भंग झाला. एकवार जांभई देऊन डोळे उघडून ते वकीलसाहेबांकडे पहात राहिले.

"काय दिगंबरपंत! झोंप झाली का पुरी?" असें म्हणून वामनराव गालांतल्या गालांत हंसूं लागले.

"हो—आतांच उठतों आहें हा!" असें म्हणून रावसाहेब उठून बसले.

बापूसाहेबांनीं त्यांना नमस्कार करून म्हटलें "बुवासाहेब कुठें गेले आहेत?"

इकडेतिकडे पाहून रावसाहेब म्हणाले "खरेंच! बुवांची स्वारी गेली तरी कुठें बुवा? इथेंच तर या खाटेवर ते निजले होते माझ्याबरोबर."

वामनरावहि किंचित् आश्चर्यानें म्हणाले "खरेंच बुवा! बुवासाहेब गेले कुठें? कुठें आसपास गेले असतील उठून झालें."

"आम्ही तर संध्याकाळींच इथून निघणार होतों. बरें, पण वाजले तरी किती?" असें म्हणून रावसाहेबांनीं बॅगेंतून घड्याळ काढण्याकरतां म्हणून ती पुढें सरकावून घेतली.

या शेवटापासून त्या शेवटापर्यंत बॅग चिरलेली पाहून रावसाहेब आश्चर्य, भय, उद्वेग इत्यादि विकारांनीं स्तंभितच होऊन गेले. ते एकदम उद्गारले "हें काय? माझी बॅग ही चिरली कुणीं?"

वामनराव व बापूसाहेब झटकन् त्यांच्याजवळ येऊन बॅग पाहूं लागले. तेहि आश्चर्यानें थक्क होऊन म्हणाले "अरे! खरेंच कीं! हें काय झालें हें?"

तत्क्षणीं पोर्टमॅंटो उघडून रावसाहेबांनीं त्यांतून सर्व जिन्नस झपाझप बाहेर काढले. धोतरें, शर्ट, कोट, सदरे, रुमाल दोन्ही हातांनीं झाडझाडून त्यांनीं शोधून पाहिलें. नंतर कपाळावर हात मारून ते उद्वेगाच्या स्वरानें म्हणाले "हाय—घात झाला! सत्यनाश झाला माझा!"

"काय झालें? काय काय गेलें?"

"जें कांहीं मजपाशीं होतें, तें सर्व गेलें. माझ्या सर्वस्वाची चोरी झाली!"

बापूसाहेबांनीं विचारलें "काय होतें?"

"नोटा होत्या, रुपये, चवल्या, पावल्या वगैरे कांहीं नाणेंहि होतें. त्यांपैकीं एक पैसाहि शिल्लक नाहीं राहिला!"

वामनरावांनीं विचारलें " किती रुपयांच्या होत्या नोटा ?"

" होत्या थोड्याशा. तीर्थयात्रेला निघालों होतों मी-खूब छान झाली आमची तीर्थयात्रा! पोस्टकार्ड विकत घेऊन तें लिहून घरीं पाठवून पैसे मागवीन म्हटलें, तर एक पैसाहि नाहीं शिल्लक राहिला माझ्यापाशीं!" असें म्हणून रावसाहेबांनीं दोन्ही हातांनीं आपलें डोकें घट्ट दाबून धरलें.

हा विलक्षण प्रकार पाहून दोघेहि पितापुत्र विचार करीत कांहीं वेळ स्तब्ध बसले. नंतर बापूसाहेबांनीं विचारलें "तो बुवा होता तरी कोण?"

एक मोठा सुस्कारा टाकून रावसाहेब म्हणाले " तें मलाहि ठाऊक नाहीं-आज सकाळीं जयगडला त्याची आगबोटीवर गांठ पडली. दोन-तीन तासांचीच काय ती आमची संगत. आपण कोंकणांतलीं तीर्थें करीत रामेश्वरपर्यंत जाणार, असें त्यानें मला सांगितलें. मीं मनांत विचार केला, आपण आहों अगदीं नवखे माणूस. कधीं कोठें आपण प्रवास केला नाहीं. तो बुवाहि मला चांगल्या साधूंपैकीं असावा असें वाटलें, म्हणून म्हटलें, कीं, त्याच्या संगतीनें आपणहि प्रवास करावा, म्हणजे आपणाला तीर्थयात्रा सोपी जाईल. त्या साळसूद दिसणाऱ्या बैराग्यानेंच मला अशा भयंकर संकटांत लोटलें अं?"

बापूसाहेब म्हणाले " खास—त्या बुवाजींचंच हं काम!"

परंतु मुलाच्या या विधानावर वडिलांचा विश्वास बसला नाहीं. मान हलवून ते म्हणाले " छे छे-अगदीं अशक्य गोष्ट! बुवासाहेबांच्या हातून असें कृत्य कधींहि होणें शक्य नाहीं. उठले असतील निजून अन् एकट्याला करमेना म्हणून गेले असतील जवळपास कुठें तरी सहज--झालें! आतां येतील ते परत. घर उघडें पाहून कोणीतरी चोर येऊन त्यानेंच हें काम केलें असलें पाहिजे." असें म्हणून वामनरावजी बुवासाहेबांच्या शोधाला बाहेर गेले.

वकीलसाहेब म्हणाले "बाबा कांहीं म्हणोत–पण त्याच बिलंदर भामट्या गोसाव्याचें हें काम! आमचे बाबा इतके कांहीं भोळे आहेत, कीं, कांहीं विचारूं नका! कुणाच्या डोकीवर त्यांनीं जटांचा डोंगर बघितला, कुणाच्या अंगावर त्यांनां भगव्या चिंध्या दिसल्या, ह्मणजे बाबा त्याला बेलाशक कुणी तरी बडा साधु किंवा सिद्धपुरुष समजतात, अन् त्याच्या ताबडतोब भजनीं लागतात. त्या गोसाव्याचे कांहीं जिन्नस-पान्नस देखील नाहीं इथें कुठें दिसत."

"वाः! त्याची खूब जंगी एक झोळी होती, एक मोठें व्याघ्रांबर होतें, एक मोठा चिमटा होता, कमंडलु होता. जर कुठें तो सहज बाहेर गेला असता, तर त्यानें हे जिन्नस कांहीं नेले नसते आपणाबरोबर. मला चांगलाच हात दाखवून केला बेट्यानें पोबारा!" असें ह्मणून रावसाहेब डोकीवर हात देऊन बसले.

रावसाहेबांची अशी विपन्न स्थिति पाहून बापूसाहेब ह्मणाले "तुह्मी इतक्या काळजींत कशाला पडतां? घरीं पत्र पाठवून तुह्मी पैसे आणवा. पैसे येईपर्यंत तुह्मी इथें खुशाल रहा–मनांत तिळमात्र संकोच धरूं नका. मी तुह्माला कार्डपाकीट काय वाटेल तें देतों."

रावसाहेब कांहींच बोलले नाहींत. बापूसाहेब ह्मणाले "अगोदर पोलिसला खबर दिली पाहिजे. नोटा मोठ्या तरी होत्या का? अन् नंबर आहेत का टिपलेले त्यांचे तुमच्याजवळ?"

"छेः! दहा दहा रुपयांच्या नोटा होत्या. जें नशीबीं होतें, तें झालें. आतां पोलिसांत खबर देऊन काय करायचें आहे? आपणालाच त्रास!"

इतक्यांत वामनरावहि परत येऊन ह्मणाले "छे बुवा! बुवाजींचा पत्ता कुठेंच नाहीं लागत पहा."

बापूसाहेब ह्मणाले "इतक्या अवकाशांत तो भामटा कुठच्या कुठें गेला असेल!"

वामनराव ह्मणाले "छे छे! बुवा कांहीं पळून नसतील गेले रे! आतां येतील ते. कुठें तरी देवळाबिवळाला गेले असतील दर्शन करायला."

" छट् बाबा ! देवदर्शनाला गेला नसेल तो. तसें असतें तर त्यानें आपली झोळी, चिमटा, व्याघ्रांबर हें सारें लटांबर कशाला नेलें असतें बरोबर ? "

आतां वामनरावांनां अधिक वाद करतां येईना.

ती रात्रहि रावसाहेबांनां वकीलसाहेबांच्या घरींच काढणें भाग पडलें. दुसऱ्या दिवशीं ते बापूसाहेबांनां ह्मणाले "माझ्या या घड्याळाची किंमत शंभर रुपये आहे. हें गहाण ठेवून मला पंचवीसएक रुपये कर्जाऊ द्यायची आपण कृपा करा. आपल्या पितापुत्रांचे माझ्यावर अतिशय उपकार झाले आहेत. माझ्या घराहून पैसे केव्हां येतील कोण जाणे ! तोंपर्यंत इथें राहून आपणावर जुलूम करणें मला योग्य वाटत नाहीं. "

बापूसाहेब व वामनराव यांनां रावसाहेबांची ही विनंति अर्थात्च मान्य झाली नाहीं. बापूसाहेब ह्मणाले "अवचित रीतीनें संकटांत सांपड-लेल्या गृहस्थाला दोन दिवस दोन घांस अन्न जर आह्मांला घालतां आले नाहीं, तर आह्मी गृहस्थाश्रमधर्म चालवितों तरी कशाला ? घड्याळ गहाण ठेवायची कांहीं जरूरी नाहीं. आपणाला हातखर्चासाठीं जें कांहीं पाहिजे असेल, तें मी आपणाला देतों. आपण मनांत कांहीं न आणतां इथेंच रहा. फार तर आपले पैसे आले ह्मणजे आमचे आपण फेडून टाका ह्मणजे झालें. "

त्या दोघां बापलेकांचा अतिशय आग्रह पाहून रावसाहेबांनां त्यांचें मन मोडतां येईना. त्याच दिवशीं त्यांनीं केशवरावांनां पुढीलप्रमाणें पत्र लिहिलें:—

" श्रीकृष्णप्रसन्न.

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री केशव भास्कर कुळकर्णी, मुक्काम सोनगांव, जिल्हा सातारा, यांसी.**

**स्नेहांकित दिगंबर नारायण जोशी, मुक्काम रत्नागिरी, याचे साष्टांग नमस्कार विनंति विशेष.**

मी पुष्कळ क्षेत्रें करीतकरीत सध्या येथें येऊन राहिलों आहें. काल एका भामट्यानें माझी बॅग फाडून त्यांतून सर्व पैसे चोरून नेल्यामुळें मी मोठ्या संकटांत सांपडलों आहें. करितां शंभर रुपये मनिऑर्डरनें खालील नांवपत्त्यावर ताबडतोब पाठवून द्यावे. तेथली सर्व हकीगत कळण्याविषयीं मी अतिशय अधीर होऊन गेलों आहें. तरी सविस्तर हकीगतीचें पत्र उलट डांकेनें जरूर पाठवावें. बाकी सर्व ठीक आहे. कळावें, लोभ करावा, हे विनंति.

पत्ता—रा. रा. रघुनाथ वामन तुळपुळे वकील, यांच्या घरीं दिगंबर नारायण जोशी, मुक्काम रत्नागिरी."

सहासात दिवसांनीं या पत्राचें उत्तर आलें. केशवरावांनीं पत्रांतून दहादहा रुपयांच्या दोन नोटा मात्र पाठविल्या होत्या. त्यांनीं पत्रांत लिहिलें होतें 'आपण बनगांव सोडला, त्याच्या दुसऱ्याच दिवशीं मी ठाण्यावर गेलों. जाऊन पहातों तों सखाराम कुडव गंगेला बरोबर घेऊन फिर्याद करण्यासाठीं तेथें आला असून वडाच्या झाडाखालीं उभा आहे. मी झटकन् नाईकसाहेबांची भेट घेऊन त्यांना नगद पांचशें, जमादाराला शंभर व इतर मंडळीला शंभर असे एकंदर सातशें रुपये देऊन सर्व कांहीं ठीकठाक करून टाकलें आहे. नाईकांनीं सखारामाची फिर्याद लिहून न घेतां खोटी फिर्याद करण्याबद्दल त्याच्यावर खटला करण्याचें त्याला भय दाखवून ठाण्यावरून त्याला हांकलून दिलें. परंतु आतांच मला कळलें, कीं, सखाराम गंगेला घेऊन साताऱ्याला मॅजिस्ट्रेटसाहेबांकडे फिर्याद करावयाला गेला आहे. अर्थात् तेथला योग्य बंदोबस्त करावयाला मलाहि आतां ताबडतोब साताऱ्याला गेलें पाहिजे. आजच निघालों असून मेणा तयार आहे. 'हुजुरां'च्या हजार रुपयांपैकीं तीनशें रुपये मात्र शिल्लक आहेत. वसुलापैकीं आणखी दोनशें, म्हणजे एकंदर पांचशें रुपये बरोबर घेऊन मी साताऱ्याला जात आहें. शिल्लक अधिक नसल्यामुळें या पत्रांतून

फक्त वीसच रुपये आपणाला पाठवीत आहें. साताऱ्याला जें कांहीं घडून येईल, तें तेथूनच पत्रद्वारें परस्पर कळवीन. 'हुजुरां'नीं घरीं येण्याची इतक्यांतच घाई करूं नये. कारण साताऱ्याहूनहि वॉरंट निघण्याचा बराच संभव आहे.'

हें पत्र वाचतांच रावसाहेब फार भ्याले. त्यांचें तोंड अगदीं उतरून गेलें. काय करावें, तें त्यांनां सुचेना !

वामनरावांनीं येऊन त्यांनां विचारलें "घराकडची सारी खबरबात ठीक ना दिगंबरपंत ?"

जड कंपित स्वरानें रावसाहेब ह्मणाले "खबर ठीक आहे; परंतु मुलानें लिहिलें आहे, कीं, 'तूर्त पैसे कांहीं हाताशीं नाहींत. पैसे गोळा करून लवकरच पाठवितों.'"

वामनराव ह्मणाले "त्याबद्दल आपण तिळमात्र काळजी नका करूं. आपले पैसे येत तोंपर्यंत आपण आपलें घर समजून खुशाल इथें रहा. पैसे आल्यावर जा घरीं."

रावसाहेब खेदानें ह्मणाले " तोच प्रसंग आला आहे आतां. पण आपणांवर आतां अधिक जुलूम करायला मनाला भारी वाईट वाटतें. पण करायचें काय ?"

"दिगंबरपंत ! असे शब्दहि आपण तोंडावाटे नका काढूं. आपण अतिथि ह्मणजे देवाप्रमाणें आह्मांला पूज्य आहां. त्यांतून आपण ब्राह्मण. कांहीं दिवस तरी आपली सेवा करायला आह्मांला सांपडतें आहे, हेंच आमचें मोठें भाग्य आहे. देवब्राह्मणांच्या ठिकाणीं आमची भक्ति अचल राहो, असा आपण आह्मांला आशीर्वाद द्या."

केशवरावांच्या दुसऱ्या पत्राची वाट पहात रावसाहेब वकीलसाहेबांच्या घरीं एकएक दिवस कष्टानें घालवूं लागले.

## प्रकरण अडतिसावें.

## केशवरावांचें पत्र.

एक दिवस गेला, दोन दिवस गेले, तीन दिवस गेले, तरी सातान्याहून केशवराव जें पत्र पाठविणार होते, त्याचा कोठें पत्ताच नाहीं! जसजसा पत्र यावयाला विलंब होत होता, तसतशी रावसाहेबांच्या मनाची हुरहुर आणि उत्कंठा हीं सारखीं वाढत होतीं. झालें तरी काय? केशवरावांनीं सातान्याला जाऊन काय केलें? वॉरन्ट निघालें असेल काय? अशा तऱ्हेच्या चिंतेनें रावसाहेबांनां अगदीं भंडावून सोडलें होतें—एक क्षणभरहि त्यांच्या हृदयाला शांति म्हणून नव्हती. डांकेच्या दोन्ही डिलिव्हरींच्या वेळीं रावसाहेब रस्त्यावर जाऊन शिपायाची वाट पहात उभे रहात. जितकी लांब दृष्टि जाणें शक्य असेल, तितक्या दूरवर निरखून पहात, व शेवटीं पत्र नाहीं असें शिपायाकडून कळतांच द्विगुणित निराशेनें परत येत.

रावसाहेबांपाशीं जे कांहीं पैसे होते, ते इतके थोडे होते, कीं, त्यांनां दुसरीकडे कोठेंहि जावयाचें साहस होत नव्हतें. त्या पैशांनांहि दिवसेंदिवस क्षय लागला होता. ज्यांची जन्मांत कधीं ओळखहि नव्हती अशा गृहस्थांच्या घरीं, परक्या ठिकाणीं, स्वस्थ पडून दोन वेळ अन्नाचा फडशा पाडण्याची त्यांनां अतिशय लाज वाटूं लागली. तेव्हां केशवरावांकडून पैसे येतांच दुसऱ्या दिवशीं सकाळीं फिरावयाला जावयाच्या निमित्तानें ते बाजारांत गेले व पांच शेर तुपाचा एक डबाच ते विकत घेऊन आले.

त्यांच्या हातीं डबा पाहून वामनरावांनीं विचारलें "हें काय?"

"तूप आणलें आहे आपलें थोडेंसें."

"म्हणजे? आपण कशाला आणलें तूप?"

"सहज आणलें झालें. फिरतांफिरतां बाजारांत गेलों, तों एका दुकानांत एका गृहस्थाला दुकानदार त्याच दिवशीं आलेल्या तुपाचा नमुना

दाखवून 'हें तूप अगदीं साजूक घरगुती तुपासारखें आहे. तुम्हाला बाजारी असें ओळखतांसुद्धां यायचें नाहीं,' असें सांगत होता. मला हें ऐकून भारी आश्चर्य वाटलें. म्हणून मी थोडा नमुना घेऊन पहातों, तों खरेंच अगदीं घरगुती साजूक तूप! अन् किंमतहि आमच्या तिकडच्या मानानें अगदीं कमी, तेव्हां एक डबा घ्यायचा लोभ कांहीं मला सुटेना पहा. मग केला झालें खरेदी."

"बरें केलेंत. पण याचे पैसे मात्र आपणाला घेतले पाहिजेत. किती रुपये पडले डब्याला?"

"कांहीं फार नाहीं. आमच्या तिकडच्या मानानें अगदींच थोडे. ते नको कांहीं द्यायला आपणाला."

"वा:! असें कसें म्हणतां? आपण आमचे पाहुणे—पूज्य अतिथि! आपले स्वत:चे पैसे खर्च करून आपण आमच्या घरचे जिन्नस आणणार?"

रावसाहेब कांहीं डब्याची किंमत सांगेनात आणि इकडे वामनरावहि कांहीं केल्या आपला आग्रह सोडीनात! शेवटीं म्हातारा रागावून अगदीं निकरावर आला.

तेव्हां रावसाहेब हंसून म्हणाले "वा वा—भाऊसाहेब! खरेंच मला आपला मोठा चमत्कार वाटतो. आपली भेदबुद्धि अजून कांहीं गेली नाहीं, असें दिसतें. हा तुपाचा डबा जर आपल्या चिरंजीवांनीं—बापूसाहेबांनीं—खरेदी करून आणला असता, तर आपणाला किती आनंद झाला असता? मीं आणला, म्हणून आपण एवढी घासाघीस कां करावी?"

रावसाहेबांचा हा बाण अगदीं अमोघ होता. वामनराव हें ऐकून हंसूं लागले, व म्हणाले "वा वा! आपण शेवटीं युक्ति तर नामी काढली शोधून! तोंड बंद करायची खाशी युक्ति!"

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं बाजारांत जाऊन रावसाहेबांनीं 'सर्वांत महाग अशी भाजी बरीचशी खरेदी करून आणली. त्याच्या दुसऱ्या दिवशीं बापूसाहेबांच्या लहानग्या छोकऱ्याला त्यांनीं आपणाबरोबर फिरावयाला म्हणून नेलें. बाबू घरीं आला, तो एक सुंदर बिगुल फुंकीतच

आला! त्या वेळेपासून बाबूनें बिगुल वाजवूनवाजवून घरच्या साऱ्या मंडळीचे कान अगदीं किटवून टाकले!

सहाव्या दिवशीं सकाळीं दिवाणखान्यांत बसून रावसाहेब 'सत्य-शोधकाचा' ताजा अंक वाचीत बसले होते. इतक्यांत पोस्टाच्या शिपायानें येऊन त्यांच्या हातीं एक रजिस्टर पत्र दिलें. वकीलसाहेब त्या दिवशीं कांहीं कामानिमित्त शेजारच्या गांवीं गेले होते. वामनरावहि नित्याप्रमाणें समुद्रस्नानाला गेले होते. जवळपास कोणीहि कोठें नव्हतें. धडधडणाऱ्या हृदयानें, कंप पावणाऱ्या हातांनीं रावसाहेबांनीं तें पत्र फोडलें.

पत्रांतून शंभर रुपयांची एक नोट बाहेर पडली. केशवरावांनीं एक लांबलचक पत्र लिहिलें होतें. आधुनिक भाषा आणि लेखनपद्धति यांत त्याचें परिवर्तन करून तें आह्मी येथें देत आहोंः—

" श्रीसिद्धेश्वरीप्रसन्न.

"राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री दिगंबर नारायण जोशी, हल्लीं मुक्काम रत्नागिरी, स्वामींचे सेवेशीं.

पोष्य केशव भास्कर कुळकर्णी यांचे कृतानेक साष्टांग नमस्कार. विनंति विशेष.

"आपणाला मागचें पत्र लिहिल्यानंतर मी साताऱ्याला गेलों. तेथें गेल्यावर माझ्या परिचयाच्या एका वकिलाकडून मला कळलें, कीं, त्याच दिवशीं गंगेला बरोबर घेऊन सखाराम कुडव फिर्याद दाखल करण्याकरतां साताऱ्याला आला असून त्यानें सखाराम श्रीधर दामले यांनां आपल्या वतीनें वकील नेमलें आहे. वकीलांच्या लायब्ररीच्या बाहेरच्या पडवींत फिर्यादीच्या अर्जाचा मसुदा लिहिला जात होता; परंतु पुढें फिर्याद गुदरली गेली कीं नाहीं, किंवा गुदरली गेली असल्यास पुढें काय झालें, हें त्या वकिलाला कळलें नव्हतें. ही बातमी मला कळतांच मीं दामले वकिलांकडे जाऊन त्याच रात्रीं त्यांची भेट घेतली, व त्यांनां पैशांची लालूचहि दाखवून पाहिली. वकीलसाहेब मला ह्मणाले 'मग मीं

काय करावें असें तुमचें ह्मणणें?' मी त्यांनां ह्मणालों 'विशेष कांहीं नाहीं, त्यांचा मुकद्दमा ज्यायोगानें फसेल, असें कांहीं तरी आपण करावें ह्मणजे झालें.' ते ह्मणाले 'छे, हें मोठें भयंकर काम आहे. तुमच्यासाठीं मी स्वतः संकटांत पडूं ह्मणतां? अहो, प्रसंगीं माझी सनद देखील रद्द होईल ना!' परंतु मीं कांहीं आपला आग्रह सोडला नाहीं. तेव्हां शेवटीं कांहीं वेळ विचार करून वकीलसाहेब ह्मणाले 'तुह्मी जर मला हजार रुपये नगद देत असाल, तर मी हा मुकद्दमा डिसमिस करवतों पहा.' हजार रुपये ह्मणजे भलतीच कांहीं तरी रक्कम आहे, वगैरे सांगून, वकीलसाहेबांचीं पुष्कळ आर्जवें व खुशामत करून त्यांनां हजारांवरून पांचशेंवर तर मीं आणले. त्यांपैकीं अडीचशें रुपये तेथल्या तेथें त्यांनां मला द्यावे लागले. वकीलसाहेब तेव्हां मला ह्मणाले 'आज कचेरीला येऊन त्यांनीं जेव्हां मला वकीलपत्र दिलें, त्या वेळीं पावणेबारा वाजून गेले होते. फौजदारी फिर्यादी दाखल करण्याची वेळ टळून चुकली होती. फिर्याद लिहून जेव्हां मी कोर्टांत घेऊन गेलों, त्या वेळीं वेळ टळून गेली, या सबबीवर मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं फिर्याद घेतलीच नाहीं. ती फिर्याद आतां उद्यांच दाखल होणार.' हें ऐकतांच मला जरा धीर आला आणि मी मूळ फिर्यादीचा मसुदाच वकीलसाहेबांजवळून मागून घेऊन वाचला. त्यांत सर्व हकीगत संक्षेपानें लिहिली आहे. मध्यरात्र उलटून गेल्यावर सखारामानेंच टाळें फोडून गंगेची सुटका केली, असें त्यांत लिहिलें आहे; परंतु बाबूरावांच्या नांवाचा त्यांत कोठेंहि उल्लेख नाहीं. साक्षीदारांच्या यादींतहि त्यांचें कोठें नांव नाहीं. लोकलज्जेच्या भयामुळें बाबूरावांनीं आपल्या वडील बंधूविरुद्ध कोर्टांत साक्ष द्यावयाचें नाकारलें असल्यामुळेंच त्यांचा संबंध या हकीगतींतून अजिबात गाळला असावा, असाच संभव दिसत आहे. ती फिर्याद वाचून आपल्या हातानें त्या कागदाचे मीं तुकडेतुकडे करून टाकले व वकीलसाहेबांनां ह्मटलें 'आपण आतां अशी दुसरीच एक नवळी फिर्याद लिहावी, कीं, ती पहातांच मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं ती एकदम डिसमिस करून टाकावी. ज्या युक्तीनें

त्या फिर्यादीवर गंगेच्या आंगठ्याचा छाप घेऊन ती दाखल करा ह्मणजे झालें.' वकीलसाहेब ह्मणाले 'त्याबद्दल आपणाला बिलकूल कांहीं काळजी करायला नको! आज कचेरींत दोन कोऱ्या कागदांवर तिच्या आंगठ्याचे छाप मीं घेऊन ठेवले होते. एकाच कागदावर फिर्याद लिहून संपल्यामुळें दुसऱ्या कागदाची कांहींच जरूर पडली नाहीं. त्याच्यावरच फिर्याद लिहितां येईल. परंतु फिर्यादींत लिहावें काय?' नंतर आह्मीं दोघांनीं विचार करून अशी फिर्याद लिहिली: —

" 'माझें नांव गंगा वाडकरीण. माझी फिर्याद अशी आहे, कीं, वनगांवचे इनामदार गोपाळ कृष्ण देशमुख यांच्या वाड्यांत मी कांहीं महिने नोकरी करीत आहें. इनामदारसाहेब हे अतिशय रागीट स्वभावाचे आहेत. त्यांच्या खमिसाचें सोन्याचें बटण चोरीला गेल्यामुळें त्यांनीं अन्यायानें चोरीचा वहीम मजवर घालून ठाण्यावर पाठविण्याचें भय मला ते दाखवूं लागले. यामुळें 'या नोकरीवर रहावयाचें नाहीं,' असें सांगून माझा झाल्या दिवसांचा पगार मीं मागितला; परंतु इनामदारसाहेबांनीं मला पगार न देतां शिवीगाळ करून मला घरांतून बाहेर घालवून दिलें. दरमहा तीन रुपयेप्रमाणें चार महिन्यांचा पगार बारा रुपये त्यांच्याकडे माझें येणें निघत आहे. मी ठाण्यावर फिर्याद करावयाला गेलें होतें; परंतु नाईकांनीं माझी फिर्याद दाखलच करून घेतली नाहीं. ह्मणून कोर्टाला माझी प्रार्थना इतकीच आहे, कीं, अन्यायानें भय दाखविणें आणि शिवीगाळ करणें या अपराधांबद्दल कोडाच्या ५०६ आणि ५०४ कलमांअन्वयें समन्स अथवा वॉरंट काढून आरोपीला हजर करून माझा न्याय करावा.'

"नंतर वकीलसाहेब मला ह्मणाले 'अशा दोघांतिघां साक्षीदारांचीं नांवें लिहून द्या, कीं, जरी साक्षबीक्ष द्यायचा प्रसंग आला, तरी ते आपल्या धन्याला अनुकूल अशीच साक्ष देतील.' मीं आपल्या दोन नोकरांचीं व एका मोलकरणीचें नांव लिहून दिलें. वकीलसाहेब मला ह्मणाले 'उद्यां ही फिर्याद दाखल करून गंगेचा शपथेवर जबाब घ्यावा लागेल; परंतु

मी तिला अशा तऱ्हेचे प्रश्न विचारीन, कीं, खरी गोष्ट त्यांमुळें बिलकूल बाहेर न पडतां मुकद्दमा तेथल्यातेथें डिसमिस् होऊन जाईल !'

"दुसऱ्या दिवशीं वेष पालटून मी कोर्टात जाऊन गुपचूप बसलों. फिर्याद पुकारतांच गंगा साक्षीदारांच्या पिंजऱ्यांत उभी राहिली व वकीलसाहेब तिला प्रश्न विचारूं लागले.

'कुणावर फिर्याद आहे तुझी ?'

'रावसाहेब देशमुखांवर.'

'रावसाहेब देशमुख कोण ? कुठले ?'

'बनगांवचे इनामदार गोपाळराव उर्फ रावसाहेब देशमुख.'

'किती दिवस तूं त्यांच्या वाड्यांत होतीस ?'

'तीनचार महिने.'

'तुझ्याशीं रावसाहेब कसे वागत ?'

'भारी वाईट रीतीनें.'

'तूं कधीं त्यांच्या घरांतून निघून गेलीस ?'

'दिवाळीच्या रात्रीं.'

'कुणाबरोबर गेलीस ?'

'सखाराम कुडवाबरोबर. तो माझा लांबचा दीर होत असून माझा खरा हितकर्ता आहे.'

'ठाण्यावर गेली होतीस ?'

'होय.'

'नाईक काय ह्मणाले ?'

'ते ह्मणाले 'तूं खोटी फिर्याद करायला आली आहेस. तुलाच तुरुंगांत घालीन.''

'तुझी फिर्याद खरी कीं खोटी ?'

'खरी.'

'ही पहा फिर्याद. हा छाप तुझ्याच आंगठ्याचा ना ?'

'होय.'

"याप्रमाणें गंगेचा जबाब झाल्यावर मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं फ़िर्याद वाचून ती एकदम डिसमिस् करून टाकली व गंगेला ह्मटलें 'ही फिर्याद फौजदारींत नाहीं चालायची. इच्छा असली तर दिवाणींत दाखल कर आपली फिर्याद.'

"मी मनांत ह्मटलें, कीं, निभावलों बुवा एकदांचे आपण. परंतु बाहेर येऊन सखारामानें वकीलसाहेबांशींच तंटा सुरू केला. तो म्हणाला 'खरी हकीगत आपण कांहींच नाहीं विचारली.' वकीलसाहेब ह्मणाले 'खरी हकीगत सगळी फिर्यादींत लिहिलीच आहे.' दामले वकिलांच्या या वागणुकीमुळें सखारामाला त्यांचा संशय आला व त्यानें दुसराच वकील नेमून नकला वगैरे घेतल्या. त्या वाचतांच दामले वकिलांची लुच्चेगिरी त्याला सर्व कांहीं कळून आली. दुसऱ्या दिवशीं त्यांच्याविरुद्ध ॲफिडेव्हिट करून नवीनच फिर्याद दाखल करण्यासाठीं तो सगळ्या वकिलांकडे फिरला; परंतु सर्वांनीं त्याला एकच उत्तर दिलें, कीं, 'कावळ्याच्या मांसाला कांहीं कावळा कधीं शिवायचा नाहीं! आमच्या व्यवसायबंधूविरुद्ध—एका वकिलाविरुद्ध आह्मी कांहीं कधीं फिर्याद दाखल करायचे नाहीं.' गांवांतल्या साऱ्या लहानमोठ्या, नवीनजुन्या पुष्कळ वकिलांकडे सखाराम गेला, परंतु प्रत्येक वकिलानें त्याला सांगितलें 'वकिलाविरुद्ध जर मीं फिर्याद दाखल केली, तर सर्व वकील माझ्याविरुद्ध चिडतील आणि त्यामुळें माझ्या धंद्यालाच अजिबात खो येईल!' शेवटीं 'पहिल्या दिवशीं चुकीनें तशी फिर्याद लिहिली गेली, परंतु खरी हकीगत अशी अशी आहे. दामले वकिलांविरुद्ध कांहीं लिहायचें नाहीं कीं बोलायचें नाहीं,' या शर्तीवर एका नवीन भुकेबंगाल वकिलानें वकिलातनामा घेतला. दुसऱ्या दिवशीं ती नवीन फिर्याद वाचून मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं ती दाखल करून घेतली. साक्षीदारांच्या जबाबांवरून फिर्याद खरी आहे अशी जर त्यांची खात्री झाली, तर आरोपीवर समन्स निघेल; नाहीं तर पुनः फिर्याद डिसमिस होईल. आणखीं दहा दिवसांनीं फिर्याद सुनावणीची तारीख नेमलेली आहे. मध्यें अवकाशहि तसा फार राहिलेला नाहीं.

पुष्कळ विचार करकरून मीं शेवटीं मनाशीं असें ठरविलें, कीं, या संकटांतून जर आपली मुक्तता करायची असेल, तर पाहिल्यानें हा सखारामाचा कांटा वाटेंतून दूर केला पाहिजे. गंगेच्या खटल्याचा उत्पादक, चालक सगळा काय तो हा पाजी सखाराम कुडव आहे. तो राहिला नाहीं, ह्मणजे गंगेच्या वतीनें फिर्याद चालवावयाला कोणीच राहिलें नाहीं. आपले बंधु राजश्री मनोहरपंत देशमुख हे या खटल्यांत कोणत्याहि प्रकारें साहाय्य करतील, असें वाटत नाहीं. तसा जर त्यांचा कांहीं उद्देश असता, तर ते स्वतःच एक साक्षीदार झाले असते, यांत कांहीं संशय नाहीं. आतां सखारामाला आपल्या वाटेंतून दूर करावयाचा, ह्मणजे त्याला एकच उपाय आहे; तो हा, कीं, कोठल्या तरी दुसऱ्याच एकाद्या संकटांत त्याला फसवून पाडावयाचा. नाईकसाहेबांनां वळवून मी तो बंदोबस्त सारा टाकठीक करून टाकतों. याखेरीज गंगेलाहि कोणत्या उपायानें दूर करतां आली, तर तसेंहि केलें पाहिजे. हुजुरांनीं मला जे एक हजार रुपये दिले होते, त्यांपैकीं सातशेंचा विल्हेवाट काय झाली, हें मीं आपणाला मागच्या पत्रांत लिहिलेंच आहे. त्यांतले सारे तीनशेंच रुपये मजपाशीं शिल्लक होते. ते तीनशें आणि आपल्या वसूल झालेल्या रकमेपैकीं दोनशें असे एकंदर पांचशें रुपये घेऊन मी साताऱ्याला आलों होतों. त्यांपैकीं अडीचशें रुपये मीं दामले वकिलांनां दिले असून, या पत्रासोबत शंभरांची एक नोट हुजुरांनां पाठविली आहे, आणि येथल्या खाणावळीचा खर्च, रहावयाचा खर्च, डाकमहसूल इत्यादि बाबतींत आजपर्यंत दहा रुपये सव्वानऊ आणे खर्च झाले आहेत. आतां माझ्या हातीं एकशेंएकूणचाळीस रुपये पावणेसात आणे शिल्लक आहेत. येथून आजच मी सोनगांवला जात असून नाईकसाहेबांची भेट घेऊन मी सखारामाला अडकवण्याच्या उद्योगाला ताबडतोब लागतों; परंतु हुजुरांच्या विरुद्ध पुरावा बळकट आहे, झाली तर पांचसात वर्षांचीहि सक्तमजूरी व्हावयाचा बराच संभव आहे. चहूंकडे योग्य कडेकोट बंदोबस्त केला पाहिजे. यासाठीं पांचसातशें अधिक रुपयांची तरी अगदीं

जरूरी आहेच. गंगेचा बंदोबस्त करावयालाहि थोड्याफार पैशांची जरूरी आहेच. सुनावणीच्या नेमलेल्या दिवशीं गंगा किंवा सखाराम यांपैकीं कोणी कोर्टांत हजर झालें नाहीं, म्हणजे तत्क्षणीं मुकद्दमा खारीज होऊन जाईल. कोर्टांत पुढें कधींहि मग या बाबतींत हुजुरांवर संकट उपस्थित होण्याचा संभव नाहीं आणि हुजुरांनां निरापदपणें घरीं परत येतां येईल. म्हणून सेवकाची चरणीं विनंति इतकीच, कीं, दिवाणजींच्या नांवें मला आठशें रुपये नगद मिळण्याविषयीं उलट डांकेनें हुकूमपत्र पाठवावें. अनमान होऊं नये. नाहीं तर व्यर्थ एकादें संकट अचानक उभें रहावयाचें. मी आपल्या पैन् पैचा चोख हिशेब ठेवला असून हुजूर निरापदपणें घरीं परत आल्यावर तो सारा जमाखर्च हुजुरांच्या नजरेला मी घालणारच आहें. जितक्या कमी खर्चांत हुजुरांवरची ही भयंकर घोरपड नाहींशी होईल, तितक्या कमी खर्चांत करावयाला या सेवकाचे प्रयत्न रात्रंदिवस चाललेच आहेत. बाकी सर्व ठीक आहे. हुजुरांच्या खुशालीचें पत्र वारंवार येत असावें. कळावें, लोभ करावा, हे विनंति."

केशवरावांचें हें पत्र वाचून रावसाहेबांची काळजी बरीचशी दूर झाली. त्यांनां असें वाटलें, कीं, जरी खटला झालाच आपणावर, तरी दामले वकील आपल्या बाजूनें साक्ष देतीलच, कीं, पहिल्यानें गंगेनें आपणापाशीं निराळीच कांहीं हकीगत कबूल केली होती! आपल्या नवीन विकत घेतलेल्या टिनच्या ट्रंकेंत त्यांनीं तें पत्र जपून ठेविलें.

आपल्या विश्वासू सेवकाची सूक्ष्मबुद्धि व प्रभुकार्यदक्षता यांची यथेष्ट प्रशंसा करून रावसाहेबांनीं त्यांनां पत्रोत्तर लिहिलें—" दिवाणजींच्या नांवें मीं हुकूमपत्र पाठविलें असून ते तुह्माला एक हजार रुपये देतील. मुकद्दम्याच्या बंदोबस्तासाठीं आठशें रुपये ठेवून बाकी दोनशें रजिष्टर पत्रानें मला तावडतोब पाठवून द्यावे. उद्यां मी येथून राजापुरीं जाणार आहें. तेथें गंगा आली असल्याचें मला आजच कळलें; परंतु मी तेथ रहाणार नसून तेथून जवळच धोपेश्वर म्हणून गांव आहे, तेथें राहीन. तेथें गेल्या-

नर तेथला पत्ता कळवीन. त्या पत्त्यावर तुह्मीं रजिस्टरनें पैसे पाठवावे आणि बाकीची हकीगतहि लिहावी."

पत्राच्या शेवटीं आपल्या नवीन नांवाची सही करून रावसाहेबांनीं पत्र पाठवून दिलें.

---

## प्रकरण एकुणचाळिसावें.

## प्रयाणाचा बेत.

साडेचएक वाजावयाच्या सुमाराला बापूसाहेब कोर्टांतून घरीं परत आले. बंगल्याच्या व्हरांड्याच्या पायऱ्यापाशीं एक मध्यम वयाचा पांढरा बाळी फेटा घातलेला, कांहीं दिवस दाढीडोकीवर क्षुरप्रयोग न झालेला असा एक ब्राह्मण बसला असून तो चंची सोडून पट्टीची तयारी करीत होता. बापूसाहेबांनां आलेले पहातांच त्यानें उठून नम्रपणें नमस्कार केला.

बापूसाहेबांनीं कुतूहलानें त्याला विचारलें "कोण तुह्मी ?"

" सदाशिवभट मेहेंदळे."

"कुठून आलेत ?"

" कोल्हापुर इलाख्यांतील शिरपुरगांवाहून. "

" शिरपुराहून? नानासाहेबांकडून?—ठीक ठीक! कधीं आलेत ?"

" मी आलों रात्रींच बोटीनें. पण जवळच्या गांवीं माझ्या बायकोला तिच्या माहेरीं पोंचवायची होती, ती पोंचवून आतांच आलों. "

" तिकडची सारी मंडळी खुशाल? नानासाहेबांची प्रकृति ठीक आहे ना? बहिनी, मुलें वगैरे सारी मंडळी बरी आहेत ना ? "

" हो, सगळी मंडळी खुशाल आहे. फक्त चंपूची तब्येत भारी नादुरुस्त झाली आहे. डॉक्टरांनीं कुठें तरी कोंकणाबिकणांत हवा पालट-याची नानासाहेबांनां सूचना दिल्यामुळें ते इकडे यायला निघाले आहेत. आज रात्रीं ते इथें येऊन पोंचतील.उद्यां ते इथून कुठेंसे जाणार आहेत."

" चंपूची प्रकृति ठीक नाहीं ह्मणतां? काय होतें आहे तिला ?"

"ताप येतो आज किती दिवस. चंपू कशी टणटणीत गुटगुटित पोर! पण तापानें कसें अर्धे शरीर होऊन गेलें आहे बिचारीचें."

"असें! इथें कधीं येणार मंडळी?"

"आज रात्रीं येऊन पोंचतील. मला थोडेंसें काम होतें ह्मणून मी श्रीमंतांच्या अगोदर एक दिवस निघालों. आपणाला भेटून त्यांनीं मला निरोप कळवायला सांगितलें, ह्मणून मी तो कळवायला आलों. अगदीं आयत्या वेळीं बेत झाला, ह्मणून पत्र वगैरे नाहीं पाठवलें. तार मात्र आली असेल बहुतकरून."

"मी कोर्टांत गेल्यानंतर आली असेल कदाचित्. कोणकोण मंडळी येणार आहेत?"

"खुद्द श्रीमंत, बाईसाहेब, चंपू अन् बाबू इतकीच खाशी मंडळी यायची आहे. शिवाय मोलकरीण, गडीमाणसें वगैरे मंडळीहि थोडीबहुत येतील."

"आंत सांगितलीत का बातमी ही?"

"नाहीं. हा येऊन मी आतांच टेंकतों आहें."

"बरें तर, बसा थोडेसे." असें ह्मणून बापूसाहेब आंत गेले. थोड्याच वेळांत वामनरावहि दिवाणखान्यांत आले व मुलाला ह्मणाले "अरे बापू, नाना येतो आहे आज, तार आली आहे त्याची नाधांशीं."

"हो, त्यांचे भटजीच आले आहेत—पहा हे."

वामनरावांनीं भटजींनां नानासाहेबांच्या आणि त्यांच्या कुटुंबांतील मंडळीच्या कुशलाविषयीं माहिती विचारली व शेवटीं ते ह्मणाले "पण तो जाऊन रहाणार आहे कुठें?"

भटजी ह्मणाले "तें कांहीं मला नीटसें माहीत नाहीं. गांवाचें नांव मला त्यांनीं सांगितलेंहि होतें—पण विसरलोंच मी तें."

इतक्यांत रावसाहेब कोठें बाहेर गेले होते, ते घरीं आले. त्यांनां पहा-तांच वामनराव ह्मणाले "दिगंबरपंत, आज आमचा भाचा येतो आहे इथें."

"असें! कुठले कोण ते?"

" कोल्हापुर इलाख्यांत शिरपुर ह्मणून एक गांव आहे, तिथला तो इनामदार. त्याच्या मुलीला आज पुष्कळ दिवस ताप येतो आहे, ह्मणून डॉक्टरच्या शिफारशीवरून तो हवा बदलण्यासाठीं कांहीं दिवस कोंकणांत येऊन रहाणार आहे. पुष्कळ वर्षांनीं आह्माला भेटायला तो इथें अगोदर येतो आहे. उद्यांच्या उद्यां तो ह्मणे कुठें जाणार! पण इतक्या लवकर सोडतो आहे कोण बेट्याला?"

" मीहि उद्यांच निघणार इथून. माझे पैसे आज आले हातीं. आपणाला भारी त्रास दिला मीं."

" छे छे-असें ह्मणूं नका. घरची सारी खबरबात ठीक ना?"

" होय-सारी हकीगत ठीक आहे."

" तर मग उद्यांच तुह्माला आह्मी सोडणार आहों वाटतें? तुह्माला आणखी दोनतीन दिवस तरी इथें राहिलेंच पाहिजे! बरें तर, मी जाऊन येतों बाजारांत--बरेच दिवसांनीं ही मंडळी येते आहे आमच्या घरीं. यांतून श्रीमंत इनामदार हे. त्यांच्या खाण्यापिण्याचा बेतबात कांहींतरी त्यांच्या योग्यतेप्रमाणें ठेवायला हवा ना?"

असें ह्मणून वामनराव एका नोकराला बरोबर घेऊन बाजारांत गेले व तिकडून नानातऱ्हेची फळफळावळ, भाज्या, व असेंच इतर जिन्नस त्यांनीं खरेदी करून आणले.

फराळ वगैरे उरकून बापूसाहेब दिवाणखान्यांत येऊन रावसाहेबांशीं गप्पा मारावयाला बसले. रावसाहेबांनीं त्यांनां विचारलें " जे आपल्या-कडे आज येताहेत, ते आपले आतेभाऊ वाटतें?"

" होय-माझा आतेभाऊ. कोल्हापुरकडे शिरपुर ह्मणून एक गांव आहे, तिथला तो इनामदार आहे."

" नांव काय त्याचें?"

" त्याचें नांव चिंतामणराव. पण त्याला नानासाहेब ह्मणतात. श्रीमंत इनामदारांचा एकुलता एक मुलगा हा. वास्तविक चैनी, रंगीढंगी निघायचा. पण तसें कांहीं सुद्धां नाहीं पहा. चांगला विद्वान् आहे. मुंबई

युनिव्हर्सिटीचा बी. ए. आहे. इतकेंच नव्हे, तर मराठींतल्या तो एक नांवाजलेल्या लेखकांपैकीं आहे. मासिकपुस्तकांतून त्यानें लिहिलेले निबंध वगैरे पुष्कळ प्रसिद्ध होतात. त्या दिवशीं त्या ' धूमकेतु ' मासिक-पुस्तकाच्या ताज्या अंकांत त्याचा एक निबंध प्रसिद्ध झालेला मीं वाचला. ' प्राचीन भरतखंडांत बंदुकी होत्या कीं नाहीं ? ' हें त्या विषयाचें नांव. रामायणबिमायणांतून पुष्कळ श्लोकांचीं अवतरणें घेऊन त्यानें सिद्ध करून दाखविलें आहे, कीं, दशरथराजाच्या वेळीं अयोध्या नगरींत तोफा, बंदुकी हीं सगळीं होतीं."

प्राचीन भरतखंडांत बंदुकी होत्या कीं नाहीं, या प्रश्नाची माथेफोड करावयाची रावसाहेबांनां कांहींच जरूरी नसल्यामुळें त्यांनीं बापूसाहेबांच्या भाषणाकडे विशेष लक्ष्य दिलें नाहीं. कॉलेजांतील उच्च शिक्षण प्राप्त झालेल्या तरुण मंडळीला ते अतोनात भीत असत. रावसाहेबांनां वामनरावांकडून धोपेश्वर या गांवाविषयीं सहज माहिती मिळाली होती, व तेथेंच जाऊन रहाण्याविषयीं त्यांच्या मनांत उत्सुकता उत्पन्न होऊन तसा त्यांनीं निश्चयहि केला होता. जर कर्मधर्मसंयोगानें नानासाहेबहि तेथेंच जाणार असले, तर तें त्यांनां फारसें आवडण्यासारखें नव्हतें ! पुनः आज वामनरावांनीं रावसाहेबांनां बजावलें होतें, कीं, आणखी दोनतीन दिवस तरी कांहीं त्यांची सुटका व्हावयाची नाहीं ह्मणून ! छेः— तसें होणें अशक्य ! उद्यांच रावसाहेबांनीं रत्नागिरीहून निघून जावयाचा विचार ठाम केला.

रावसाहेबांनां गप्प बसलेले पाहून बापूसाहेबांनीं त्यांनां विचारलें "दशरथराजाच्या वेळीं तोफा अन् बंदुकी होत्या, या गोष्टीवर तुमचा विश्वास बसतो काहो दिगंबरपंत ?"

विमनस्कतेनें रावसाहेब ह्मणाले "आं—काय ह्मणतां ?"

इतक्यांत दिवाणखान्याच्या दाराशीं येऊन वामनराव ह्मणाले "बापू— अरे बापू ! जरा एकदां आंत येऊन जा ना ! नानाची निजाबिजायची सोय कुठल्या खोलींत करायची, तें एकदां ठरवूं या."

"आलोंच मी हा." असें म्हणून बापूसाहेब उठून आंत गेले व बंदूकांच्या माऱ्यांतून बिचाऱ्या रावसाहेबांची सुटका झाली !

रात्रीं बारा वाजावयाच्या सुमाराला नानासाहेब व त्यांची मंडळी न पोहोंचली. त्यांचीं स्नानें जेवणें वगैरे आटोपावयाला चांगले दोन जून गेले. त्या रात्रीं रावसाहेबांचा त्यांचा नुसता दृष्टिपरिचय झाला. च्याशीं एकदोनदां बोलण्याचा जो त्यांनां प्रसंग आला, त्यावरून गृहस्थ कॉलेजांत शिकलेला असला तरी कांहीं भयंकर नाहीं, अशी ची खात्री झाली.

दुसऱ्या दिवशीं आठएक वाजावयाच्या सुमाराला नानासाहेब उठून र आले. तेथेंच त्यांचा चहा आला. त्यांनीं रावसाहेबांनां विचारलें आपण नाहीं का चहा घेत ?"

रावसाहेब चहा या पदार्थाचे मोठेच भक्त होते. घरीं असतां दररोज ाळसंध्याकाळ ते नेमानें चहा घेत असत. परंतु येथें आल्यापासून च्छील ब्राह्मण ', अशी त्यांची ख्याति झाली असल्यामुळें त्यांनां चहाचा योग अगदीं दुर्मिळ झाला होता. दहा वाजावयाच्या सुमाराला नां कधींकधीं वामनरावांबरोबर समुद्रावरहि जावें लागे. स्नानानंतर लेत्यानें घरीं येऊन दोनदोन तीनतीन घटका त्यांनां वामनरावांनां वा दाखविण्यासाठीं नाक धरून बसावें लागे. त्यांतून ते मोकळे होत, अकरा वाजून जेवणाची वेळ होई. अर्थात्‌च प्राभातिक चहापानाचा ग रावसाहेबांनां येतच नसे !

आज नानासाहेबांच्या हातांतला बाष्पयुक्त चहाचा पेला पाहून रावहेबांच्या तोंडाला भारीच पाणी सुटलें. या वेळीं वामनरावहि सुदैवानें नव्हते. ही संधि साधून रावसाहेब म्हणाले "हो–घेतों तर काय झालें. धींकधीं."

हातांतला पेला रावसाहेबांपुढें करून नानासाहेब म्हणाले "हा प्याला पण घ्या–मी दुसरा आणवतों माझ्यासाठीं–अरे, कोण आहेरे ! आंतून णखी एक पेला आणरे चहा."

तोंडांतल्यातोंडांत पुटपुटून रावसाहेबांनीं नको म्हटलें. पण पुनः त्यांनीं असा विचार केला, कीं, वामनराव यावयाच्या पूर्वीच पेला गट्ट करून टाकला म्हणजे झालें. नानासाहेब म्हणाले "घ्याना आपण. माझा चहा हा येतोच आहे आतां." रावसाहेबांनीं सुरुवात तर केली; पण पितांपितां मधुनमधून ते आंतल्या दाराकडे दृष्टि फेंकीत असत.

शागीर्दानें चहाचा दुसरा पेला आणून दिला. चहाचा आस्वाद घेत असतां नानासाहेब ह्मणाले "काल रात्रीं आपली सारी हकीगत ऐकली मीं दिगंबरपंत–भयंकर बुवा ! मिस्किल बदमाषाच्याच जाळ्यांत सांपडलांत आपण. साधुसंन्याशांचा वेष घेऊन किती बदमाष उजळ माथ्यानें हिंडत असतात, त्यांचा कांहीं पत्ता नाहीं! कुणी तुरुंगांतून पळून येतात, कुणी खून, दरोडेखोरी करून निसटलेले असतात, अन् पोलिसच्या भयानें वेष पालटून साधुबैरागी बनतात ! कुणाचा विश्वास ह्मणून नाहीं धरतां येत बघा ! आपणाला मोठ्या संकटांतच टाकलें त्या बदमाषानें !"

"हो, मोठ्याच अनर्थांत मी पडलों त्याच्यामुळें ! अशीं कोंकणचीं तीर्थक्षेत्रें पहात रामेश्वरापर्यंत जाणार होतों–पण जवळ पैसा नसल्यामुळें इथेंच कांहीं दिवस नाइलाजानें काढावे लागले. काल घराहून माझे पैसे आले. पण वामनरावांनीं मला निक्षून सांगितलें आहे, कीं, आज कांहीं जायचें नाहीं ह्मणून. आपणालाहि आज इथून जाऊं देणार नाहीं ह्मणून ते ह्मणत होते."

नानासाहेब इकडेतिकडे पाहून हळूच ह्मणाले "त्याची व्यवस्था मी करून देतों आपणाला दिगंबरपंत ! मीं पंचांग पाहिलें आहे. उद्यां आश्लेषा, परवां मघा, त्याच्या दुसऱ्या दिवशीं अमुक कुयोग, पुढें अमूक तिथि वाईट, अन् मग घातवार. आज जर आह्मी गेलों नाहीं, तर आणखी पांच दिवस कांहीं आमचें जाणें होत नाहीं. असें युक्तियुक्तीनें मामांनां सांगून त्यांचा घेतों झालें हुकूम. आपणासाठींहि परवानगी घेतों काढून. पण आपण पहिल्यानें कोठें जाणार आहां दिगंबरपंत ?"

"मी घोटेश्वरला जावें, असें ह्मणतों आहें."

" काय धोपेश्वरला ? वाः—फारच मामी ! मी देखील धोपेश्वरलाच ललों आहें. भारीच रम्य अन् हवाशीर आहे ठिकाण तें ! मी एक-नदां मुद्दाम गेलों होतों तेथें. आमच्या कुटुंबाचे मामा तेथलेच. माझ्या ीला ताप जडून ती भारीच अशक्त झाली आहे—ह्मणून कांहीं दिवस ां शांतपणें घालवण्याचा विचार केला आहे. वाः, ठीक जमलें तर. दमच जाऊं आपण. मग ठरलें तर एकदम जायचें ?"

इतक्यांत वामनराव तेथें येऊन पोहोंचले व नानासाहेबांचे शेवटचे द ऐकून ते ह्मणाले "इतक्यांत जायच्या गोष्टी कशाला रे नाना? दोन वस रहा इतका आल्यासारखा. मग जायचें पाहूं पुढें. दिगंबरपंतांनांहि हीं आज मी जाऊं देत."

नानासाहेब मान हलवून रावसाहेबांकडे हंसून वक्र दृष्टीनें पाहून गाले "रहातां येतें आपल्या ह्मणण्याप्रमाणें तर मलाहि फार बरें वाटलें सतें; पण उद्यां आश्लेषा, परवां मघा, तेरवां असाच एक कुयोग आहे, ाच्या दुसऱ्या दिवशीं माझा घातवार अन् त्याच्या पुढच्या दिवशीं ूचा घातवार आहे. आज जर आह्मी नाहीं निघालों इथून, तर आणखी च दिवस आमची सुटका नाहीं होत. चंपू भारीच दुखणेकरी आहे— के दिवस जायला विलंब करणें बरें होईल का ? "

"तूं पंचांग पाहिलें आहेस ?"

"हो तर !"

हें ऐकून वामनराव स्तब्ध बसून राहिले. थोड्या वेळानें बापूसाहेब येतांच त्यांनां ह्मणाले "अरे बापू ! नाना तर आजच जायला निघाला आहे— े पांच दिवस प्रवासाला मुहूर्त नाहीं ह्मणतो."

चेहरा गंभीर करून बापूसाहेब ह्मणाले "मग कांहीं इलाजच नाहीं ह्मणाचा तर !"

रावसाहेब ह्मणाले "मलाहि इतके दिवस उशीर करून चालायचें नाहीं. थें आटोपून मला होईल तितकें लवकर घरीं गेलें पाहिजे."

वामनराव नाइलाज होऊन ह्मणाले "आतां कांहीं इलाजच नाहीं राहिला बुवा ! मग काय नाना ! आज रात्रींच तूं बोटीनें निघणार ना ?"

रावसाहेब ह्मणाले "नानासाहेब बोटीनेंच का जाणार आहेत? छे बुवा ! आपणाला हा बोटीचा पहिलाच प्रसंग—पण इतका कंटाळून गेलों म्हणतां ! आपण आपले सडकेनें जाणार विचारीत. तें बरें वाटतें बोटीपेक्षां."

नानासाहेब ह्मणाले " तें आम्हांला शक्यच नाहीं दिसत. इतक्या मंडळीला पायरस्त्यानें गाड्या करून नेणें ह्मणजे भारीच त्रास होणार. त्यापेक्षां आपलें बोटीनें गेलेलें बरें. थोडा घाणीबिणीचा त्रास होईल, पण तो गाड्यांच्या त्रासापेक्षां पुरवला. शिवाय चंपी आहे आजारी— तिला तर गाडीचा त्रास बिलकूल सहनच व्हायचा नाहीं. दिगंबरपंत, तुह्मी तरी कशाला पायवाटेनें जातां ? खरोखर सांगतों, तुह्माला भारीच त्रास पडेल. आपण रात्रींच निघूं !"

"बोटीनें ?"

बापूसाहेब ह्मणाले " तेंच उत्तम होणार आहे. एकदम गेलेलेंच बरें दोघांनीं."

वामनरावांनींहि दुजोरा देऊन ह्मटलें " हो, तेंच बरें. नाना आहे एकटाच, मुलेंबाळें घेऊन जातो आहे. रात्रीची वेळ, बोटींत चढण्या-उतरण्याला इतकीं माणसें घेऊन कठिणच पडणार जरासें. दिगंबरपंत ! तुम्ही जाच जरूर नानाबरोबर. तुमची त्याला मदत होईल पहा चांगली. म्हणजे मलाहि तितकी काळजी नाहीं."

शेवटीं, या सर्वांपुढें आपली टाळाटाळी कांहींच चालत नाहीं असें पाहून रावसाहेबहि एकदांचे कबूल झाले. नानासाहेबांनीं त्यांना विचारलें " दिगंबरपंत ! आपण तिथें किती दिवस रहाणार आहां ?"

"त्याचा कांहीं नेम नाहीं. मी आहें भारी चंचल माणूस. बरें वाटलें, तर तिथेंच राहीन. पण फार फार तर वीसपंचवीस दिवस."

" कुठें रहाबिहायची सोय केली आहे का अगोदरपासून ?"

" छे-तशी तजवीज मीं कांहींच केली नाहीं. तिथें जाऊन कोणा तरी भटाभिक्षुकाच्या घरीं उतरेन म्हणजे झालें. स्वतंत्र घर मिळालें, तर घेईन; पण बहुधा कठिणच आहे, असें भाऊसाहेब म्हणतात."

" तें खरें--पण मीं मोठ्या शिकस्तीनें एक घर मिळवून ठेवलें आहे. एकाद्या भटाभिक्षुकाच्या घरीं उतरून आपल्या जिवाचे उगीच हाल कां करून घेतां तुह्मी? पहिल्यानें आपण आमच्याच बिऱ्हाडीं चला. नंतर कुठें घरबीर मिळतें का पहातां येईल चौकशी करून. आपण फार फार झालें, तर एक महिनाभरच ना रहाणार ? आपणाला आग्रह करून आमच्याच बिऱ्हाडीं रहा, असें हक्कानें सांगण्याजोगा आपला माझा परिचय नाहीं, हें खरें; पण एका महिन्यासाठीं निराळें बिऱ्हाड करण्याची तरी जरूर काय आहे आपणाला ? आपण तर एकटे माणूस. आपण जर आमच्या बिऱ्हाडींच रहाण्याचा अनुग्रह कराल, तर मला त्यानें भारीच आनंद होईल पहा. काय ह्मणतां आपण मामा ?"

वामनराव ह्मणाले "तूं ह्मणतोस असें झालें, तर अति उत्तमच होणार आहे गोष्ट. दिगंबरपंत, नाना ह्मणतो असेंच करा तुह्मी. नाना आहे पोरच किती झालें तरी, अन् सूनबाई देखील पोरच! दोन पोरें–दोन पोरांनां घेऊन चालली आहेत! अन् पुनः त्यांतलें एक मूल रोगी. परकी जागा, वडीलधारें काळजीचें माणूस कोणी नाहीं. आप्तमित्र कोणीसुद्धां नाहीं. अशी स्थिति असतां यांनां इथून जाऊं देणें माझ्या अगदीं जिवावर येतें आहे. दिगंबरपंत! तुह्मी यांच्याबरोबर असाल, तर यांनां तुमचें किती तरी साहाय्य होऊन मलाहि बिलकूल काळजी नाहीं वाटायची."

रावसाहेब मोठ्या विचारांत पडले. नानासाहेबांशीं त्यांचा जो कांहीं परिचय झाला होता, त्यावरून त्यांचें त्यांच्याविषयीं फार अनुकूल मत झालें होतें. ते मोकळ्या आणि उदार हृदयाचे, प्रेमळ मनुष्य असून वैभवाच्या किंवा शिक्षणाच्या अहंकाराचें त्यांनां वासवारेंहि नव्हतें. उच्च शिक्षण मिळालें असतांहि त्यांनां त्याबद्दल तिळमात्र दिमाख नव्हता. अशा मनुष्याची संगति आपणाला सुखप्रदच होईल; इतकेंच नव्हे, तर

आपण सध्या ज्या प्रसंगांत सांपडलों आहों, त्यांतून आपली मुक्तता व्हावयालाहि कदाचित् या गृहस्थाचें साहाय्य आपणाला होईल, असा विचार करून रावसाहेब ह्मणाले "ठीक आहे. कोठें जावें, काय करावें, याबद्दल आतांपर्यंत माझें मन स्थिर नव्हतें. आतां नानासाहेबांबरोबरच रहावें, असा माझा निश्चय झाला आहे. उद्यां पहिल्यानें तर मी यांच्याच बिऱ्हाडीं उतरेन. पण लवकरच आपल्याजवळच कुठें तरी जर एकादी जागा मला हे बघून देतील, तर यांच्यावरोबर बोलाचालायला मला बरें पडेल. आपणाकडेच रहाण्याबद्दल नानासाहेबांनीं जो मला हा आग्रह चालविला आहे, त्यावरून यांचा प्रेमळपणा अन् उदारता हीं मात्र स्पष्ट दिसून येतात. यांच्या सौजन्यानें मी फार संतुष्ट झालों आहें; पण सबंध महिनाभर यांच्या बिऱ्हाडीं राहून यांच्यावर आपला भार घालणें मला प्रशस्त वाटत नाहीं. परकी ठिकाणीं केवळ मीच यांच्या उपयोगीं पडेन असें नाहीं. यांचेंहि मला पुष्कळ साहाय्य होईल."

सर्वांच्या मनाप्रमाणें बेत तर कायम झाला. रावसाहेबांनीं विचारलें "नानासाहेब, आपला तिथला पत्ता काय? घरीं मला कळवला पाहिजे."

"नारायणदास गुजराचा बंगला, धोपेश्वर, जिल्हा रत्नागिरी, असा पत्ता लिहिला ह्मणजे बस्स."

केशवरावांनां हा पत्ता कळवून रावसाहेबांनीं लिहिलें, कीं, "या पत्त्यावर मला पैसे पाठवून पत्रानें तिकडची सारी हकीगत कळवावी."

रात्रीच्या बोटीनें ठरल्याप्रमाणें सर्व मंडळी धोपेश्वराला जावयाला निघाली.

---

## प्रकरण चाळिसावें.

## कमलेचा आजार.

आबासाहेबांच्या वाढदिवसानिमित्त वनभोजन वगैरे उरकून सर्व मंडळी पुनः गाड्यांतून परत घरीं येते, तों चांगल्या करकरीत तिन्हीसांजा होऊन गेल्या होत्या. घरीं पोहोंचून हातपाय धुऊन मंडळी नेहमींच्या खोलींत चहापानासाठीं पुनः एकत्र जमली.

आज आबासाहेबांचा चेहरा अत्यंत गंभीर दिसत होता. आज या वेळीं ते फारसे कोणापाशीं बोलत नव्हते. 'कथासरित्सागरा'चे कथातरंग आज अगदीं शांत होते! त्यांच्या हृदयांत या वेळीं कांहीं निराळेच विचार खेळत होते. आज सारा दिवस कुटुंबांतील प्रिय मंडळीशीं आबासाहेब चांगले हंसूनखेळून वागत होते. मंडळीच्या आनंदालाहि पारावार नव्हता. एकमेकांच्या आनंदानें एकमेकांचा आनंद द्विगुणित होत होता. परंतु संध्याकाळ होऊन घरीं परतण्याची वेळ आली, तसा आबासाहेबांचा आनंद मावळूं लागला. दिवसभर चाललेल्या आमोदप्रमोदानें ते बरेचसे श्रांत होऊन गेले होते. संध्याकाळपासून त्यांनां असें वाटूं लागलें होतें, कीं, आपल्या जीवनाचा संध्याकालहि निकट आलेला आहे. **'करो देव कृपा थोर, येउ दिन हा वारंवार!'** अशी जरी आपल्या कुटुंबांतल्या मंडळीची उत्कट इच्छा असली, तरी आपला हा वाढदिवस कदाचित् पुनः साजरा करण्याचा योग येणार नाहीं! कदाचित् त्याबद्दल निराळीच कांहीं तिथि पाळण्याचा त्यांच्यावर प्रसंग येईल! असा विचार आबासाहेबांच्या मनांत संध्याकाळपासून खेळूं लागला होता. परंतु अर्थातच त्यांनीं तो कोणापाशींहि प्रगट केला नव्हता. अन्तःकरणाच्या या स्थितींतहि शक्य तितके तेहि इतर मंडळीच्या आनंदाशीं एकरूप व्हावयाचा आपणाकडून प्रयत्न करीत होते.

मंडळी येऊन बसल्यानंतर कांहीं वेळानें कमला सर्वांसाठीं चहा घेऊन आली. पहिल्यानें एक पेला आबासाहेबांच्या हातीं देऊन दुसरा पेला ती मनोहरपंतांनां देऊं लागली; परंतु ते ह्मणाले "नको. असूं द्या."

मनोहरपंतांकडे आपल्या भेदक नेत्रांनीं पहात कमला ह्मणाली "कां बरं? आपण सकाळीं तर चहा घेतला होता अन् 'भारी उत्तम लागतो,' असंहि ह्मटलं होतं."

"आबासाहेबांचा जन्मदिवस ह्मणूनच एक पेलाभर चहा आज मीं घेतला."

"मग बाबांचा जन्मदिवस अजूनहि आहेच! घ्या झालं एवढा एक पेलाभर!"

मनोहरपंत हंसून म्हणाले "तुमच्या वहिनी कांहीं केल्या सोडीनात, म्हणून घ्यावा लागला सकाळीं एक पेलाभर."

गाल फुगवून कमला म्हणाली "वहिनीच्या आग्रहाला मान देऊन आपण चहा घेतला, अन् माझ्या आग्रहाला मात्र कांहींच किंमत नाहीं!"

आबासाहेब, माईसाहेब, अच्युतराव आणि सुशीला हीं सारींजणें चाललेला हा प्रकार कौतुकानें पहात होतीं. त्यांनां त्यांत एक प्रकारचा अवर्णनीय आनंद वाटत होता. कमलेच्या मुखकमलाकडे पहातांच मनोहरपंतांची खात्री झाली, कीं, या वेळीं जर आपण हिच्या हातचा चहा घेतला नाहीं, तर कमलेच्या मनाला अतोनात दुःख झाल्याशिवाय रहाणार नाहीं. त्या मृदुलहृदय बालिकेचें हृदय दुखविणें त्यांच्या अगदीं जीवावर आलें. ते स्मितपूर्वक म्हणाले "बरें, द्या तर बुवा एक पेला!"

मनोहरपंतांच्या हातीं चहाचा पेला देऊन, आपला डावा हात सुशीलेपुढें करून कमला हंसतहंसत म्हणाली "वहिनी, चल–काढ रुपये!"

माईसाहेबांनीं किंचित् आश्चर्यानें विचारलें "कसले ग रुपये ताई?"

कमला हंसून म्हणाली "कसले म्हणजे? पैजेचे! वहिनी मला मघांशीं चिडवून म्हणाली, कीं, 'सकाळीं मीं एक मनोहरपंतांनां चहा घ्यायला लावलं, म्हणून तुम्हाला दिखील का त्यांनां चहा घ्यायला लावतां येईल? कधीं नाहीं तुमचं ते ऐकायचे!' त्यावर मीं तिला म्हटलं 'त्यांच्याकडून मी चहा घेववीन–अगदीं खात्रीनं घेववीन!' झालं, शेवटीं आमची दोघींची ठरली पैज!"

आबासाहेबांनीं हंसून विचारलें "किती रुपयांची?"

"पांच रुपयांची बाबा! जी पैज जिंकील, तिनं बाजारांतून दारूसामान आणून तें लावायचं तुमच्या वाढदिवसानिमित्त, असं आमचं ठरलं आहे. चल वहिनी, काढ रुपये!"

सुशीलेनें कांहीं न बोलतां हंसतहंसत आपल्या पोलक्याच्या खिशांतून पांच रुपये काढून कमलेच्या हातीं दिले.

ते रुपये तसेच अच्युतरावांच्या हातीं देऊन कमला ह्मणाली "दादा, याचं दारूसामान आणून दे मला आतांच्या आतां!"

माईसाहेब हंसून ह्मणाल्या " चल, वेडी पोर कुठली ! आतां कुठलं दारूसामान मिळणार तुला ? फुलवाडी ह्मणजे का मुंबईशहर वाटलं तुला ?"

कमला जोरानें ह्मणाली " मिळेल ग ! मिळेल बाजारांत आपल्या. दिवाळीकरतां ह्मणून पुष्कळ दुकानदारांनीं दारूसामान आणलं होतं, तें अजूनहि असेल. सारंच कांहीं सरलं नाहीं. मधूनं मला सांगितलं आहे, कीं, अजून दारूसामान बाजारांत आहे ! "

बहिणीच्या या भाषणाला दुजोरा देऊन, मान हलवून मधु ह्मणाला "आहे ग, खरंच आहे अजून आई ! फटाक्या, नळे, चंद्रजोती, चिचुंद्र्या, फुलबाज्या–विजेची तार—"

आबासाहेब मध्येंच ह्मणाले "असेल मिळत; पण दारू उडवून पैसे कां उगीच जाळायचे ?"

कमला ह्मणाली "त्यांत हो काय झालं बाबा ? महाराणीच्या जुबिलीच्या वेळीं, अन् आपले राजेसाहेब गादीवर बसले, तेव्हां कसं हो दारूसामान इतकं मोठं लागलं ? तुह्मीच ना सांगत होतां ती मुंबईची मजा आह्मांला? तुमच्या वाढदिवसानिमित्त आह्मीहि उडवणार दारूसामान."

मुलीला प्रेमभरानें जवळ ओढून, तिच्या पाठीवरून वत्सलतेनें हात फिरवीत आबासाहेब हंसून ह्मणाले "बरें तर आणवा दारूसामान. तुमच्या पैजेच्या कारभारांत आह्मी कशाला ?"

सर्वांचें चहापान झाल्यावर मंडळी हंसतबोलत गप्पा झोडीत बसली आहे, इतक्यांत लहानशा दोन टोपल्या भरून दारूसामान येऊन हजर झालें. वाड्याच्या मागच्या बाजूला ग्यालरीच्या खालीं जी लहानशी पुष्करिणी होती, तिच्या कांठीं दारूसामान लावावयाचें, असें ठरलें.

सर्व मंडळी जाऊन त्या ग्यालरींत बसली. मौजेंत आणि आनंदांत अर्धा-तासपर्यंत तें दारूसामान उडत होतें.

थोडासा फराळ करून मनोहरपंत बिछान्यावर पडले असतां त्यांनां कांहीं केल्या झोंप येईना. कोणाचें तरी सुंदर सुकुमार मुखकमल त्यांच्या मनश्चक्षूंसमोर वारंवार उभें राहून त्यांच्या अन्तःकरणावर दुष्टपणानें अधिकार गाजवूं लागलें! अहाहा! कौतुकानें व सरल अकृत्रिम हास्यानें उज्ज्वल दिसणारे ते दोन मोठाले चंचल डोळे—त्यांच्यांत कुटिलता, उग्रता व कृत्रिमता याचा लेशहि नाहीं! तें नितांतरमणीय मुखकमल आणि तें सुंदर नेत्रयुग्म यांनां आपल्या अन्तःकरणसाम्राज्याच्या हद्दपार करणें मनोहरपंतांनां कांहीं केल्या साध्य होईना! आज सारा दिवसभर कमलेनें आत्मजनांशीं जें परिहासाचें, अकृत्रिम अशा मधुर बालिशतेचें वर्तन केलें, ज्या साखरेहूनहि गोड अशा गोष्टीगप्पा सांगितल्या, जें निसर्गसुंदर हास्य केलें, त्या साऱ्याचा पुनःपुनः मनोहरपंतांच्या हृदय-रंगभूमीवर अभिनय होऊं लागला; क्रमाक्रमानें निद्रेचा अंमल थोडथोडा त्यांच्यावर बसूं लागला; त्या वेळीं 'खरेंच—पोरगी भारीच गोड आहे; ज्याच्या नशिबीं तिच्याशीं सारा जन्म कंठायचें असेल, तो या जगांत खरोखर मोठा सुखी, यांत संशय नाहीं!' असा विचार मनोहरपंतांच्या मनांत सारखा खेळूं लागला.

अशा मानसिक स्थितींत मनोहरपंतांनां झोंप लागली. आज सारा दिवस उघड्या हवेंत आनंदांत घालविल्यामुळें त्यांनां गाढ निद्रा आली. पहांटपहांटे त्यांनां एक स्वप्न पडलें. जणूं काय ते वरवेषानें सज्ज होऊन विवाहमंडपांत आले आहेत; चहूंबाजूंनां लोकांची ही गर्दी झाली आहे; मंडपांत चिराकदानाचा लख्ख प्रकाश पडला आहे; बाहेर सूरसनई मधुर तानपलट आळवीत आहे; आपण तांदुळाच्या राशीवर उभें असून समोर अन्तःपट धरून भटजींनीं मंगलाष्टकांचा दणका सुरू केला आहे; योग्य वेळीं अन्तःपट दूर होऊन वधूनें आपल्या गळ्यांत आणि आपण तिच्या गळ्यांत विवाहमाला घातल्या; वधू दुसरी कोणी नाहीं—कमला!

निद्राभंग होतांच कांहीं क्षणपर्यंत मनोहरपंतांना असें वाटलें होतें, कीं, जणूं काय आपण सुखाच्या सरोवरांत स्नान करीत आहों ! निद्रेची जड तंद्रा दूर होतांच त्या अंधकारमय खोलींत मनोहरपंत बिछान्यावर उठून बसले. ते विचार करूं लागले–हें काय आपण स्वप्न पाहिलें? हाच का आपला परिणाम ? विवाह करून, संसारजालांत बद्ध होऊन वासना-तृप्ति आणि अर्थोपार्जन हीच आयुष्याची पूर्ण सफलता समजून आपण जीवित कंठणार काय ? स्वप्नांतील या गोष्टींचें मनांत पर्यालोचन चाललें असतां मनोहरपंत आपणावर खूब रागावले ! स्वप्न पडणें किंवा न पडणें हें कांहीं कोणाच्या इच्छाधीन नाहीं; पण स्वप्नामुळें आपल्या मनाला निरतिशय आनंद कां वाटावा ? त्यांत आनंद वाटण्यासारखें कांहीं नव्हतें. उलट विरक्त व्हावयाला, संसारावरची आसक्ति नष्ट व्हावयाला तें कारणी-भूत व्हावयाला पाहिजे होतें. मननशक्ति निद्रित होती. धनी जवळ नसल्यामुळें सेवकाचें हृदय संयमहीन होऊन निषिद्ध मार्गानें खुशाल चाललें होतें ! परंतु असा सेवक कांहीं चांगला नव्हे. जोंपर्यंत धन्याच्या नजरेसमोर तो असेल, तोंपर्यंतच तो विचारी, शिष्टसांप्रदाय पाळणारा आणि मुकाट्यानें आज्ञा मानणारा असावा ? त्याच्या दृष्टीच्या आड होतां-क्षणींच त्यानें स्वच्छंदी, यथेच्छाचारी बनावें ? रागानें डोळे लाल करून मनोहरपंतांनीं आपल्या हृदयाकडे पाहिलें व भविष्यत्कालीं जपून वागण्या-विषयीं त्याला सावध केलें.

सकाळीं उठतांच, कमलेला रात्रीं बराच ताप आला होता, अशी बातमी मनोहरपंतांना कळली. काल वनभोजनाला गेल्यावेळीं कमला स्नानाच्या निमित्तानें कितीं वेळ तरी नदीच्या पाण्यांत डुंबत राहिली होती, त्याचाच हा परिणाम ! ताप साधाच होता. काळजीचें फारसें कारण नव्हतें. संध्या, गीतापाठ वगैरे आटोपून भोजनासाठीं मनोहरपंत जेव्हां आंत गेले, तेव्हां कमलेच्या दर्शनासाठीं त्यांचे डोळे इकडेतिकडे चळवळ करूं लागले. ताप कांहीं फारसा आला नाहीं–शालबील पांघरून घेऊन इकडेतिकडे हिंडतांना कमला आपणाला दिसेलच बहुतकरून, अशी

त्यांची कल्पना होती; पण ती फोल ठरली ! प्रातःकाळीं मनोहरपंतांनीं आपल्या हृदयाला भारी दटावलें असतांहि तें या वेळीं अत्यंत निराश झालें !

साऱ्या दिवसांत मनोहरपंतांनां कमलेचें दर्शन झालें नाहीं. लज्जेमुळें तिच्या समाचाराला त्यांच्यानेंहि आंत जाववेना. निदान संध्याकाळीं चहापानाच्या वेळीं तरी कमला बाहेर येईल, अशी त्यांनां भारी आशा होती. परंतु ती आशाहि विफल झाली. सुशीला आणि अच्युतराव यांनीं अतिशय आग्रह केला असतांहि त्यांनीं आज चहा घेतला नाहीं. आजची ही बैठक त्यांनां निरानंद आणि उत्साहहीन वाटत होती. जणूं काय झाड आहे—पण फूल नाहीं, आकाश आहे—पण ज्योत्स्ना नाहीं !

तो सबंध दिवस मनोहरपंतांनां कमलेचें दर्शन न होतांच गेला. रात्रीं बिछान्यावर पडल्यानंतर त्यांच्या मनांत विचारलहरींनीं नुसता कल्लोळ मांडला. रोग पूर्णपणें जडल्याचीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं. नाटक-कादंबऱ्यांतून जो प्रकार दिसतो, तसाच येथेंहि झाला. याप्रमाणेंच अज्ञान मनुष्य एकएक पाऊल पुढें टाकीत जात असतो, आणि क्रमानें अगाध पाण्यांत पडून शेवटीं वाहून जातो ! नाहीं, असें होऊन चालावयाचें नाहीं. आपण इतके दुर्बल असूं, अशी मनोहरपंतांनां स्वप्नांतहि कल्पना नव्हती ! कमला—कमला—कमला ! सारा दिवस आपलें मन कमला—कमला कां करीत आहे ? काय आहे असें त्या बालिकेंत, कीं, त्यामुळें आपलें हृदय इतकें विलक्षण रीतीनें आकृष्ट व्हावें ? तिचें ज्ञान तें किती ? तिला षड्दर्शनें ठाऊक नाहींत—विज्ञानादिकांचा गंध नाहीं—शास्त्रमीमांसा तिच्या कधीं स्वप्नांतहि नाहीं ! गीता—उपनिषदें तिनें कधीं बघितलींहि नाहींत. अज्ञ—विचारशक्तिहीन चौदा वर्षांची कोंवळी पोर ! तिचें मुखकमल फार सुंदर आहे; नेत्रयुग्म विशाल व पाणिदार आहे; ओष्ठद्वयावर परिहासाचें हास्य नेहमीं नर्तन करीत आहे; कंठस्वरांत संगीताची मधुर तानलय आहे; हीच काय ती त्या मुग्ध पोरीची सारी संपत्ति ! यामुळेंच काय मनोहरपंत पागल होणार ? मनोहरपंत ? छे छे—अशक्य—अगदीं कल्पनातीत—अविश्वसनीय गोष्ट !

कांहीं वेळ आत्मानुसंधान केल्यानंतर मनोहरपंतांनी वाटूं लागलें, तर्कवितर्क करून काय होणार? पागल बनावयाला आतां कांहीं बाकी का राहिली आहे? त्या स्वप्नानें हा सारा घात केला! आज सारा दिवस जागृत राहून कमलेला पहाण्यासाठीं आपल्या तृषित मनानें कोण धडपड केली! आत्मप्रवंचना करून काय फायदा? रोग जडण्याचीं पूर्वलक्षणेंच हीं, नाहीं तर काय? पण पूर्वलक्षणें तरी कसलीं? रोग पूर्णपणें जडलाहि! तर मग आतां उपाय काय? पलायनाशिवाय दुसरा कोणता उपाय असणार? उद्यांच्या उद्यां या मंडळीचा निरोप घेऊन घरीं गेलें पाहिजे. वेळ आहे तोंच सावध होणें उचित होय!

त्या रात्रीं मनोहरपंतांनीं कांहीं स्वप्नांत कमलेला पाहिलें नाहीं. सकाळीं उठतांच त्यांच्या मनाची भावना एकाद्या विजयी वीराप्रमाणें झाली. त्यांनां वाटूं लागलें, प्रेमरोगाच्या अंकुरानें किंचित् डोकें वर केलें होतें खरें; परंतु आपण आपल्या जोरदार लाथेच्या आघातानें तो चुरून कुसकरून अगदीं नाहींसा करून टाकला! आपण ह्मणजे आहोंत कोण? आपण आतां खरोखरच दृढहृदयाचे मनोहरपंतच आहोंत! मधुर सुंदर मोहिनीचें रूप घेऊन संसारसुख आपणाला मोह पाडण्याकरितां आलें होतें! पण प्रसंग कोणाशीं, तें माहीत नाहीं?

. सकाळीं उठतांच, रात्रीं कमलेचा ताप बराच वाढला होता, असें मनोहरपंतांनीं ऐकलें. सारी रात्रभर तिची सारखी तळमळ चालली होती. ही बातमी ऐकतांच मनोहरपंतांच्या नुकतेंच दृढ बनलेल्या हृदयाला अवर्णनीय वेदना होऊं लागल्या. अच्युतरावांनां त्यांनीं विचारलें "ताप किती डिग्री आहे कमलाबाईंनां?"

"रात्री एकशेंपांच होता. आतां एकशेंचार आहे."

"डॉक्टर कोण?"

"इथले एक वैद्य आले होते रात्रीं. आतांहि त्यांनां घेऊन यायला माणूस पाठवला आहे. ताप येऊन तीस घंटे होऊन गेले, तरी अजून

कांहीं ताप हटत नाहीं पहा. कांहीं तरी 'कॉम्प्लिकेशन' नाहीं झालें म्हणजे मिळवली !"

त्या दिवशीं प्रातःसंध्यादि नित्यकृत्यांकडे मनोहरपंतांचें चांगलेंसे मनच लागेना. ते बाहेरच्या दिवाणखान्यांत एकटेच बसून राहिले. आबासाहेब व अच्युतराव आंत कमलेजवळ बसून होते. कमलेची कांहींच बातमी न कळल्यामुळें मनोहरपंतांचें मन अधिकाधिक व्याकुल होऊं लागलें. एकदोघां नोकरमोलकरणींनां त्यांनीं विचारून पाहिलें; परंतु त्यांनां नीटसें कांहीं सांगतां येईना. "लई बिमार हैती ताईसाब." एवढेंच तीं म्हणालीं.

याप्रमाणें दुपारपर्यंत कसा तरी वेळ गेला. आतां मात्र ही स्थिति मनोहरपंतांनां असह्य होऊं लागली. आंत जाऊन कमला कशी आहे, हें स्वतःच बघावें, असें त्यांनां वाटूं लागलें. माईसाहेब, सुशीला वगैरे मंडळी आपल्याशीं तर मन मोकळें करून बोलतात, वागतात. तर मग तिकडे जावयाला संकोच कसला ?

आपल्या मनाशीं असा विचार करून मनोहरपंत आंत जाऊं लागले. त्यांच्या हृदयांतून जणूं कोणीं त्यांनां प्रश्न केला "तुझ्या मनाला भारीच ओढ लागलेली दिसते आहे रे ! कुणाला कधीं ताप नाहीं का येत ?"

मनोहरपंतांनीं त्याला उत्तर दिलें "माझ्या जिवलग मित्राची बहीण भारी आजारी आहे. मग त्यामुळें माझ्या मनाला उत्कंठा नाहीं का लागून रहाणार ? माझी जर अशीच एकादी बहीण असून ती अशीच आजारी असती, तर काय झालें असतें ?"

मनोहरपंत आंत जातात, तों अंगणांत सुशीला त्यांच्या दृष्टीला पडली. त्यांनीं तिला विचारलें "कसें आहे आतां कमलाताईचें ?"

"ताप तर भारीच आहे बाई ! माथ्यावर सारखी कोलनवॉटरची पट्टी ठेवली आहे ! ताप एकशें सहापर्यंत चढला आहे ! आपण याना–पहा स्वतःच." असें म्हणून मनोहरपंतांनां घेऊन सुशीला वर गेली.

कमला एका पलंगावर पडली असून तिनें डोळे मिटले होते. मनोहरपंतांच्या पावलांचा शब्द होतांच तिनें एकवार डोळे उघडून पाहिलें; परंतु माणसाची तिला ओळख असावी, असें कांहीं दिसत नव्हतें. माईसाहेब, आबासाहेब, अच्युतराव हीं तिच्या पलंगाजवळ उद्विग्नहृदयानें कपाळाला हात लावून बसून राहिलीं होतीं.

कमलेचें तापानें अगदीं सुकून गेलेलें, मलिन मुख पाहून मनोहरपंतांनां जणूं भडभडूनच आलें. मोठ्या कष्टानें आत्मसंवरण करून, कांहीं क्षण तेथें राहून ते बाहेर निघून आले.

रात्रीं मनोहरपंत केवळ नांवाला पानावर बसले. त्यांनां जेवण मुळीं जाईच ना! सर्व रात्र घोर चिंतेंत त्यांनीं तळमळत काढली! रात्रभर त्यांचा कसा तो डोळ्याला डोळा लागला नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून कमलेच्या समाचाराला ह्मणून मनोहरपंत आंत गेले, तों देवघराच्या दाराशीं उभी राहून सुशीला स्फुंदत अश्रु ढाळीत आहे, असें त्यांच्या दृष्टीला पडलें. हें पहातांच मनोहरपंतांच्या हृदयांत भयानें धस्स झालें! त्यांनीं तिला विचारलें "कसें काय आहे आतां?"

सुशीला रडतरडत ह्मणाली "अजून बन्सं आहेत, एवढं खरं! पण देवं यश देईल, अशी कांहीं आशा नाहीं दिसत." असें ह्मणून ती स्फुंदूं लागली.

मनोहरपंतांच्या डोळ्यांतूनहि झरझर अश्रु वाहूं लागले. कशानेंहि त्यांच्या मनाची समजूत पडेना! ते ह्मणाले "सातारहून एकादा चांगला डॉक्टर आणला तर बरें नाहीं का?"

सुशीला ह्मणाली "रात्रीं तीन वाजायच्या सुमाराला मेणा घेऊन सिव्हिल सर्जनला आणायला मंडळी गेली आहे."

मनोहरपंत वर गेले नाहींत. खालीं मान घालून परत, बाहेर येऊन बसले.

सुमारें नऊ वाजतां सिव्हिल सर्जनसाहेबांची स्वारी येऊन पोहोंचली. सर्व दिवसभर ते तेथेंच असून त्यांचे उपचार चालू होते. संध्याकाळच्या सुमाराला तापाचा जोर हटूं लागला.

तीनचार वाजल्यापासून मनोहरपंत कमलेच्या खोलीच्या बाहेर बसून राहिले होते. रात्रीं दहा वाजल्यावर आबासाहेब त्यांनां ह्मणाले "मनोहर-पंत, तुह्मी कशाला बरें उगीच कष्ट करून घेतां आपणाला ! रात्र भारी झाली; जा, कांहीं थोडें तरी खाऊन पडा जा."

मनोहरपंत ह्मणाले "मला भूकच नाहीं आहे. कमलेजवळ जागत बसायला आपण जे पहारे ठरविले आहेत, त्यांपैकीं एकदोन तरी मला मिळाले पाहिजेत."

"आजची रात्र जर निभावली, तर उद्यांपासून एक पहारा तुमच्या-कडे ठेवूं. आज नाहीं कांहीं फारशी जरूर.आहोंच आह्मी सारींजणें तिच्या-जवळ. जा मनोहरपंत–जाऊन झोंपा–उगीच नका कष्ट करूं."

"डॉक्टरसाहेब काय म्हणतात ?"

"ते म्हणाले, आज साऱ्या रात्रींत ताप पुरा निघेल, असें वाटतें; पण कमला इतकी निःशक्त झाली आहे, कीं, पहांटेच्या सुमारालाच नाडी सोडून गेली नाहीं म्हणजे झालें ! रात्रीं तीन वाजल्यापासून तों सूर्यो-दयाच्या वेळेपर्यंत अतिशय भयंकर–क्रिटिकल–वेळ आहे. एकदां तेवढी वेळ निभावली, म्हणजे पोरीला कांहीं भीति नाहीं–नाहीं तर—"

आबासाहेबांचे पुढील शब्द त्यांच्या जोराच्या अश्रुप्रवाहांत वाहून गेले ! मनोहरपंतहि स्फुंदत बाहेर आले. थोडा फराळ करण्यासाठीं सुशी-लेनें त्यांनां अतोनात आग्रह केला; परंतु ते त्याला कांहीं केल्या कबूल झाले नाहींत.

---

## प्रकरण एकेचाळिसावें.

### गृहत्याग.

शून्यागृहांत प्रवेश करून मनोहरपंत कांहीं झोपेंच्या उद्योगाला लागले नाहींत. एका आरामखुर्चीवर पडून ते शरीरानें स्वस्थ पडले. परंतु मनानें ते तितकेच अस्वस्थ होते. त्यांच्या अन्तःकरणांत नानाविध चिंता-लहरींनीं नुसता धुमाकूळ मांडला होता.

अहाहा! असें सुंदर, पवित्र, कोमल फूल या जगांतून कायमचें नाहींसें होऊन जाणार ना? सरलतेची केवळ मूर्तिच अशी कमला जगतांतून निघून गेल्यावर येथें काय राहिलें? कमलेवांचून शून्य होणाऱ्या या अरण्यवत् जगांत एक क्षण तरी आपण जीवंत कसें रहावयाचें? अशा तऱ्हेचे अनेक प्रश्न मनोहरपंतांच्या हृदयांत तांडव घालीत असतां मध्येंच त्यांच्या मनांत अशी कल्पना आली, कीं, जणूं काय पहांट झाली. आंतून–कमलेच्या खोलींतून रडण्याचा हलकल्लोळ चालला आहे. तत्क्षणीं जणूं काय धांवतच आपण तिकडे गेलों. सर्व तयारी झाली असून कमलेला खालीं अंगणांत आणली आहे. तिच्या भोंवतीं शोक करीत धाय मोकलणाऱ्या आप्तस्वजनांची गर्दी झाली असून कमला मुकाट्यानें त्यांचा व जगाचा शेवटचा निरोप घेत आहे! किती भयंकर–दारुण कल्पना ही! मनोहरपंतांच्या अंगावर रोमांच उभे राहून त्यांच्या अंगाला दरदरून घाम सुटला! हृदय भरून येऊन नेत्रांवाटे झरझरां अश्रुप्रवाह सुरू झाला.

याप्रमाणें कांहीं वेळ गेला. मनोहरपंत खुर्चीवरून उठले आणि त्यांनीं घड्याळ पाहिलें. बारा वाजावयाला फारसा अवकाश नव्हता. दार उघडून, ग्यालरींत उभे राहून आंतल्या दुसऱ्या मजल्यावरच्या खोल्यांकडे ते सजल नेत्रांनीं पाहूं लागले. दोन खोल्यांतून दिव्यांचा क्षीण प्रकाश बाहेर दिसत होता. एकींत कमला असून दुसरींत डॉक्टरसाहेब निजले होते. मनोहरपंत ग्यालरींत इकडूनतिकडे येरझारा करूं लागले. मधुनमधून आंतल्या त्या दिवे असलेल्या खोल्यांकडे ते कातरदृष्टीनें पहात होते. त्यांनां वाटलें, कीं, अच्युतरावांचे केवळ आपण स्नेहीच नसतों, कुटुंबा-

पैकींच असतों, तर आबासाहेबांनीं कांहीं निष्ठुरपणानें कमलेच्या खोलींतून आपणाला याप्रमाणें हद्दपार करून टाकलें नसतें! मनोहरपंत किती वेळ तरी याप्रमाणें येरझारा घालीत होते. कांहीं वेळानें एक वाजला. नंतर मनोहरपंत आंत आले व दार लावून दिवा मालवून ते बिछान्यावर पडले.

परंतु मनोहरपंतांच्या मनाला चिंतेच्या भयंकर इंगळ्या लागून राहिल्या होत्या; त्यांनां इतक्या सहज रीतीनें झोंप कशी येणार? किती वेळ तरी ते या कुशीवरून त्या कुशीवर याप्रमाणें सारखे तळमळ करीत होते. कांहीं वेळानें त्यांचे डोळे जड होऊन त्यांनां किंचित् तंद्रा आली.

कांहीं क्षणांनीं तंद्रेच्या भरांत मनोहरपंतांनां वाटलें, कीं, जणूं काय आंतून रडारडीचा आवाज ऐकूं येतो आहे! तत्क्षणीं त्यांच्या तंद्रेचा भंग होऊन त्याचें हृदय भयानें धडधडूं लागलें. लक्ष्यपूर्वक कान देऊन ते आंत ऐकूं लागले–कांहीं नाहीं. सर्व शांत! आपण आतां रडारड ऐकली, ती स्वप्नांतच वाटतें!

मनोहरपंतांनीं दिवा लावला व पाहिलें, तों दोन वाजून सातआठ मिनिटें झालीं होतीं. दार उघडून ते बाहेरच्या ग्यालरींत गेले. त्या दोन्ही खोल्यांत अजूनहि दिवे जळतच होते. बाकी जिकडेतिकडे अगदीं शांत–निस्तब्ध होतें. नाहीं–तर मग अजून कांहीं तें अमंगल घडून आलें नाहीं!

ग्यालरींत फिरत असतां मनोहरपंतांच्या मनांत अशी प्रबल इच्छा उत्पन्न झाली, कीं, आंत वरती जाऊन कमलेच्या खोलींत प्रवेश करून तिच्या पलंगाशीं एकवार उभें राहून तरी यावें. कोणाला ठाऊक, फिरून ती कधीं आपल्या दृष्टीला पडते कीं नाहीं तें! तिचें शेवटचें दर्शन घेऊन आलों, म्हणून आपणाला कोणी दोष देईल काय? तीन वाजावयाला आतां तर कांहीं फारसा अवकाश राहिला नाहीं!

इतक्यांत मनोहरपंतांच्या मनांत असा विचार आला, कीं, कमलेच्या पलंगाशीं उभे राहून आपण काय करणार आहों? आबासाहेब, अच्युतराव वगैरे मंडळी तर तेथें आहेतच!

पुनः क्षणभरांत त्यांच्या मनांत अशीहि कल्पना आली, कीं, ते जवळ बसून राहिले असले, तरी काय करणार आहेत? कमला जर गेली–तर–तर ते तिला धरून ठेवतील काय?

नंतर मनोहरपंतांच्या मनांत असा विचार आला, कीं, डॉक्टरसाहेब तरी तिच्याजवळ आहेत ना? परंतु डॉक्टरसाहेब झाले, म्हणून ते तरी काय करूं शकणार आहेत? मग कोण काय करणार? कमलेला कोण वांचवील? हां–जो तिला वांचवूं शकेल, असा एकजण आहे खरा! ज्यानें ही पृथिवी, हें नक्षत्रखचित नभोमंडल, हें अनंत विश्व–ब्रह्मांड आपल्या हातानें निर्माण केलें, फक्त त्याच्याच अंगीं कमलेला परत फिरवून आणावयाची शक्ति आहे, हें खास! त्या विश्वात्म्याला आज मी हांक मारीन–अन्तःकरणाच्या अन्तःकरणापासून त्याची मी प्रार्थना करीन--कमलेच्या जीवनाची भिक्षा त्याच्यापासून मी मागून घेईन!

कर्तव्याचा निश्चय करावयाला मनोहरपंतांनां क्षणाचाहि विलंब लागला नाहीं. ही गोष्ट आपल्या मनांत या क्षणापर्यंत कशी आली नाहीं, याचेंच मनोहरपंतांनां भारी आश्चर्य वाटूं लागलें. सर्व रात्र आपण जागून काढली –इतका हा वेळ आपण व्यर्थ घालविला. इतक्या वेळांत भगवंताच्या पदकमलाच्या ठिकाणीं मन समर्पण करून आपली कातर प्रार्थना आपणाला त्याला समजावितां आली असती. आतां तरी क्षणमात्रहि विलंब करण्यांत अर्थ नाहीं.

तत्क्षणीं पायांतल्या खडावा काढून ठेवून मनोहरपंतांनीं आपलें हातपायतोंड धुतलें. वस्त्र बदलून दुसरें धौतवस्त्र ते नेसले. त्या खोलीच्या एका कोंपऱ्यांत त्यांचें संध्येचें सामान, दर्भासन वगैरे होतें. त्यांपैकीं दर्भासन मात्र त्यांनीं घेतलें. तांब्या, पंचपात्री, शाल वगैरे कांहीं घेतलें नाहीं. आज त्यांच्या नेत्रद्वयांतून ज्या पुण्यधारा वहात होत्या, त्या भगवंताला गंगाजलापेक्षांहि पवित्र वाटण्यासारख्या होत्या.

दर्भासन घेऊन मनोहरपंत मागच्या ग्यालरींत जाऊन बसले. त्याच ग्यालरीच्या खालून थोड्या अंतरावरून नदी वहात गेली होती. कांहीं

दिवसांपूर्वी याच ग्यालरींत आपण बसून 'ब्रह्मसूत्रभाष्य' वाचीत असतां लाल अलवानाचा तुकडा घेऊन त्यावर अक्षरें काढून द्यावयाची आपणाला विनंति करावयाला कमला आली होती, ही गोष्ट या वेळीं मनोहरपंतांना आठवल्याखेरीज राहिली नाहीं.

आसन पसरून पूर्वेकडे तोंड करून मनोहरपंतांनीं डोळे मिटले व हात जोडून ते विश्वात्म्याची कातर भावानें प्रार्थना करूं लागले. घड्याळांत तीन वाजले. बाहेर घनदाट अंधकार पडला होता. नदीहि दिसत नव्हती —फक्त तिच्या तीरांवरील लहानलहान दगडांवर पाण्याच्या लहरि आपटून त्यांपासून मृदुमृदु ध्वनि निघत होता. याशिवाय आणखी कोठें कसलाहि शब्द होत नव्हता. मनोहरपंत मधुनमधून प्रार्थनाश्लोकांचीं अक्षरें अस्पष्ट स्वरानें उच्चारीत; पुनः मधुनमधून किती वेळ तरी ते स्तब्ध रहात.

चार वाजले. अंधकार कमीकमी होत चालला होता. आकाशांतील तारकावृंदांत पूर्वीप्रमाणें तेज राहिलें नव्हतें. मनोहरपंत मध्येंच एकाद वेळ डोळे उघडून रात्र अजून किती शिल्लक आहे तें पहात. पुनः डोळे मिटून आपल्या प्रार्थनेंत निमग्न होत.

आतां रात्र बाकी राहिली नव्हती. पूर्वदिशा उजळूं लागली होती. एकाददुसऱ्या पक्ष्याचा कलरव ऐकूं येऊं लागला होता. नदीच्या बाजूकडून उषःकालच्या शीत वायूच्या मृदुमंद लहरि वाहूं लागल्या होत्या. मनोहरपंतांनीं डोळे उघडून कांहीं क्षण पूर्वेकडील आकाशभागाकडे पाहिलें व फिरून त्यांनीं डोळे मिटले.

पूर्वदिशा लाल रंग धारण करीत चालली होती. शेंकडों पक्ष्यांच्या कलकूजनानें नदीचा तीर गजबजून गेला होता. क्रमाक्रमानें पूर्व दिशेचा रक्तिमा गाढतर—गाढतम होऊं लागला. पहातांपहातां नुकत्याच उदय पावलेल्या सूर्यनारायणाच्या एका कनककिरणानें, जणूं काय भगवंताच्या आशीर्वादाप्रमाणेंच धांवत येऊन ध्यानमग्न मनोहरपंतांच्या ललाटप्रदेशाला हळूच स्पर्श केला. तत्क्षणीं डोळें उघडून भूमीपर्यंत लवून त्यांनीं प्रणाम केला.

मनोहरपंत उठले. कुशासन खोलींत ठेवून ते झटकन् आंत जावयाला निघाले. मघांपासून रडारडीचा शब्द तर आपणाला बिलकूल ऐकूं आला नाहीं! सर्व कांहीं शांत-निस्तब्ध होतें.

मनोहरपंत अंगणांत येऊन पहातात, तों तेथें माईसाहेब उभ्या होत्या. मनोहरपंतांनां आलेले पहातांच त्या ह्मणाल्या "देवाच्या दयेनं ताई आतां बरी आहे. अंगांतला ताप सारा काढला आहे. दोन शब्द दिखील ती आमच्याशीं बोलली. आतां तिला गाढ झोंप लागली आहे."

बोलतांबोलतां माईसाहेबांनीं तीक्ष्ण दृष्टीनें मनोहरपंतांकडे पाहिलें. आपले डोळे व गाल यांवरचे अश्रूंचे डाग पुसून टाकावयाचें आपणाला स्मरण राहिलें नाहीं, ही गोष्ट मनोहरपंतांनां आतां आठवली व त्यामुळें ते लाजले. खालीं मान घालून पुनः ते बाहेर आले व प्रातःकृत्यें आटोपून, स्नान करून संध्या-पूजा करावयाला बसले.

* * *

कमला आतां बरी झाली होती; परंतु अजून तिच्या अंगांत शक्ति कशी ती बिलकूल नव्हती. दोनतीन दिवस अगदीं जरूरीशिवाय कोणींहि तिला भेटूं नये, अशी डॉक्टरसाहेबांची सर्वांनां ताकीद होती. ती आपल्याच खोलींत असे. या तीन दिवसांत मनोहरपंतांच्या ती बिलकूल दृष्टीला पडली नव्हती.

आपलें हृदय कमलेकडे आतां कोणत्या भावानें पाहूं लागलें आहे, हें मनोहरपंतांनां आतां स्पष्टपणें समजून चुकलें. अलीकडे बोलतांबोलतां आपल्या समक्ष जर कमलेच्या नांवाचा कोणीं उल्लेख केला, तर आपल्या कर्णयुगलांत जणूं काय स्वर्गीय वीणेचाच झंकार उठतो, ही गोष्ट आज कित्येक दिवस मनोहरपंतांच्या लक्ष्यांत येऊन चुकली होती. यामुळें त्यांच्या मनाला अतोनात लज्जा वाटूं लागली होती—परंतु आतां मात्र कांहीं केल्या त्यांनां आत्मसंवरण असें करतांच येत नव्हतें. आपल्या हृदयाची ही विलक्षण दुर्बलता मनोहरपंतांच्या केव्हांच ध्यानांत येऊन

चुकली होती. यामुळें संसाराश्रम आपणाला निरापद, सुरक्षित स्थल नव्हे, असें त्यांनीं आपल्या मनाशीं ठरवून टाकलें होतें. अप्पांचे शब्द अलीकडे मनोहरपंतांनां वारंवार स्मरत असत. ते म्हणाले होते "संसाराचा त्याग करून बैरागी किंवा संन्यासी बनून तूं जर अरण्यांत गेलास, तर मग ती गोष्ट अलाहिदा होती. परंतु गृहस्थाश्रमांत राहून त्याच्या नियमांचें मात्र प्रतिपालन करावयाचें नाहीं, तर मात्र त्यापासून दुष्परिणाम झाल्याशिवाय कधींहि रहाणार नाहींत." अप्पा अर्थात् निराळ्या भावानें हे शब्द बोलले होते; परंतु सिद्धान्त अगदीं अनुभवानें सिद्ध झालेला आहे, असें मनोहरपंतांनां वाटूं लागलें. त्यांच्या मनाची प्रस्तुतची स्थितिच या सिद्धान्ताचें उत्कृष्ट प्रमाण होतें.

याप्रमाणें निरनिराळ्या दिशांनीं विचार करून मनोहरपंतांनीं संसाराश्रमांत आतां आपण राहूंच नये, असें निश्चित केलें. आतां रीतसर वैराग्य घ्यावयाचें, असें त्यांनीं ठरविलें. संसाराश्रमांत राहिलें, तर आपल्या साधनभजनादिकांत पदोपदीं विघ्नेंच येतात. आपली आध्यात्मिक उन्नति करणें असेल, तर योग्य अशा गुरूचीहि आवश्यकता आहे. आपण जर बाहेर पडलों नाहीं, तर तो गुरु तरी आपणाला मिळणार कोठून? शक्य तितकें लवकर येथून घरीं जाऊन, भगवीं वस्त्रें धारण करून, कांबळीकमंडलु घेऊन घरांतून बाहेर पडावयाचें, असें मनोहरपंतांनीं ठरविलें. अहाहा! मग काय तें आत्मग्लानिविहीन स्वतंत्रतेचें आयुष्य! नेहमीं वाटेल तें करावयाला मोकळीक–घातुक लोकदृष्टीच्या आड बसून एकान्तमनानें एकध्यानानें आपणाला तपश्चर्या करतां येईल. येथें मित्राचें आतिथ्य घेत आपण उगीच कितीतरी दिवस काढले! आतां या मंडळींचा निरोप घ्यावयाला उशीर कां करावा? पण थोडा आवकाश आहे खरा. कमला खालीं येऊं लागल्यावर तिचें शेवटचें दर्शन घेऊन सर्वांचा कायमचा निरोप घेऊन निघून जावें. आतां आपण आपल्या मनाची प्रवंचना करीत नाहीं, हृदयाच्या चपलतेला आपण क्षमेच्या दृष्टीनेंच पहात आहों–हें कित्येक दिवस हृदयाला आपण मोकळीक दिली असून

तेंहि रात्रंदिवस प्रियचिंतनांत निमग्न आहे—असूया—आणखी दोन दिवसा-पेक्षां तर कांहीं त्याला ही मौज करायला मिळणार नाहीं!

दोन दिवसांनीं सायंकाळीं कमला आपल्या खोलींतून खालीं आली. दुपारीं फराळ करावयाला मनोहरपंत आंत गेले असतां ती त्यांच्या दृष्टीला पडली. तिचें पांडुर कृश मुख पाहून मनोहरपंतांच्या हृदयाला यातना होऊं लागल्या. एक गुलाबी रंगाची पातळ शाल अंगावर घेऊन कमला बाहेर ग्याल्ररींत हिंडत होती.

तिच्याजवळ जाऊन मनोहरपंतांनीं विचारलें "आतां कशी काय आहे तब्येत कमलाताई?"

"बरी आहे.मी इतक्या लवकर कशी बरी झालें सांगा पाहूं मनोहरपंत?"

"नाहीं बुवा मला ठाऊक!"

"भारीच मजा झाली एक. दादानं नाहीं का सांगितली आपणाला?"

"नाहीं बुवा!"

"तापांत मला वायु झाला, तेव्हां मी कांहीं तरी बडबडायला लागलें. नाहीं ऐकलंत?"

"हो, ऐकलें तर काय झालें!"

"वायूच्या लहरींत मी बडबडत होतें—मला कांहीं ठाऊक नाहीं ह्मणा. सारींजणं सांगतात आम्हीं—मी बडबडत होतें 'आई, माझा ग्रॅमोफोन ग कुठं आहे? कुठं आहे माझा ग्रॅमोफोन?' ह्मणून. जेव्हां मला थोडं बरं वाटूं लागलं, तेव्हां दादा मला ह्मणाला 'तूं लवकर हो बरी ताई! मी तुला एक ग्रॅमोफोन देईन हं आणून.' त्या ग्रॅमोफोनच्या आशेनं मी इतक्या लवकर झालें बरी!"

इतक्यांत सुशीला तेथें आली व ह्मणाली "ग्रॅमोफोन ग्रॅमोफोन करून वन्संची बाई झोंपसुद्धां नाहींशी झाली!"

फराळ करून बाहेर आल्यावर मनोहरपंतांनीं आबासाहेबांजवळ घरीं जावयाला निरोप मागितला. आणखीहि दोनचार दिवस रहावयाला

आबासाहेबांनीं त्यांना प्रेमानें आग्रह केला; परंतु नम्रपणें आपला जावयाचा निश्चय कळवून मनोहरपंतांनीं तो युक्तीनें मोडून काढला.

सायंकाळ झाल्यावर चहापानासाठीं कुंटुंबांतील सर्व मंडळी एकत्र जमली असतां कमला मनोहरपंतांनां ह्मणाली "मनोहरपंत, आपण उद्यां ह्मणे जाणार इथून घरीं ?"

"होय."

"छे मनोहरपंत ! उद्यां नका जाऊं. माझा ग्रॅमोफोन येऊं द्या अगोदर. तो ऐकून मग जा."

मनोहरपंत मान हलवून ह्मणाले "छेः ! इतका उशीर लावून मला आतां चालायचें नाहीं ! उद्यां मला इथून निघालेंच पाहिजे."

आपणाला कांहीं यश येत नाहीं, असें पाहून कमला आबासाहेबांनां ह्मणाली "बाबा ! तुह्मी सांगाना हो मनोहरपंतांनां रहायला. तीनचार दिवसांच्या आंतच तर माझा ग्रॅमोफोन येईल बाबा !"

किंचित् हंसून आबासाहेब ह्मणाले "मी तर मनोहरपंतांनां पुष्कळ आग्रह केला रहायला; पण हे नाहींच ह्मणतात, त्याला काय करायचें बाळ ?"

मनोहरपंत ह्मणाले "अच्छा–तुमचा ग्रॅमोफोन येऊं द्या. पुनः जेव्हां मी इथें येईन कीं नाहीं, तेव्हां तो ऐकेन मी."

त्यांच्या या शब्दांनीं कमलेला अतिशय वाईट वाटलें असावें, असें दिसलें. कांहीं वेळानें आबासाहेब ह्मणाले "जा बरें बाळ, चहाचें आधण आलें का पहा."

"ही जातें," असें ह्मणून कमलेनें मनोहरपंतांकडे वळून विचारलें "आपणासाठींहि आणूं का एक पेला ?"

क्षणभर स्तब्ध राहून मनोहरपंत ह्मणाले "अच्छा. आणा एक पेला."

ग्रॅमोफोन येईपर्यंत रहावयाला मनोहरपंत कबूल न झाल्यामुळें कमलेला वाईट वाटलें होतें. आणखी चहा नाकारून तिच्या मनाला अधिक दुःख द्यावयाला त्यांचें मन आतां तयार होईना. त्यांनीं असाहि विचार केला

'आज तर शेवटचा दिवस. सर्व तऱ्हेचा असंयम, आत्मपरायणता यांचाहि आज शेवटचाच दिवस हा!"

दुसऱ्या दिवशीं भोजन वगैरे आटोपून मनोहरपंत माईसाहेबांचा निरोप घ्यावयाला गेले. त्या वेळीं त्या आपल्या खोलींत एकट्याच बसल्या होत्या. मनोहरपंत तेथें बसल्यावर इतर इकडच्यातिकडच्या कांहीं गोष्टी झाल्यावर माईसाहेब त्यांना ह्मणाल्या "मनोहरपंत, तुह्माला कांहीं विचारावं असं किती दिवस माझ्या मनांत आहे–पण मनाला संकोच वाटतो–धीर होत नाहीं."

"काय विचारायचें आहे आई? ज्याप्रमाणें अच्युतराव आपले चिरंजीव आहेत, त्याप्रमाणेंच मीहि आपला मुलगाच आहें, असें समजा. विचारायचें असेल, तें खुशाल विचारा—त्यासाठीं संकोच कशाला?"

यापूर्वी दुसऱ्या कोणाच्याहि मातेला मनोहरपंतांनीं 'आई' असें ह्मटलें नव्हतें.

माईसाहेब ह्मणाल्या "माझा अच्युत ज्याप्रमाणं माझा मुलगा आहे, त्याप्रमाणंच तुह्मींहि मला खरोखरीच मुलासारखेंच व्हावं, अशीच माझी इच्छा आहे. माझ्या कमलेशीं तुमचं लगिन व्हावं, असा माझा फारच हेतु आहे. मनोहरपंत, तुह्माला आई नाहीं–तेव्हां अशा तऱ्हेनं तुमची आई व्हावं, अशी माझ्या मनाला भारी उत्कंठा लागून राहिली आहे."

मनोहरपंत कांहीं वेळ खालीं मान घालून स्तब्ध बसले होते. नंतर ते ह्मणाले "आई, तसें होणें संभवनीय नाहीं. माझ्या आयुष्याचा मार्ग ह्मीं निराळ्याच दिशेनें निश्चित करून टाकला आहे. हा गृहस्थाश्रमाचा मार्ग माझ्याकरतां नाहीं. या असार संसाराचा त्याग करून मी बैरागी होणार आई!"

मनोहरपंतांच्या तोंडचे हे शब्द ऐकून माईसाहेब आश्चर्यानें थक्कच झाल्या. क्षणभर स्तब्ध राहून त्या ह्मणाल्या "असं हें भलतंच काय बोलावं मनोहरपंत? हें का बैरागी व्हायचं तुमचं वय? असं बोलूं दिखील नका पुनः! माझ्या पोरीशीं तुह्माला लगिन करायचं नसलं, तर नका करूं–पण

बैरागी व्हायची गोष्ट दिखील नका बोलूं. दुसऱ्या मनाजोग्या कोणत्याहि उत्तम मुलीशीं लगिन करून सुखानें चिरकाल संसार करा. त्यांतहि आम्हांला सुखच आहे."

मनोहरपंत खालीं मान घालून म्हणाले "आई, जर मला लग्न करायचें असतें, तर आपणालाच मातृपदाचा मान देऊन मी जगांत धन्य झालों असतों, याविषयीं आपल्या मनांत तिळप्राय संशय आणूं नका!"

माईसाहेब जवळजवळ विनंतीच्या स्वरानें म्हणाल्या "तर मग आमचं म्हाताऱ्यांचं ऐकल्याशिवाय राहूं नका. तुमच्या वडील बंधूंनां पत्र लिहायला मी सांगतें. या मार्गेसरांतच उरकून जाऊं द्या लगिन."

मनोहरपंतांचे डोळे अश्रूंनीं भरून आले. झटकन् उठून ते म्हणाले "आई, मला आतां मोहांत नका पाडूं!" असें म्हणून माईसाहेबांच्या पायांवर मस्तक ठेवून मनोहरपंत तेथून निघून गेले.

* * *

बनगांवला घरीं जाऊन, दोन दिवस तेथें राहून तिसऱ्या दिवशीं उषःकालीं भगवीं वस्त्रें परिधान करून, कांबळी व कमंडलु घेऊन एक पैहि बरोबर न घेतां मनोहरपंत गृहत्याग करून निघून गेले!

---

## प्रकरण बेचाळिसावें.

## शत्रुनाशाची युक्ति.

सकाळीं उठून प्रातर्विधि आटोपून केशवरावजींनीं पहिल्यानें चिलीम भरली, व कांहीं वेळ तिचें मनःपूर्वक सेवन करून त्यांनीं उठून लालभडक कांठांचें एक रेशमी धोतर परिधान केलें. नंतर खडावा पायांत घालून, हातीं फुलांची परडी घेऊन बागेंतून पूजेसाठीं फुलें तुळशी काढून आणावयाकरतां म्हणून ते बाहेर पडले.

सकाळची वेळ. थंडीहि साधारणपणें पडूं लागली होती. ती निवारण्यासाठींच म्हणून कीं काय कोण जाणे-धोतराच्या पुढील निऱ्या सोडून केशवरावजींनीं घट्ट कांचा मारला. झाडांच्या पानांवरून टपटप दंव पडत

होतें. फुलांतूनसुद्धां दंवाचे बिंदु भरून गेले होते. फुलझाडाची एकएक फांदी हातीं धरून ती चांगली सळसळां जोरानें हलवून तीवरचें सगळें दंव झाडून टाकून केशवराव फुलें तोडूं लागले. पांढरी व पिंवळी कण्हेर, चांफा, पांढरीतांबडी जास्वंद या फुलांनीं व तुळशीच्या मंजरींनी आणि दलांनीं केशवरावजींची परडी अगदीं तोंडोतोंड भरून गेली.

काय असेल तें असो—आज केशवरावांचें चित्त कांहीं ठिकाणावर नसावें, असें दिसत होतें. मधुनमधून थांबून कान देऊन ते कांहीं ऐकल्यासारखें करीत व मध्येंच सतृष्ण अशा दृष्टीनें बाहेर रस्त्याकडे पहात. वृक्ष—लता—गुल्मांनीं गांवचा रस्ता भरून गेलेला असल्यामुळें त्यांची दृष्टि अधिक दूरपर्यंत पोहोंचणें शक्य नव्हतें. तरीहि केशवराव वारंवार रस्त्याकडे पहातच होते.

कांहीं वेळ याप्रमाणें गेला. केशवरावजींची स्वारी आतां जरा त्रासल्यासारखी झाली. इतक्यांत झाडांझुडपांच्या आंतून कोणाचा तरी आर्त शोकध्वनि एकाएकीं ऐकूं येऊं लागला. केशवराव कान देऊन, पूर्ण लक्ष्य देऊन तो ऐकूं लागले. शब्द अधिकाधिक जवळ येऊं लागून तो आतां चांगलाच ऐकूं येऊं लागला. कोणी विवळत ओरडत होतें "अरे माझा सत्यनाश झाला रे! माझें सर्वस्व गेलें रे!" हा आर्तनाद ऐकून केशवरावांचें मुखमंडल प्रसन्न दिसूं लागलें!

तो शोकशब्द हलुहलू जवळजवळ येऊं लागला. तो ऐकून आसपासच्या घरांतील मंडळी उत्सुकतेनें व जिज्ञासेनें बाहेर येऊन पाहूं लागली.

कांहीं क्षणांनीं बांवूच्या बेटाच्या आडून पांडू विवळत विवळत बाहेर पडला. हातांनीं छाती पिटून, तो रडत ओरडत होता "गेलें—गेलें—माझें सर्वस्व गेलें हो! मला नागवलें हो सपशेल!" त्याच्यामागें गांवांतील पोरांचा घोळका व चारदोन वयस्क लोकहि होते.

केशवराव दृष्टीला पडतांच पांडू त्यांना ह्मणाला "अहो कारभारीसाहेब; माझा सत्यनाश झाला हो—सत्यनाश झाला!"

हातांत परडी घेऊन त्वरेनें बागेच्या कुंपणापर्यंत येऊन् केशवरावांनीं विचारलें "काय रे पांडू ? अरे झालें काय ? असा काय वेड्यासारखा ओरडतो आहेस उगीच ?"

"अहो-उगीच नाहीं हो-सत्यनाश झाला हो माझा ! माझ्या घरांतलें सर्वस्व गेलें हो कारभारीसाहेब ! सर्वस्व गेलें!"

"अरे, नीट सांग. कोणीं नेलें तुझें सर्वस्व ? उगीच ओरडतोस काय असा ? कोणीं काय नेलें तुझें?"

"चोरानें हो कारभारीसाहेब !"

"चोरी झाली तुझ्या घरीं?"

"जी, होय."

"कशी रे झाली चोरी?"

"जी हुजूर ! माझ्या घराच्या मागच्या बाजूला देसायांची आमराई आहे. त्या आमराईतून चोरानें माझ्या घराच्या भिंतीला भगदाड पाडलें अन् त्यांतून आंत शिरला तो कारभारीसाहेब !"

जमलेल्या मंडळींपैकीं पुष्कळजण एकदम ओरडले "काय ? भिंतीला भगदाड पाडलें ? अरे बाप रे !"

"तें पाहिल्याशिवाय खात्री नाहीं व्हायची साहेब ! एवढें जंगी भगदाड पाडलें आहे !"

केशवरावांनीं विचारलें " तुम्ही कोणकोण होतां घरांत ?"

"मी अन् माझी बायको त्या माजघरांत निजलों होतों हो कारभारीसाहेब ! माझी भावजय माझ्या दोन्ही मुलांनां घेऊन अगदीं पलीकडच्या-लांबच्या एका खोलींत निजली होती."

कांहीं वेळ स्तब्ध राहून केशवरावांनीं विचारलें " तुझ्या घराला भगदाड पाडून चोर घरांत शिरून चोरी करून पळून गेला, अन् तुमची कुणाची झोंपमोडसुद्धां झाली नाहीं अं ? मोठें आश्चर्य आहे बुवा हें!"

" नाहीं साहेब ! आम्हांला खरोखरच कांहीं देखील कळलें नाहीं. सकाळीं मी जेव्हां जागा होऊन पहातों, तों त्या भगदाडांतून उजेड

येतो आहे आंत! तें दृष्टीला पडतांच माझ्या छातींत कळच निघाली एकदम! माझ्या बायकोला हलवून जागी करून मीं ह्मटलें 'अग ए, ऊठ ऊठ–मोठा अनर्थ झाला–ऊठ–हें पहा केवढें थोरलें भोंक तें भिंतीला!' माझ्या बायकोनें लगबगीनें घाबरून उठून पाहिलें, तों खरेंच! केवढें तरी भगदाड! त्याबरोबर ती छाती पिटून मोठमोठ्यानें रडूं लागली. नंतर दार उघडून आह्मीं पाहिलें, घरांत तपेलीं, पातेलीं, घंगाळ वगैरे जीं कांहीं भांडीं होतीं, तीं सारीं घेऊन गेला चोर! एका बांबूच्या करंडींत बारा आण्यांचे पैसे होते, भावजईच्या हातांतला रुप्याच्या कांकणांचा एक जोड होता, धाकट्या मुलाच्या कमरेंतला करघोटा होता, हें सारें चोरानें चोरून नेलें हो कारभारीसाहेब–चोरून नेलें! मला सर्वस्वीं नागवून त्यानें मला रस्त्यावरचा भिकारी करून टाकलें हो! हो हो हो–" असें ह्मणून गळा काढून पांडू मोठमोठ्यानें रडूं लागला.

जमलेल्या मंडळीला पांडूच्या या संकटामुळें भारी वाईट वाटून सर्वांनां त्याची दया आली. ते त्याचें सांत्वन करावयाचा प्रयत्न करूं लागले.

केशवराव पांडूला ह्मणाला "जा, असाच ठाण्यावर जा, अन् वर्दी देऊन ये चोरीची. नीट फिर्याद लिहून दे."

पांडू रडत ह्मणाला "फिर्याद लिहून दिली, ह्मणजे माझे जिन्नस सारे मिळतील का हो कारभारीसाहेब?"

सहानुभूतीच्या स्वरानें केशवराव त्याला ह्मणाले "तें आतांच कसें बरें सांगतां येईल पांडू? पोलिसला जर चोर सांपडला, अन् त्याच्याकडून माल मिळाला, तर तुझे सगळे जिन्नस तुला खात्रीनें मिळतील. ज्या खोलींत चोरी झाली, तिथें जो जिन्नस जसा असेल, तसाच तो असूं दे हां! मग तूं ठाण्यावर जा. एकहि जिन्नस इकडचा तिकडे होऊं देऊं नकोस. नाईकसाहेब येऊन सर्व कांहीं बघतील. चल, पण मीच येऊन तिथली कशी काय स्थिति आहे तें स्वतः बघून ठेवतों. कुणाला टाऊक साक्षीबिक्षी द्यावी लागेल कीं काय ती. चला–तुह्मी चला या मजबरोबर सारे."

हें ऐकतांच जमलेले लोक 'हें काय नसतें लचांड आलें!' असें सुचविणाऱ्या मुद्रेनें एकमेकांच्या तोंडांकडे पाहूं लागले. आपण जर कारभारीसाहेबांच्या ह्मणण्याप्रमाणें गेलों, तर फौजदारी मुकद्दम्यांत आपणाला साक्षीबिक्षी द्यावयाच्या भानगडींत पडून नसता त्रास करून घ्यावा लागेल, अशी त्या सर्वांची कल्पना झाली. ह्मणून कोणीं ह्मटलें "आपण पुढें चला साहेब-मी हा येतोंच हे शेणानें भरलेले हातपाय धुऊन." कोणी ह्मणाला "काल रात्रीं पोराला भारीच ताप आला आहे. त्याला तिंबूनानावैद्यांकडे घेऊन गेलेंच पाहिजे मला." कोणीं सांगितलें "माझें अजून दूध काढून नाहीं झालें. आतां येतों हा मी दूध काढून." अशा रीतीनें नानातऱ्हेच्या सबबी सांगून एकेकानें तेथून काढता पाय घेतला.

रस्त्यांत केशवराव पांडूबरोबर एक शब्दहि न बोलतां गंभीरतेनें चालले होते; परंतु त्याच्या अंगणांत जातांच फिदिफिदि हंसून पांडूच्या पाठीवर थाप मारून ते ह्मणाले "शाबास पांडू, शाबास! भारी नामी दिलास फार्स उडवून! एकदम अस्सल वीररस वठवलास मजेदार रीतीनें! आजची नक्कल तूं इतकी हुबेहूब वठवलीस, कीं, ती पाहून मुंबईच्या थेटरांत तुला कोणींहि एक्टरच्या जागेवर तीस रुपये दरमहावर नेमलें असतें!"

पांडूनें हंसतहंसत विचारलें "काय ह्मटलेंत साहेब? खेटरांत एक्टीन् नोकरी?"

केशवराव स्मितपूर्वक ह्मणाले "अरे खेटर नव्हे थेटर-थेटर! अरे, आपल्याकडे जत्रा अन् ललितें होतात ना? तींच तीं. विलायती ललितें ह्मणजे थेटर समजलास? तिथें नाटकें होतात, अन् जितक्या जोरानें एकादा ओरडेल नाटकांत, तितकी त्याची किंमत अधिक! तुला तीस रुपये तरी खास मिळतील तिथें!"

बोलतांबोलतां ते दोघे घरांत आले. केशवरावांना पहातांच गंगा उठून उभी राहिली आणि तशीच बाहेर पडून गोठ्यांत गेली. पांडूची बायकोहि जरा अंतरावर जाऊन उभी राहिली.

माजघरांत जाऊन भिंतीला पाडलेलें भोंक पाहून केशवराव एकदम म्हणाले "वावा ! भारीच वाखाणण्यासारखी आहे तुझी अक्कल ! सुदैवानें त्यांच्या अगोदर मी इथें आलों म्हणून बरें झालें. नाहीं तर एकदम सारा खटाटोप व्यर्थ झाला असता ना! मुकद्दमा पार बुडाला असता!"

पांडु भिऊन म्हणाला "काय झालें साहेब ?"

"काय झालें साहेब ? पांड्या, तूं अगदीं जंगी गाढव आहेस. अरे म्हाण्याच्या कांद्या, चोरानें बाहेर बसून जर भगदाड पाडलें, तर त्याची सारी माती तुझ्या माजघरांत रे ही कशी येऊन पडली ? तुझें हें कौशल्य त्याच्या दृष्टीला पडेल, तो एकदम साफ असें म्हणेल, कीं, आंत बसून हें भगदाड पाडलें आहे ! चल–पहिल्यानें अगोदर हें काम कर. अगोदर ही सारी माती भगदाडांतून बाहेर फेंकून दे."

केशवरावांच्या सूचनेप्रमाणें पांडु करूं लागला. तें काम संपल्यावर केशवराव म्हणाले "बरें–मी जातों आतां. न्याहारी करून तूं आतांच्या आतां कचेरीकडे ये. कोणाला तरी तुझ्याबरोबर देऊन मी तुला ठाण्याकडे देतों धाडून !"

योग्य वेळीं ठाण्यावर जाऊन पांडूनें चोरीची वर्दी दिली. पांडु सांगतांना कांहीं चुकेल, कांहीं हकीगत अजिबातच सांगावयाची राहील, दागिन्यांच्या दुरुस्तीच्या खुणा, दुरुस्त करणाऱ्या तांबटाचें नांव इत्यादि सांगण्यांत पांडु कदाचित् कांहीं चुका करील, अशा आशंकेनें फिर्यादीचा मसुदा खुद्द केशवरावांनीं तयार करून पांडुबरोबर पाठवून दिला होता.

पांडूची फिर्याद दाखल झाल्यावर पत्नीवियोगानें दुःखी झालेल्या नाईकसाहेबांच्या वतीनें मामासाहेबांनीं पहिल्यानें ठाण्याच्या टापूंत असलेल्या, कारागृहांतून सुटून आलेल्या साऱ्या बदमाषांच्या घरांची झडती घेतली. परंतु त्यांत कोठेंच तो चोरीचा माल सांपडला नाहीं.

चवथ्या दिवशीं बनगांवला जाऊन दिवाणजींना हुजुरांचें हुकूमपत्र दाखवून केशवराव त्यांच्याकडून रोख हजार रुपये घेऊन आले. नंतर ठाण्यावर जाऊन त्यांपैकीं दोनशें रुपये मामासाहेबांच्या स्वाधीन करून

ते ह्मणाले " आपल्या पानसुपारीसाठीं ह्मणून हे दोनशें रुपये आणले आहेत मामासाहेब ! आमच्या अप्पासाहेबांनीं या मुकद्दम्यासाठीं सगळे चारशें रुपये छांकशन केले आहेत. त्यांपैकीं शंभर तर त्या दिवशींच दिले आपणाला. हे आतां देतों आहें दोनशें-मिळून एकंदर झाले तीनशें. ज्या दिवशीं आरोपी तुरुंगांत जाईल, त्या दिवशीं बाकीचे शंभर रुपये देऊं, असें अप्पासाहेबांचें ह्मणणें आहे. "

मामासाहेब नोटा हातीं घेऊन आंबट तोंड करून ह्मणाले " बस्स ? एकंदर चारशेंच रुपये ? तुमचे अप्पासाहेब तर भारीच कृपण दिसताहेत बुवा ! पांचशें देखील पुरेपुर नाहीं देववले तुमच्यानें ? "

केशवराव गंभीरपणानें ह्मणाले "मी आपणाकडून अगदीं शिकस्तीचा प्रयत्न करून पाहिला मामासाहेब ! मीं कांहीं आपलें नांव अर्थात्च अप्पासाहेबांनां सांगितलें नाहीं आहे. ते ह्मणाले ' नाईकसाहेबांनां आमचे बहुत सलाम सांगा केशवराव ! त्यांनां ह्मणावें, हा कांहीं एका दिवसाचा कारभार नाहीं. त्यांच्यांशीं आमचें विशेष संघटन पडलें, ह्मणजे नेहमींच त्यांच्याशीं आह्मांला कामें पडणारच आहेत. पहिलाच प्रसंग आहे हा- हें काम कसें काय वठतें त्यांच्याकडून, तें पाहिलें पाहिजे. "

कमिशनचे साठ रुपये केशवरावांनां देऊन मामासाहेब ह्मणाले " माझी सफाई तर पहा केशवराव ! पण आह्मांला खुषी करायचें असलें, तर कांहीं नुसत्या शंभरांवर नाहीं भागायचें ! अप्पासाहेबांनां जाऊन सांगा तुह्मी हें!"

नंतर ते आपल्या मनाशीं ह्मणाले "मी हा सारा कारभार दपटून करतों आहें खरा; पण नाईकसाहेबांनां यांतलें अवाक्षर जर का कळलें,तर मला एकदम तुरुंगांतच डांबतील ते ! मेहुणा ह्मणून माझी गय नाहीं करायचे अगदीं! पण ताईच्या मरणानें त्यांनीं अगदींच हाय घेतली आहे, त्यांच्या वतीनें, सारा कारभार मीच पहातों आहें, तेव्हां युक्तीनें काम केलें, तर त्यांनांहि फसवतां येईल ह्मणा वाटेल तसें ! "

केशवराव ह्मणाले " कळवीन मी आपलें ह्मणणें अप्पासाहेबांनां. मी काय त्यांनां सांगायला कधीं कसूर का करतों आहें मामासाहेब ? आतां भांडीं कोणत्या युक्तीनें—"

केशवरावांनां पुरतें बोलूंहि न देतां मामासाहेब ह्मणाले "या मामाजवळ हजारों युक्त्या असतां अशी काळजी करायचें कारण काय? आज रात्रींच सारीं भांडीं सखारामाच्या घरांत जाऊन पडलीं ह्मणून समजा! माझ्या हाताशीं किती चोर बदमाष आहेत, याची कल्पना आहे तुह्माला? त्यांतल्या दोघांनां मीं घेतले आहेत आपल्या कटांत. ते जाऊन सखारामाचें घर बघूनहि आले आहेत. त्याच्या गोठ्याच्या मागल्या बाजूची भिंत थोडीशी पडलेली आहे. तीवरून आंत जाऊन तीं भांडीं गवताच्या गंजीच्या खालीं ते लपवून ठेवून चटकन् परत येतील. उद्यां सकाळीं आठएक वाजतां जाऊन नाईकसाहेबांच्या वतीनें दपटून मी त्याच्या घराची झडती घेऊन तीं भांडीं काढतों बाहेर. अन् नंतर त्या पाजी सख्याचे हात मागें बांधून त्याला फरफटत आणतों ठाण्यावर. नंतर चारशें अकरा कलमाप्रमाणें त्याच्यावर चालवतों मोकद्दमा. एक वर्ष तर जातेच आहे स्वारी ह्मणा—अधिक जाते कीं काय तें पहावें!"

आपला शत्रु जो सखाराम, त्याला गिरफदार करून मामासाहेब फरफटत ठाण्यावर आणीत आहेत, असें चित्र कल्पनानेत्रांनीं पाहतांच केशवरावजींच्या अन्तःकरणाला आनंदातिशयानें गुदगुल्या होऊं लागल्या. ते ह्मणाले "मामासाहेब! नुसते हात बांधूनच का आणणार? कांहीं बक्षीसबिक्षीस देतां आलें तर पहा!"

"अहो, द्यायला कितीसा वेळ? पण इतक्या पैशांत नाहीं व्हायचें बुवा!"

मामासाहेबांचा हात धरून केवशराव ह्मणाले "मामासाहेब! बेट्याला ठाण्यावर आणून जर चांगली समजून दिलीत, तर अप्पासाहेबांकडून आणखीहि पन्नास रुपये आपणाला मी देववीन पहा!"

"ठीक—तसेंहि करतां येईल." असें ह्मणून मामासाहेब उठले. केशवरावहि शत्रुदमनाच्या आनंदानें हलतडुलत कचेरीकडे निघाले.

## प्रकरण त्रेचाळिसावें.

### साधुसमागम.

मनोहरपंत ज्या वेळीं घरांतून बाहेर पडले, त्या वेळीं नुकतें झुंजूमुंजू दिसूं लागलें होतें. घरची मंडळी किंवा वाड्यांतल्या दासदासी कोणीच उठून हिंडूंफिरूं लागलें नव्हतें. निर्विघ्नपणें हळूच वाड्यांतून पार पडून मनोहरपंत गांवच्या रस्त्यानें चालूं लागले. परिचित असे चारदोन लोक रस्त्यांत त्यांनां भेटले खरे; परंतु प्रकाशाच्या अल्पतेमुळें आणि त्यांचा वेष अगदीं कल्पनेच्या बाहेर भलताच असल्यामुळें मनोहरपंतांनां त्यांपैकीं कोणींच ओळखलें नाहीं.

मनोहरपंतांनीं एक भगवें वस्त्र परिधान केलें होतें. अंगांत त्याच रंगाचा एक पोकळ व लांब सदरा होता. खांद्यावरून तशीच एक छाटी टाकलेली होती. खांद्यावर कांबळी होती. सकाळची वेळ. आज थंडीहि बरीच पडली होती. मनोहरपंतांच्या उजव्या हातांत भगव्याच रंगाची जाड कापडाची एक झोळी झुलत असून तींत भगवद्गीता, सांख्यदर्शन, दशोपनिषदें आणि दुसरींहि चारपांच पुस्तकें होतीं. शिवाय एक मोठी सुरीहि झोळींत होती. डाव्या हातांत कमंडलु असून काखेंत गुंडाळी केलेलें एक मृगचर्म होतें. कोणत्याहि प्रकारचा खाण्याचा जिन्नस किंवा एक पैहि मनोहरपंतांनीं आपणाबरोबर घेतली नव्हती. अशा कपर्दिक-हीन स्थितींत आपलें कसें चालेल, याविषयीं मनोहरपंतांनीं कांहींच का विचार केला नव्हता? केला होता तर काय झालें! बालपणापासूनच त्यांचें मन भक्तिप्रवण बनलेलें होतें. मनोहरपंतांच्या मनाचा असा दृढ विश्वास होता, कीं, परमेश्वरानें ज्या अर्थीं जीव दिला आहे, त्या अर्थीं आहार देऊन त्याचा योगक्षेम चालविण्याची व्यवस्थाहि तो करीलच ! निर्भय-शीलतेच्या या भावनेची स्फूर्ति मनोहरपंतांच्या हृदयांत या वेळीं तर अधिकच उज्ज्वल झाली होती.

कोणत्या रस्त्यानें कोठें जावें हें अगोदर ठरवून मग मनोहरपंत घराच्या बाहेर पडले होते, असें नाहीं. बांगवानपासून दोन कोस अंतरा-

वर एक सरकारी पक्की सडक असून ती बरोबर साताऱ्याला जात होती. रेल्वे झाल्यापासून आगगाडीनेंच बनगांवाहून साताऱ्याला जाणें कांहींसें सोपें पडे, हें खरें; पण रेल्वे होण्याच्या अगोदर याच सडकेनें लोक साताऱ्याला जातयेत असत. गांवाच्या सीमेशीं पोहोंचतांच याच सडकेच्या दिशेला मनोहरपंतांनीं आपला मोर्चा फिरविला. शेतें, मैदानें यांतून एक पायवाट जाऊन या राजमार्गाला मिळाली होती.

मनोहरपंत जेव्हां गांवापासून सरासरी एक कोस चालून आले, तेव्हां सूर्योदय होऊन पूर्वेला त्याचा तेजःपुंज दैवी गोल दिसूं लागला. हा देखावा पाहून, कांहीं दिवसांपूर्वीं जो सूर्योदयाचा देखावा फुलवाडीला मनोहरपंतांनीं पाहिला होता, त्याचें त्यांनां स्मरण झालें. आपल्या एकान्तमनानें केलेल्या कातर प्रार्थनेला जणूं काय उत्तर देण्याकारितां म्हणून हा सूर्यनारायण त्या वेळीं कमलेचा प्राणदाता होऊनच उदय पावला होता, अशीहि कल्पना या वेळीं मनोहरपंतांच्या मनांत आली. अहाहा ! केवढ्या शांतीनें–पवित्रतेच्या केवढ्या पुलकपूर्ण स्फुरणानें त्या वेळीं आपल्या अन्तःकरणाला परिपूर्ण करून टाकलें होतें! मनोहर-पंतांच्या कल्पनेला हांहां म्हणतां फांटे फुटूं लागले ! कमला आतां कशी असेल ? काय करीत असेल ? अहाहा ! त्या पवित्र सरलहृदय बालिकेचें जीवन सुखमय होवो ! अशा प्रकारच्या विचारपरंपरेनें मनोहरपंतांच्या मानसभूमीवर अधिकार नसतांहि प्रवेश करून तेथें रंगण घालावयाला आरंभ केला नाहीं, तोंच ते एकदम भानावर आले. रस्त्यानें जात असतां ते एकदम थबकून उभे राहिले. आपल्या मनावर अतिशय रागावून ते त्याला म्हणाले "हें काय चालविलें आहेस तूं ? घरदार सोडून भगवीं वस्त्रें परिधान करून संन्यासाश्रम घ्यायला ना मी चाललों आहें ? धर्मचिंतनांत–भगवच्चिंतनांत मीं निमग्न असावें, त्याऐवजीं कामिनीच्या चिंतनानें माझ्या मनावर असें आधिपत्य गाजवावें काय ? छी छी छी ! धिक्कार असो मला !" अशा रीतीनें मनाची निर्भर्त्सना करून, मनांत शंकराचार्यांच्या 'मोहमुद्गरां'तील श्लोक म्हणत पूर्वीपेक्षांहि त्वरित गतीनें मनोहरपंत पुढें चालले.

अर्धातास याप्रमाणें चालल्यावर उन्हाच्या तापामुळें मनोहरपंतांनां जरा थकवा वाटूं लागला. खांद्यावरील कांबळी काढून त्यांनीं ती झोळींत घातली. दोन्ही बाजूंचीं शेतें पिकलेल्या धान्यांनीं पिंवळीं दिसत होतीं. रस्त्यानें लोकांची वर्दावळ सुरू झाली होती. मधुनमधून एकाददुसरी बैलगाडी समोरून येऊन मनोहरपंतांच्या जवळून जात होती. आंतलीं माणसें कुतूहलपूर्ण दृष्टीनें त्यांच्याकडे पहात होतीं–कोणीकोणी त्यांनां प्रणामहि करीत होते.

मनोहरपंत जेव्हां पक्क्या सडकेला लागले, त्या वेळीं सात वाजले होते. इतक्या थोड्या वेळांतहि ते कांहींसे थकून गेले होते. अगोदर गेल्या रात्रीं बहुतेक त्यांनां झोंप मिळालीच नव्हती, असें म्हटलें तरी चालेल. दुसरें असें, कीं, मनोहरपंतांनां चालावयाची कधीं फारशी सवय नव्हती. जेव्हां ते मुंबईंत कॉलेजांत शिकत होते, तेव्हां संध्याकाळीं बॅकबेवर ते थोडेसे फिरावयाला जात असत. रविवार किंवा सुट्टीचा दिवस असला, तर ते थोडेसे अधिक म्हणजे महालक्ष्मीपर्यंत किंवा इकडे कुलाब्यापर्यंतहि फिरतफिरत जात. कधींकधीं चालतचालत ते दादर-माटुंग्यापर्यंतहि जात–परंतु हें वर्षांतून एकाददुसऱ्या प्रसंगींच ! कॉलेज सुटल्यापासून तर त्यांचें फिरणें अजिबातच बंद झालें होतें. एकादवेळ वाटलेंच तर तीनचार मैलपर्यंत तो हिंडूनहि येत; परंतु असा प्रसंग अगदींच क्वचित् येत असे.

संयोगस्थलाशीं मोठ्या रस्त्याच्याखालीं एक पक्का पूल होता. त्याच्या एका कठड्यावर झाडाच्या छायेखालीं मनोहरपंत बसले. मृदु शीतल वायूच्या मंद लहरि झुळझुळ वहात होत्या. त्यांनीं मनोहरपंतांचे घर्मबिंदु आणि श्रांति हीं लवकरच नाहींशीं झालीं. तेथें बसून ते विचार करूं लागले 'आतां आपण कोणत्या दिशेला जावें ? साताऱ्याच्या बाजूला, कीं, त्याच्या अगदीं विरुद्ध दिशेला ?' विरुद्ध दिशेला रस्ता कोठें जाऊन संपतो आहे, हें मनोहरपंतांनां मुळींच ठाऊक नव्हतें. शेवटीं 'साताऱ्याकडेच जावें; जर भगवंताची इच्छा असेल, तर तिथूनच आगगाडीनें काशीकडे अगर असेंच कोठें तरी निघून जावें,' असा त्यांनीं विचार केला.

त्या ठिकाणापासून सातारा पायरस्त्यानें बरोबर दोन दिवसांच्या वाटेवर होता. सुमारें तीनसाडेतीन कोसांवर रांजणगांव ह्मणून एक साधारण बरेंच मोठें शहर होतें. मनोहरपंत उठून पुनः रस्ता चालूं लागले.

मनोहरपंत चालले असतां हळुहळू ऊन जसें वाढूं लागलें, तसतसा त्यांचा चालण्याचा वेगहि कमीकमी होऊं लागला. दहा वाजावयाच्या सुमाराला तर तहानेनें त्यांचा जीव कासावीस झाला. गळा सुकला; छाती फाटते कीं काय असें वाटूं लागलें. रस्त्यानें जाणाऱ्यायेणाऱ्या लोकांना विचारतां मनोहरपंतांनां कळून आलें, कीं, रांजणगांव येथून एक कोसावर आहे. आज तेथें बाजार भरावयाचा असल्यामुळें आसपासच्या गांवांहून फळफळावळ,भाजीपाला,धान्यधुन्य यांच्या टोपल्यांच्याटोपल्या भरून तिकडे चालल्या होत्या. गाई, ह्मशी वगैरे जनावरेंहि बाजारांत विक्रीसाठीं जातांना मधुनमधून दिसत होतीं. गवळी दहीं, दूध, ताक, तूप वगैरेंच्या चरव्या तिकडे घेऊन चालले होते. रस्त्याच्या बाजूला एक मोठा तलाव होता. पाणी पिण्यासाठीं मनोहरपंत रस्त्यावरून उतरून तलावाच्या कांठाशीं जाऊन उभे राहिले.

पायऱ्या उतरून मनोहरपंत पाण्याशीं जातात, तों त्यांनां एकदम स्मरण झालें, कीं, स्नानसंध्या आन्हिक यांपैकीं आपण आज कांहींच केलें नाहीं. त्यापूर्वी तोंडांत पाणी तरी कसें घालावयाचें? पोषाक उतरून ठेवून लहानशी छाटी नेसून त्यांनीं चटकन् स्नान उरकून घेतलें. तलावाच्या तीरानें आंबा, डाळिंब, लिंबूं इत्यादि फळझाडांची एक बाग होती. स्नान करून पुनः पोषाक चढवून मनोहरपंत त्या बागेंत गेले आणि एक स्वच्छ जागा पाहून तेथें मृगचर्म पसरून त्यावर बसले.

मनोहरपंतांच्या गळ्यांत अद्यापि यज्ञोपवीत्र होतें. कोणातरी सद्गुरूची गांठ पडून त्याच्यापासून संन्यासाश्रमाची दीक्षा घेऊन यज्ञोपवीताचा त्याग करावा, अशी त्यांची इच्छा होती.

संध्यावंदन आटोपून मनोहरपंतांनीं भगवद्गीता उघडली. तींतले कांहीं श्लोक वाचल्यानंतर त्यांनां आढळून आलें, कीं, बागेंत कांहीं

अंतरावर तीनचार लोक फिरत आहेत. त्यांपैकीं एकाच्या हातांत फळें पाडावयाची कातर होती-बाकीच्याच्या खांद्यावर टोपल्या होत्या. ती मंडळी हळुहळू मनोहरपंतांच्या जवळ येऊं लागली. त्यांच्याजवळच कागदी लिंबांचीं कांहीं झाडें होतीं. ज्याच्या हातांत कातर होती, तो इसम त्या झाडांवरून पटापट लिंबें पाडून एकाच्या खांद्यावरील टोपलींत तीं टाकीत होता. ही बाग या मनुष्याचीच असावी, असें मनोहरपंत समजले.

लिंबें पाडून झाल्यावर त्या मनुष्याची दृष्टि मनोहरपंतांकडे गेली. नंतर तो हळुहळू त्यांच्याकडे येऊं लागला. तो मनुष्य जातीनें मराठा असावा, असें दिसत होतें. कांहीं अंतरावर पायांतल्या वहाणा काढून ठेवून तो मनोहरपंतांजवळ येऊन उभा राहिला आणि कांहीं न बोलतां त्यांच्याकडे टक लावून पाहूं लागला.

मनोहरपंतांनीं पुस्तकावरून दृष्टि वर करतांच, त्या इसमानें त्यांना साष्टांग नमस्कार घातला. नंतर उभा राहून हात जोडून तो म्हणाला "बुवाजी, या तलावाच्या तिन्ही तीरांवरची ही बाग मीं मालकापासून वर्षाला एकशेंपंचवीस रुपये खंडानें घेतली आहे. आजच या बागेंतलीं फळें पाडायला मी पहिल्यानें आलों आहें. रांजणगांवच्या बाज़ारांत जाऊन मी हीं विकणार आहें. आज बागेला आपल्या पायांची धूळ लागली, हा एक मला शुभशकुनच झाला, असें मी समजतों." असें म्हणून टोपलींतून एक मोठें पिवळेंधमक लिंबू व एक सुपक्क असें लहानसें पपनस घेऊन तीं त्यानें मनोहरपंतांपुढें ठेवलीं व पुनः हात जोडून तो उभा राहिला.

हें पाहून डोळे मिटून मनोहरपंत मनांत म्हणाले "प्रभो दीनदयाघना ! तुझ्या पायांचा आश्रय घेतल्यावर मनुष्याला कसलीच चिंता करावी लागत नाहीं, हें मला ठाऊकच आहे. तुझ्या पायांवरची निष्ठा माझ्या हृदयांत अचल राहो, असा दयामया ! तुझा मला आशीर्वाद असूं दे."

मनोहरपंतांनीं डोळे उघडतांच तो इसम विनयानें ह्मणाला "या बागेंतलीं फळें विकून मला दोन पैसे फायदा होऊं दे—असा मला आपला आशीर्वाद असावा बुवाजी !"

मनोहरपंत ह्मणाले "तुला भक्तिलाभ होवो, भगवंताच्या चरणांकडे सदासर्वदा तुझें मन लागो, असा मी तुला आशीर्वाद देतों."

पैशांच्या लाभाचा आशीर्वाद न मिळाल्यामुळें त्या इसमाला उद्वेग वाटूं लागला. "तर मग येतों मी," असें ह्मणून पुनः प्रणाम करून तो तेथून निघून गेला. मनोहरपंत पुनरपि आपल्या गीतापाठांत निमग्न झाले.

अर्धातास गीतेचें पठन झाल्यावर लिंबू झोळींत टाकून मनोहरपंतांनीं पपनस खाल्लें. नंतर तलावाच्या पायऱ्या उतरून हाततोंड धुऊन ते दोन-चार ओंजळी पाणी प्याले, व वर येऊन पुनः रस्ता चालूं लागले.

ज्या वेळीं मनोहरपंत रांजणगांवला पोहोंचले, त्या वेळीं मध्यान्ह-काल झाला होता. गांवाच्या एका सीमेवर बाजार बसला होता. उन्हाच्या तापांत चारहि दिशा रणरणत होत्या. मनोहरपंतांचें अंग घामानें चिकचिकून गेलें होतें. कोठें तरी बसून थोडी विश्रांति घेऊन पुनः एकदां स्नान करावें, असें त्यांनां वाटूं लागलें. बाजारापासून जवळच एक स्वच्छ तलाव दिसत होता.

विश्रांति घेण्याकरितां ह्मणून मनोहरपंत थोड्या अंतरावर असलेल्या एका वडाच्या झाडाकडे निघाले. तेथें जाऊन पहातात, तों झाडाखालीं जटाजूटधारी, भस्मानें शरीर माखलेला असा एक बैरागी बसला असून त्याच्या भोंवतीं स्त्रीपुरुषांचा मोठा घोळका जमला आहे ! एक स्त्री त्याच्या-जवळ बसून त्याला आपला हात दाखवीत आहे. वैराग्यासमोर एक भगवें वस्त्र पसरलें असून त्यावर पावल्या, चवल्या, पैसे, पै वगैरे पडल्या आहेत.

कुतूहलानें व जिज्ञासेनें प्रेरित होऊन मनोहरपंत एक मिनिटभर तेथें उभे राहिले. त्यांच्याकडे त्या बुवाचें लक्ष्य जातांच क्रोध, विरक्ति आणि तिरस्कार यांनीं पूर्ण अशा दृष्टीनें लोकांच्याकडे एकसारखा पाहूं लागला.

त्या दृष्टीचा अर्थ काय, हें समजून मनांत हंसून मनोहरपंत तेथून निघून गेले.

तलावाच्या तीरावर जाऊन मनोहरपंत पहातात, तों दोनतीन लोकच काय ते तेथल्या घाटावर स्नान करीत आहेत, असें त्यांच्या दृष्टीला पडलें. पायऱ्यांवर झोळी वगैरे ठेवून पुनः ती छाटी नेसून मनोहरपंत पाण्यांत उतरले, व नीट अंग चोळून, वस्त्रपरिवर्तन करून तीरावरच्या एका स्वच्छ वृक्षतलाशीं गेले. त्या वृक्षाच्या दोन शाखांनां भिजलेली छाटी बांधून मृगचर्म पसरून ते त्यावर बसले व त्यांनीं पुनः आपला गीतापाठ सुरू केला.

परंतु कांहीं केल्या आतां गीतेकडे मनोहरपंतांचें लक्ष्यच लागेना! कांहीं वेळ मनावर जुलूम करून पांचदहा श्लोक ते वाचतात, तों त्यांच्या मनानें एकदम उलट खाल्ली. त्यांचें मन एकदम त्यांच्या पोटाकडे वेधून गेलें. या वेळीं मनोहरपंतांनां अतोनात भूक लागली होती. आज अगदीं उषः-कालपासून त्यांनां चालण्याचे परिश्रम झाले होते—एका लहानशा पपनसा-खेरीज त्यांच्या पोटांत कांहींहि गेलें नव्हतें. मग भुकेचा तरी अपराध काय होता? तरीहि मनांतल्या मनांत हंसून मनोहरपंत ह्मणाले " साधु-बैरागी माणूस तूं! सारा दिवस असें खाईन खाईन करून रे कसें चालणार तुझें?" असें ह्मणून पुनः त्यांनीं गीतापाठाकडे मन लावलें.

परंतु भुकेचा सपाटा विलक्षण आहे! ती गीता मानीत नाहीं, उप-निषदांनां भीक घालीत नाहीं, वेदान्त—दर्शनांनांहि ती धाब्यावर बसवते! गीतापाठावर कांहीं केल्या मनोहरपंतांचें मन लागेना. तेव्हां त्यांनीं पुस्तक बंद केलें व झोळींतून लिंबू आणि सुरी बाहेर काढली. त्या वेळीं तें लिंबू ह्मणजे मनोहरपंतांनां स्वर्गांतील अमृतच लागलें. आहार आटो-पल्यावर तलावांतून हाततोंड धुऊन येऊन मनोहरपंत आतां योगवासिष्ठ उघडून बसले.

याप्रमाणें कांहीं वेळ गेल्यानंतर झोंपेचा अंमल मनोहरपंतांच्या डोळ्यां-वर बसूं लागून ते अगदीं मिटूंच लागले. गेली रात्र त्यांनां बहुतेक

अगदीं जागूनच काढावी लागली, असें ह्मटलें तरीहि चालेल. नंतर या अशा उन्हांत झोळीचें ओझें अंगावर घेऊन सहा कोस रस्ता ते चालून आले होते. मनोहरपंतांना झोपेनें अगदीं घेरलेंच. तेव्हां पुस्तक बंद करून, झोळी उशाला घेऊन, अंगावर कांबळी पसरून, त्या मृगचर्मावरच हातपाय आंखडून ते पडले. हां हां ह्मणतां त्यांनां झोंप लागली.

मनोहरपंत झोंपेंतून जागृत झाले, त्या वेळीं सूर्य अस्ताला चालला होता. वाळत घातलेल्या छाटीची एका डहाळीवरची गांठ सुटून ती खालीं मातींत लोळत होती. चटकन् उठून, ती दुसऱ्या डहाळीवरून काढून त्यांनीं ती आपल्या पाठीवरून छातीपर्यंत उत्तरीयासारखी पांघरली. नंतर खालीं बसून ते विचार करूं लागले.

दिवस सरून थंडीची रात्र समोर आ पसरून उभी होती. या वृक्षतलाशीं आपण किती वेळ बसून रहाणार? रात्रीपुरता आश्रय कोठें तरी पाहिलाच पाहिजे. भूकहि भयंकर लागली होती. तरीहि मनोहरपंत आळसानें कांहीं वेळ तेथेंच बसून राहिले.

सूर्य अस्ताला गेला होता. मनोहरपंत उठून ज्या ठिकाणीं बाजार बसला होता, त्या दिशेकडे जाऊं लागले. त्या ठिकाणीं कोठें तरी आपणाला खात्रीनें आश्रय मिळेल, अशी त्यांची कल्पना होती.

त्या वटवृक्षाजवळ मनोहरपंत येऊन पहातात, तों तो बैरागी अजूनहि तेथें बसला होता. त्याच्याजवळ आतां मात्र कोणी नव्हतें. बाजारहि बहुतेक आतां मोडत आला होता. मनोहरपंतांनां पहातांच तो बैरागी त्यांनां हंसून ह्मणाला "ये दोस्त, ये–बस." असें ह्मणून त्यानें जवळची जागा दाखविली. तेथें जाऊन मृगचर्म पसरून मनोहरपंत बसले.

बैराग्यानें विचारलें "कुठें होतास तूं इतका वेळ ?"

मनोहरपंतांनीं अंगुलिनिर्देश करून तें ठिकाण दाखविलें.

"कसें काय झालें एकंदर, सांग बघूं ?"

त्याच्या ह्मणण्याचा अर्थ न कळल्यामुळें मनोहरपंतांनीं विचारलें "कसलें काय झालें ?"

बैरागी हंसून ह्मणाला " अरे, प्रामिबिमी ! रोजगार ! आज कसा काय झाला रोजगार तुझा ? "

मनोहरपंत हंसून ह्मणाले " बरोबर नाहीं झाला एकंदरींत ! "

तोंड वाईट करून बैरागी ह्मणाला " माझाहि रोजगार तसा चांगलासा नाहीं झाला आज. इथले लोक भारीच बुवा दरिद्री अन् कृपण ! बेट्यांच्या हातून पैसा नाहींच सुटायचा. एका सटवीला मूल व्हायचें औषध दिलें, तर तिनें सारे आठ आण्यांचे पैसे दिलेन् ! बाकी सान्यांनीं हात दाखवून, हजार प्रश्न विचारून, दोनदोन चारचार पैसेच दिले. तूं नाहीं का कुणाला कसलें औषधबिवषध दिलेंस ? "

मनोहरपंत हंसून ह्मणाले " मला कसलेंच औषध ठाऊक नाहीं ! "

" हात पाहिलेस ? "

" हातहि नाहीं मला बघतां येत. "

" तर मग काय येतें ? फक्त गांजाची राखच तेवढी करतां येते वाटतें ! "

मनोहरपंत स्मितपूर्वक ह्मणाले " ती तरी कुठें येतें आहे ? "

मनोहरपंतांच्या या उत्तरानें बुवाला अतोनातच आश्चर्य वाटल्यासारखें दिसलें. भगवीं वस्त्रें परिधान करून गांजा न पिणें ह्मणजे जगांतलें एक मोठें आश्चर्यच होय, असें त्याला वाटत होतें. तो मनोहरपंतांनां ह्मणाला " काय, अजूनहि नाहीं तूं गांजा ओढायला शिकलास ! नवीनच झाला आहेस वाटतें बैरागी ? हें मी तुझा चेहरा पाहतांच समजलों. मी तुला आपला स्पष्ट सांगतों दोस्त-तूं अगदीं अडाणीराम आहेस ! तुझ्या माथ्यावर जटा कुठें आहेत ? नुसता आपला भगवा पोषाक केला अन् झोळी घेतली, ह्मणजे झाला का बैरागी ? अंगावर सपाटून राख लावली पाहिजे; माथ्यावर या एकएक जटा हव्यात; घडीघडीला गांजा ओढला पाहिजे; डोळे लालबुंद असले पाहिजेत. हीं सारीं लक्षणें बघून तर लोकांची भक्ति बसते आपणांवर. मी जेव्हां प्रथमच बैरागी झालों, तेव्हां मुंबईच्या कोटांतल्या एका केंसाच्या दुकानांतून साडेतीन रुपये देऊन या अशा

लट्ठलट्ठ जटांचा एक टोप विकत आणून माथ्यावर चढवला. अरे, उगीचच का कुठें बैरागी होतां येतें दोस्त ?" असें ह्मणून त्यानें गांजा काढून तो मळावयाला सुरुवात केली. गांजा तयार करून, तो चिलमींत घालून बैराग्यानें विचारलें "किती दिवस झाले बैरागी होऊन ?"

"फार दिवस नाहींत."

या बाजूला त्या बाजूला पाहून, स्वर खालावून, मनोहरपंतांच्या कानाशीं तोंड नेऊन बुवानें विचारलें "अरे, कोणत्या गुन्ह्याबद्दल ?"

अर्थ न समजल्यामुळें मनोहरपंतांनीं विचारलें "काय ह्मटलेंत ?"

बैरागी हंसून म्हणाला "अरे, ढोंग कशाला उगीच ? अगदीं माहितीच नाहीं वाटतें ? अगदीं शुद्ध गरीब माणूस ! बोल–खून, चोरी, दरोडा, का खोट्या कागदपत्रांचा मोकद्दमा ? कशाबद्दल झाली होती शिक्षा तुला ?"

मनोहरपंत गंभीरपणें म्हणाले "मला कशाबद्दलहि शिक्षा नाहीं झालेली !"

बैरागी मस्तक हलवून हंसत म्हणाला "ओह्हो ! दांत पाहूं–तुझें वय किती तें ? उगीच तूं झालास बैरागी ! मोठा देवभक्तच पडलास कीं नाहीं !" असें म्हणून त्यानें चिलमीवर विस्तव ठेवला.

मनोहरपंत उगीच राहिले. गांजाचे दोनचार सडकून दम मारून बैरागी म्हणाला "खरें सांग ना ? माझ्यापासून उगीच चोरून ठेवतोस कशाला ? मी कांहीं डिटेक्टिव नाहीं. कोण साला खोटें बोलतो आहे ? अरे, तुझीच शपथ दोस्त !"

परंतु तरीहि आपण एकाद्या गुन्ह्यामुळें तुरुंगांत पडलों होतों, असें कांहीं मनोहरपंत कबूल करीनात !

बैराग्यानें आणखींहि चारदोन दम मारले व चिलीम खालीं ठेवून तो ह्मणाला "तूं सांगितलेंस असें, ह्मणून त्याच्यावर माझा विश्वास बसणार आहे थोडाच ! इतक्या लोकांचे हात बघून मी सांगतों–कांहीं खोटीं असतात, कांहीं खरी नाहींहि असत. पण दोस्त ! तुझा हात पाहतांच मी तुला सांगतों कीं, तूं चोरांच्या खटल्यांतून फरारी झालेला

आरोपी आहेस! या गांजाच्या माथ्यावर निखारा जळतो आहे, हा साक्षात् ब्रह्म आहे. अच्छा, ठेव रे याच्यावर हात, अन् सांग तूं फरारी आरोपी नाहींस ह्मणून!"

मनोहरपंतांनीं हेंहि दिव्य करून दाखविण्याचें नाकारलें. शेवटीं, गांजाची चिलीम त्यांच्यापुढें करून बैरागी ह्मणाला "पितोस ?"

"नाहीं."

तेव्हां त्यानें गांजाची पुरी रांगोळी करून ह्मटलें "ऊठ, चल—"

"कुठें ?"

"देवळांत. इथें देऊळ आहे, हें नाहीं वाटतें ठाऊक तुला ?"

"नाहीं."

"या बाजूला तूं पहिल्यानेंच आला आहेस कीं नाहीं! गांवांत एक मुरलीधराचें मंदिर आहे. रोज संध्याकाळीं जिलबीचा भोग होतो देवाला. साधु, बैरागी, संन्यासी आले, तर त्यांनां प्रसाद मिळतो. आठ खा-दहा खा पंधरा खा, जितक्या हव्या तितक्या बेश गरमागरम ताज्या जिलब्या. तुपानें चबचब करताहेत अशा! आहा—मजेदार—बच्च्या मजेदार—जिलब्या आज रात्रीं तिथेंच रहाणार आहें मी. साधुबैराग्यांसाठीं रहायला चांगली धर्मशाळाहि आहे. चल—तर ये मजबरोबर." असें ह्मणून तो उठला.

या ढोंगी बैराग्याच्या संगतीचा मनोहरपंतांनां फारसा लोभ वाटत होता, असें नाहीं. परंतु आहार आणि आश्रय यांसाठीं त्याच्या संगतीचा स्वीकार करणें त्यांनां भागच पडलें. दोघेजण हळुहळू मुरलीधराच्या त्या देवळाकडे निघाले.

---

## प्रकरण चवेचाळिसावें.

## साधुसमागमाचा अधिक मासला!

रस्त्यानें जात असतां मनोहरपंतांनीं बैराग्याला विचारलें " बुवाजी, तुमचें नांव काय ?"

" माझें नांव क्षेमानंद. जेव्हां मी गृहस्थाश्रमांत होतों, तेव्हां अर्थात्च माझें दुसरें नांव होतें. तुझें काय नांव दोस्त ?"

" मला अजून कांहींच नांव मिळालेलें नाहीं. गृहस्थाश्रमांतलेंच नांव अजून माझें कायम आहे."

" गृहस्थाश्रमांतलें नांव सांगूं नये–कुणालाहि सांगूं नये. पोलिसला जर तें समजलें, तर आपल्या डायरींत तें लिहून घेऊन ते त्याचा शोध करतील. पण मला हळूच सांगितलेंस, तरी कांहीं हरकत नाहीं दोस्त! मी कांहीं तुला धरून नाहीं देत." असें ह्मणून बैरागी मोठमोठ्यानें हंसूं लागला.

मनोहरपंत यावर कांहींच बोलले नाहींत.

मनोहरपंतांनां गप्प राहिलेले पाहून बैरागी ह्मणाला " हें पहा दोस्त, एका गोष्टीसंबंधानें मी तुला अगोदरच सावध करून ठेवतों. देवळांत गेल्यावर तुला मोठा भाविकपणाचा अन् गंभीरपणाचा आविर्भाव आणला पाहिजे हो! तोंडावर असा भाव दाखव, कीं, जणूं आपलें सदासर्वदा परमार्थविषयकच चिंतन चालू असतें. सोनेंरुपें, जिलबीलाडू, इत्यादि पृथ्वीवरील कोणत्याहि पदार्थाकडे आपण दृष्टिपातहि करीत नाहीं, असें दाखवावें. आह्मी जी कांहीं थट्टामस्करी, फाजिलपणा, चावटपणा करतों, तो गुप्तपणें आपापसांत बरें! लोकांच्या समोर अन् विशेषतः असल्या अन्नछत्रासारख्या ठिकाणीं आपण एकदम गंभीर विश्वंभरमूर्ति बनायचें, समजलास ना? अरे दोस्त–तूं एक काम कर ना गड्या! तूं आपला माझा चेलाच हो कसा! एकदोन चेलेंबिले असल्याखेरीज कांहीं साधुसंन्याशांची इज्जत नाहीं वाढत! अन् मुख्य लाभ तुला होईल, तो हा, कीं, माझ्याबरोबर हिंडण्याफिरण्यानें नानाप्रकारच्या युक्त्या, आपल्या धंद्याच्या हातचलाख्या तुला मजकडून सहज रीतीनें कळतील, अन् थोडेंसें तुला 'सायन्स–विज्ञान'हि शिकवीन मी!"

मनोहरपंतांनां बुवाच्या तोंडचे हे शब्द ऐकून भारी आश्चर्य वाटलें. त्यांनीं विचारलें "तुह्मी विज्ञान शिकलां आहां वाटतें?"

"अरे, शिकलों आहें तर काय झालें! आजकालच्या अर्धवट शिकलेल्या लोकांत–विशेषतः शहरांतल्या लोकांत या 'विज्ञाना'ला भारी किंमत

आहे! विज्ञानाचे दोनचार शब्द जर बोलतांबोलतां आपणाला फुटाण्याप्रमाणें उडवतां आले, तर आपला जो जयजयकार होतो, तो कांहीं विचारूं नको! वकील, मुन्सफ, डाक्टर असलीं बडींबडीं धेंडेंहि आपणाला गुरु करून आपला उपदेश घेतात! हें प्रत्यक्ष मला पुष्कळ ठिकाणीं दिसत असल्यामुळें हें 'विज्ञान' थोडेंबहुत तरी हस्तगत करून घ्यावें, असा पुष्कळ दिवस माझा प्रयत्न चालला होता. मी रीतसर लिहायवाचायला शिकलेला आहें. बैरागी म्हणून मी कांहीं तसा मूर्ख टोणपा अक्षरशत्रु नाहीं. मी इंग्रजी पांचवी यत्ता 'फेल' पर्यंत शिकलों आहें ना! जर एकादें मराठींतलें विज्ञानाचें पुस्तक आपणाला मिळालें, तर आपणाला तें खास समजेल अशी मला घमेंड होती, अन् अशी संधिहि मला लवकरच मिळाली. एकदां एका मोठ्या गृहस्थाकडे भीक मागायला मी गेलों होतों. बाहेर दिवाणखान्यांत जाऊन पहातों, तों तिथें कोणीच नव्हतें. शेजारच्या खोलींत घरची विद्यार्थिमंडळी लिहायवाचायला बसे, तीहि तेथें कोणी नव्हती. तेथल्या टेबलावर कांहीं पुस्तकें मात्र अस्ताव्यस्त रीतीनें पडलीं होतीं. त्यांत एक 'कठिण शास्त्रांतल्या सोप्या गोष्टी' नांवाचें मराठी पुस्तक तेथें पडलेलें माझ्या दृष्टीला पडलें. तें पहातांच काय विचारतोस दोस्त? हळूच उचलून मीं दिलें तें झोळींत टाकून! अन् धार्मिक बगळ्याप्रमाणें हळुहळू पावलें टाकीत एकदम तेथून निघून दुसऱ्या घरचा पाहुणा बनलों! तें पुस्तक वाचूनवाचून विज्ञान मीं पूर्णपणें हस्तगत करून घेतलें. पुस्तकाच्या ज्या पानावर त्या मुलाचें नांव लिहिलें होतें, तें पान मीं दिलें पहिल्यानेंच टरकावून! मधुनमधून अजूनहि तें मी वाचतों. माझा चेला बनून जर तूं माझी खूब सेवाशुश्रूषा केलीस, अन् पुस्तक घेऊन पोबारा नाहीं केलास, तर तें पुस्तक मी तुला वाचायला देईन. पण काय हो चेलेसाहेब, आपणाला लिहितांवाचतां तरी येतें का? कोठपर्यंत आपण शिकलां आहां?"

मनोहरपंत खिन्नपणें हंसून म्हणाले "कांहीं फारसें नाहीं."

" अस्सें-भिऊन या बाजूकडूनहि शंखध्वनिच आहे तर मग तुझा ? तरी पण भिऊं नकोस कांहीं तूं-मी तोंडानेंच सांगून तें तुला शिकवीन सारें. हो, बरोबरच आहे. सर्वच बैरागी काय पांचवी यत्ता 'फेल' पर्यंत शिकलेले असतात ? तूंच सांग. हें ऐकून कुणाला खरें तरी वाटेल का ? आजकालच्या बाजारांत पांचवी यत्ता 'फेल' असा बैरागी एक तरी सांपडेल का ? दोस्त, माझा चेला होऊन हें ज्ञान संपादन करून घे. अशी संधि फिरून तुला नाहीं कधीं येणार."

त्या उभयतांचें संभाषण सुरू असतां ते मुरलीधराच्या देवळाजवळ येऊन पोहोंचले. हें देवालय शिंदेसरकाराच्या कुळांतील एका दानशील श्रीमंत राणीनें बांधलें असून तेथल्या सदावर्तासाठीं एक मोठी थोरली रक्कम तिनें निराळी काढून ठेवली होती. देवळाचें पटांगण मोठें असून त्यांत मुख्य देवळाखेरीज धर्मशाळा वगैरे इमारती पांचसात होत्या. देऊळ टुमदार असून त्याला लागूनच अतिथिशाला ऊर्फ सदावर्त होतें.

मनोहरपंतांनीं तेथें येऊन पाहिलें, अतिथिशालेच्या पडवींत तीन प्रौढ वयाचे बैरागी बसले होते. त्यांपैकीं एक चांगला 'धष्टं पुष्टं भवेद्दादा' वर्गापैकीं गुंडगोल होता ! यांशिवाय एक छोटा बैरागी गांजा मळीत बसला होता व दुसरा एक तरुण वयाचा बैरागी हातीं बेलाच्या झाडाचें भलें थोरलें दंडुकें घेऊन एका पातेल्यांतली भांग घोंटीत होता.

मनोहरपंत व क्षमानंद यांनां पाहतांच ते धष्टपुष्ट बैरागीबुवा घन-गंभीर स्वरानें ह्मणाले "आरे, और दो मूरत साधु आया. उसमें और दो छटाक भांग डाल दे." असें ह्मणून उंच स्वरानें ते हांका मारूं लागले "पुजेरीजी-ओ पुजेरीजी, ओ बम्मनभाई-ओ बम्मनभाई!"

त्यांची ही हांक ऐकून एक कृष्णवर्ण, फाटक्या अंगाचे, खांद्यावर फडकें टाकलेले भटजी बाहेर येऊन ह्मणाले "काय ह्मणतां बुवाजी ?"

बुवाजी ह्मणाले "पुजेरीजी, और दो मूरत साधु आया. दो छटाक किस-मिस, दो छटाक सक्कर और आधाशेर दूध मांगा दो."

"ठीक आहे." असें ह्मणून 'पुजेरीजी' निघून गेले.

इतक्यांत मनोहरपंत व क्षेमानंद तेथें येऊन उभे राहिले. बैरागीबुवा त्यांनां ह्मणाले " बैठो—"

ते दोघेजण बसल्यावर बुवाजी मनोहरपंतांचें आपादमस्तक निरीक्षण करूं लागले. शेवटीं त्यांनीं त्यांनां विचारलें " तुझने नया भेख् लिया? "

मनोहरपंतांचा सोबती ह्मणाला " एकबार नया. "

" तेरेहि चेला है ? "

क्षेमानंद मनोहरपंतांच्या तोंडाकडे पाहून ह्मणाला "हां–ना–लेकिन अबतक चेला नहीं किया. लेकिन् हमारा चेला होनेके वास्ते उसका बहुत इरादा है. "

बुवाजी संतोषानें मान डोलवून ह्मणाले "बहुत अच्छा–बहुत अच्छा–ये देख हमारा दो दो चेला. एक चेला भांग पिशे, और एक चेला गांजा चढाय ! "

आपल्या चेल्यांची गुरुवर्य याप्रमाणें माहिती करून देत आहेत, तों त्यांच्या बाल चेल्यानें गांजाची चिलीम गुरुजींच्या हातीं आणून दिली. तिच्यावर विस्तव ठेवून बुवाजींनीं पांचसात जोराचे दम मारल्यावर ती त्यांनीं क्षेमानंदाच्या हातीं दिली. क्षेमानंदानें 'प्रसाद पावून' दुसऱ्या एका बैराग्याच्या हातीं दिली. त्यानें दोन दम मारून मनोहरपंतांनां देण्याकरतां ह्मणून ती त्यांच्यापुढें केली.

इतक्यांत बुवाजींनीं विचारलें " क्यांरे ? तूंभी गांजा पीता है ? "

मनोहरपंत जोरानें मान हलवून ह्मणाले " नहीं—"

संतोषप्रदर्शक स्वरानें बुवाजी ह्मणाले " बहुत अच्छा–बहुत अच्छा ! मत् पी–गांजा मत् पी–तूं अभी बच्चा है. गांजा पियेगा तो पागल हो जायगा–मर जायगा! भांग पी–गांजा मत् पी. भांग अच्छा है. '**भांग पिये, मौज करे, बना रहे अबधूत**'–ये कबीत्त है. जब तेरा चलीस बरसका उमर हो,–तब गांजा पी–अभी भांग पी—"

गांजाच्या चिलमीचीं क्रमाक्रमानें वयस्क बैरागी मंडळींत आवर्तनें होऊं लागलीं. रात्र अधिकाधिक होत चालली.

इकडे दुसऱ्या बाजूला एका मोठ्या पातेल्यांत यथेष्ट साखर व दूध यांत किसमिस, बदाम वगैरे मिश्र केलेली व सपाटून घोटलेली भांग तयार झाली होती. देवळाचे व्यवस्थापक 'पुजेरीजी' यांनीं अगदीं स्वच्छ धुऊन काढलेले मातीचे नवीन वाडगे आणून ते एकेका बैराग्याच्या हातीं दिले. त्या वाडग्यांतून सर्वांचा भांगपानसमारंभ सुरू झाला.

बुवाजींनीं भांगेचे दोन वाडगे झोंकले, तेव्हां त्यांनां कोठें इकडेतिकडे पहावयाची आठवण झाली. त्यांची दृष्टि सहज मनोहरपंतांकडे गेली, तों ते भांग पीत नाहींत, असें त्यांनां आढळून आलें. हा विलक्षण-बैराग्यांनां अगदींच न शोभणारा प्रकार पाहून त्यांनां भारी आश्चर्य वाटून ते ह्मणाले "क्यारे! तू भांगभी नहीं पीता है?"

मनोहरपंत ह्मणाले "मी भांग कधींच नाहीं घेत."

सर्व बैरागी आश्चर्यानें ओरडले "क्या-भांग नहीं पीता है?"

बुवाजी ह्मणाले "भांग नहीं पीता है? तब शुन बेटा, एक कबीत्त शुन-

**"जिसनें इस दुनियामें आ-कर, एक दिनभी पिये न भांग उसने, सच पुछो तो, क्या देखा जाहानका आरंग?"**

असें ह्मणून बुवाजी मनोहरपंतांकडे स्मितपूर्वक पाहूं लागले.

मनोहरपंत कांहींच बोलत नाहींत, असें पाहून बुवाजी पुढें ह्मणाले "समझा? नहीं समझा? जिसनें इस दुनियामें आ-कर, नरका जलम् लेकर, एक दिनभी भांग नहीं पी लिया, उसने जाहानूका-जाहान कहते हें दुनियाको-यह फार्सी लब्ज है-उसनें दुनियाका रंगढंग क्या देखा? कुछ नहीं देखा!" असें ह्मणून बुवाजी होहो करून मोठमोठ्यानें हंसूं लागले.

बुवाजींचें हें वक्तृत्व ऐकून इतर बैरागीहि पोट धरून हंसतहंसत एकदम ह्मणाले "कुछ नहीं देखा!"

क्षेमानंद ओरडला "वहावा! बहुत अच्छा कबीत्त है!"

रात्र बरीच झाली. देवाच्या आरतीला आतां फारसा अवकाश राहिला नव्हता. एकएक दोनदोन अशी गांवची स्त्रीपुरुष मंडळी-विशेषतः जवळ रहाणारी मंडळी-आरतीसाठीं देवळांत जमूं लागली. त्यांत

सोन्याच्या फ्रेमचा चष्मा लावलेले, अंगांत सदरा आणि त्यावरून शाल घांघरलेले, तुंदिलतनु असे एक गांवांतले मोठ्या हुद्द्यावरचे पेन्शनर रावबहादुरहि आले होते. आरतीला थोडासा वेळ आहे, असें पाहून ते या बैरागीमंडळीच्या अड्ड्यावर येऊन बसले.

ह्या वेळपर्यंत बुवाजींनीं पांच वाडगे भांग उडविली होती. सहाव्या वाडग्यांतील सुमारें अर्धी भांग फस्त करून बाकीची त्यांनीं आपल्या बालचेल्याला बहाल केली. त्या बेट्यानें तर ती एका घोटाबरोबरच गिळं- कृत करून टाकली.

छाटीनें तोंड पुसून बुवाजी आपल्या चेल्याला ह्मणाले " अरे बच्चा, थोडा भजन सुना दे. भगतलोग, मायीलोग आये है–थोडा नाम सुना दे उसको ! "

त्यांच्या त्या बालचेल्यानें गुरुजींची आज्ञा मान्य करून लांकडाच्या दोन खंजनी झोळींतून बाहेर काढल्या. त्यांच्या लांकडाचा एक भाग काटलेला असून तेथें करताल लावलेले होते. बुवाजींनीं एक खंजनी हातीं घेऊन ते ती वाजवूं लागले. दुसरी खंजनी बडवीत व वेडेंवाकडें नाचत- नाचत तो बालक गाऊं लागला—

**" रामनाम लड्डू गोपालनाम घी,**
**हरिनाम मिछरी, घोर घोर पी ! "**

भजन अगदीं रंगांत आलें. वाजवतांवाजवतां बुवाजीहि रंगांत येऊन तालाच्या लईवर जोरजोरानें मस्तक हलवूं लागले.

कांहीं वेळानें गायन हलुहळू थांबलें. भजन ऐकण्यासाठीं बायकांचा मेळाहि बैराग्यांच्याजवळ बसला होता. त्यांतील जी बाई अगदीं प्रौढ होती, तिला उद्देशून बुवाजी ह्मणाले "हिंदी गीत तुम्हारे समजमें आता है मायी?"

" होय बुवाजी, समजतं थोडथोडं त्यांतलं !"

बुवाजी स्त्रीवृंदाला उद्देशून आपल्या भजनाचा अर्थ विशद करून सांगूं लागले " रामनाम लड्डू है ( येथें बुवाजींनीं हातांच्या बोटांनीं गोलाकार पदार्थ दाखविला )—लाडू लाडू तुह्मारा ! गोपालनाम तो घी

है–तूप तूप ! और हरिनाम ए तो मिछरी–जिसको तुम् खडीशक्कर कहते है—"

ती प्रौढ विधवा मध्येंच ह्मणाली " होय बुवाजी ! रामनाम लाडू-पेक्षांहि गोड आहे, हरीचं नांव खडीसाखरेपेक्षांहि मिष्ट आहे–अगदीं खरं आहे तुमचं ह्मणणं ! "

बुवाजी मान डोलवीत ह्मणाले "हां–माई, बहुत मिठ्ठा है–बहुत मिठ्ठा है! एक साधुनें बोला '**भरोसा देहका मत् राखो । अमि–रस नामका चाखो**!' समजमें आया माई? ये जो मनुषका देह है, इसका कुछ भरोसा नहीं है ! कुछभी नहीं. सब ये संसार खनभंगुर है–असार है–भरोसा कुछभी नहीं."

दुसरे बैरागीहि एकदम एकस्वरांत ओरडले " कुछभी नहीं–कुछभी नहीं ! "

" अगदीं बरोबर बुवाजी ! अगदीं बरोबर! या शरीराचा–संसाराचा भरंवसा कसला आला आहे? आतां आहेत–आतां नाहींत ! "

बुवाजी ह्मणाले "तुम् ठिक कहते है माई, ठिक कहते है ! इस्के वास्ते साधु कहते है–अमि–रस नामका चाखो ! हां, हरीका नाम जो है, येहि अमरत--उस पीनेसे जीवके मुक्ति होता है! प्रभूको चरनमें मिल जाता है!"

बुवाजींचें हें वक्तृत्व ऐकून सर्व श्रोते मान डोलवून एकमेकांशीं हळुहळू बोलूं लागले " वावा! बुवाजी खरोखर तत्त्वज्ञानी आहेत मोठे ! अशा साधूचें दर्शन कांहीं पुण्य पदरीं असल्याशिवाय घडत नाहीं." हा गुणानुवाद अर्थात्च बुवाजींनां चांगला ऐकूं येत होता.

रावबहादुर ह्मणाले "अगदीं बरोबर ह्मणालांत तुह्मी बुवासाहेब ! आमच्या मराठींत देखील '**संसाराचा क्षणिक बुडबुडा जाइल निमिषीं फुटून रे**,' असें एका कवीनें ह्मटलें आहे. खरेंच–हा संसार असार आहे–क्षणभंगुर आहे अगदीं !"

बुवाजींनीं आपले डोळे मिटले व भक्तिगद्गद स्वरानें मान डोलवून ते ह्मणूं लागले—

**"सोंयासा सोंयासा कृष्ण रट्र सोंयासा वृथा न खो,**
**न जाने ये सोंयासका एहि अन्त न हो !"**

इतक्यांत मंदिरांत आरतीची घंटा वाजूं लागली. श्रोते मंडळींनीं बुवाजींच्या पायांशीं कोणी दोन पैसे, चार पैसे, दोन आणे याप्रमाणें ठेवून त्यांनां नमस्कार केला. रावबहादुरांनीं तर ठणकन् एक रुपयाच फेंकून दिला. सर्व मंडळी बुवाजींच्या वक्तृत्वावर खूष होऊन आरतीला निघून गेली.

आरतीमंत्रपुष्प वगैरे आटोपल्यावर मंडळी घरोघर निघून गेली. 'पुजेरीजीं'नीं येऊन जमलेल्या बैराग्यांनां गरमागरम जिलब्या पानावरून दिल्या. मनोहरपंतांनींहि हात पुढें करून त्या घेतल्या. परंतु या वेळीं त्यांच्या हृदयाला काय यातना होत होत्या, त्या त्यांनांच ठाऊक ! त्यांचें मस्तक फाटून जाऊं लागलें ! हाय ! या भोंदू पाजी लोकांच्या मेळ्यांत मिसळून आपणहि जणूं काय त्यांच्यापैकींच एक बनून जिलब्या मटकावण्याकरतां येथें आलों, असा विचार मनांत येऊन मनोहरपंतांचें हृदय लज्जेनें आणि क्षोभानें क्षुब्ध होऊन गेलें; परंतु करणार काय ? कांहींच गत्यंतर नव्हतें. त्यांचे प्राण अगदीं व्याकुळ होऊन गेले होते— नाड्या जणूं काय आंवळून आल्या होत्या ! एका अंधाऱ्या कोंपऱ्यांत बसून डोळ्यांतले अश्रु कष्टानें आंवरून मनोहरपंतांनीं कसा तरी फराळ संपविला.

देवळाचा दरवाजा लागला. पुजारी वगैरे सारी मंडळी गेली. दुसरे जे दोघे बैरागी होते, त्यांनीं बुवाजींनां विचारलें "आज किती झाली भजनाची बिदागी ?"

तरुण चेला ह्मणाला 'दोन रुपये."

एक बैरागी ह्मणाला " त्यांपैकीं आमचा भाग आह्मांला मिळाला पाहिजे."

बुवाजी तीव्र स्वरानें ह्मणाले "कां ? भाग कशाबद्दल ?"

"मंडळींनीं जे पैसे टाकले, ते सर्व बैराग्यांनां. तुह्मला एकट्यालाच नाहीं दिले कांहीं !"

"असें ? तर मग माझ्या पायांशीं पैसे टाकून त्यांनीं मलाच नमस्कार कां केला ? कबित ह्मणालों मी–चेला नाचला अन् गायला माझा! मीं मंडळीला खुष केलें, ह्मणून त्यांनीं मला पैसे दिले. तुह्मीं काय केलेंत ह्मणून भाग मागतां ? लाज नाहीं वाटत वांटा मागायला?"

ते दोन्ही बैरागी ह्मणाले "आह्मीहि इथेंच बसलों होतों. आह्मी काय गवत कापायला आलों होतों ? बस्स–तें कांहीं नाहीं–आमचा वांटा आह्मांला मिळालाच पाहिजे !"

त्या तिघां बैराग्यांत जंगी भांडण सुरू झालें. तिघेहि शिव्यागाळीवर ताबडतोब आले. बुवाजींनीं तर अचकटविचकट अशा शिव्या दिल्या, कीं, तत्क्षणीं मनोहरपंतांनीं कानांत बोटेंच घातलीं. शेवटीं, भांग घोटण्याचा दंडुका हातीं घेऊन तो फिरवीत बुवाजी ह्मणाले "कोण वांटा घ्यायला येतो, तें बघूं दे मला. आज इथें आतां खून पाडतों–सोडीत नाहीं !"

त्यांचा तरुण चेलाहि खूब गुरगुरून गुरुजींना साहाय्य करूं लागला. शेवटीं, आपला कांहींच इलाज चालण्यासारखा नाहीं, असें पाहून ते दोघे बैरागी हट्टन गप्प राहिले.

बुवाजी आपल्या चेल्यांना घेऊन दुसऱ्याच एका खोलींत गेले. तेव्हां त्यांपैकीं एक बैरागी क्षेमानंदाला ह्मणाला " पाहिलेंत ? पाहिलेंत कसा न्याय आहे तो ? गरीब, अशक्त झालों ह्मणून असें फसवायचें आह्मांला ? असें नाडायचें ?"

त्याचा दुसरा सोबती ह्मणाला " कां ? यानें दोन कवितें ह्मटलीं अन् दोघे चेले बरोबर आणलेन् ह्मणून यानेंच सारे पैसे उपटावे ? आमचा हक्क तर गेलाच–पण आमचा वर, आणखी अपमान झाला मोठा ! "

मनोहरपंत मुकाट्यानें समोर चाललेला हा देखावा पहात होते. रागानें त्यांच्या शरीराची आगीआग होऊन गेली होती. या पाजी बदमाषांबरोबर सारी रात्र आपणाला काढावी लागणार, या विचारानेंच त्यांच्या हृदयाला अतोनात यातना होऊं लागल्या. शेवटीं मनाचा धिक्कार करून मनोहरपंत आपणाशीं ह्मणाले "नाहीं–बाहेर उघड्या मैदानांत झाडाखालीं

निजावें लागलें तरी पत्करलें, पण या नराधमांबरोबर येथें रात्र काढायला नको !" असा निश्चय करून आपली झोळी वगैरे सामान घेऊन मनोहरपंत देवळाच्या आवारांतून त्वरेनें निघून गेले !

---

## प्रकरण पंचेचाळिसावें.

## विधुराची आत्मकथा.

मुरलीधराच्या देवळाच्या आवारांतून मनोहरपंत जे त्वेषानें बाहेर पडले, ते मनाच्या उद्वेगाच्या तडफेबरोबर इकडेतिकडेहि न पहातां बऱ्याच अंतरापर्यंत झपाट्यानें गेले. आपण आतां कोणीकडे जात आहों, काय करीत आहों, याचें त्यांचें त्यांनांच भान नव्हतें. चांदणें अगदीं स्वच्छ पडलें होतें. गांवांतील रस्ते या वेळीं अगदीं शून्य होऊन गेले होते. चहूंकडे शांत निस्तब्ध होतें. फारशी जाग कोठेंहि दिसत नव्हती. गांवच्या घरांतील बहुतेक मंडळी झोंपी गेली होती. क्वचित् एकाददुसऱ्या घराच्या एकाद्या खोलीच्या खिडकींतून थोडासा उजेड बाहेर पडत असलेला दिसत असे.

मनोहरपंत याप्रमाणें सरासरी दहाबारा मिनिटेंपर्यंत वाटेल तिकडे चालले होते. इतक्या वेळांत त्यांच्या मनाचा संताप कांहींसा कमी होऊन ते आतां थोडेसे शांतहि झाले होते. आतां विचार करावयालाहि त्यांनां थोडासा अवकाश मिळाला.

मनोहरपंतांच्या मनांत पहिल्यानें विचार आला, तो हा, कीं, रात्रीच्या या अशा वेळीं जावयाचें कोठें ? एकाद्या माणसाच्या घरीं जर आश्रयाची याचना आपण केली, तर, कदाचित् आपणाला चोरसुद्धां कोणी समजतील ! आणि त्यांत विचित्र असें काय आहे ? साधु, बैरागी, संन्यासी, अशीं नांवें धारण करणारांच्या वर्तनक्रमाचा आपण प्रत्यक्ष अनुभव घेतला आहे. या मंडळीविषयीं गृहस्थांच्या मनांत तिळमात्र आदरबुद्धि नसली, ते चोर, पाजी बदमाष आहेत, असें समजण्यापर्यंत जर गृहस्थांच्या मनाची प्रवृत्ति झाली, तर त्यांत नवल असें काय आहे ?

जशा प्रकारच्या विचारलहरि मनःसागरावर उठत असतां मनोहरपंत पुढें पुढें चालले होते. मध्येंमध्यें एकाददुसरे 'ग्रामसिंहजी' त्यांनां पाहून गुरुगुरून मागें मागें जात असत. कांहीं अंतरावर गेल्यावर मनोहरपंतांनीं पाहिलें, तों समोर बरेंच मोकळें मैदान असून त्या ठिकाणीं लहानलहान गवतझांपांचे मांडव बांधलेले दिसत होते. जवळच एक मोठें वडाचें झाड होतें. हा सर्व देखावा पाहून, दुपारीं जेथें बाजार बसला होता, तेथेंच भटकतभटकत आपण पुनः आलों, अशी मनोहरपंतांची खात्री झाली.

मनोहरपंत तरीहि तसेच भटकत होते. बाजाराच्या दोन्ही बाजूंला बरींच कायमचीं दुकानें दिसत होतीं. दुकानदार दुकानांचीं दारें बंद करून झोंपी गेले होते—एकहि कोणी जागा नव्हता. मनोहरपंत तें ठिकाण सोडून मोठ्या रस्त्यानें पुढें निघाले.

परंतु ते फारसे दूर गेले नाहींत, तों रस्त्याच्या बाजूला उंच व्हरांडा असलेलें असें एक घर मनोहरपंतांच्या दृष्टीला पडलें. या व्हरांड्यांत सुखानें व सुरक्षितपणें आपणाला रात्र काढतां येईल, असा विचार त्यांच्या मनांत आला. तत्क्षणीं सडकेवरून उतरून मनोहरपंत त्या घराजवळ येऊन उभे राहिले. घराच्या मालकाची अनुमति घेऊन मग बाहेरच्या व्हरांड्यांत पडावें तें बरें, असा विचार त्यांच्या मनांत येऊन त्यांनीं उभे राहिल्या जागेवरूनच साधारण मोठ्यानें हांक मारली "आंत कोण आहे?"

परंतु मनोहरपंतांनां कांहींच उत्तर मिळालें नाहीं.

सूर किंचित् आणखीहि चढवून मनोहरपंतांनीं हांक मारली "इथें कोणी आहे का?"

तरीहि त्यांनां कांहीं उत्तर मिळालें नाहीं. घर रिकामें तर नसेल, अशी मनोहरपंतांच्या मनांत शंका आली. पायऱ्या चढून ते वर व्हरांड्यांत आले. चांदण्याचा जो थोडा प्रकाश होता, त्याच्या साहाय्यानें बाहेरच्या दरवाज्याला कुलूप लावलेलें आहे, असें त्यांनां आढळून आलें. तेव्हां मनोहरपंत व्हरांड्याच्या एका टोंकाला जाऊन पहातात, तों बाजूबाजूनें व्हरांडा गेला असून घराच्या चारहि बाजूंला तो आहे, असें

त्यांनां आढळून आलें. व्हरांड्यांतून पुढें होऊन ते हळुहळू घराच्या मागच्या भागाला आले, तों एका किंचित् उघड्या असलेल्या खिडकींतून दिव्याचा उज्ज्वल प्रकाश बाहेर येत आहे, असें त्यांनां आढळून आलें. मनोहरपंत दरवाज्याजवळ जाऊन पहातात, तों खोलींत जमिनीवर आसन पसरून त्यावर सुमारें तीसएक वर्षं वयाचा एक तरुण पुरुष डोळे मिटून हात जोडून बसून राहिला आहे, असें त्यांनां आढळून आलें. परमेश्वराच्या उपासनेंत हा तरुण गृहस्थ गढून गेला असावा, आतां त्याला हांका मारून त्याच्या या मनोवृत्तीचा भंग करणें उचित नाहीं, असें मनोहरपंतांनां वाटलें. एखाद्या चोराप्रमाणें ते तेथेंच उभे राहिले. नंतर कांहीं वेळानें खिडकीजवळून ते त्या खोलीच्या दाराशीं आले. दार आंतून बंद होतें. मनोहरपंत चालण्याच्या श्रमांनीं अगदीं गळून गेले होते. झोळी जमिनीवर पसरून, त्या गृहस्थाची उपासना आटोपेपर्यंत खालीं बसावें, असा त्यांनीं विचार केला. खालीं बसते वेळीं झोळी जमिनीवर पडून किंचित् शब्द झाला. त्याबरोबर आंतून त्या तरुणानें विचारलें " कोण आहे ? "

मनोहरपंत चटकन् उठून म्हणाले "मी एक बैरागी आहें."

क्षणभरांत बसल्या जागेवरून उठून येऊन त्या गृहस्थानें दार उघडलें व तो बाहेर आला. हातांतील दिव्याच्या प्रकाशांत त्यानें मनोहरपंतांकडे एकवार निरखून पाहिलें. नंतर तो त्यांनां म्हणाला "आपण बैरागी? या–आंत या."

मनोहरपंत नम्रपणें म्हणाले "आंत यायची मला कांहीं आवश्यकता वाटत नाहीं. मीं आपणाला त्रास दिला, त्याबद्दल आपण मला क्षमा करा. आपल्या घराच्या या व्हरांड्यांत आजची रात्र पडावें, असा माझा विचार आहे. म्हणून आपली अनुमति घ्यायला मी आलों आहें."

तो तरुण गृहस्थ म्हणाला " निजायचें आहे आपणाला? मग बाहेर कां? बाहेर निजलांत तर थंडीनें आपले फार हाल होतील. आपण आंत येऊन खुशाल पडा."

मनोहरपंत ह्मणाले "नको-नको. आपली यत्किंचित्‌हि गैरसोय करावी, अशी माझी इच्छा नाहीं. व्हरांड्यांतच मी निजतों. माझे हाल नाहीं कांहीं व्हायचे."

"वा-वा! असें कुठें झालें आहे? मीं आंत निजणार, अन् आपण पडणार बाहेर थंडींत कुडकुडत? आपणामुळें माझी कांहींसुद्धां गैरसोय व्हायची नाहीं. खोली चांगली प्रशस्त आहे. या—"

मनोहरपंतांनीं आतां कांहीं आढेवेढे न घेतां ते त्या गृहस्थाच्या मागोमाग आंत गेले. खोली खरेंच चांगली प्रशस्त आहे, असें त्यांनां आढळून आलें. एका लांकडी खाटेवर बिछाना पसरला होता. बिछान्याजवळ एका बांकावर एक स्टीलट्रंक, तिच्याजवळ एक स्टोव्ह, ऍनामेलची किटली, कपबशी, एकदोन डबे असा चहाचा सरंजाम दिसत होता. खाटेच्या उशाशीं एका टेबलावर एक हरिकेन कंदिल जळत होता. जवळच कांहीं जाडींजाडीं पुस्तकेंहि ठेवलेलीं दिसत होतीं. खोलीच्या समोरच्या भिंतीवर खिळ्यांनां टांगलेले चारपांच नकाशे दिसत असून एका कोंपऱ्यांत चारपांच बांकें व एक चीर गेलेला काळा फळा उभा होता.

आंत येऊन तो गृहस्थ खाटेवर बसून जवळ बोट दाखवून मनोहरपंतांनां ह्मणाला "या-बसा असे."

मनोहरपंत बसले आणि खालीं पसरलेल्या आसनाकडे पाहून ह्मणाले "आपण उपासना करीत होतां, तींत व्यत्यय आणून मीं आपणाला त्रास मात्र दिला."

गृहस्थ खिन्नपणें हंसून ह्मणाला "हाः! माझी कसली आली आहे उपासना! संसारांत पडलेल्या गृहस्थ माणसाचें मन कधीं तरी स्थिर असतें का? वरून भगवंताचें किंचित् चिंतन करण्याचा प्रयत्न करावा, इतकीच काय ती आमची मजल. आपण इथें आलां, हें माझें भाग्यच मी समजतों."

कांहीं वेळ त्या उभयतांत इकडच्यातिकडच्या गोष्टी झाल्यानंतर, एकदम विमनस्कतेनें तो गृहस्थ ह्मणाला "बुवासाहेब, आपण जर अनुमति द्याल; तर एक प्रश्न आपणाला विचारावा, असें माझ्या मनांत आहे."

" विचारा-खुशाल विचारा."

भ्रुकुटींवर अंगुलि जोरानें फिरवीत तो गृहस्थ ह्मणाला " मनुष्य मृत्यु पावल्यानंतर आत्म्याच्या रूपानें ह्मणा, किंवा अन्य कांहीं रूपानें ह्मणा, त्याला कांहीं स्वतंत्र अस्तित्व असतें का ? "

मनोहरपंत ह्मणाले "हिंदुशास्त्रांवर जर विश्वास ठेवायचा असेल—"

गृहस्थ मध्येंच ह्मणाला "तें सर्व मला ठाऊक आहे-मीं वाचलें आहे. मी आपणाला तें नाहीं विचारीत. आपल्या स्वतःच्या मनाचा—शास्त्र-बिस्त्र राहूं द्या तूर्त एका बाजूला-आपल्या स्वतःच्या मनाचा स्वतंत्र असा विश्वास काय आहे, तें मला आपण सांगा."

मनोहरपंत ह्मणाले " माझ्या मनाचा असा ठाम विश्वास आहे, कीं, मनुष्य जरी मृत्यु पावला, तरी त्याला स्वतंत्र असें एक अस्तित्व आहे."

गृहस्थ सुमारें एक मिनिटभर स्तब्ध होता. नंतर तो ह्मणाला "अस्तित्व आहे. माझाहि विश्वास असाच आहे. बुवाजी, आणखीहि एक गोष्ट मी आपणाला विचारतों. मी ती अहंकारामुळें विचारतों आहें, असा आपण कृपा करून समज करून घेऊं नका. त्याप्रमाणेंच आपली परीक्षा करण्याकरितां किंवा आपणाला ठकवण्यासाठीं म्हणून ही गोष्ट आपणाला विचारीत नाहीं."

" खुशाल विचारा आपण—"

" कांहीं कारणामुळें माझ्या मनाला अतोनात दुःख झालें आहे. असो. हा मी कांहीं तरी भलतीकडेच वहावत चाललों-" असें ह्मणून एक दीर्घ निःश्वास टाकून तो गृहस्थ क्षणभर स्तब्ध बसला.

त्याच्या मनाला कसलें तरी अत्यंत तीव्र दुःख होत असावें, असें मनोहर-पंतांना वाटलें; परंतु त्याचें सांत्वन करण्याचा कांहीं मार्गच नसल्यामुळें ते अगदीं स्तब्ध बसून राहिले.

कांहीं वेळानें तो गृहस्थ बोलूं लागला " आपण ह्मणालांत, कीं, मृत्यूनंतरहि मनुष्याला स्वतंत्र अस्तित्व आहे, असा आपला दृढ विश्वास आहे. ठीक आहे. आपल्या या विश्वासाला आधार काय आहे ? कशावरून,

ह्मणजे कोणत्या प्रमाणांवरून आपली खात्री झाली आहे, कीं, मृत्यू-नंतरहि मनुष्याला स्वतंत्र अस्तित्व आहे ?"

मनोहरपंत क्षणभर विचार करून ह्मणाले "माझा हा विश्वास a priori पायावर स्थापन झालेला आहे."

बैरागीबुवांच्या तोंडीं इंग्रजी शब्द आणि त्यांतूनहि हे उच्च दर्जाचे शब्द ऐकून त्या गृहस्थाला भारीच आश्चर्य वाटलें. त्यानें विचारलें "आपणाला इंग्रजी येतें काय ?"

"होय."

"पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा आपण अभ्यास केला आहे ?"

"होय, केला आहे थोडाबहुत."

"वा: ! फारच चांगलें. तर मग आपली दोघांची विचारपद्धति जुळून येईल. बरें सांगा पुढें."

मनोहरपंत बोलूं लागले "माझा असा दृढ विश्वास आहे, कीं, प्रथमतः ईश्वर हा सृष्टिकर्ता आहे, अन् द्वितीयतः त्याचा सृष्टि निर्माण करण्याचा हेतु परम मंगलमय आहे. मनुष्याला परमेश्वरानें जें निर्माण केलें आहे, तें आपलें उगीच आपल्या चैनीसाठीं किंवा कांहीं तरी करायचें ह्मणून केलें नाहीं. क्रमाक्रमानें त्याला पूर्ण परिणति देण्यासाठींच होय. पायऱ्यांवर पायऱ्या तयार करून परमेश्वर मनुष्याला त्या पूर्ण परिणतीच्या स्थितीला खास पोंचवील. शाळेमध्यें ज्याप्रमाणें निरनिराळ्या इयत्ता असतात, त्याप्रमाणें मनुष्याचा एकएक जन्म ह्मणजे एकएक इयत्ता आहे, असें माझें मत आहे. एकाच जन्मांत मनुष्याला आपली कितीशी उन्नति करून घेतां येईल ? मृत्यूबरोबरच जर त्याचा सर्व कारभार आटोपला, तर मग परमेश्वराचा हा एकंदर कारभार अगदींच कांहींतरी उद्देशहीन पोरखेळाप्रमाणें ठरतो ! ह्मणूनच माझा असा दृढ विश्वास आहे, कीं, मृत्यू-नंतरहि मनुष्याला स्वतंत्र अस्तित्व खास आहे ! मग त्याला आपण आत्मा ह्मणा, किंवा दुसरें कांहींहि नांव द्या. तो आत्मा पुनः नवीनच मनुष्यदेह धारण करतो. मागच्या जन्मीं ज्या ठिकाणीं त्याचा शेवट झाला होता,

त्या ठिकाणींच या नवीन जन्मांत प्रारंभ करून आपल्या उन्नतिमार्गानें तो पुढें जाऊं लागतो."

गृहस्थ ह्मणाला "एके काळीं माझाहि आपणासारखाच विश्वास होता. अच्छा, माझ्या एका प्रश्नाचें आपण उत्तर द्या."

"काय?"

"झाडाला आत्मा आहे कीं नाहीं? झाड मेल्यानंतरहि त्याला स्वतंत्र अस्तित्व आहे कीं नाहीं? अन् तें 'स्वतंत्र अस्तित्व' पुनः नवीन झाड होऊन जन्म घेतें काय?"

मनोहरपंत ह्मणाले "मला नाहीं असें वाटत."

"तर मग वनस्पतिसृष्टि निर्माण करण्यांत परमेश्वर उद्देशहीन असा पोरखेळ खेळतो आहे ह्मणायचा?"

"असें कसें ह्मणतां येईल? झाड मरून जातें, परंतु त्याच्या फुलाच्या बीजांतून जे शेंकडों 'वंशज' जन्मग्रहण करतात, ते परमेश्वराचा हेतु सिद्ध करतातच!"

गृहस्थ स्मितपूर्वक ह्मणाला "अशाच रीतीनें मी जर ह्मणूं लागलों, कीं, पूर्ण परिणतीसाठींच मनुष्याला भगवंतानें निर्माण केलें आहे खरें; परंतु प्रत्येक माणसानें पूर्ण परिणतीला जावें, असा कांहीं त्याचा उद्देश नाहीं! पूर्ण परिणतीसाठीं त्यानें मानवजाति निर्माण केली आहे. वंशावलीच्या क्रमानें मानवजाति या पूर्ण परिणतीच्या दिशेकडे चालली आहे, अन् यानेंच परमेश्वराचा हेतु सफल होईल."

मनोहरपंत कांहीं वेळ विचार करून ह्मणाले "हां—तर्काची ही दिशा माझ्या मनांत कधींच आली नाहीं, हें मी प्रांजलपणें कबूल करतों. जरा मी विचार करतों याबद्दल. मृत्यूनंतर प्रत्येक मनुष्याला स्वतंत्र अस्तित्व आहे, ह्या आपल्या विश्वासाला आधार काय आहे, असें आपणाला विचारायला कांहीं हरकत आहे का?"

गृहस्थानें एक उसासा टाकून हळुहळू ह्मटलें "छेः! हरकत कसली? सांगतों मी सारें आपणाला. मी लहानपणीं खूब श्रद्धावंत होतों. या वयांत

सर्वच असे असतात. मी जेव्हां पहिल्यानें कॉलेजांत गेलों, तेव्हां, अजूनहि मला आठवतें आहे, आमच्या रेसिडेन्सींतला एक विद्यार्थी वादविवादांत ह्मणाला, कीं, गंगायमुनादि हिंदूंनीं पवित्र मानलेल्या नद्या इतर देशांतील अमेझॉनसारख्या नद्यांप्रमाणेंच आहेत–त्यांत विशेष पवित्रता अशी कांहीं नाहीं. त्या वेळीं सतत एक महिनापर्यंत मीं त्याची याबद्दल सारखी हेटाळणी चालविली होती. नंतर जेव्हां मी बी. ए. च्या वर्गांत गेलों, तेव्हां सायन्सचा अभ्यास करतांकरतां–विज्ञानाचें पर्यालोचन करीत असतां मला असें वाटूं लागलें, कीं, आमचे हे शंकर, विष्णु, अन् लक्ष्मी, दुर्गा या देवदेवता आमच्या ऋषिमुनींच्या कविकल्पना तर नाहींत? क्रमाक्रमानें या प्रश्नाचा जों जों मी छाननी करूं लागलों, तों तों माझा संशय अधिकाधिक वाढूं लागला. एके दिवशीं आमच्या रेसिडेन्सींत झाली एक पार्टी. त्या वेळीं माझ्या कांहीं थट्टेखोर मित्रांनीं सामान्य बर्फी ह्मणून फसवून मला भांगेची बर्फी खाऊं घातली. थोड्याच वेळांत त्या भांगेच्या नशेचा माझ्यावर परिणाम होऊन माझें मस्तक एकदम चम्‌चम् करूं लागलें. त्या रात्रीं भांगेच्या नशेंत, डोळे मिटल्यामिटल्याच मीं जे कांहीं चमत्कारिक चमत्कारिक अपूर्व देखावे पाहिले, ते कांहीं विचारूंच नका! दुसऱ्या दिवशीं नशेंतून शुद्धीवर आल्यावर मला असें वाटूं लागलें, कीं, हिंदुपुराणांतले जे तेतीस कोटि देव आहेत, ते केवळ ऋषिमुनींचीं स्वप्नेंच होत, यांत संशय नाहीं. एम्. ए. च्या वर्गांत हर्बर्ट स्पेन्सर वाचीत असतां मी तर घोर अज्ञेयवादी बनलों. एम्. ए.ची परीक्षा पास होऊन मी हेडमास्तरी करूं लागलों. जसजसें माझें वाचन वाढूं लागलें, तसतसा मी भयंकर संशयवादी बनत चाललों. अशा तऱ्हेनें कांहीं वर्षें गेलीं, अन् माझी—"

इतक्यांत आंतल्या एका खोलींतून ठणठण असे घड्याळाचे बारा ठोके पडले. ते ऐकून तो तरुण गृहस्थ अर्धमिनिटभर स्तब्ध राहून जरा विचारांत पडल्यासारखा झाला. नंतर पुनः मृदुतर स्वरानें तो बोलूं लागला "माझी प्रियपत्नी मृत्यु पावली. त्या शोकानें एकदम मी अगदीं पागलच

बनून गेल्याधारखा झालों! अशा स्थितींत हळुहळू सहा महिने गेले–तरीहि माझें मन स्थिर होईना. एके जागीं मला कोठेंच चैन पडेनासें झालें. सारखें इकडूनतिकडे हिंडत रहावें, असें मनाला वाटूं लागलें. तेव्हां इन्स्पेक्टरसाहेबांनां विनंति करून ही डेप्युटी इन्स्पेक्टरची जागा मीं मिळविली. तीन तालुक्यांत जितक्या शाळा आहेत, त्यांची तपासणी करीत मी सारखा भटकत असतों. ही इमारत इथल्या मायनर स्कूलची आहे. आज सकाळींच मी इथें आलों. उद्यां सकाळीं मी दुसरीकडे जाणार. छेः–सांगतांसांगतां मी फारच बहकत सुटलों. माझ्या पत्नीच्या मृत्यूनंतर मला असें वाटूं लागलें, कीं, माणूस मेलें, ह्मणजे त्याचें सर्वस्व नाहींसें होतें, असें कधींहि होणें शक्य नाहीं. तसें असेल, तर आह्मांला एकमेकांचें फिरून कधीं दर्शनहि होणें शक्य नाहीं–कधीं कोणत्या काळींहि शक्य नाहीं–पण हें सर्वथा असंभवनीय आहे. तिचें मला पुनः कधीं तरी दर्शन होईल, हें निश्चित आहे. त्या वेळीं मला असा विश्वास पटूं लागला, कीं, माझी पत्नी आत्मरूप होऊन कोठें तरी निश्चयपूर्वक आहे. माझा आत्मा ज्या वेळीं या देहाचा त्याग करील, त्या वेळीं पुनः आह्मां उभयतांचें मीलन होईल. परलोकावरचा माझा विश्वास परत आला. माझा संशयवादहि नाहींसा झाला. ईश्वरावरील विश्वासहि हृदयांत फिरून उदय पावला. ह्मणून अवकाश मिळाला, कीं, मी भगवंताला आळवतों, अन् त्याला ह्मणतों, कीं, 'हे प्रभो दयामय, ती माझी प्रिया कुठेंहि असो, तिला सुखांत ठेव; ती खुशाल, सुरक्षित असूं दे–ह्मणजे तुझ्या कृपेनें तिचें मला कधीं तरी दर्शन होईल !"

असें ह्मणून तो गृहस्थ उगा राहिला. विस्मयकरुणांनीं निस्तब्ध होऊन मनोहरपंत त्याची ही शोकाची कहाणी ऐकत होते. ज्या वेळीं हा प्रेमळ पति आपल्या मृत पत्नीकरतां प्रभूची अशी एकान्त प्रार्थना करीत होता, त्यावेळीं आपण येऊन त्याच्या प्रार्थनेंत व्यत्यय आणला, असें वाटून त्यांचा अनुताप तीव्रतर झाला.

कांहीं वेळानें तो गृहस्थ खाटेवरून उठला व कळशींतून एक फुलपात्र-भर पाणी ओतून तें प्याला, व आणखी एक फुलपात्रभर पाणी घेऊन तो

बाहेर गेला आणि त्यानें आपलें तोंड, डोळे वगैरे नीट धुऊन तो आंत परत आला. रुमालानें तोंड पुशीतपुशीत जरा स्थिर होऊन तो ह्मणाला "बुवासाहेब, मला अपराधाची क्षमा करा. आपला फराळ वगैरे झाला कीं नाहीं, त्याची चौकशीहि करायला मी विसरलों!"

मनोहरपंत स्मितपूर्वक ह्मणाले " आपण त्यासाठीं वाईट वाटून घेऊं नये. इथें येण्यापूर्वी सुमार एक तास अगोदर माझा फराळ झाला होता."

"आपण भारी दमलेले दिसतां. या खाटेवर आपण निजा आतां. मनांत कांहीं आशंका आणूं नका."

"मग आपण कुठें निजणार ?"

"बिछान्याखालची ती सतरंजी काढून भुईवर पसरून निजेन मी तिच्यावर!"

मनोहरपंत उठून ह्मणाले "छे छे छे! असें कांहीं करायची बिलकूल जरूरी नाहीं. मी निजतों भुईवर–माझी कांबळी आहे माझ्याबरोबर."

गृहस्थ ह्मणाला "नको–भुईवर निजून आपणाला भारी त्रास होईल. माझें ऐका–आपण खाटेवरच निजा."

मनोहरपंत ह्मणाले "छे छे, कांहीं देखील नाहीं त्रास व्हायचा. हवे तर यांपैकीं दोन बांक घेऊन ते जोडून त्यांवर कांबळी पसरून निजतों मी."

क्षणभर स्तब्ध राहून तो गृहस्थ ह्मणाला "आपण जरी बांकावर निजलांत, तरी मी भुईवरच निजणार. मी कधींहि खाटेबिटेवर निजत नाहीं. आपण जरी आज आलां नसतां, तरी भुईवरच सतरंजी पसरून मी निजलों असतों."

मनोहरपंत आश्चर्य वाटून ह्मणाले "कां बरें? आपण खाटेवर कां कधीं नाहीं निजत?"

गृहस्थ मृदुस्वरानें ह्मणाला "माझ्या प्रियपत्नीच्या देहाचे अणुपरमाणु या पृथ्वीशीं एकजीव झाले आहेत ना! ह्मणून मला नेहमीं भुईवरच झोंपणें भारी आवडतें."

आतां त्या गृहस्थाचा आग्रह मोडणें मनोहरपंतांनां शक्यच नव्हतें. बिछान्याखालची सतरंजी त्याला काढून देऊन ते खाटेवर निजले. रात्र सरण्याच्या सुमाराला मनोहरपंतांनां स्वप्न पडलें, कीं, कमलेनें येऊन आपला हात धरला आणि हंसतहंसत आपणाला ह्मटलें "चलावं मजबरोबर!"

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून डेप्युटी इन्स्पेक्टरसाहेबांच्या आग्रहाला मान देऊन मनोहरपंत त्यांच्याबरोबर बैलगाडींत बसून साताऱ्याकडे निघून गेले.

---

## प्रकरण शेचाळिसावें.

## अद्भुत कारवाई !

त्या दिवशीं सकाळीं प्रातर्विधि वगैरे आटोपून सखाराम कुडव आपल्या खोलींत खाटेवर बसून स्वच्छंदानें गुडगुडी ओढीत फुरुक्‌फुरुक्‌ करीत बसला होता. इतक्यांत त्याचा सतराअठरा वर्षांचा मोठा मुलगा गणू तेथें घाबऱ्याघाबऱ्या येऊन कंपित स्वरानें ह्मणाला "बाबा—बाबा—दरवाज्यावर पोलिसशिपाई आपल्या—"

सखारामाला हें ऐकून भारीच आश्चर्य वाटलें. तो ह्मणाला "काय ह्मणतोस ? शिपाई ? अन् आपल्या दरवाज्याशीं ? चल. कांहीं तरी सांगतोस ! आपल्या घरीं कशाला येणार आहेत पोलिस ?"

गणू ह्मणाला "तें कांहीं नाहीं मला ठाऊक बाबा ! मी आतां जात होतों बाहेर, तों आवाराच्या दाराशीं पोलिस. मला ते ह्मणाले 'आतां कुणी घरांतून बाहेर नाहीं पडायचें—हुकूम नाहीं !' "

इतक्यांत घरची कुणबीण 'बया धांवतच येऊन घाबरतघाबरत ह्मणाली "अग बया—बया!—अव, मागल्या दाराशीं शिपाई बसल्याती आपल्या!"

हें ऐकून सखाराम ताडकन् उठला व ह्मणाला "कां ? शिपाई कशाला आले आहेत ?"

बया म्हणाली " मी चाललें व्हतें पानी भराया हिरीवर, तों दाराशीं शिपाय उबा! मस्नी तो म्हनाला 'न्हाई जायचं घरांतनं भाईर कुनीबी! नाईकसाबांचा न्हाई हुकूम!'"

सखाराम उठून दोन्ही दरवाज्यांकडे जाऊन आला, तों खरेंच! दोनहि दरवाज्यांशीं दोन काळ्या टोपीचे पोलिस शिपाई उभे आहेत. त्यांनां विचारतां ते सखारामाला म्हणाले " आतां नाईकसाब येत्याल. भाईर जायचा न्हाइ कुनालाबी हुकूम!"

सखारामानें विचारलें " कां, झालें आहे तरी काय?"

" आमास्नी न्हाई दक्कल! नाइकसाब येत्याल इकत्यामंदीं–त्यास्नींच इचारा की "

सखाराम मोठ्या फिकीरींत पडला. हलुहलू तो अंगणांत आला. इतक्यांत त्याची मुलगी रखमा तेथें धांवत येऊन त्याला सांगूं लागली "बाबा, गोठ्याची मागली भिंत पडली आहे ना? तिथं दिखील एक शिपाई उभा राहिला आहे!"

सखाराम लगेच तिकडे गेला व पहातो, तों रखमानें सांगितल्या-प्रमाणें गोठ्याच्या मागेंहि एक शिपाई उभा आहे खराच! बाहेर जाण्याचे सर्व रस्ते याप्रमाणें पोलिसनें अडवून टाकले होते.

हें प्रकरण आहे तरी काय, याचा बिचाऱ्या सखारामाला विचार करी–करूनहि पत्ता लागेना! हा विलक्षण प्रकार पाहून घरच्या सगळ्या मंडळींचीं धाबीं अगदीं दणाणून गेलीं! कांहीं तरी आपणावर अवर्णनीय घोर असें संकट येऊं पहात आहे, या दारुण शंकेनें सर्वांचीं तोंडें अगदीं काळवंडून गेलीं. कोणाचा कांहींच तर्क चालेना! बायकामंडळी तर मुकाट्यानें डोळ्यांतून अश्रु काढूं लागल्या!

इतक्यांत कांहीं वेळानें घोड्यावर स्वार होऊन मामासाहेबांची स्वारी तेथें येऊन पोहोंचलीहि! त्यांच्यामागून आणखी दोन शिपाई धांवतधांवत येत होते. त्यांपैकीं एकाच्या खांद्यावर एक लहानशी लांकडी पेटी होती. तींत कांहीं कागदपत्र, शाई, लेखण्या वगैरे मामासाहेबांची लेखनसामग्री होती.

मामासाहेब दाराशीं पोहोंचतांच तेथल्या शिपायानें त्यांनां आश्चर्यानें विचारलें " ह्ये काय मामासाब ? आपुनच आलांसा? नाइकसाब न्हाईंत का येत ? "

मामासाहेब त्याला हळूच ह्मणाले "ते नाहीं येत. मलाच जायला त्यांनीं सांगितलें आहे. हें पहा, मला इथें ' मामासाहेब ' ह्मणायचें नाहीं कुणीं ह्मणून तुह्मांला सांगितलें ना ? इथें मी खुद्द नाईकसाहेब आहें, समजलास ना सुभान्या ? सगळ्यांनां सांगून ठेव असें-" नंतर ते आपणांशींच हंसून ह्मणाले "नाईकसाहेबांपासून तों तहत या सुभान्यापर्यंत सर्वांचाच गैरसमज करून आपला लग्गा आपण साधणार ! सगळ्यांनांच फसवलें जर नाहीं माझ्या करामतीनें, तर मी ' मामा ' कसला ? "

मामासाहेबांच्या बरोबर आलेल्या शिपायांनीं तेथें पोहोंचतांच हांका-हांक करावयाला सुरुवात केली. सखारामानें बाहेर येऊन मामासाहेबांनां सलाम केला.

मामासाहेबांनीं विचारलें " काय तुझें नांव? "

सखारामानें नांव सांगितलें.

" हें घर तुझें काय ? "

" जी, होय. "

" आणखी कोणी वांटेकरी आहे यांत ? "

" नाहीं, मीच सोळा आण्यांचा मालक. "

" तुझ्या घराची झडती घ्यायची आहे. घरांतल्या बायकामंडळीला बाहेर येऊं दे. "

" कां नाईकसाहेब ? माझ्या घराची झडती कां ह्मणून होणार ? "

" तुझ्या घरांत चोरीचा माल आहे, अशी आह्मांला खबर मिळाली आहे. "

इतक्यांत पांडूहि तेथें येऊन पोहोंचला.

सखाराम आश्चर्यानें ह्मणाला "काय? चोरीचा माल? अन् तो माझ्या घरांत ? अगदीं बिलकूल नाहीं–कध्धीं नाहीं ! कुणीं दिली खबर तुह्माला ?

मामासाहेब घोड्यावरून खालीं उतरून थोडे तिरसटपणानें ह्मणाले " कुणीं दिली खबर तें सांगायला कांहीं आह्मी बांधलेले नाहीं!" एका शिपायानें त्यांचा घोडा धरला. दुसऱ्या शिपायाला मामासाहेब ह्मणाले "शेजारच्या कुणातरी दोघां इसमांनां बोलावून आण बरें पंचनाम्याला!"

मामासाहेब अंगणांत आले व पांडूकडे बोट दाखवून सखारामाला ह्मणाले "या इसमाच्या घराला भगदाड पडून चोरी झाली आहे, अन् तो माल तुझ्या घरांत आहे, अशी खबर आह्मांला मिळाली आहे. जर कांहीं कमीअधिक प्रसंग येऊं नये अशी तुझी इच्छा असेल, तर मुकाट्यानें आतांच्या आतां माल कुठें आहे, तो दाखवून दे. नाहीं दाखविणार, तर तुझें घर आह्मांला उलटेंपालटें करावें लागेल."

हे शब्द ऐकतांच सखारामाच्या मनावरचा शंकाकुशंकांचा प्रचंड बोजा खालीं पडल्यासारखा झाला. तो खिन्नपणें हंसून ह्मणाला "हेंच का सारें नाईकसाहेब? तर मग खुशाल घ्या माझ्या घराची झडती. माझ्या घरांत कसलाहि असा माल नाहीं. कुणा तरी माझ्या दुष्मनानें ही खोटी खबर आपणाला दिली आहे."

नंतर तो पांडूकडे वळून ह्मणाला "तूं रे कोण बाबा? तुझें नांव काय? घर कुठें?"

तत्क्षणीं मामासाहेबानीं पांडूकडे क्रोधकटाक्ष फेंकून ह्मटलें "चूप रहा—बोलूं नको कांहीं!"

सखाराम अवज्ञेनें ह्मणाला "नको सांगूं दे. माझ्या कोणत्या दुष्मनानें माझ्यावर हा खोटा आरोप घातला आहे, हें कळल्याशिवाय मला कधींहि रहायचें नाहीं. आज नाहीं कळलें, तर उद्यां तरी कळेलच! त्या वेळीं नाईकसाहेब! आपणाकडेच येऊन मी फिर्याद करीन. माझा ज्यानें उगीचच्या उगीच असा अपमान केला आहे, माझा लवमात्रहि अपराध नसतां मला ज्यानें व्यर्थ हैराण केलें, त्याचा न्याय आपणालाच करायला हवा. आपण या आंत. पेट्या, फडताळें, पेटारे यांच्या किल्ल्या मी आपल्या स्वाधीन करतों. आपल्या खुषीप्रमाणें करून घ्या झडती आपण!"

इतक्यांत शेजारचे तिघेचौघे लोक तेथें येऊन हजर झाले. ते बिचारे सर्वहि शेतकरी, अर्थात् अशिक्षित आणि भयानें घाबरगुंडी उडून गेलेले असल्यामुळें मामासाहेबांचा सारा कावा साधून आपणच नाईक असल्या-बद्दलचा त्यांनीं अप्रत्यक्षपणें केलेला बहाणा उघडकीला येणें शक्य नव्हतें. या तोतया 'नाईकसाहेबां'नां सलाम करून ते उभे राहिले. मामासाहेबांनीं कागद, शाई बाहेर काढून त्यांपैकीं प्रत्येकाचें नांव लिहून घेतलें. शेवटीं ते ह्मणाले "या घराची छडती घ्यायची आहे आह्मांला–तुह्मी साक्षी आहांत. आमच्याबरोबर या."

मामासाहेबांनीं नंतर प्रत्येक खोलींत जाऊन अगदीं कसून शोध करून पाहिला. पेट्या, फडताळें वगैरे सारीं उघडून त्यांनीं पाहिलीं. घरां-तील सर्व भांडींकुडीं आणि दागिने एकत्र करून त्यांनीं पांडूला विचारलें "बघ–या साऱ्या वस्तूंत तुझा माल आहे का कांहीं?"

पांडू हात जोडून ह्मणाला "नाहीं हुजूर!"

हातांतल्या छडीनें पांडूच्या खांद्याला टोंचून मामासाहेब ह्मणाले "बेट्या, न पहातांच काय सांगतो आहेस? अगोदर सारे जिन्नस नीट पहा, अन् सांग काय तें."

सर्व जिन्नस नीट पाहून पांडू ह्मणाला "नाहीं हुजूर! यांत माझा एकहि नग नाहीं."

मामासाहेब नंतर अंगणांत येऊन चहूंकडे बारकाईनें निरीक्षण करूं लागले. कोठेंहि जमीन खणून माल लपवून ठेवल्यासारखीं चिन्हें आहेत कीं काय, तें शोधून पहावयाला त्यांनीं शिपायांनां हुकूम केला. त्यांनीं चहूंकडे नीट शोधून पाहिलें, परंतु तसा संशय घेण्यासारखी जागा त्यांनां कोठेंहि आढळून आली नाहीं.

अंगणांत धान्यांचीं दोन मोठीं पालें दिसत होतीं, तिकडे अंगुलि-निर्देश करून मामासाहेब ह्मणाले "दोन्ही पालांत चोरीचा माल लपवून ठेवला आहे कीं काय, पहा बरें." तत्क्षणीं आपला पोषाक वगैरे उतरून दोघां शिपायांनीं त्या पालांत उड्या टाकल्या व त्यांतलें सर्व धान्य बाहेर काढलें; परंतु त्यांत कांहींहि सांपडलें नाहीं.

नंतर मामासाहेब सर्व मंडळीसह स्वयंपाकघराकडे निघाले व ह्मणाले "तर मग माल इथेंच लपवून ठेवला असला पाहिजे." सखाराम हरकत करीत असतांहि मामासाहेब स्वयंपाकघरांत शिरले व शिपायांनां ह्मणाले "सगळ्या हांड्या, शिंकीं, बासनें वगैरे काढा खालीं, अन् पहा आंत माल कांहीं सांपडतो का?"

शिपायांनीं त्याप्रमाणें केलें; परंतु तेथेंहि कांहीं माल त्यांनां आढळून आला नाहीं.

शेवटीं, मामासाहेब गोठ्याजवळ जाऊन ह्मणाले "आतां बहुतेक नाहींच कांहीं माल सांपडत असें दिसतें. बहुतकरून आह्मांला चुकीची खबर मिळाली असावी, असें वाटतें. तरी पण एकदां इथेंहि आल्याप्रमाणें शोध करून जावें ह्मणजे बरें. इथें ही मोठी जंगी गवताची गंजी दिसते आहे. ही अजून नाहीं आपण पाहिली. पहा बरें ही एकदां शोधून–नाहींच सांपडलें कांहीं, तर या भल्या माणसाला उगीच त्रास दिला आपण असें होणार आहे!"

मामासाहेबांच्या आज्ञेप्रमाणें शिपायांनीं गंजीचें गवत विसकटावयाला आरंभ केला. परंतु अधिक गवत काढण्यापूर्वीच त्यांतून कांहीं तांब्याचीं व पितळेचीं भांडीं बाहेर पडलीं! तीं दृष्टीला पडतांच पांडू उड्या मारून ह्मणाला "हींच माझीं भांडीं! तांबटानें हीं नीट केलीं नुकतींच. त्याचे डाग हे पहा दिसताहेत अजून!"

मामासाहेब पांडूकडे कांहीं वेळ पाहून सखारामाला रागानें ह्मणाले "काय सखारामजी! मोठे साधु, साव ह्मणून मिरवीत होतां नव्हे? हें काय हें निघालें यांतून? वा रे वा सभ्यपणा!"

गंजींतून भांडीं निघालेलीं पाहून बिचारा सखाराम तर आश्चर्यातिशयानें अगदीं हतबुद्धच होऊन गेला! आपल्या डोळ्यांवर त्याचा विश्वासच बसेना! कांहीं वेळ तर त्याच्या तोंडून शब्दच फुटेना! शेवटीं तो मोठ्या कष्टानें कांपतकांपत ह्मणाला "हें खास कुणातरी माझ्या कट्ट्या दुष्मनाचें काम असलें पाहिजे. मला संकटांत पाडण्यासाठीं कुणीं तरी हीं इथें लपवून ठेवलीं, खास!"

हेटाळणीच्या स्वरानें मामासाहेब ह्मणाले "दुष्मनाचें काम काय हें तुझ्या ? अस्सें ! आतां कोर्टांत जाऊन हाच जबाब दे तिथें ह्मणजे झालें. वावा ! काय डोकें तरी बेट्याचें पहा ! गोठ्यांत गवताच्या गंजींत माल लपवून ठेवला होतान् ! त्याला वाटलें होतें, कीं, झडती झाली, तर पेट्या, फडताळें,पेटारे यांची होईल–फार तर सारें घर पहातील शोधून! गोठा कोण पहातो आहे ? अन् ही गंजी उलगडून कोण बघतो आहे ? अरे, पण आह्मी आहों ना चोरावर मोर ? आमच्या डोळयांत तूं का धूळ टाकणार बेट्या ? चोर हरामखोर कुठचा !"

हे अपशब्द ऐकून त्या मानी सखारामाच्या अंगाची रागानें आगीआग होऊन गेली. डोळे लालबुंद करून तो कंपित स्वरानें ओरडला "खबरदार नाईकसाहेब ! उगीच शिव्याबिव्या देऊं नका मला ! तोंड संभाळून काय बोलायचें तें बोला—"

मामासहिब तुच्छतेनें ह्मणाले " काय ? चोर तर चोर अन् वर शिरजोरी चालवली आहेस हरामजाद्या ? लहान तोंडीं मोठा घांस घेतोस हलकट माणसा ? पाजी बेटा–बदमाष कुठचा ! सुभान्या पहातोस काय, चढव लेकाच्या हातांत हातकडी!" असें ह्मणून ते मनांत ह्मणाले "बरी संधि आली आतां–त्या भटाकडून आणखीहि उपटतों पैसे !"

सुभान्यानें तत्क्षणीं सखारामाला एक धक्का दिला. जवळच एक पेरूचें झाड होतें, त्यावर कसा तरी सांवरल्यामुळें तो जमिनीवर पडला नाहीं, इतकेंच; परंतु झाडाचीं टेंगळें त्याच्या हाताच्या पंजाला जोरानें लागून त्याची चामडी फाटली आणि त्यांतून जोरानें रक्तपात होऊं लागला. या धक्क्यांतून सखाराम उठतो न उठतो, तों दोघां शिपायांनीं त्याचे दोन्ही हात मागें ओढून धरले व सुभान्यानें त्याला चटकन् हातकडी लावली. सखारामाच्या कुटुंबांतील बायका कांहीं अंतरावर उभ्या होत्या, त्या सर्वांनीं हा प्रकार पाहून रडूनओरडून एकच हलकल्लोळ करून सोडला.

मामासाहेब जमिनीवर दोन लाथा मारून बायकांकडे पाहून ह्मणाले "चूप रहा एकदम !" असें ह्मणून त्यांनीं गलिच्छ भाषेंत त्यांना शिव्या

द्यावयाला आरंभ केला. मामासाहेब आपण कोण, हें यावेळीं आंजेबात विसरले! आज त्यांनां विलक्षण मद चढला होता.

आतां मात्र सखारामाला हें त्यांचें वर्तन सहन झालें नाहीं. तो ओरडूं लागला " नाईक,-तोंड संभाळून बोल-बायकांचा अपमान करूं नकोस! याद राखून ठेव. सातारला जाऊन तुझ्यावर मी फिर्याद करून तुला तुरुंगांत डांबीन. हें इंग्रज सरकारचें राज्य आहे! बेकायदेशीर अन्याय इथें एक दिवसहि नाहीं चालणार!" सखारामाच्या दोन्ही डोळ्यांतून क्रोधाच्या आणि क्षोभाच्या ज्वाला बाहेर पडत होत्या. क्षणोक्षणीं नाक फेंदारत होतें.

सखारामाचे शेवटचे शब्द ऐकून मामासाहेबांच्या हृदयाचा थरकांप झाला! आपणाला या कृत्याचें कदाचित् दारुण प्रायश्चित्त भोगावें लागेल, असा विचार मनांत येऊन त्यांचा चेहरा काळवंडला. परंतु तो क्षणमात्रच! त्यांनीं पुनः उग्र रूप धरून ह्मटलें "सुभान्या, लगाव रे साल्याच्या तोंडांत!"

सुभान्या हा हुकूम मान्य करावयाला अर्थातच कांकूं करूं लागला! स्त्रियांनीं पुनः एकच कलोळ केला.

हा सारा देखावा पाहून व बायकांचा कल्लोळ ऐकून पांडूचें हृदय अगदीं भडभडून आलें. अश्रुगद्गद कंठानें तो ह्मणाला " नाईकसाहेब! याला द्या सोडून-हीं भांडीं माझीं नाहींत!"

मामासाहेब डोळे फिरवून ह्मणाले " काय ह्मणालास?"

पूर्वीपेक्षां दृढ स्वरानें पांडू ह्मणाला " जी, हीं भांडीं माझीं नाहात याला सोडून द्या."

मामासाहेब गर्जना करून ह्मणाले " काय? तुझीं नाहींत हीं भांडीं? तर मग आतां कां सांगितलेंस, कीं, हीं भांडीं आपलीं ह्मणून?"

" तें मीं खोटें सांगितलें."

मामासाहेब सभमांत ओरडून ह्मणाले " काय? माझ्यासमोर खोटा कबुलीजबाब? तर मग तुझ्यावरच सुळीं खटला चालवतों. तुला सात वर्षे पाठवतों चामडीं कुटायला. सुभान, येऊन दे हातकडी!"

जरी दुसरी हातकडी बरोबर आणलेली नव्हती, तरी सुभाना बॅगमध्यें हातकडी शोधावयाचें ढोंग करूं लागला.

कपाळांत डोळे चढवून पांडूनें विचारलें "खोटा कबुलीजबाब दिला, तर काय तुरुंगाची शिक्षा होते?"

मामासाहेब हेटाळणीच्या स्वरानें ह्मणाले "नाहीं–तुरुंगाची शिक्षा कशानें होणार आहे? लाडूपुऱ्या खायला मिळतील समजलास? सुभाना, लगाव हातकडी!"

पांडू हात जोडून कांपतकांपत ह्मणाला "तर मग नाईकसाहेब, हीं भांडीं माझींच आहेत." असें ह्मणून ज्या बाजूला बायकामंडळी उभी होती, तिकडे पाठ करून वर आकाशाकडे तोंड करून तो उभा राहिला.

मामासाहेबांनीं कागद, शाई वगैरे घेऊन भांड्यांची याद करून टाकली व त्या यादीवर त्यांनीं साक्षीदारांच्या सह्या घेतल्या. कदाचित् पांडू भांडीं आपलीं नव्हेत, असें पुनः ह्मणेल, ह्मणून त्याच्याहि आंगठ्याचा छाप त्यांनीं बाजूला घेऊन ठेवला.

इतक्या अवकाशांत आणखीहि कांहीं शेजारी येऊन उभे राहिले होते. त्यांपैकीं एक ह्मातारा माणूस पांडूच्या मोठ्या मुलाबरोबर एकीकडे कांहीं हळुहळू बोलूं लागला. नंतर तो मुलगा बायकांजवळ जाऊन हळूच सांगूं लागला. यांपैकीं प्रत्येक गोष्ट मिस्किल मामासाहेबांच्या काकदृष्टींतून चुकली नाहीं. हें एकंदर प्रकरण काय असावें, याचा धूर्त मामासाहेबांनां केव्हांच अंदाज झाला होता.

मामासाहेब नंतर उंच स्वरानें बोलूं लागले "इकडे तर सारें ठीक झालें. आतां एक शिपाई हीं भांडीं बांधून घेऊं दे. सुभाना, आरोपीच्या कमरेला एक रश्शी बांध. कमळ्या अन् गण्या, त्या दोरीचीं दोन शेवटें तुह्मी आपल्या हातीं धरा. रस्त्यांत बेटा जर कांहीं बदमाषगिरी करूं लागला, किंवा चालायला वेळ लावूं लागला, तर सुभाना, मार कमरेंत एक लाथ! रस्त्यानें जातांना चिंचेचे दोन फोंक काढून घ्या बरोबर. ठाण्यावर गेल्यावर आरोपीनें जर लवकर नाहीं गुन्हा कबूल केला, तर करायचा त्या फोंकांचा उपयोग–चल, बांध कमरेला रशी!"

सुभानानें दोरी बाहेर काढली. हें पाहून बायकांनीं फिरून कल्लोळ केला.

तो वृद्ध तेव्हां मामासाहेबांच्या जवळ येऊन म्हणाला "हुजूर, इकडे या जरा."

'हुजूर' अगदीं बेपर्वाईनें त्या वृद्धाबरोबर निघाले अंगणाच्या टोंकाला जाऊन उभे राहिल्यावर म्हातारा म्हणाला "नाईकसाहेब! कांहीं उपाय बघा–नाहींतर गरीब फुकट मरून जातो आहे!"

"मग त्याला मी काय उपाय करूं?"

"गरीबाची बायको, दोन कच्चींबच्चीं आहेत. सत्यानाश होईल बिचाऱ्याचा. दया करा, द्या त्याला सोडून."

"अहो, दया करणार मी कोण? मी कसा सोडूं याला? कायदा का मीं केला आहे? मी सरकारचें मीठ खातों–सरकारचा कायदा जो मोडतो, त्याला का मला सोडून देतां येईल?"

"हो, न यायला काय झालें? आपणच गरीबांचे मायबाप. आपण मनांत आणलें, तर काय वाटेल तें होईल बघा."

असल गोष्ट बोलावयाला म्हातारा कांकूं करतो आहे, असें पाहून मामासाहेब अधीरपणें म्हणाले "या साऱ्या फालतू गोष्टी ऐकायला मला नाहीं वेळ. काय बोलायचें असेल, तें झटपट बोला!"

म्हाताऱ्यानें इकडेतिकडे पाहून म्हटलें "नाईकसाहेब! याची कितीवर सुटका होईल?"

"सुटका करतां येईल, असें तर मला नाहीं वाटत. अच्छा–त्याबद्दल मागून करूं विचार. मी सांगतों तें नीट ऐका. मी माझ्या लोकांनां काय हुकूम दिला आहे, तो ऐकलात ना कानांनीं? मी मोठा करडा आहे. जें मीं एकदां म्हटलें, तें केल्याशिवाय कधींहि रहायचा नाहीं–अधिक करीन, पण कमी नाहीं. आतां नमद शंभर जर मला देत असाल, तर कमरेची दोरी, हातकडी वगैरे खोलतों, आणि नुसता आमच्याबरोबर आरोपीला नेतों. कबूलजबाबासाठीं आम्ही त्याला कोणत्याहि प्रकारें त्रास देणार नाहीं. फक्त ठाण्यावर आम्ही याला ठेवूं, म्हणजे झालें. पाहिजे तर

तुमच्यापैकीं एकादें माणूस जाऊन त्याला शिजवूनहि घालील. त्याच्यां बोलाचालायलाहि तुह्माला सांपडेल. पण यासाठीं नगद शंभर हवे बाकीच्या गोष्टी आपण संध्याकाळीं बोलूं.''

एकीकडे मामासाहेब आणि दुसरीकडे बायकामंडळी यांच्यामध्यें त्य वृद्धानें कांहीं फेऱ्या घातल्या. शेवटीं अशी तोड झाली, कीं, आतांच्य आतां साठ रुपये त्यांनीं मामासाहेबांच्या हातावर रोख ठेवावे. त्य प्रमाणें व्यवस्था होऊन, आरोपीला घेऊन मामासाहेब निघून गेले.

जातांजातां मिशांवर ताव देऊन मामासाहेब ह्मणाले "वारे या मामाचं अद्भुत कारवाई! नुसत्या भोळ्या मंडळीलाच मीं फसविलें, एवढेंच नाहीं तर खुद्द पोलिसलाहि फसवून त्यांच्याच हातून माझें काम करून घेतलें शिवाय आतां आणखीहि कांहीं जादा लग्गा मिळण्याचा संभव दिसत आहे तो निराळाच! मरतांमरतां आमची ताई माझ्यावर हे उपकार करून गेली ह्मणायची! नाहीं तर आमचे नाईकसाहेब शुद्ध धर्मराज एक पै कांहीं कधीं मला मिळाली नाहीं खायला त्यांच्या कारभारांत!"

दुसऱ्या दिवशीं पत्रानें केशवरावांनीं सर्व हकीगत रावसाहेबांनां कळवून आणखीहि लिहिलें " सखाराम कुडव पैसेवाला माणूस दिसतो. नाईकांनां पांचशें रुपये देऊन त्यानें सुटून जावयाची खटपट केली. हें ऐकतांच मीं नाईकांनां आणखीहि शंभर कबूल केल्यावर त्यांनीं त्याच्यावर चारशें अकरा कलमाप्रमाणें खटला केला आहे. जे पुढें होईल, तें हुजुरांनां मी कळवीनच."

---

## प्रकरण सत्तेचाळिसावें.

## वैराग्य पुरें झालें !

दीडप्रहर दिवस उलटून गेला होता. चांपवलीकडून पळसगांवाकडे जाणाऱ्या नदीच्या रस्त्यानें मनोहरपंत एकटेच हलुहलु चालले होते. हलुहलु असें ह्मणावयाचें कारण इतकेंच, कीं, त्यांच्या देहांत आतां कांहींच त्राण राहिलें नसल्यामुळें त्यांचें पाऊलच मुळीं उठत नव्हतें.



"कदाचित् याला कांहीं कॉलऱ्यासारखा रोग तर नाहीं झाला ?"

(पृष्ठ ४८६.)

चालूनचालून त्यांच्या पायांची चाळण होऊन त्यांनां अतिशय वेदना होत होत्या. कालपासून मनोहरपंतांच्या पोटांत अन्नाचा एक कणहि गेला नव्हता. आज घराच्या बाहेर पडून त्यांनां जवळजवळ दोन आठवडे होऊन गेले होते; परंतु इतक्या दिवसांत जे दोन दिवस ते इन्स्पेक्टर-साहेबांबरोबर होते, तेवढे दोनच दिवस काय तो त्यांनां नियमितपणें आहार मिळाला होता. त्या वेळेपासून अन्नाचें दर्शन त्यांच्या अदृष्टांतच फारसें नव्हतें, असें म्हटलें तरी चालेल! एकाद दिवस नुसतीं फळेंमुळें खाऊनच काढावा, तर एकाद्या दिवशीं कोठें मिळालेल्या दुधावरच सारा दिवस कंठावा आणि एकाद्या वेळीं तर नुसत्या फुटाण्यांवरच रहावें! मनोहरपंतांनां लाज सोडून लोकांकडे जर कांहीं खावयाला मागतां येतें, तर त्यांनां हे उपवासाचे हाल काढावे लागते ना! परंतु कोणत्याहि प्रकारें भिक्षा किंवा याचना करणें मनोहरपंतांच्या हातून कधींहि संभवनीय नव्हतें. आपण काशीला निघालों आहों, असें त्यांनीं इन्स्पेक्टर-साहेबांपाशीं सहज सांगतांच त्यांनीं तेथपर्यंतचें रेल्वेभाडें त्यांनां देऊं केलें; परंतु तें दान घ्यावयाला मनोहरपंत कांहीं केल्या कबूल झाले नाहींत. आतां प्रवासाची अमुकच दिशा त्यांनीं धरली नव्हती. सद्गुरूच्या आशेनें ते कोठें तरी भटकत चालले होते. त्यांच्या खांद्यावर ती झोळी, डाव्या हातांत तो कमंडलु, बगलेंत तें मृगचर्म—त्यांचें भगवें वस्त्र व उत्तरीय तर अतोनात मलिन झालेलीं! डोकीवरचे केंस धुळीनें भरून गेलेले डोळे अगदीं खोल गेलेले! असा मनोहरपंतांचा एकंदर थाट होता.

रस्त्याच्या एका बाजूनें वृक्षांच्या छायेच्या खालूनखालून मनोहरपंत चालले होते. मधुनमधून चारदोन शेतकरी लोक रस्त्यानें [illegible]तयेत होते. उन्हाचा ताप जसजसा वाढत चालला होता, तसतसा मनोहरपंतांचा चालण्याचा वेगहि अगदीं मंदमंद होत आला होता. आणखी दीड कोस रस्ता तोडला, म्हणजे पळसगांव. तेथें पोहोंचल्यानंतर [illegible] स्वतःच्या प्रवृत्तीनें जर मनोहरपंतांनां कोणी खावयाला दिलें, [illegible] होतें!